श्रीशंकर

# संतकवि श्रीदासगणूमहाराज

## व्यक्ति आणि वाङ्‌मय

लेखक

अ. दा. आठवले

प्रस्तावना

प्राचार्य हरिभक्तिपरायण

श्री. शं. वा. दांडेकर

पुरस्कार

महामहोपाध्याय

श्री. दत्तो वामन पोतदार

प्रबोधिनी एकादशी शके १८७७

मूल्य साडेसात रुपये



श्री. धोंडो दत्तात्रेय

ऊर्फ

श्री. बाबासाहेब नांदेडकर

जन्म शके १७९०　　　　मृत्यु १८६२

श्रीशंकर

नांदेड येथील ख्यातनाम वकील, थोर सद्गृहस्थ
श्री.ती. दादांचे जिवलग स्नेही, आणि भक्त,
ज्यांनीं पितृतुल्य वात्सल्यानें माझ्या हिताची
चिंता वाहिली,
त्या कै. तीर्थरूप बाबासाहेबांच्या
आदरणीय स्मृतीस
श्रद्धापूर्वक समर्पण—

विनीत
अ. दा. आठवले.

श्रीशंकर

# निवेदन

संतकवि श्रीदासगणूमहाराज यांच्या जीवनाचा व वाङ्मयाचा परिचय सुशिक्षित वर्गास व्हावा यासाठीं हा ग्रंथ लिहिला गेला आहे. श्रीदासगणूमहाराज हे भगवद्भक्त, रसाळ कीर्तनकार व प्रासादिक संतकवि या नात्यानें भाविक जनांमध्यें प्रसिद्ध असले तरी, त्यांच्या विशाल काव्यसंपदेची ओळख अलीकडील विद्वानांना विशेषशी नाहीं, ही बोंच मला बरेच दिवसांपासून जाणवूं लागली. वाढत्या वया-बरोबर जसजसा माझा श्री. ती. दादांच्या काव्याशीं अधिकाधिक परिचय होत गेला, कीर्तनाच्या निमित्तानें या काव्याचा व्यासंग स्वाभाविकपणेंच अधिकाधिक घडत गेला, तसतसें दादांच्या काव्याला कांहीं वेगळीच गोडी आहे असें मला वाटूं लागलें. वाचनाची आवड असल्यामुळें साहित्यगुणांशीं माझा थोडाबहुत परिचय झालेला होता. त्याहि दृष्टीनें हें काव्य सरस आहे, असें माझ्या अनुभवास आलें. केवळ भाविक म्हणूनच नव्हे तर सर्वसामान्य सुशिक्षित रसिक म्हणूनहि या काव्याचें आलोडन करणें आवश्यक आहे. पण त्यासाठीं तें जनतेच्या पुढें आलें पाहिजे.

कीर्तनप्रवचनांच्या द्वारां झालेला या वाङ्मयाचा प्रसार मर्यादित क्षेत्रांतच होतो. एक विशिष्ट वर्ग या प्रचारसाधनाकडे अगदीं तुच्छतेनें नसलें तरी उपेक्षेनेंच पाहतो. त्यामुळें निराळ्या पद्धतीनें श्री. ती. दादांचें काव्य लोकांच्यापुढें मांडलें जावें म्हणून हा ग्रंथ लिहिण्याचा उपक्रम मीं केला. या काव्यासंबंधीं मीं केलेलें गुणदोषविवेचन वा प्रतिपादिलेलें मत सगळ्यांनाच मान्य होईल, असें मला मुळींच म्हणावयाचें नाहीं. या तऱ्हेच्या लेखनाविषयींच्या माझ्या मर्यादांची मला जाणीव आहे. परंतु महाराजांचें काव्य डोळ्यासमोरच न येणें हें मात्र मराठी भाषेच्या दृष्टीनें इष्ट नाहीं असें वाटून मीं हा प्रयत्न केला. प्रसाद प्रकाशनानें प्रसिद्ध केलेल्या महाराष्ट्र परिचय या विस्तृत सांगोपांग आणि अद्ययावत् माहितीनें भरलेल्या जाडजूड ग्रंथांतहि, ज्यांनीं मराठीच्या साहित्य संपदेंत मोलाची भर घातली, त्या श्रीदासगणूमहाराजांचा उल्लेखाहि नसावा हें पाहून मला सखेदाश्चर्य वाटलें. फारच

थोड्या ठिकाणीं श्रीदासगणूमहाराजांचा उल्लेख आढळतो. मराठीच्या वाङ्मयाचा निरनिराळ्या दृष्टिकोनांतून आढावा घेणारे वा समालोचन करणारे अनेक ग्रंथ गेल्या पंचवीस तीस वर्षांत प्रकाशित झालेले आहेत. परंतु त्या ग्रंथांच्या विद्वान लेखकांनाहि एक लाखाच्या घरांत कविता लिहिणाऱ्या कविवर्यांची ओळख मुळींच नसावी वा असलीच तर नांवापुरतीच असावी असें माझ्या प्रत्ययास आलें.* यामुळेंच हा ग्रंथ लिहिण्याची इच्छा माझ्या मनांत प्रबल झाली.

याव्यतिरिक्त कांहीं आनुषंगिक कारणेंहि आहेत. महाराजांच्या पुष्कळशा काव्यग्रंथाचे प्रकाशक कै. विठ्ठल लक्ष्मण सुबंध यांच्या मनामधें श्रीदासगणू-महाराजांच्या संबंधींचा चरित्र व काव्यविवेचनात्मक ग्रंथ लिहून प्रसिद्ध करण्याची प्रबल इच्छा होती. त्यांनीं तसें प्रगटहि केलें होतें. कै. श्री. सुबंध निष्ठावंत भाविक आणि मोठे साक्षेपी गृहस्थ होते. त्यांनीं टिपणाची जुळवाजुळवहि केली होती. प्रत्यक्ष लेखनास आरंभ झाला नसला तरी कै. सुबंधांनीं साधनें गोळा करण्याचा उदंड प्रयत्न केला होता. पण त्यांच्या अकालींच घडलेल्या मृत्यूमुळें सर्व कल्पना जागच्या जागींच राहिल्या. त्यांच्या हातून ग्रंथलेखनाचें काम पुरें झालें असतें तर फार बहार झाली असती यांत शंका नाहीं. तें व्हावयाचें नव्हतें आणि म्हणून मला त्या स्वरूपाचा पण थोड्या वेगळ्या प्रकारचा हा ग्रंथ लिहिण्याचा उपक्रम करावा लागला. हें चरित्र आणि काव्यविवेचन नाहीं. त्या दोन्हींचा व्याप याहून खूपच विस्तृत आणि साधार असावयास पाहिजे. येथें केवळ जीवनाचा परिचय व्हावा म्हणून विस्तृत व्यक्तिदर्शन होईल असें लेखन केलें आहे. येथील चरित्रविषयक भाग म्हणजे यथातथ्य पण रेखाचित्र आहे. छायाप्रकाश आणि विविधरंग यांनीं चित्राला येणारा बारकावा येथें नाहीं. श्रीसाईबाबा चित्रपट आणि द्वारकामाई मासिकांतून प्रसिद्ध झालेलें साईबाबांचें चरित्र या दोन ठिकाणीं आलेल्या संदर्भावरून श्री. ती. दादांचे पूर्वायुष्याविषयीं एक प्रकारचा गैरसमज झालेला दिसतो. तो दूर व्हावा यासाठीं एक

---

* हैदराबाद येथील विद्वान् प्राध्यापक कै. चिं. नि. जोशी हे मात्र माझ्या विधानास अपवाद समजावे. त्यांनीं आपल्या 'मराठवाड्यांतील वाङ्मय' या ग्रंथांत ती. दादांच्या ग्रंथाचें समालोचन ५० पृष्ठांत मार्मिकपणें केलें आहे. त्यांना वाट पुसतच मीं या ग्रंथांतील महत्त्वाचा कांहीं भाग लिहिला आहे हें साभार सांगणें माझें कर्तव्य आहे.

संकलनात्मक लेख लिहिण्याचा हा प्रयत्न केला आहे. काव्यासंबंधीं सांगोपांग चर्चा न करितां स्पष्ट परिचय व्हावा असें दिग्दर्शन केलें आहे.

नांदेड येथील महाराजांच्या चहात्यांनीं त्यांच्या सत्कारसमारंभाची एक व्यापक योजना आंखली होती, व १९४६ मध्यें ती त्यांनीं जाहीरहि केली होती. पत्रकें वगैरे प्रसिद्ध करून देणग्या मिळविण्यासहि आरंभ झाला होता. त्या सत्काराच्या कार्यक्रमापैकीं दासगणूदर्शन या नांवाचा एक गौरव ग्रंथ प्रसिद्ध करण्याची कल्पना प्रमुख होती. चरित्रविषयक भाग व निरनिराळ्या लोकांचे श्रीदासगणूमहाराजांबद्दलचे लेख प्रसिद्ध करून हा ग्रंथ निर्माण केला जावयाचा होता. चरित्रविषयक भाग लिहिण्याचें काम मजवर सोंपविलें गेलें होतें. परंतु अनेक कारणांनीं व सत्कार-समारंभास असलेल्या श्रीदासगणूमहाराजांच्या वैयक्तिक तीव्र विरोधामुळें सर्वच कार्य स्थगित झालें. त्यांतच गौरव ग्रंथाची कल्पनाहि विरघळली. सोंपविलेल्या जबाबदारींतून पार पडण्यासाठीं १९४६ सालीं मीं ज्या प्रांतांत महाराजांनीं आपलें पूर्वायुष्य घालविलें, तो नगर जिल्ह्याचा भाग दहा बारा दिवस स्वतः हिंडून पाहिला. महाराजांच्या पूर्वायुष्याशीं समकालीन असलेल्या सुमारें पन्नास व्यक्तींच्या गांठीभेटी घेतल्या. मिळतील त्या आठवणी व सांपडेल तें काव्य गोळा केलें. त्यांचें टांचण टिपण केलें. आणि त्यावरून सुमारें चाळीस पानें मजकूर चरित्राचा पूर्वभाग म्हणून लिहून काढला. तें लिखाण मजजवळ आजवर तसेंच पडून होतें.

पुढें पुण्यास स्थायिक झाल्यावर एकदां माझे शेजारी व मित्र श्री. रामचंद्र विनायक सोमण यांच्याशीं गप्पा मारीत बसलों असतांना महाराजांच्या काव्यासंबंधींच्या गोष्टी निघाल्या. श्री. रामभाऊ सोमण म्हणाले ‘ आजपर्यंत या तऱ्हेच्या काव्याची मला मुळींच कल्पना नव्हती. तुमच्या अधिक मासांतील कीर्तनामुळें ही माहिती होत आहे. खरोखरीच आजपर्यंत हें वाङ्मय आम्हांला वाचावयास सांपडलें नाहीं, ही खेदाची गोष्ट आहे. माझ्यासारखीच अनेक सुशिक्षितांची स्थिति असणार. ’

“ खरें आहे तुमचें म्हणणें. ती. दादांचें काव्य एका मर्यादित क्षेत्राच्या बाहेर कधीं पडलेंच नाहीं आणि या स्वरूपाची प्रसिद्धि मिळावी अशी कल्पनाहि दादांच्या मनांत कधीं आलेली नसल्यामुळें काव्याचा तसा प्रसारहि झाला नाहीं. ”

“ मग तो करणें आतां तुमचें कर्तव्य आहे.” एवढेंच म्हणून न थांबतां श्री. सोमण यांनीं दादांच्या समग्र काव्यवाचनाचा व त्याचीं टिपणें घेण्याचा कार्यक्रम लगेच

आखला. वाचनाची वेळ निश्चित केली आणि लेखकू बनण्याचें त्रासदायक काम स्वतः पत्करलें. मला अळंटळं करण्यास सवडच ठेविली नाहीं. रोज तास दीडतास काव्याचें वाचन करून त्याची विषयवारीनें नोंद सुरू झाली. माझ्या अव्यवस्थितपणावर पूर्णपणे दडपण ठेवून हें काव्यवाचनाचें काम श्री. सोमणांनीं मजकडून तडीस नेवविलें. इतकेंच नव्हे तर विद्यार्थ्याला गृहपाठ करून आणलास कीं नाहीं ? कां आणला नाहीं ? तें विचारावें अशा स्वरूपांत आपल्या शिक्षकपणाला शोभेल अशी निकड माझ्यामागें सतत लावून ग्रंथलेखनाचें काम ठराविक मुदतींत पूर्ण करावयास लाविलें. म्हणूनच माझ्या हातून हें काम पूर्ण झालें. आणि फार दिवसांच्या इच्छेला मूर्त रूप आलें. त्यामुळें ग्रंथाच्या प्रकाशनाचें बहुतेक श्रेय वस्तुतः श्री. भाऊराव सोमणांचें आहे.

ग्रंथाचें लेखन चालू असतांना श्री. द. स. गोखले, श्री. भानूराव जोशी यांनीं अत्यंत आस्थेनें लिखाण वरचेवर पाहिलें आणि सप्रेम प्रोत्साहन देऊन उपयुक्त सूचना केल्या. श्री. दा. न. शिखरे आणि राय किणीकर यांनींहि कांहीं थोडा फेरपालट सुचविला. लोणावळा येथील काचरे, जोशी, खिरे, नाईक इत्यादि बालगोपालांनीं प्रकरणवारीनें काढलेल्या वेच्यांच्या २५ वह्या लिहून काढल्या. अशा रीतीनें अनेकांचे अनेक प्रकारें साह्य होऊन हा ग्रंथ पुरा झाला.

यानंतर प्रश्न पडला तो ग्रंथाच्या प्रसिद्धीचा. प्रकाशनपूर्व ग्राहक मिळवावे व त्यासाठीं महाराजांशीं ज्यांचा परिचय आहे अशा सर्व व्यक्तींकडे एक विनंतीपत्रक पाठवावें अशीहि कल्पना श्री. सोमणांनीं काढली आणि पुस्तकाचे पहिले ग्राहक पण तेच झाले. पुस्तकाच्या मदतीसंबंधींचीं पत्रकें निरनिराळ्या व्यक्तींना पाठविण्याचें काम चि. छगन बारटक्के यानें अंगावर घेऊन उत्तम रीतीनें पार पाडलें. पत्रव्यवहाराचा अत्यंत कंटाळा असलेल्या माझ्या हातून अन्यथा हें काम होतेंच ना. सुमारें अडीचशें व्यक्तींनीं ग्राहक म्हणून नांवें नोंदवून मला उपकृत केलें.

कांहीं थोड्या व्यक्तींनीं देणगीदाखल लहान मोठ्या रकमा पाठवून ग्रंथाच्या प्रकाशनाचा भार आपलेपणानें उचलला. त्या सर्वांचे जेवढे उपकार मानावे तेवढे थोडेच आहेत; पण तरीहि ग्रंथाची पृष्ठसंख्या मूळच्या कल्पनेपेक्षां अडीचशें तीनशें पानांनीं वाढल्यामुळें प्रकाशनाचा खर्च त्या प्रमाणांत पुष्कळच वाढून आवश्यक त्या रकमेच्या अभावीं प्रकाशनाला किती विलंब होतो कोण जाणें अशी चिंता वाटू

लागली. परंतु माझे मित्र श्री. गोविंद दत्तात्रेय गोखले यांनीं मला वाटणारी चिंता नाहींशी केली. श्री. गोविंदरावांचें साहाय्य झालें नसतें तर ग्रंथप्रकाशन झालें असतें कीं नाहीं कोणास ठाऊक. श्री. गोविंदराव यांच्याविषयीं कोणत्या शब्दांत मीं माझ्या भावना व्यक्त कराव्या तें मला समजत नाहीं.

ग्रंथप्रकाशनासाठीं श्री. ती. दादांच्या संमतीचीहि मोठी अडचण होती, परंतु अनेक प्रकारांनीं वादविवाद करून आणि श्री. द. स. गोखले, श्री. नारायणराव गर्दे, तारमास्तर का. के. गाडगीळ, श्री. संगमनाथ अप्पा सोमावार, श्री. दिगंबर बाबा पत्तेवार, श्री. तात्यासाहेब कोठाळकर इत्यादि महाराजांच्या निकटवर्तीयांच्या अनुरोधामुळें व माझे सर्वच हट्ट पुरविणाऱ्या वत्सलतेमुळें श्री. ती. दादांचा विरोध संमति समजण्याइतका सौम्य झाला आणि त्या पडत्या फळाची आज्ञा घेऊन मी ग्रंथप्रकाशनाच्या सिद्धतेस वेगानें लागलों.

नांदेड येथील नियोजित सत्कारमंडळाचे अध्यक्ष आणि कार्यवाह श्री. देविदासराव लव्हेकर वकील व श्री. माधवराव नांदेडकर या उभयतांनीं ' आमचेंच कार्य तुम्ही पार पाडीत आहांत असेंच आम्ही समजतों ' असें म्हणून सत्कार-मंडळाकडे जमा झालेले पांचशें रुपये आपण होऊन ताबडतोब माझ्या स्वाधीन केले. या साहाय्याबद्दल मी सत्कारमंडळाचा व अध्यक्ष कार्यवाहांचा अत्यंत आभारी आहें. असें साह्य मिळालें म्हणून फार दिवस संकल्पित असलेलें हें कार्य पार पडत आहे.

व्यक्तिदर्शन ( चरित्र ), वाङ्मयपरिचय आणि वेचे असे या ग्रंथाचे तीन भाग आहेत. वेच्यांतील विविध विचार हें प्रकरण विषयवारीनें सर्वच ओवीबद्ध ग्रंथांतून एकत्र केलेलें असल्यामुळें एक ओवी या ग्रंथांतील तर दुसरी दुसऱ्या ग्रंथांतील असें झालेलें आहे, त्यामुळें स्वीकृत ओव्यांचे पत्ते देणें सोईचें नव्हतें. विचक्षणांनीं यासाठीं क्षमा करावी.

या ग्रंथास प्रस्तावनालेखक म्हणून हरिभक्तिपरायण श्री. शं. वा. ऊर्फ सोनूमामा दांडेकर लाभले हें मी माझें भाग्य समजतों. विनंती करितांच त्यांनीं आपलेपणानें होकार दिला आणि विस्तृत प्रस्तावना लिहून दिली. प्राध्यापक महामहोपाध्याय श्री. दत्तो वामन पोतदार यांचा आणि महाराजांचा ऋणानुबंध फार जुना. त्यांनीं अत्यंत आपुलकीनें ग्रंथास पुरस्कार लिहिण्याचें मान्य केलें व जिव्हाळ्याचा लेख

लिहून दिला. या उभयतां थोर व्यक्तींसंबंधीं मला वाटणारी कृतज्ञता शब्दांनीं व्यक्त करतां येणार नाहीं.

पुस्तकाचें बाह्यांग आकर्षक असावें या दृष्टीनें त्यांत कांहीं छायाचित्रें असावींत. ग्रंथाच्या अंतरंगालाहि तीं उपकारक होतील· या कल्पनेनें छायाचित्रांची निवड करण्यासंबंधीं प्रसिद्ध चित्रकार द. धों. रेगे यांनीं आपल्या कलात्मक दृष्टीनें मला फार साहाय्य केलें. श्री. रेगे यांचें चित्रकलाकौशल्य पाहून त्यांच्या हातून दादांचें एखादें रंगीत चित्र तयार होऊन मिळालें तर पुस्तकामध्यें एक रंगीत आणि सुंदर चित्र देतां येईल असें मला वाटलें. त्याप्रमाणें मीं श्री. रेगे यांना जरा भीतभीतच विनंती केली व ती त्यांनीं आपल्या पत्नीच्या भावनेखातर मोठ्या आनंदानें मान्य केली. फार थोड्या वेळांत ती. दादांचें एक सुंदर व यथातथ्य रंगीत चित्र काढून दिलें. विशेष म्हणजे हें सर्व काम त्यांनीं अत्यंत निरपेक्षपणानें केलें. पुस्तकाच्या सजावटीसंबंधीं त्यांच्या सूचनांचा मला फार उपयोग झाला. श्री. रेगे यांचे जेवढे आभार मानावे तेवढे खरोखर अपुरेच पडतील.

मुद्रणप्रत लिहिण्याच्या कामीं कन्याशाळा पुणें येथील शिक्षक श्री. गो. वि. चिपळूणकर यांनीं परिश्रमपूर्वक साहाय्य केलें. विद्यार्थीमित्र शि. शि. अळगुंडगी, दिवाकर जोशी यांनींहि या कामीं हातभार लाविला हें आभारपूर्वक मान्य केलें पाहिजे.

पुस्तकाची छपाई आकर्षक करण्याचें काम श्री. शासाहेब पटवर्धन यांनीं आपलेपणानें केलें आहे. वेष्टणाची सजावट श्री. भय्यासाहेब ओंकार यांची आहे. दोघांचाहि मी आभारी आहें.

परमेश्वराच्या कृपेनें आणि श्रीसद्गुरूंच्या आशीर्वादानेंच हें कार्य पार पाडलें आहे. त्यांचे चरणां प्रणिपात समर्पण करून हें निवेदन पूर्ण करतों.

गणुदास दास

**अ. दा. आठवले**

# प्रस्तावना

**तेहि प्राणापरौतें। आवडती हें निरुते ।**
**जे भक्तचरित्रातें। प्रशंसती ॥**

ज्ञा. अ. १२-२२७

'आधुनिक महिपति' म्हणून उभा महाराष्ट्र ज्यांना ओळखतो त्या श्रीदासगणू-महाराजांच्या चरित्राची व वाङ्मयाची ओळख करून देणारें पावणेसहाशें पानांचें 'संतकवि श्रीदासगणूमहाराज व्यक्ति व वाङ्मय' हें पुस्तक लिहून आयुर्विद्या-पारंगत श्री. अनंतराव आठवले यांनीं संतवाङ्मयविषयक व चरित्रविषयक ग्रंथांत एका उत्कृष्ट ग्रंथाची भर घातली आहे यांत शंका नाहीं व त्याबद्दल त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करणें अवश्य आहे.

गणित, अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान इत्यादि शास्त्रीय विषयांवर स्वतंत्र ग्रंथ लिहिण्यापेक्षां एका दृष्टीनें चरित्र—मग तें 'आत्मचरित्र असो अथवा दुसऱ्याचें असो' लिहिणें सोपें वाटतें हें खरें आहे. पण त्यालासुद्धां एका विशिष्ट प्रकारच्या मनोरचनेची व साहित्याची गरज असल्यानें चरित्र लिहिणें हें सुद्धां नाजुक व अवघड असें काम आहे.

ज्या थोर पुरुषांचीं चरित्रें लिहिलीं जातात त्यांमध्यें आपली माहिती स्वतःच देणारे फारच थोडे असतात. जे कांहीं थोडे माहिती देतात ते आपल्या आयुष्यांतील कांहीं घटनांचा प्रसंगोपात्त कोठेंतरी उल्लेख करतात. पण त्यांनीं अशा सांगितलेल्या फुटकळ माहितीबद्दल त्या घटना कां, कशा, कोठें व केव्हां घडल्या ह्यांचा विचार करून एक सुसंगत अशी गोष्ट तयार करून एक संपूर्ण जीवन-चरित्र तयार करणें हें एक अवघड काम होऊन बसतें. कारण, जे फार मोठे लेखक आहेत त्यांना जगाला जो संदेश द्यावयाचा असतो त्यांतच ते इतके विरून गेलेले असतात कीं त्यांना आपल्या स्वतःच्या वागणुकींतील सुसंगता दाखविण्यास फुरसतच नसते. ज्या अतिशय मोठ्या व्यक्ति आहेत त्यांच्यांत तर ती दाखवावी

अशी वृत्तिच नसते. ह्यामुळें त्यांच्या जवळ बरींच वर्षें राहणारा चरित्रलेखक लाभला तरच त्यांचें चरित्र जगाच्या पुढें सुसंगतपणें येण्याचा संभव असतो.

पण खरें सांगावयाचें तर नुसता मोठ्या लोकांच्या जवळ बरींच वर्षें राहणारा असा नुसता मनुष्य मिळूनहि खरें चरित्र जगास मिळेलच असें नाहीं. कारण, थोर पुरुषाच्या जवळ राहणाऱ्या सर्वांनाच त्याच्या थोरवीची खरी किंमत कशांत आहे हें ठाऊक असतेंच असें नाहीं. उदाहरणार्थ म्हणून मी पुढील गोष्ट सांगतों. त्या योगानें माझ्या वरील म्हणण्याचा अभिप्राय वाचकांच्या लक्षांत येईल :—

माझे गुरुजी वै. जोगमहाराज ह्यांना पिनस होता, त्यामुळें ते तपकीर ओढत असत. ते वैकुंठवासी झाल्यानंतर एका त्यांच्या भक्ताची व माझी गांठ पडली व त्यांनीं माझ्यापुढें ओढण्याकरितां तपकिरीची डबी केली. त्यावर मीं सांगितलें, ' मी तपकीर ओढत नाहीं. ' तेव्हां तो मनुष्य माझ्याकडे आश्चर्यानें बघूं लागला, व मला म्हणाला, " काय, तुम्ही जोगमहाराजांचे शिष्य आणि तपकीर ओढत नाहीं ? " वाचकांच्या लक्षांत आलें असेल कीं मला भेटलेल्या या भक्ताच्या दृष्टीनें जोगमहाराजांच्या जीवनांत ज्ञानेश्वरी, अनुभवामृत ह्यांना जितकें स्थान तितकेंच तपकीर ओढण्यासहि असावें. ह्याचा अर्थ असा कीं मोठ्या मनुष्याच्या जवळ राहूनसुद्धां मोठ्या मनुष्याचा मोठेपणा कशांत आहे हें सर्वांनाच कळतें असें नाहीं. म्हणून तुकारामबुवांनींसुद्धां उपरोक्युक्त विनोदानें म्हटलें आहे कीं " संतसंगती न करावा वास । एखादा गुणदोष येईल अंगा ॥ "

थोर पुरुषांचे चरित्रलेखक होण्यास त्यांच्याजवळ राहण्याचें भाग्य लागतें एवढेंच नव्हे तर त्यांची योग्यता जाणण्याची चरित्रलेखकाच्या अंगीं पात्रताहि लागते हें खरें. पण एवढ्यानेंहि काम भागत नाहीं. आणखी दोन तीन गुणांची ह्या गोष्टीस जोड लागते. त्यांतील पहिला गुण असा कीं जवळ राहणाऱ्या मनुष्यास ह्यांचें चरित्र आपणांस कळावें अशी तळमळ लागते. तसेंच तें आपण लोकांस सांगावें अशी इच्छा लागते. ह्यांच्या अभावीं तो जवळ असून व अंगीं जाणण्याची पात्रता असूनसुद्धां व त्या थोर पुरुषाच्या आयुष्यांतील घटना त्याच्या डोळ्यादेखत घडत असूनसुद्धां तो त्यासंबंधीं स्वतः विचार करणार नाहीं अथवा त्या थोर पुरुषांसहि विचारणार नाहीं. मग त्या आठवणींत ठेवून लिहून काढून लोकांच्या समोर मांडायची गोष्ट विचारावयासच नको.

चरित्रलेखकांत वरील प्रकारची तळमळ व इच्छा असूनहि भागत नाहीं. त्याची वृत्ति साक्षेपी लागते. कारण थोर पुरुषांच्या चरित्रांतील नमूद करण्यासारख्या घटना ज्या स्थळीं व ज्या कालीं घडत राहतील त्या स्थळीं व त्या कालीं सर्वच प्रसंगीं लेखक जातीनें हजर राहूं शकेलच असें नाहीं. उदाहरणार्थ, थोर पुरुषांचा जन्मकाल अथवा लहानपण ह्याविषयींची माहिती चरित्रलेखकास सामान्यतः दुसऱ्याकडूनच गोळा करावी लागते. चरित्र–नायकापेक्षां वयानें मोठे व नात्यानें जवळचे असे चरित्रलेखक मिळणें अत्यंत दुर्लभ आहे हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. चरित्र-नायक प्रसिद्धीला येण्याच्या पूर्वीच्या लहानसहान गोष्टींची दखल कोण ठेवणार ? कारण, त्यांची गरज तरी कशी भासलेली असणार ? यामुळें चरित्र–लेखकांस त्या थोर पुरुषांचा ज्यांच्याशीं संबंध आला त्यांच्या त्यांच्या गांठी घेऊन माहिती मिळविणें आवश्यक असतें. पण हें काम अत्यंत अवघड असें आहे. कारण अशी माहिती देणारीं माणसें मिळणें जरूर आहे. मिळाल्यास, त्यांना मागच्या गोष्टींची स्मृति असणें कठीण. स्मृति असूनमुद्धां त्यांत आत्मश्लाघा न येतां जशी घटना घडली असेल तसें सांगण्याचें सत्यावरील प्रेम त्यांच्यांत असणें जरूर आहे. ह्यामुळें हें काम फारच अवघड होऊन बसतें.

तात्पर्य ( १ ) चरित्रलेखकाला चरित्रनायकाचा बहुतकाल सहवास घडण्याचें सुभाग्य असणें, ( २ ) त्याला चरित्रनायकाची योग्यता कळण्याची पात्रता असणें, ( ३ ) चरित्र कळावें अशी तळमळ असणें, ( ४ ) तें लोकांना सांगण्याची इच्छा असणें, ( ५ ) व इतरांकडून माहिती गोळा करण्याकरितां करावे लागणारे कष्ट सहन करण्याचें अंगीं धैर्य व उत्साह असणें—ह्या गोष्टी चरित्रलेखकाकडून उत्कृष्ट चरित्र-लेखन होण्यास आवश्यक असतात.

जगांतील उत्कृष्ट चरित्रग्रंथामध्यें आंग्ल–साहित्यिक डॉ. जॉन्सन् ह्यांचें बॉस्वेलनें लिहिलेलें चरित्र मोडतें. त्या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत बॉस्वेलनें आपलें एतद्विषयक भाग्य वर्णन करितांना पुढीलप्रमाणें उद्गार काढले आहेत. ‘As I had the honour and happiness of enjoying his friendship for upwards of twenty years; as I had the scheme of writing his life constantly in view; as he was well apprised of this circumstance, and from time to time

obligingly satisfied my inquiries, by communicating to me the incidents of his early years; as I acquired a facility in recollecting, and was very assiduous in recording, his conversation, of which the extraordinary vigour and vivacity constituted one of the first features of his character, and as I have spared no pains in obtaining materials concerning him, from every quarter where I could discover that they were to be found, and have been favoured with the most liberal communications by his friends; I flatter myself that few biographers have entered upon such a work as this with more advantages; independent of literary abilities, in which I am not vain enough to compare myself with some great names who have gone before me in this kind of writing.'

श्रीदासगणूमहाराजांचे चरित्रलेखक वैद्य श्री. अनंतराव आठवले यांच्या ठिकाणीं हे सर्व सुयोग जुळून आलेले दिसतात.

( १ ) त्यांना अगदीं जन्मापासून तों या क्षणापर्यंत संत श्रीदासगणूमहाराज यांच्या सहवासांत राहण्याचें सौभाग्य प्राप्त झालें आहे. श्रीयुत अनंतराव हे श्रीदासगणूमहाराजांच्या मानसपुत्राचे पुत्र असल्यानें त्यांच्या कुटुंबियापैकींच एक आहेत. ( २ ) श्री. अनंतरावांच्या मनांत बरींच वर्षें चरित्र लिहावें असें वाटत होतें व त्या दृष्टीनें त्यांची तयारी बरींच वर्षें चालली होती. ( ३ ) श्रीयुत अनंतराव हे आयुर्विद्यापारंगत आहेत. त्यांचा संस्कृतचा अभ्यास उत्तम आहे. ते उत्तम कीर्तन करतात. स्वतः आख्यानें रचतात व काव्य करतात. ह्यामुळें श्रीदासगणू-महाराजांच्या चरित्रांतील गोष्टी व काव्यांतील मर्म समजण्याची त्यांच्या ठिकाणीं पात्रता आहे. ( ४ ) त्याचप्रमाणें श्रीदासगणूमहाराज यांच्या संबंधित जीं माणसें त्यांच्या गांठी श्री. अनंतराव हे घेऊं शकले व त्या मंडळींनींहि मोठ्या प्रेमानें व आदरानें पुसलेली माहिती पुरवली. ( ५ ) व सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्यांपैकीं कांहीं मंडळी लिखाणाचा खरेखोटेपणा सांगण्यास आज हयात आहेत.

श्रीदासगणूमहाराज यांच्या चरित्रांत असा कांहीं भाग आहे कीं त्या ठिकाणीं या जिवंत माणसांच्या शब्दावरून गोष्ट बरी वाईट ठरणारी आहे. उदाहरणार्थ, श्रीदासगणू हे 'दासगणू' होण्यापूर्वी व कवित्व करूं लागल्यानंतरहि कांहीं वर्षे तमाशे करीत, करवीत, लावण्या तयार करीत व म्हणवीत. अर्थातच तमाशांत डफ वाजवणारे साजिंदे, नाचणाऱ्या गाणाऱ्या बाया यांच्याशीं त्यांचा नित्याचा संबंध असावयाचा व असा संबंध असल्यानें सामान्य मनुष्यानें जर अशी कल्पना केली कीं पूर्व आयुष्यांत दासगणूमहाराज यांना कांहीं दोष लागला असावा तर ती कल्पना अगदींच अवास्तव ठरणार नाहीं. पण वस्तुस्थिति अगदीं उलट होती. दासगणू हे 'पद्मपत्रमिवांभसि' असे शुद्ध राहिले व यास साक्ष–त्यावेळचे त्यांचे अनेक मोठ्या अधिकाराच्या जागेवर असणारे स्नेहीसोबती त्यांचा शुचिपणा अथवा पावित्र्यरक्षण सांगण्यास आज ह्यात आहेत.

इतका गोष्टींचा मेळ होणें हा सुयोग या चरित्राच्या बाबतींत जुळून आल्यानें हें चरित्र सर्वांगसुंदर झालें आहे असें वेगळें सांगण्याची गरज नाहीं.

या चरित्रांत जो एक गौणपणा आहे तो म्हणजे प्रस्तावना माझी असणें हा आहे. मी हा गौणपणा म्हणतों याचें कारण असें आहे कीं प्रस्तावना ही परक्याची असल्यास बरी. कारण प्रस्तावना म्हणजे एका दृष्टीनें 'आपुलेंचि रत्न थितें। घेणें पारखियाचेनि हातें' अशा स्वरूपाची आहे. पण माझा व श्रीदासगणू यांचा स्नेहसंबंध गेल्या चाळीस वर्षांचा आहे व तो आजहि वाढता आहे. सन १९११।१२ च्या सुमारास श्री. बाळासाहेब ढमढेरे मामलेदार पंढरपुरांत प्लेग असल्यामुळें गांवाबाहेर असतांना दासगणूमहाराजांच्या कीर्तनाचा वरचेवर थाट चालावयाचा व प्लेगच्या दिवसांतसुद्धां हजारोंनीं श्रोते जमा व्हावयाचे. त्यावेळीं श्री. अनंतराव यांच्या वडिलांनीं गायिलेलें 'पाटिल झाला पिसा। दिसतो वैदु जसा' हें पद, तसेंच त्यावेळचें बोधलेबोवांचें दासगणूमहाराजांचें आख्यान कानांत आजहि गुणगुणत आहेत. परवांपरवांपर्यंत सवड साधेल तेव्हां श्रीदासगणूंच्या कीर्तनास मी जात असें व अजूनहि अशी प्रथा चालू आहे कीं पंढरपुरीं अगर पुण्यांत त्यांना भेटावयास गेलों म्हणजे श्री. ज्ञानसारख्याकडून त्यांचें एक आख्यान ऐकल्यावांचून परत यावयाचेंच नाहीं. अशा स्थितींत मजकडून शुद्ध टीकाकाराची भूमिका वठवली जाणें अशक्यच आहे. माझ्यापेक्षां दुरून

पाहणारा जर प्रस्तावना लिहिण्यास शोधला असता तर मला वाटतें बरें झालें असतें व म्हणून मी माझी प्रस्तावना हें वैगुण्य समजतों.

चरित्राच्या एकंदर स्वरूपाविषयीं व लेखकाच्या सौभाग्याविषयीं सांगितल्यावर श्रीदासगणूमहाराजांच्या प्रत्यक्ष चरित्राकडे वळूं. श्री. अनंतराव यांनीं श्रीदासगणू-महाराजांच्या कुलवृत्तान्तापासून तों परवापर्यंतचा जीवन इतिहास सर्व तपशिलासह जसा घडत आला तसा सोप्या पण आकर्षक भाषेंत दिला आहे. चरित्रास योग्य अशी सुलभ भाषा वापरली असल्यानें व तींत प्रसाद असल्यानें वाचकास पुस्तक संपेपर्यंत तें खालीं ठेवावें असें वाटत नाहीं.

मुळांत तपशीलवार चरित्र दिलें असल्यानें त्यांतील सर्व घटनांचा पुनरुच्चार करण्याची आवश्यकता नाहीं. त्यांतील कांहीं महत्त्वाच्या घटनांकडेच फक्त वाचकांचें या प्रस्तावनेंत लक्ष वेधतों. त्यांच्या चरित्रांत विचार करावयास लावणाऱ्या व तशाच बोधप्रद अशा पुष्कळ गोष्टी आहेत. त्यांपकीं कांहींचा थोडक्यांत पुढें विचार मांडला आहे.

( १ ) श्रीदासगणूमहाराज यांचा जन्म सन १८६८ मध्यें नगर जिल्ह्यांत अकोळनेर या गांवीं झाला. आज त्यांचें वय ८८ वर्षांचें आहे. लक्षांत ठेवण्या-सारखी व आश्चर्यकारक गोष्ट म्हणजे या वयांतसुद्धां त्यांची काव्यशक्ति पूर्वीइतकीच काम करीत आहे. ते 'विचारसागरासारख्या तर्ककर्कश ग्रंथाचें ओव्यांत आज रूपांतर करीतच आहेत.

ज्या नगर जिल्ह्यांत प्रसिद्ध महिपतिबोवा ताहाराबादकरांचा जन्म झाला त्याच नगर जिल्ह्यांत या आधुनिक महिपतींचा जन्म झाला हा एक विलक्षण योगायोग आहे. नगरजिल्हा हा पूर्वीपासूनच साधुसंतांचा म्हणून प्रसिद्ध आहे. श्रीदासगणूंच्या थोडे पूर्वी या नगर जिल्ह्यांत पुणतांब्याजवळील बेटांत गंगागीर महाराज, बेलापूरला भानुदास महाराज होऊन गेले. अजूनहि नगर जिल्हा ही संतभूमीच आहे.

( २ ) जीं माणसें जगतांत चमकतात त्यांचे तीन प्रकार दिसतात. एक असा कीं तीं माणसें लहानपणांतच चमकूं लागतात व त्यांचा प्रकाश ते इहलोक सोडून जाईपर्यंत त्यांना सोडून जातच नाहीं. ते जन्मभर जगाच्यासमोर तळपतच राहतात. दुसरा प्रकार अशा लोकांचा कीं जे प्रथम चमकतात पण पुढें तारुण्यांत अगर वृद्धपणीं

अस्तंगत होतात. तिसरा प्रकार त्या लोकांचा कीं जे बालपणीं साधे सामान्यच किंबहुना हूड व ह्यांचें पुढें कसें होईल म्हणून त्यांच्या मातापितरांना काळजी लागते असे असतात. पण हा वर्ग पुढें असा चमकूं लागतो कीं ज्या मंडळींनीं ह्यांचा लहानपणचा हूडपणा पाहिलेला असतो, तीं आश्चर्य करतात कीं या पोराचे हे गुण त्या वेळेला कोठें लपले होते ? दासगणू महाराज हे या तिसऱ्या वर्गांतले. कै. ह. भ. प. गंगागीरमहाराज यांचेसुद्धां असेंच. पूर्व आयुष्यांत त्यांनीं कुस्त्या मारल्या, तमाशे केले पण पुढें महान् विरक्त म्हणून प्रसिद्धीस आले. ही मंडळी लहानपणीं हूड, घरांतून बाहेर निघून गेलेले, शालेय शिक्षण जवळजवळ नाहींच, पण एकदां प्रतिभेस वाव मिळूं लागला कीं ती नवनवोन्मेषशालिनीसारखी स्फुरतच राहते.

जगाच्या पुढें येण्यास उत्तम शालेय अथवा महाविद्यालयीन शिक्षण हें एक साधन आहे. पण ज्याच्याजवळ बुद्धि आहे, प्रतिभा आहे, त्याला त्याची आवश्यकताच आहे असें नाहीं. पाश्चात्य देशांत ओलिव्हर गोल्डस्मिथ या कवीनें आपल्यासंबंधीं असेंच म्हटलें आहे कीं 'मी लहानपणीं शाळेंत चुकार म्हणून प्रसिद्ध होतों.' असा चुकारतट्टुच पुढें इंग्लंडच्या नांवाजलेल्या लेखकांपैकीं एक लेखक झाला. दासगणूमहाराज यांच्याजवळ सुप्त अशी दांडगी बुद्धि होती. तिला शिरडीचे श्रीसाईनाथमहाराज यांच्या सहवासाचें झडपण मिळाल्याबरोबर वरची राख जाऊन आंतील विस्फुलिंग आपल्या प्रखरतेनें चमकूं लागला.

पण येथें एक गोष्ट लक्षांत ठेवणें अवश्य आहे कीं एकदां का या लोकांना विद्येची किंमत कळून आली कीं ही मंडळी विद्येकरतां जीवापाड श्रम करतांना आढळून येतात. उदाहरणार्थ, दासगणूमहाराजांचें बघण्यासारखें आहे. साध्या मराठी चार इयत्ता झालेले गृहस्थ; पण शांडिल्यभक्तिसूत्रें, भक्तिरसायन, शंकराचार्यचरित्र यांच्याकरतां संस्कृताचें ज्ञान करून घेतात व या ग्रंथावर ओवीबद्ध टीका करतात ! माझे गुरु कै. जोगमहाराज यांचेंहि असेंच. त्यांना आपली सही करण्यास दोन मिनिटें लागावयाचीं. पण शारीरभाष्य ऐकून त्यांनीं प्राकृतांत त्याची उत्तम मांडणी करावी, पन्नाशीच्याजवळ आल्यावर उपनिषदें कीर्तनांतून म्हणावींत. याचा अर्थ असा कीं कांहीं माणसांच्या बुद्धि जागृत होण्यास पूर्वसंचितामुळें वेळ लागतो. पण एकदां ती जागृत झाली कीं मागची सर्व उणीव भरून काढते.

( ३ ) यांच्या चरित्रांतील आणखी महत्त्वाची घटना म्हणजे शिरडीच्या श्रीसाईमहाराजांची गांठ व श्रीगोंदेमुक्कामीं नोकरीवर असतांना श्रीवामनशास्त्री इस्लामपूरकर या सांप्रदायिक रामदासी साधूंचा उपदेश. श्रीवामनशास्त्री हे एक अधिकारी पुरुष होते. हे रामदासी सांप्रदायी असूनहि पंढरपूरचे वारकरी होते. अशा गुरूंनीं या शिवभक्तास ( श्रीदासगणूंना ) शिवमंत्राबरोबर पंढरीची वारी करावयाची आज्ञा केली. याचा परिणाम श्रीदासगणूंच्या ठिकाणीं शैव, वैष्णव हा भेद शिल्लक राहिला नाहीं, रामदासी वारकरी हा भेद शिल्लक राहिला नाहीं. तात्पर्य, त्यांची वृत्ति संकोचित पंथाभिमान्याची राहिली नाहीं. ते उदार अशा भागवतधर्माचे उपासक व प्रचारक बनले. त्यांतच श्रीसाईनाथमहाराज या अवलियांच्या सहवासाची भर पडली. त्यामुळें त्यांनीं शैव, वैष्णव, रामदासी, वारकरी—सर्व प्रकारच्या संतांचीं चरित्रें गायिलेलीं आढळतात. श्रीपांडुरंगाचें वर्णन करतांना त्यांचें हृदय उचंबळून येतें. महाराष्ट्रांत पूर्वसाधूंनीं जें समन्वयाचें रोपटें लावलें, श्रीदासगणूंनीं त्यालाच आपल्या प्रतिभेचें पाणी घालून त्याचा मोठा फुलाफळांनीं नटलेला असा डौलदार वृक्ष बनवला. श्रीदासगणूंचा वेष वगैरे रामदासी थाटाचा असतो. पण त्यांच्या कीर्तनांतून कोणत्याच संकोचित पंथाचा पुरस्कार केलेला आढळून येत नाहीं. त्यांचा मुक्काम पंढरपुरांत वर्षांतून कांहीं महिने असतोच. श्रीरुक्मिणीमातेसमोर आश्विनांतील उत्सवांत कितीतरी वर्षें त्यांचीं कीर्तनें होत असत. तात्पर्य, श्रीदासगणूंच्या ठिकाणीं मोठा उत्कृष्ट असा वेगवेगळ्या पंथांचा समन्वय आढळून येतो. यामुळें त्यांच्या काव्यांत–वर्णनांत एकांगीपणा आढळून येत नाहीं. यामुळेंच श्री. आठवले यांनीं म्हटल्याप्रमाणें दासगणूंच्या लिखाणांत पंथनिष्ठेचा दुराग्रह नाहीं. ते पूर्ण अद्वैती आहेत. व यास महत्त्वाचें कारण त्यांना भेटलेले दोघेहि गुरुजी समन्वयवादी होते, यथार्थ आत्मज्ञानी होते.

( ४ ) श्रीदासगणू हे ज्याप्रमाणें बुद्धीच्या बाबतींत लहानपणींच चमकणाऱ्यापैकीं नव्हते, त्याचप्रमाणें परमार्थाच्या बाबतींतहि ते ‘ बालभक्त ’ होते असें म्हणतां येणार नाहीं. रागावून घर सोडल्यावर त्यांना नोकरी मिळाली तीहि पोलिस खात्यांत ! ही थोडी उलटच स्थिति होती. खरें सांगावयाचें म्हणजे परमार्थास सर्वस्वी विसंगत अशी होती. श्रीसाईमहाराजाच्या सारख्या अवलियाची गांठ पडली व त्यांनीं नोकरी सोड म्हणून सांगितलें. तरीसुद्धां त्यांनीं नोकरी सोडली नाहीं. नंतर कांहीं प्रसंगानें उपरति होऊन त्यांनीं नोकरीस कायमची सोडचिठी दिली. याचा अर्थच असा आहे कीं एखाद्या माणसाची

व साधूची गांठ पडली व त्या साधूनें जरी त्या माणसास उपदेश केला तरी त्याची पूर्वकमाई म्हणजे संचित जोंपर्यंत त्यास परमार्थ करण्यास साथ देत नाहीं तोंपर्यंत त्याची चित्तवृत्ति परमार्थाकडे वळत नाहीं; त्याच्यावर साधूच्या उपदेशाचा सुद्धां फारसा परिणाम होत नाहीं. याचा अर्थ तो वाया जातो असें नव्हे. कार्य होतें पण प्रारब्ध आड असेल तर वेळ लागतो. कालांतरानें–पूर्वसुकृत सन्मुख झालें म्हणजे परिणाम होतो. 'अंधु तिही अवसरें सुखिया झाला' असें धृतराष्ट्रासंबंधीं सांगतांना ज्ञानदेवांनीं दिलेला दृष्टान्त द्यावयाचा तर द्राक्षाला दूध घालतांना तें वाया गेल्यासारखें दिसतें. पण काळानें द्राक्षाच्या वेलीला मधुरफळें येतात. तसें साधूचा उपदेश त्यावेळीं वाया गेलेला दिसतो पण तो वाया जात नाहीं, कालांतरानें फलद्रूप होतो. श्रीसाईनाथमहाराजांची पूर्वी गांठ न पडती व कान्ह्या भिल्लाचीच गांठ पडती तर श्रीरामानें मरणांतून वांचवून सुद्धां श्रीरामाच्या सेवेला श्रीदासगणूंनीं आपणांस वाहून घेतलेंच असतें असें नाहीं. श्रीनामदेवांचे या बाबतींतले पुढील उद्गारच खरे आहेत :—

'पूर्वीचें संचित ये जन्मींची कमाई। तिसरी ते पाही गुरुकृपा.'

( ५ ) श्रीदासगणूंनीं भक्तिरसायन, अनुभवामृत, चांगदेवपासष्टी इत्यादि तत्त्वज्ञानाच्या संस्कृत प्राकृत ग्रंथांवर ओवीबद्ध टीका जरी लिहिल्या असल्या व त्या उत्तम जरी असल्या तरी जग श्रीदासगणूंना प्रामुख्यानें 'संतचरित्रगायक' या नांवानेंच ओळखतें व ओळखणार व म्हणूनच त्यांना 'आधुनिक महिपति' असें यथार्थपणें संबोधलें जातें.

आरंभींच म्हटल्याप्रमाणें चरित्र लिहिणें हें एका दृष्टीनें सोपें पण दुसऱ्या दृष्टीनें नाजूक व अवघड असें काम आहे. कारण, दुसऱ्याचें चरित्र कळण्यास त्याच्याशीं समरस होण्याची पात्रता अंगीं लागते. एरवी त्याच्या वागणुकीची आपणांस कल्पना येणार नाहीं. आपण त्या जातींचे व्हावें तेव्हां त्यांचें महिमान कळतें हें खरें आहे. व्यवहार करणाऱ्या माणसाचें चरित्र कळणें सोपें आहे. कारण आपण व्यवहारी असतों व आपल्या वृत्ती आपणांस ठाऊक असतात. आपण त्यावरून दुसऱ्या व्यवहारी मनुष्याच्या वृत्तीची कल्पना करूं शकतों. पण व्यावहारिक लाभ दिसत असतांना पारमार्थिक अदृश्य लाभाकरितां चालून आलेला लाभ टाकणारा दिसला कीं

व्यवहारी मनुष्यास त्याची उपपत्ति लावणें कठिण जातें. तो त्याला वेड्यांत तरी काढतो अथवा ती गोष्ट जुनी असली तर कपोलकल्पित तरी ठरवतो. घरांत खायला नाहीं, पोरेंबाळें, बायको अन्नाविना रडत आहेत अशा स्थितींत तत्त्वपरिपालन म्हणून पाया पडून आलेलें मोहरांचें ताट लाथाडणाऱ्या तुकारामबोवांची, कवडी सकाळच्या प्रहरीं दिसली कीं कपाळाला लावणारा जो द्रव्यलोभी, त्याला कशी कल्पना येणार ? त्यानें ही कथा ऐकली कीं तो म्हणणार, ‘ अहो हीं कथेकरी कवि यांनीं रचलेलीं आख्यानें ! असें कोठें घडतें आहे ? ’ आतां हा तुकारामबोवांचें चरित्र काय जाणणार व कसें लिहिणार ? तात्पर्य, संतांचें महिमान कळण्यास संतांची ईश्वरनिष्ठा, तपश्चर्या, जिव्हाळ्याची भक्ति, त्याग, प्राणिमात्रांविषयींचें प्रेम व त्यांच्या कल्याणाची काळजी इत्यादि गुण अंगीं लागतात. तरच संतांचें महिमान खरें कळेल. तुकाराम-बोवांनीं म्हटलें आहेः—

‘ भक्तांचा महिमा भक्तचि जाणती । दुर्लभ या गती आणिकांसी ॥
तुका म्हणे अंगें व्हावें तें आपण । तरीच महिमान येईल कळों ॥ १ ॥ ’

श्रीदासगणू यांच्या ठिकाणीं ईश्वरनिष्ठा, जिव्हाळ्याची भक्ति वगैरे गुण असल्यानें व त्यांच्यावर श्रीसाईमहाराज व श्रीवामनशास्त्री इस्लामपूरकर या साधूंची कृपा झाल्यानें त्यांना हीं संतचरित्रें गाणें सहज झालें व त्यांना गोडी आली.

या संतचरित्राच्या बाबतींत त्यांचें कार्य व प्रसिद्ध कै ह. भ. प. लक्ष्मणरावजी पांगारकर व नुकतेच कैलासवासी झालेले श्री. आजगांवकर या संतचरित्रलेखकद्वयांच्या कार्यांची तुलना करण्यासारखी आहे. कै. पांगारकर व कै. आजगांवकर हे आपआपल्या परीनें थोरच आहेत व संतचरित्रांच्या बाबतींत त्यांचें कार्यहि मोठें आहे. पण संतचरित्रें सुशिक्षित-अशिक्षित सर्वांस आवडतील अशीं करणें हें कार्य श्रीदासगणूंनीं जितक्या प्रमाणावर केलें इतकें या दोघांना करतां आलें नाहीं, हें कोणीहि सांगेल. कारण श्रीदासगणूंनीं संतचरित्रें रचलीं व गायलीं व इतर लेखकांनीं लिहिलीं. कै. तात्यासाहेब केळकर यांनीं म्हटल्याप्रमाणें श्रीदासगणू यांनीं शक्य तितकी माहिती मिळवून तीं गायलीं असल्यामुळें ‘ सोन्यास सुगंध ’ यावा तसा प्रसंग घडून आला आहे. श्रीदासगणूंनीं संतचरित्रें उत्कृष्ट अशा काव्यांत गुंफलीं, स्वतः आख्यानरूपानें कथेंत वर्णिलीं, यामुळें तीं जिवंत अथवा चैतन्ययुक्त झालीं व तीं श्रोत्यांच्या हृदयाचा ठाव एकदम गाठूं शकलीं.

श्रीदासगणूंच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या, दामुबोवा राग आळवूं लागले कीं श्रोतेहि भक्तिरसांत बुडून जात. यामुळें त्यांच्या काव्याचा वेगळा परिणाम होई व म्हणूनच त्यांना संतांच्या चरित्राचा मोठा प्रसार करतां आला.

तात्पर्य, श्रीदासगणूमहाराजांनीं जुन्यानव्या सर्व संतांचीं चरित्रें प्रसादयुक्त वाणीनें गायिलीं व जुन्या संतचरित्रांचें आयुष्य वाढविलें. अर्वाचीन संतांचीं चरित्रें तर या आधुनिक महिपतीच्या इतकीं माहितीपूर्वक व प्रसादपूर्ण भाषेंत वर्णन केलेलीं दुसरीकडे आढळणारच नाहींत असें म्हटलें तरी चालेल.

( ६ ) श्रीदासगणू हे जसे कवि म्हणून प्रसिद्ध आहेत तसे ते कीर्तनकार म्हणूनहि प्रसिद्ध आहेत. त्यांच्या कीर्तनास हजारोंनीं श्रोतृवृंद उपस्थित असतो व त्यांत पंडित, ज्ञानी, शेतकरी, सुशिक्षित, अशिक्षित, सुधारक, सनातनी, मोठीं माणगें, मुलें, बायापुरुष सर्व प्रकारचे लोक असतात. श्रीदासगणूंचें कीर्तन म्हणजे ज्याच्यांत गहन वेदान्तविषयक पूर्वपक्ष उत्तरपक्ष आहेत, संस्कृतांतील श्रुतिस्मृति, आचार्यांचे ग्रंथ यांच्यांतील पंक्तीच्या पंक्ति श्रोत्यांसमोर ओतल्या जात आहेत, दोन-दोन तीन-तीन आख्यानें एकदम लावताहेत, असें विद्वत्तापूर्ण ज्याला म्हणतां येईल असें कीर्तन नव्हे. बरें ते स्वतः मोठे पट्टीचे गवई आहेत व नानाप्रकारचे राग छेडताहेत असेंहि नव्हे. अशा स्थितींत त्यांच्या कीर्तनास हजारोंनीं श्रोते ओढले जातात, ही वेड लावण्याची जी त्यांत शक्ति आहे तिची मीमांसा लेखकाच्या मतें थोडक्यांत पुढीलप्रमाणें आहे.

श्रीदासगणूंचें कीर्तन हें हरिदासी कथा अथवा भजनीनिरूपण याहून थोडें वेगळ्या स्वरूपाचें आहे. भजनीनिरूपणांत पूर्वरंग-उत्तररंग नसतो. श्रीदासगणूंच्या कीर्तनांत पूर्वरंग उत्तररंग असतो व या बाबतींत त्यांच्या कीर्तनाचा थाट हरिदासी-कथेसारखा आहे. पण तो पुरा ' हरिदासी ' ही नाहीं. कारण श्रीदासगणू हे स्वतः कवि असल्यानें व आख्यानें रचण्याची त्यांना आवड असल्यानें कीर्तनांत ते स्वतःचेंच कवित्व उपयोगांत आणतात. क्वचितच इतर कवींच्या ओव्या, आर्या अगर दिंड्या घेतात. त्यांच्या कीर्तनाचें लोकांना वेड लागतें याचें मर्म प्रसादयुक्त पण अगदीं आधुनिक भाषेंत ते आपले विचार मांडतात व ते गेयस्वरूपाचे असल्यानें गातात यांत आहे. अलिकडे साहित्यसंमेलनांतून कवीनें आपली कविता

स्वतः गाण्याचा एक कार्यक्रम असतो. त्या कार्यक्रमास किती गर्दी लोटते हें ज्यानें पाहिलें असेल त्याला वरती लिहिलेली गोष्ट चटकन् पटेल.

श्रीदासगणू यांचीं कीर्तनें हजारों श्रोत्यांना आपलें वेड लावतात याचें वर सांगितलेलें हें एक प्रमुख कारण आहे. पण त्यास तशींच दुसरींहि महत्त्वाचीं कारणे आहेत. त्यांच्या कीर्तनांत कटाव, दिंड्या, श्लोक वगैरे जुन्या कीर्तनकारांच्या चालींतीलच कवनें पुष्कळशीं असतात. पण त्यांच्या कीर्तनाचा मुख्य गुण म्हणजे इतर कथांतून क्वचित् आढळून येणारा असा 'साधेपणा' त्यांच्या कीर्तनांत आढळून येतो. त्यांचें कीर्तन म्हणजे 'एकांकी नाटक' होत नाहीं. तें दंभ टाकून तळमळीनें केलेली देवाची प्रार्थना अथवा जगास तळमळीनें केलेला उपदेश अशा स्वरूपाचें असतें. त्यांत कृत्रिमतेचा लेश नसतो. कीर्तनांत जरी पूर्वरंग असला तरी तो वर म्हटल्याप्रमाणें क्वचितच घटप्राभाव प्रध्वंसाभाव वगैरेसारख्या विवादविषयक तत्त्वांचा असतो. पांडित्य दाखवण्याचें कीर्तन तें नव्हेच. त्यांच्या कीर्तनांतून नीति, धर्म, सदाचार यांचाच प्रामुख्यानें उपदेश ते करीत असल्यानें तशाच जातीचा साधा पूर्वरंग असतो व हें करीत असतांना साधी सरळ भाषा व आंतबाहेर कांहीं न ठेवतां सत्यकथन केलेलें असतें. त्यांत पुष्कळ वेळेला सामाजिक दोषांची निर्भिडपणें चिरफाड, दंभस्फोट असतो; मग तो सनातन्यांतील दंभाचा असो वा सुधारकांच्या दंभाचा असो. श्रीदासगणू यांना खोट्याची चीड किती होती व तें उघडकीस आणण्यांत आपणांस व्यक्तिशः कितीहि त्रास झाला तरी तो सहन करण्याची त्यांची कशी तयारी असते याचीं उदाहरणें त्यांच्या चरित्रांत कितीतरी सांपडतील. येथें पुस्तकांतील 'दंभस्फोट' या प्रकरणांतील ठळक उदाहरणांकडे बोट करतां येईल. फार महत्त्वाची व म्हणून लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं हा दंभस्फोट जे परके असतील त्यांचा करावयाचा व आपले आहेत त्यांच्यावर पांघरूण घालावयाचें असा जसा कित्येक वक्त्यांचा स्वभाव असतो तसा श्रीदासगणूंचा नव्हे. आपल्या घरांतील म्हणून त्यांनीं कोणाची गय केली नाहीं.

तात्पर्य, श्रीदासगणूमहाराजांचें कीर्तन सर्वांना आवडतें याचीं कारणें अशीं आहेत कीं त्या कीर्तनांत सर्वांस आवडणारा भोळा भाव आहे, यामुळें तें आबालवृद्ध भाविक जनांना प्रिय होतें; खोट्याचा—दंभाचा—स्फोट व सत्याचें मंडन असल्यानें चिकित्सक सुधारकांना तें प्रिय वाटतें; जुन्या संस्कृतीचा अभिमान त्यांत व्यक्त होत

असल्यानें तें सनातन्यांना आवडतें, पण अगदींच जुन्या चाकोरीला धरून 'तातस्य कूपोयमिति ब्रुवाणः क्षारं जलं कापुरुषाः पिबन्ति' या वर्गांतील तें नसल्यानें जुन्यास उद्बोधक नवें घेऊन पुढें जाणें अवश्य असा जुन्या नव्याचा ते समन्वय करतात म्हणून नवीन सुधारकांनाहि पसंत पडतें. निरपेक्षपणानें देवाला आळवणें व सदुपदेश करणें याच हेतूनें कीर्तन होत असल्यानें त्यांची टीकाहि बोचक वाटत नाहीं व स्वतःचें उत्कृष्ट कवित्व स्वतःच म्हणत असल्यानें रसिकांना तें प्रिय आहे. थोडक्यांत श्रीदासगणूंच्या कीर्तनाचें वर्णन करावयाचें म्हणजे श्रीएकनाथांनीं पुढील अभंगांत म्हटल्याप्रमाणें त्यांचें 'संतघराच्या मर्यादेंत' कीर्तन होतें व म्हणून सर्वांना प्रिय होतें.

> " सगुणचरित्रें परम पवित्रें सादर वर्णावीं ।
> सज्जनवृन्दें मनोभावें आधीं वंदावीं ॥ १ ॥
> संतसंगें अंतररंगे नाम बोलावें ।
> कीर्तनरंगीं देवासन्निध सुखेंचि डोलावें ॥ २ ॥
> भक्तिज्ञानाविरहित गोष्टी इतरां न कराव्या ।
> प्रेमभरें बा वैराग्याच्या युक्ति विवराव्या ॥ ३ ॥
> जेणें करूनीं मूर्ति ठसावी अंतरीं श्रीहरीची ।
> ऐसी कीर्तनमर्यादा आहे संतांच्या घरचीं ॥ ४ ॥ "

आटीव गाईचें दूध, त्यांत खडीसाखर, वर केशराची काडी व वेलदोड्याची पूड असावी म्हणजे त्या दुधास गोडी येऊन तें सर्वांनाच किती प्यावें असें वाटतें. अशा गोदुग्धामृताप्रमाणें श्रीदासगणू यांचें कीर्तन मसालेदार गोड आहे व म्हणूनच तें पुनः पुनः श्रवण करावें असें सर्वांना वाटतें.

( ७ ) त्यांच्या जीवनांतील महत्त्वाच्या घटनांसंबंधीं इतकें लिहिल्यानंतर त्यांनीं महाराष्ट्रशारदेच्या ओटींत घातलेल्या मौल्यवान् साहित्यरत्नांच्याकडे वळूं.

हीं सर्वच रत्नें आहेत; पण रत्नांत ज्याप्रमाणें हिरे, माणिक, पाच वगैरे प्रकार असतात तसे यांच्या ग्रंथांत आहे. श्री. आठवले यांनीं जें वर्गीकरण केलें आहे त्यांत पंधरा वर्ग सांगितले आहेत. त्यांत संतचरित्रें, टीकात्मक ग्रंथ, स्फुट पदें, आरत्या, अष्टकें, स्तोत्रें, पोवाडे, खंडकाव्य, सुभाषितें, कीर्तनोपयोगी आख्यानें इत्यादि प्रकार

आहेत. नुसतीं आख्यानें पुरीं ५९ व अपूर्ण ४ मिळून ६३ आहेत. ओवीबद्ध टीकाग्रंथ आठ आहेत. संतचरित्रात्मक ओवीबद्ध ग्रंथ ११ आहेत. व अजूनहि यांत ८८ व्या वर्षीं भर पडतच आहे! महाराजांचे श्वासोच्छ्वासादि प्रबंध व्हावेत अशी श्रीपांडुरंगाची कृपा असल्यामुळेंच एवढी ग्रंथरचना होऊं शकली यांत शंका नाहीं.

श्रीदासगणू यांच्या काव्याची चर्चा श्री. आठवले यांनीं १८० पानांत केलेली आहे. साहित्यशास्त्राच्या कसोटीला लावून बघितलें असतां त्यांच्या काव्यांत किती गुण उतरतात, हें श्री. आठवले यांनीं उत्कृष्टपणें दाखवलें आहे. मी त्याची पुनरुक्ति करीत नाहीं.

मी एकच कसोटी लावून पुढील भागाकडे वळणार आहें. मुलांस शिकवलें किंवा नाहीं याची एक प्रमुख कसोटी त्यानें परीक्षा उत्तीर्ण होणें ही आहे. तसेंच काव्याचें आहे. श्रोते हे खरे परीक्षक व त्यांचा निकाल अगोदरच लागला आहे. श्रीदासगणूंनीं ज्या वेळीं आख्यानें रचलीं व काव्यें तयार केलीं त्या वेळीं तीं हजारोंनीं श्रोत्यांना वेड लावीत होतीं व आजहि त्यांच्या शिष्यांनीं कीर्तनांत तीं म्हटलीं तर लोक मुग्ध होऊन जातच आहेत. तेव्हां पुनः पुनः श्रवण करावें असें वाटणें हें जें रमणीयतेचें लक्षण तें यांच्या काव्यांत भरपूर आहे, असा कौल जनताजनार्दनानेंच दिला आहे. यामुळें या बाबतींत विशेष लिहिण्याचें कारण नाहीं.

श्रीदासगणूंच्या काव्यासंबंधीं आणखी एक गोष्ट सांगणें आवश्यक वाटतें, ती सांगून हा भाग आटपूं. कित्येकांना वाटतें कीं लोकगीत होण्याकरतां काव्याचा विषय शृंगारच लागतो. अध्यात्मासारख्या ‘ नीरस ’ विषयावर काव्य रचून काय उपयोग? ‘ कोण वाचणार ’ असें कित्येक लोक म्हणतात. तसेंच कित्येक म्हणतात, ‘ अहो, ईश्वर, संत, त्यांचे चमत्कार हे आतां शिळे जुनाट विषय झाले. याला आतां गिऱ्हाईक नाहीं. ‘ डोळ्यांनीं बघतो ही ईश्वराची कृपा ’ अथवा ‘ आई थोर तुझे उपकार ’ इत्यादि काव्यांना आतां हल्लींच्या समाजांत स्थान नाहीं.’ या असल्या सर्व शंकांना श्रीदासगणूंच्या काव्यासंबंधीं लोकांनीं दाखवलेली रुचि ही उत्कृष्ट उत्तर आहे. जुनेच विषय पण मांडणी अशी सुंदर, भाषाहि ठसकेबाज, वर्णनें अशीं हुबेहुब कीं श्रोत्यास वाटावें आपण नव्यानेंच हें चरित्र ऐकत आहोंत. ज्याला स्फूर्ति आहे, ज्याला प्रतिभा आहे त्यांना जुना विषय सुद्धां चालतो. त्याला अध्यात्म आड येत नाहीं. ‘ शृंगाराचिया माथां ’ पाय ठेवीत अध्यात्म डौलानें तेथें वावरतें.

( ८ ) या काव्याच्या, तसेंच त्यांच्या जीवनाच्या व उपदेशाच्यामागें असणाऱ्या तात्त्विक बैठकीचा थोडासा विचार करून ही लांबलेली प्रस्तावना पुरी करूं. एका दृष्टीनें श्रीदासगणूंचें जीवन हें उघड्या पुस्तकासारखें आहे. कोणीं यावें आणि वाचावें. त्यांचा निऱ्याचा जीवनक्रम बघितला, त्यांचा उपदेश ऐकला तर पहिली गोष्ट मनावर बिंबते ती ही कीं श्रीदासगणूमहाराज हे ' ईश्वरनिष्ठ ' आहेत. अद्वैतवादी जरी ते असले तरी त्यांचा मूळचा पिंड हा भगवद्भक्तीचा आहे. यामुळें अद्वैत तत्त्वज्ञानास भक्तीची सुंदर जोड त्यांच्यांत आहे व मोठी आनंदाची गोष्ट आहे ती ही कीं त्याला स्वच्छ व शुद्ध अशा आचारधर्माची मदत आहे. ज्ञानी म्हणून कर्म व भक्ति टाकून ' करंटे ' अद्वैत सांगणाऱ्यांपैकीं ' राज ' ( कूट ) योगी श्रीदासगणू नाहींत. ' कर्म, उपासना, ज्ञान ' यांचा त्रिवेणीसंगम त्यांच्या ठिकाणीं दिसून येतो.

त्यांची अद्वैतावरची निष्ठा बघावयाची असल्यास श्रीमद् भगवद्पूज्यपाद श्रीशंकराचार्य यांचे जें चरित्र त्यांनीं लिहिलें आहे त्याची त्यांनीं दिलेली कथा वाचावी. सर्व स्त्रिया वंद्यच पण माता ती माता. तसेंच सर्व आचार्य वंद्यच पण शंकराचार्य ते शंकराचार्य असें थोडक्यांत त्यांचें मत आहे. या त्यांच्या अद्वैताच्या बैठकीमुळेंच आचार्यांनीं ज्याप्रमाणें पंचायतनी पूजा सुरू करून भक्तमंडळींचा समन्वय केला, तसाच रामदासी, वारकरी, गाणपत्य, शाक्त या सर्वांवर कवनें करून श्रीदासगणूंनीं सर्वांचा समन्वय केला. व हें करण्यांत महाराष्ट्रांतील भागवतधर्मीय श्रीएकनाथ-प्रभृति जी संतमंडळी आहेत त्यांचीच परंपरा त्यांनीं पुढें चालवली. महाराष्ट्राचें हें वैशिष्ट्य आहे कीं महाराष्ट्रांतील भक्ति ही ' एकं सन्तं बहुधा कल्पयन्ति ' या वैदिक अद्वैतावर उभारलेली आहे. तींत ना विशिष्टाद्वैत ना द्वैत. श्री. आठवले यांनीं पुढील वाक्यांतून हीच गोष्ट सांगितली आहेः–

"कर्म, उपासना, भक्ति, ज्ञान, योग या सर्वांचेंच आपाआपल्या परीनें त्यांनीं ग्रंथांतून विवेचन केलेलें आढळतें. साधनमार्गांतील पायऱ्या म्हणून अधिकारपरत्वें त्या सर्वांचा त्यांनीं साधनमार्गांत समावेश केला आहे. बाल्य, तारुण्य, वार्धक्य या स्थितीप्रमाणें कर्म, उपासना, ज्ञान यांचा स्वीकार मुमुक्षूनें केलाच पाहिजे. एकाशिवाय दुसऱ्याची, दुसऱ्याशिवाय तिसऱ्याची उत्पत्तीच होऊं शकत नाहीं. म्हणून या सर्वांचा स्वीकार साधकानें करणें आवश्यक आहे. मात्र तो करीत असतांना स्वतःशीं संपूर्णपणें प्रामाणिक असलें पाहिजे, त्यांत दंभाचा लेशहि येऊं नये. अन्यथा सर्व

साधन व्यर्थ जातें. तसेंच इतरांच्या साधनांचा व त्यांच्या उपासनापद्धतीचा लवमात्र द्वेषहि करूं नये; कारण शेवटीं एकच आहे." ( पृष्ठ ३८४ )

श्रीदासगणू हे 'आचारप्रभवो धर्मः' यास फार महत्त्व देतात. त्यांचाच दृष्टान्त जर द्यावयाच्या तर मुलाला विश्वविद्यालयांत मिळणारी एम्. ए. ची पदवी प्राप्त करून घ्यावयाची हें जरी खरें असलें तरी त्याचें नांव प्रथम घालतांना तें इन्फंटींतच घातलें पाहिजे व त्यास 'श्री श्री' च शिकवलें पाहिजे. एखादा मुलगा म्हणूं लागला कीं 'दादा, मला एम् ए. करावयाचें आहे ना, मग एम्. ए. तच नांव घाला' तर त्यास सांगितलें पाहिजे कीं 'बाळ, तुला एम्. ए. करावयाचें खरें. पण तुला प्रथम 'श्री श्री' च शिकलें पाहिजे. मग हलके हलके पुढच्या इयत्तेंत जातां येईल.' श्रीपांडुरंगाच्या या पंढरपूरच्या विश्वविद्यालयाचेंहि तसेंच आहे. प्रथम नांव दाखल करावयाचें 'कर्ममार्गांत.' 'आदौ वर्णाश्रमवर्णिताः क्रियाः कृत्वा समासादितशुद्धमानसः' या श्रीरामगीतेंतील श्लोकांत सांगितलेलाच सोज्ज्वळ मार्ग सर्व साधुसंतांनीं पुरस्कारला व श्रीदासगणूंनीं तोच सांगितला. यामुळेंच श्रीदासगणू यांच्या शिकवणुकींत मनाची शुद्धि, क्रियाशुद्धि, ईश्वरनामस्मरण, वैराग्य इत्यादि गोष्टींवर भर दिलेला आढळतो.

संतांच्या वाङ्मयाचा श्रीदासगणूंच्या मनावर परिणाम झालेला असल्यानें त्यांच्यांत चातुर्वर्ण्य व स्वसंस्कृति याविषयीं योग्य असा अभिमान आढळून येतो. त्यांना मुळींच बदल नको असें नव्हे. बदलणें हें जीवनाचें स्वरूप आहे हें ते ओळखतात. म्हणून त्यांना बदल हवा पण तो 'आपल्यांत' हवा म्हणजे 'आपण' कायम राहून हवा. 'आपणच' बदलून नको म्हणून नवीन फॅशन वगैरेवर त्यांनीं आपल्या काव्यांतून फटके ओढलेले आपणांस आढळून येतात. या बाबतींत त्यांचे विचार श्री. आठवले यांनीं पुढील शब्दांत थोडक्यांत मांडले आहेत तिकडे वाचकांचें लक्ष वेधतों.

" चातुर्वर्ण्यासंबंधीं त्यांचा दृष्टिकोनहि उदार पण सनातनपरंपरेला धरून असा आहे. वर्णच असूं नयेत, त्यांच्या कर्मांचा संकर व्हावा, विवाहबंधनें तुटावींत व सारा एकंकार व्हावा, हें मत महाराजांना तिरस्करणीय वाटतें. त्यांना वर्णसंकर मुळींच नको आहे. पण जातिमत्सर हा मात्र ते एक भयंकर रोग समजतात. हिंदुधर्म ही चार पायांची एक सुलक्षणा कपिलाधेनु आहे; किंवा हिंदुधर्म हा एक

मोठा वृक्ष असून अनेक जाति या त्याच्या फांद्या आहेत; त्यामुळें वृक्षास शोभा आली आहे. त्या तोडून वृक्षाचा सरळ असा सौंदर्यहीन सोट बनवूं नये, परंतु या फांद्यांनीं आपण एकाच वृक्षाच्या शाखा आहोंत; हें मात्र लक्षांत ठेवण्यास ते सांगतात. फुटीरपणा त्यांना मुळींच पसंत नाहीं. एका स्फुटांत ते म्हणतात—

" जातिजातिचे समाज निघाले ' ऐक्यवर्धन ' नांव तया ॥
झाड पडलें धरणीवरती फांद्या लागल्या नाचाया ॥ "

चारी वर्णांच्या ठिकाणीं कांहीं गुण, कांहीं दोष आहेत. कुणीच स्वयंपूर्ण नाहीं. एकमेकाला पूरक होण्याच्या दृष्टीनेंच ही ईश्वरी योजना झालेली आहे, असें महाराजांचें मत आहे. त्यामुळें प्रत्येक व्यक्तीनें आपापल्या क्षेत्रांत आपापल्या परीनें कर्तव्यदक्ष राहून निःस्वार्थपणें कार्य करावें आणि त्याचा लाभ सगळ्यांना घेऊं द्यावा. 'वेंच्यामधील ' चातुर्वर्ण्य ' हा उतारा यासाठीं अवश्य पाहिला पाहिजे.'

' स्वसंस्कृतीचा अभिमान महाराजांच्या ठिकाणीं पुरेपूर भरलेला आहे. आपलें सोडणें, त्यांना भेकडपणाचें वाटतें. आचारामध्यें परक्यांचें अनुकरण करणें, यासारखी दुसरी वाईट गोष्ट नाहीं, हें आग्रहपूर्वक आणि नवीन रीतिरिवाजांचा उपहास करीत त्यांनीं आपल्या काव्यांतून अनेक ठिकाणीं प्रतिपादिलें आहे." ( पृष्ठ ३८६ )

श्री. अनंतराव यांनीं या ग्रंथांत प्रथम विभागांत श्रीदासगणूंचें चरित्र २१७ पानें दिलें आहे. दुसरा विभाग वाङ्मयपरिचय यामध्यें त्यांची भूमिका देऊन त्यांच्या वेगवेगळ्या काव्यप्रकारांशीं वाचकांचा परिचय करून दिला आहे. ' एक-गहूं प्रकार बहु ' अशांतलाच हा प्रकार आहे. जसे गव्हाचे ' मांडे ', ' घीवर ', ' पुऱ्या ' ' गव्हले वगैरे प्रकार करतात, तसेंच ' भगवद्भक्ती'चे वेगवेगळ्या रूपांत हे आविष्कार आहेत. सर्वच गोड आहेत पण प्रत्येकाची चव वेगळी आहे. हा भाग २१९ ते ४०८ पर्यंत दिला आहे. पुढें काव्यग्रंथांची यादी ओवीसंख्या व पंक्तिसंख्येसह दिली आहे. शेवटीं वाचकांना इतका हा दूधसागर पिण्यास सवड नसणार म्हणून कांहीं निवडक वेंचे देऊन श्रीदासगणू महाराज यांच्या व्यक्तित्वाचा आणि वाङ्मयाचा परिचय करून देण्याचें कार्य संपवलें आहे.

आरंभीं म्हटल्याप्रमाणें श्री. आठवले यांनीं चरित्रविषयक ग्रंथास आवश्यक असणारी सर्व सामग्री कसोशीनें गोळा केली आहे व तिची निवड करून वाचकांच्या समोर हें भक्तिरसानें भरलेलें ताट ठेवलें आहे. वाचकवर्ग याचा आस्वाद घेऊन ' अन्नदाता ' सुखी होवो आणि त्याच्याकडून अशीच श्रीपांडुरंगाची सेवा घडो असा आशीर्वाद देईल अशी माझी खात्री आहे.

या ग्रंथाचे विषय श्रीदासगणूमहाराज यांना ८८ वें वर्ष लागलें आहे. या उतार वयांतहि ते विचारसागरासारख्या शारीरभाष्यांतील प्रक्रिया सांगणाऱ्या ग्रंथास ओव्यांचें रूप देतच आहेत. हें पाहून श्रीनामदेवरायांनीं जी श्रीरुक्मिणी-रमण पांडुरंगाची प्रार्थना केली तिची आठवण होते. त्याच शब्दांत श्रीपंढरीनाथाची प्रार्थना करून ही प्रस्तावना संपवतों.

' आकल्प आयुष्य व्हावें तया कुळां । माझिया सकळा हरिच्या दासां ॥ '

बलिप्रतिपदा १८७७ — शं. वा. दांडेकर

# पुरस्कार

एक अपूर्व योग ! कारण या योगामुळें अट्ठेचाळीस वर्षांपूर्वींच्या माझ्या आयुष्यांतील प्रसंगांचें स्मरण जागृत झालें. श्रीदासगणूमहाराज यांचें प्रथमदर्शन त्यावेळीं झालें. पण तें कसें ? ती थोडीशी सांगण्यासारखी कथा आहे. आम्ही त्या वेळीं पुणें शहरांत जोगेश्वरी नाक्याचे समोर किबेवाड्याशेजारच्या ढवळे ( आतां करळे ) वाड्यांत राहात होतों. त्या वाड्यांत भररस्त्यावर तळमजल्यावर विशा ( विश्वनाथ ) बापटाची खाणावळ होती. तिला लागून आमच्या बिऱ्हाडाला जाण्यासाठीं तोडून दिलेला जिन्याचा खण होता. या खणांत आमच्या एका गिऱ्हाइकाला रात्रीं निजण्याची परवानगी द्याल काय, म्हणून खाणावळमालकानें मला विचारलें. यावेळीं माझ्या आजच्या आठवणीप्रमाणें मी इंटरच्या वर्गांत ( १९०८ ) शिकत होतों. मीं ती परवानगी वडिलांस सांगून दिली. एका रात्रीं पाहतों तों हे पाहुणे उशाशीं मेणबत्ती ठेवून कांहीं लिहीत आहेत ! त्यावरून थोडी अधिक लगट केली तों दिसलें कांहीं ओव्या रचून लिहीत आहेत. या पहिल्याच भेटींत या मोंगलाई पाहुण्याविषयीं माझा अनुकूल ग्रह झाला आणि मी वडिलांच्या संमतीनें पाहुणेबुवांना आमच्या माडींतच जागा दिली. आमचे वडीलहि परमार्थप्रवण, सच्छील, वेदान्ती, कै. श्री. महर्षि अण्णासाहेबांचे शिष्य. तेव्हां हे नवे पाहुणेबुवा आणि ते यांचें उत्तम जमलें. मग माझे मित्र कै. दत्तो श्रीराम जोशी, खवलीकर इनामदार हे बुवांचे लेखक बनले. 'संतकथामृत' ग्रंथाचें लेखन चालू असावें. रोज जोशीबुवा, मी आणि बुवा यांची चर्चा-टीका–विनोद चाले. बुवांचा बराच काळ त्यांचे विष्णुसहस्रनामस्तोत्रपठनादि नित्य कर्मांत जाई आणि बाकीच्या वेळांत ते वडिलांशीं वेदान्तचर्चा करीत. बुवांनीं त्यावेळीं व्यंकटराव रामचंद्रकृत उपनिषदांची सभाषांतर आवृत्ति मिळविली होती आणि तीर्थरूपांकडून त्यांतील सर्व विषय ते समजावून घेत. या चर्चेचें फळ म्हणून नानासाहेब चांदोरकरास श्रीसाईबाबांकरवीं वदविलेला वेदान्तविवरणोपदेश या विषयाचे तीन चार अध्याय झालेले आम्हीं वाचले याच चर्चेत नगरजिल्हानमन, इतिहाससंशोधन वगैरे चर्चा चाले. आणि भरींत भर अशी कीं कै. विसुभाऊ राजवाडे हे मी त्यांस १९०६ चे साहित्य संमेलनांत गांठल्यानंतर पुनः आपले सतीर्थ्य जे आमचे तीर्थरूप त्यांच्या भेटीस

माझ्या ओढीमुळें येऊं लागले. जेव्हां प्रथम असा प्रसंग आला कीं बुवांचा आणि या मुनींचा तळ आमच्याच घरीं एकाच वेळीं पडणार, तेव्हां मला मोठी चिंता उद्भवली. तथापि बुवांना मीं अगाऊच पढवून जागृत ठेविलें होतें. तेव्हां अपेक्षित भेट-कंप सौम्यसाच झाला आणि पुढें त्यांतली चिंता निघूनहि गेली.

या आमच्या घराच्या खिडकीसमोरच आठवले यांचें लांकडी सुतारकामाचें दुकान होतें. दोन बंधूंपैकीं वडील बंधू काम करीत. त्याचें चित्र माझ्या डोळ्यां-समोर आहे. धाकटे बंधू म्हणजे या दासगणूचरित्राच्या लेखकांचे भावी तीर्थरूप दामुअण्णा आठवले. हे दामुअण्णा दुकानीं अधूनमधूनच असावे. येथेंच बुवा आणि दामुअण्णा यांची ओळख झाली आणि उभयतांच्या आयुष्यांत दैवानें एक नवीन पण मनोरम असा अध्याय रचिला. त्याचें दिग्दर्शन या ग्रंथांत अनुषंगानें आलें आहे.

१९१० त मीं बी. ए. ची परीक्षा दिली, आणि कायद्याच्या अभ्यासाचें निमित्त करून मुंबईस सरकारी लॉ स्कूलमध्यें दाखल झालों. एक वर्षा दीडवर्षांत मला वाटतें माझी आणि बुवांची गांठ पडली नव्हती. १९०८ ते १९१० या काळांत बुवा पुण्यास वारंवार येत. दीर्घ मुक्काम करीत. तो योग यावेळीं विरळ झाला होता. तोंच मुंबईच्या दैनिकांत एक दिवस वार्ता वाचली कीं, श्रीदासगणु यांचें कीर्तन धुरंधर ( ? ) यांच्या दिवाणखान्यांत आहे. तुकारामबुवांवरचें आपलें आख्यान बुवांनीं लावलें होतें. बुवांची साधी, रसार्द्र प्रेमळ वाणी, तीं त्यांचीं भक्तिरसानें थबथबलेलीं पदें, तो दामुअण्णांचा पहाडी पण मधुर खडा आवाज, सारा प्रसंग केवळ अविस्मरणीय! घरीं असतांना कविता वाचन चर्चा आमची पुष्कळ होई. परंतु कीर्तन श्रवणाचा योग मला हा पहिलाच आला! काय अद्भुत देखावा! सारे श्रोते तुडुंब भक्तिरसांत बुडून तल्लीन झालेले. सारें सात्त्विक कीर्तन. कृत्रिम नाटकी त्यांत कांहीं नाहीं. बुवांचा आवाज जात्या म्हटलें तर खरखरीत. पण भक्तीचा जिव्हाळा मोठा आणि जातिवंत. त्यामुळें दासगणूंच्या सात्त्विक कीर्तनांची उंची आपोआप मोठी दिसून येई आणि श्रोते सारे भक्तिप्रेमानें हेलावून जात! हा अनुभव मुंबईत पाहिला आणि पुढेंहि मला जे थोडे प्रसंग आले त्यांतहि पाहिला. दामुअण्णा साथीला बहारीचा रंग भरीत. पुढें किसन, छगन वगैरे मंडळींनीं कांहीं कमी केलें नाहीं. भक्तिप्रेमाचा असा उठावदार आणि प्रभावी कीर्तनकार माझ्या

पाहण्यांत क्वचितच आला. मी कीर्तनाचा हव्यासी नव्हे कीं परमार्थाची वाटचाल करणारा नव्हे म्हणून माझी साक्ष माझ्यापुरतीच खरी, परंतु मला इतर शेंकडोंच्या तोंडी साक्षी ऐकण्यास मिळाल्या. त्यांचा मेळ पाहून माझा अभिप्राय पक्का व योग्य ठरला.

तेथून पुढें श्रीसाईबाबांचें शिरडी संस्थान आणि श्रीदासगणू महाराजांचा लौकिक दिवसेंदिवस अधिकाधिक विश्रुत होत गेला.

श्रीदासगणू यांनीं केलेली प्रचंड काव्यरचना आणि तिचें स्वरूप किंचित् जरी अवलोकन केलें तरी **संतकवि** ही पदवी त्यांस यथार्थपणें लागू होते आणि कोणीं कोणीं ती लावली तरी या शब्दावलीचें समर्थनच त्यांनीं केलें आहे. मला तर '**संतकवि**' पदावर त्यांच्याइतका प्रबळ अधिकार महिपतीनंतरच्या काळांत कोणाचा सिद्ध होईल असें यथार्थपणें वाटत नाहीं. यद्यपि या संतसाहित्यक्षेत्राची माहिती त्या त्या परंपरेबाहेर फारशी ज्ञात नसते, म्हणून ठाम विधान करण्यांत उतावीळपणाचा दोष पदरीं येतो. तरी विवेकी आणि रसिक वाचक यांतलें मर्म मर्यादेनेंच ग्रहण करतील असा मला विश्वास वाटतो.

पारमार्थिक आणि भक्तिपर ओवीबद्ध रचनेचा जुना ओघ सांप्रतच्या काळीहि वाहता आहे, हें सूक्ष्मपणें पाहणाऱ्यांना दिसून येईल. विविध प्रकारची असली रचना मराठींत गेल्या शतकांत पुष्कळ झालेली आहे. तिचा थोडाफार परिचय मला जो घडला आहे, त्याचें स्मरण ठेवूनहि आधुनिक संतकवि मंडळींत अग्रगण्यपदीं दासगणूंची स्थापना करण्यास मला कसलाहि संकोच वाटत नाहीं.

श्रीसंतकवि दासगणू यांचें चरित्रहि मोठें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. मोठ्या प्रसिद्ध कुळांत जन्म प्राप्त होऊनहि बालवय सर्व हूडपणांत घालविलें आणि मानखंडनेचे धनी झाले. पुष्कळदां असें घडतें. मनाला होणारा हा दंश सर्व चरित्र उलटवितो. दासगणूंचें तसेंच झालें. ते स्वतंत्र जीवनाला लागले; आणि अखेर पोलिस बनले. भागाला आलेलें पोलिसपण त्यांनीं कसें शोभविलें, आपलें सत्त्व कसें राखलें, कान्ह्या भिल्लाच्या तपासासाठीं रामदासी वेश कसा राबविला, वगैरे कथाभाग भावी चरित्राशीं तुलना करितां मोठाच विस्मयकारक वाटतो. या काळांत पोलिसी वेषाला शोभेल असा तमाशाचा

रंग खेळण्याचाहि योग होता. आमच्या पुण्याच्या सहवासांत आपल्या पूर्वायुष्यांतील तमाशासंबंध वर्णीत होते. पुण्यांत कोण्या एका फडाच्या भिंतीवर जाहिराती फडकल्या होत्या. तिकडे बोट दाखवून बुवा मला म्हणाले, 'आज आमची लावणी पुण्यांत झडणारसें दिसतें. आपण रचून दिलेली बी. ए. ची लावणी या फडाची ठेवणींतली विजयी लावणी आहे.'

याच आयुष्यांत गुरु श्रीवामनशास्त्री इस्लामपूरकर ( मराठी बृहत्कथाकार ते हे नव्हेत ) यांचा अनुग्रह कसा घेतला आणि पुढें डफ फोडून तमाशाशीं घटस्फोट कसा केला तो सर्व कथाभाग चरित्रांत आहे. तो वाचनीय आहे. आपल्या या संतकवींचा मानसिक विकास कसा होत चालला होता, त्याचीं प्रत्यंतरें आपणांस याप्रमाणें न्याहाळतां येतात. महाराजांनीं आपली मनवाणी सर्व संतसेवेला आणि परमार्थाला वाहिली. ही संतसेवा किती भरदार झाली त्याचा पुरावा या संतकवीचा काव्यसागरच प्रत्यक्ष देतो. तेथें अन्याच्या कोणाच्या भलावणीची गरजच काय ?

श्रीदासगणूमहाराजांचें वय आतां नव्वदाजवळ पोंचत आलें आहे. त्यांची प्रकृति कशी धडधाकट असली तरी आमच्याकडे होते, तेव्हांहि लागवणकर, कवडे इत्यादि वैद्यांकडून उपचार चालू असत. 'चंद्रप्रभा' घेतल्यानें त्यांना आराम पडल्याचें मीं पुष्कळदां पाहिलें आहे. तरीहि त्यांच्या नित्यक्रमांत खंड म्हणण्या-सारखा पडला नाहीं.

श्रीदासगणूमहाराज हे एक नैष्ठिक परमार्थी आहेत यांत तर शंका नाहीं. परंतु व्यापक परमात्म्याचा ध्यास मनास लावीत असतां आपल्या विचाराला व्यापक-पणाची बैठक त्यांनीं कशी दिली आहे तें ग्रंथकर्ते श्री. अनंतराव आठवले यांनीं मोठ्या सहृदयपणें विशद केलें आहे.

श्रीदासगणूंचे भक्त बहुत आहेत. 'महाराजांचें चरित्र लिहून प्रसिद्ध करण्याची योजना आम्हीं आखली आहे,' म्हणून नांदेडचे महाराजांचे संशोधक शिष्य श्री. वि. अं. कानोले यांनीं मला कित्येक वर्षांपूर्वी लेखी व तोंडी कळविलें, बरीच तयारीहि चालविली पण अनेक व्यत्यास आले आणि तो संकल्प कांहीं सिद्धीला गेला नाहीं.

हें पाहून श्रीदासगणूंचे नातूच म्हणण्यास चिंता नाहीं, प्रा. वैद्य श्री. अनंत दामोदर आठवले यांनीं कंबर कसली आणि प्रस्तुतचा पावणे सहाशेंवर पृष्ठांचा ग्रंथ सिद्ध करून प्रसिद्धहि केला.

या ग्रंथाचे दोन मुख्य भाग आहेत. नांवांतच ते आहेत. पहिला भाग, व्यक्तिदर्शन दुसरा भाग वाङ्मयदर्शन. शेवटीं दासगणूंच्या: काव्यांतील वेंचक उतारे जोडले आहेत. मीं हा ग्रंथ इत्थंभूत वाचला. वाचीत चाललों तसा त्यांत रमून गेलों. यावरूनच अनंतरावांची भाषा आणि मांडणी किती मनोहर आणि आकर्षक आहे याची ग्वाही मी येथें प्रसन्नपणें देऊं शकतों. या अभिप्रायाचा प्रत्यय कोणाहि वाचकास आल्याशिवाय राहणार नाहीं.

‘ वयं तु न वितृप्याम स्वादु स्वादु पदे पदे । ’

या भागवतवाक्याचें स्मरण हा ग्रंथ वाचतांना हटकून होईल.

परमार्थ श्रेष्ठ वाटला तरी ‘ जयाचें ऐहिक धड नाहीं तयाचा परार्थ पुसशी काई ’ या ज्ञानेश्वरमहाराजांच्या उक्तीप्रमाणें ऐहिकांविषयींची आस्था आमच्या संतकवींनीं मोडून काढिली नाहीं. त्यांचें राष्ट्रप्रेम किती जळजळीत, जागृत आणि जिव्हाळ्याचें आहे याचींहि उदाहरणें त्यांच्या काव्यसंभारांत अनंतरावांनीं जागजागीं विपुल प्रमाणांत दाखल केलीं आहेत, तीं वाचकांनीं अवश्य पाहावीं. जुना आचार न मोडतां, जुन्यांतील उदारपणा वाढीस लावण्याची थोर दृष्टि दासगणूंच्या मनांत व कवनांत कशी भिनली आहे, याचें दर्शन त्यांच्या काव्यपरिशीलनानें होतें. तेंच श्री. अनंतरावांनीं मोठ्या ठळकपणें या ग्रंथांत दाखवून दिलें आहे.

सिंहगडच्या देवटाक्यांत वरून पाहिलें तर खालच्या तळचा तांदळाचा दाणाहि स्पष्ट दिसतो. तशी दासगणूंची वाणी आहे. अर्थ अगदीं स्पष्ट–स्वच्छ म्हणूनच अशा वाणीला प्रासादिक म्हणतात. श्रीभगवंताची कृपा तीवर आहे; या अर्थानेंहि तिला प्रासादिक म्हणणें शोभण्यासारखें आहे. श्री. अनंतरावांनीं एके जागीं सहज सांगितलें आहे कीं महाराज कविता बोलत जातात, लिहिणारा टिकत नाहीं ! एकदां लय लागली कीं प्रवाह सुरू ! हा गुण नसता तर लाख पाऊणलाख कविता रचून होतीच ना. याला अंगचा गुणच लागतो. त्याच्याहि खुणा बाळपणीं उमटलेल्या

ग्रंथांत नमूद केल्या आहेत. '**जलददूत**' म्हणून एक श्लोकबद्ध रचना त्यांनीं कालिदासाच्या मेघदूताच्या धर्तीवर केल्याचें बुवांच्या तोंडून समक्ष ऐकिलें होतें.

सुधारककर्ते कै. विनायकराव जोशी हे बुवांचे आप्तांपैकीं होते. त्यांचें या कामीं प्रोत्साहन असल्याचेंहि बुवा माझ्यापाशीं एकवार बोलल्याचें मला स्मरण आहे. मेघाच्या द्वारां राणी व्हिक्टोरिया हिला या 'जलददूत' काव्यांत संदेश पाठविला आहे. आज या काव्याची प्रत कोठें उपलब्ध नाहीं. मिळाली तर पाहिजे आहे. पक्कें स्मरण नाहीं पण सातशें श्लोक असावे असें बोलणें स्मरणांत आहे. 'लावण्या' केल्या त्याहि गेल्या ! नष्टच केल्या ! त्या तोंडी म्हणणारेहि आतां दुर्मिळ ! नाहींतच !

श्रीदासगणूमहाराज संतकवि आहेतच पण महिपतीनंतर एकमेव संतचरित्रकार आहेत. महिपतीच्या नंतरच्या काळीं जे संतमहंत होऊन गेले किंवा दासगणूंच्या काळीं हयात होते, त्यांचीं चरित्रें लिहावीं हा दासगणूंचा मुख्य छंद ! त्यासाठीं त्यांनीं खूप परिभ्रमण केलें, सर्व स्थळें पाहिलीं, त्यांच्या भक्तांकडून विश्वसनीय वाटणारी माहिती गोळा केली आणि नंतर आपल्या काव्यप्रतिभेनें ती खुलवून त्यांच्या चरित्रांतील मर्म स्वतःच्या अपूर्व कौशल्यानें आविष्कृत केलें ! ही कामगिरी इतकी अपूर्व आहे कीं गेल्या शतकांतील संतांचीं चरित्रें समजण्यास एवढें विस्तृत व एकच असें साधन नाहीं. महाराष्ट्राच्या इतिहासकारालाहि श्रीदासगणूंचें हे चरित्र-ग्रंथ साहाय्यभूत झाल्याविना राहणार नाहींत.

इतिहास आणि इतिहाससंशोधन हा आमच्यांतील एक मोठा चर्चेचा विषय असे. संशोधनाविषयीं त्यांना आदर आहे, परंतु भाविकांच्या कल्पनांना धक्का लागला म्हणजे तेंच संशोधन त्यांना नकोसें होऊं लागतें ! संशोधनानें जर उद्यां असें स्पष्ट ठरविलें कीं अनगडशहा तुकारामांच्या जन्मापूर्वीच पैगंबरवासी झाला होता तर तुकाराम आणि अनगडशहा यांच्या संबंधांविषयींच्या रूढकथा कितीहि गोड किंवा भावपोषक असल्या तरी त्या दूरच ठेवाव्या लागतील. समंजस नेते यांतूनहि योग्य मर्यादेनें वाटचाल करतात. असो.

चि. अनंतराव यांनीं या ग्रंथाच्या दुसऱ्या भागांत संतकवींच्या काव्यत्वाची एक मीमांसा आपल्या मतानें केली आहे. ही मीमांसा मार्मिक आणि विचारणीय वठली आहे. पण अशा मीमांसा क्वचितच वादांतक ठरतात. संतकवि आणि पंतकवि या विरोधी शब्दजोडीच्या आधारें माझ्या तरुणपणीं हा वाद पांगारकर भोपटकरप्रभृतींत चालत असे. परंतु त्यावेळीं जे मोरोपंतासारखे पंतकवि म्हणून उल्लेखिले जात त्यांना आज कवि म्हणण्यासहि कित्येक विद्वानांचा विरोध आहे. तात्त्विक वाद सोडला तर दासगणूंच्या रचनेंत केवळ काव्यरसिकांनाहि रंजवील असा भाग पुष्कळ आहे हें दिसून आल्याखेरीज राहणार नाहीं. एवढें खरें, कीं त्यांची जी रचना कीर्तनासाठीं झाली ती वाचण्यापेक्षांहि उठावदार म्हणण्यानेंच तिचा प्रभाव पडतो. आणि तिचें रसोत्पत्तिसामर्थ्य अनुभवास येतें. श्रोत्यांच्या डोळ्यांतून आपोआप जो अश्रुप्रवाह वाहूं लागला तोच त्या म्हणण्याची साक्ष पुरवील. श्रीदासगणू किंवा विष्णुदास माहूरकर यांच्यासारख्या आधुनिक संतकवीची भक्तिरसांत रंगून गेलेली वाणी जेव्हां श्रोत्यांनाहि रंगवून टाकते, तेव्हां त्या वाणींतली काव्यशक्ति निराळी वर्णन करून दाखवून द्यावी लागत नाहीं. थोर कवींच्या पंक्तींत दासगणू यांना मानाचें पान द्यावें लागेल आणि सर्व समंजस रसिक तें तसें देतील याविषयीं मला कसलीहि शंका नाहीं.

चि. अनंतराव यांनीं दासगणूंचें विस्तृत चरित्र आणि काव्यदर्शन या ग्रंथाचे द्वारें सिद्ध केलें आहे. तथापि लौकिक दृष्टीची भूक एवढ्यानें शमणार नाहीं. दासगणूंचे परिचित, भक्त इत्यादिकांकडून आठवणींच्या रूपानें अगदीं मिळेल तितकें विश्वसनीय साहित्य जमवून तें आणि त्यांचा व त्यांच्या संबंधींचा पत्रव्यवहार वगैरे असेल तो निवडून पाखडून पुरवणीरूपानें प्रसिद्ध केल्याशिवाय या वाग्यज्ञाची पूर्णाहुति होणार नाहीं. पण आज जो ग्रंथ पुढें मांडला त्यानें चि. अनंतराव यांनीं जसें एक मोठें वैयक्तिक ऋण फेडिलें आहे; तशीच मोलाची सामाजिक सेवाहि केली आहे. एरव्ही श्रीदासगणूंनीं कधीं स्वचरित्राविषयीं उत्सुकता दाखविली नसती. आणि मग कदाचित् त्यांच्या भक्तांनीं चमत्कारांची जोड देऊन चरित्रें सजविलीं असतीं. जर कोणी संतकवि प्रत्यक्ष आपलें आत्मचरित्र लिहील तर केवढी बहार होईल ? मात्र जसें बाबरचें आत्मचरित्र मोकळ्या वृत्तीनें लिहिलें तशा खेळकर वृत्तीनें तें लिहिलेलें असावें.

पण ही नुसती कल्पनाच राहील. संतकवींनीं आत्मचरित्रपर त्रोटक व सूचक उल्लेख केलेले आढळतात. एक बहिणाबाई शिऊरकर याच या क्रमाला अपवाद वाटतात. असो, पुनरपि चि. अनंतरावांनीं लिहिलेल्या या सुंदर व रोचक ग्रंथाबद्दल त्यांचें मनापासून कौतुक करून पुरें करितों.

आश्विन व. २, १८७७<br>
लोककल्याण, पुणें.

दत्तो वामन पोतदार

श्रीशंकर

संतकवि श्रीदासगणूमहाराज

# व्यक्ति आणि वाङ्मय

## विषयानुक्रमणिका ( आंकडे पृष्ठांचे )

**( ३ ) निवडक वेंचे :**

**महाराजांचे ग्रंथ व काव्यसंख्या : १**



**विविध विचारः—१०१**



**सूक्तिसंग्रह १६९**

# महत्त्वाचें शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | आहे | पाहिजे |
| --- | --- | --- | --- |
| २ | २० | का पुरुषा | कापुरुषा |
| ४ | १० | श्रीअप्पाचीचे | श्री अप्पाजींचे |
| ११ | १० | शिवदास कला | शिवद सकला |
| ३३ | १८ | कीर्तांचा | कीर्तनाचा |
| ४२ | ३ | स्वात्मवशात् | स्वार्थवशात् |
| ६० | ६ | पेझवाई | पेशवाई |
| ६४ | २ | कन्पनेने | कल्पनेने |
| १०५ | ४ | गहाळ | गहाण |
| १२५ | २५ | जगांत | जगत्यां |
| १४९ | १७ | ऐसा | ऐश्या |
| १५५ | २३ | विष्णं | विश्वं |
| १६६ | २४ | दुःखाचा | दुःखाची |
| २४३ | २६ | भागसे | भाग असे |
| २६१ | २१ | बैसवी तव न माळी | बैसवीत वनमाळी |
| ३०८ | १८ | तका | इतका |
| ३१२ | १२ | पाठोपाठ | पाठपोट |
| ३२४ | १६ | निवर्जित | विवर्जित |
| ३३० | ७ | वशीकाकार | वशीकार |
| ३३४ | २७ | करेत् | चरेत् |
| ३६० | १३ | साचा | साचार |
| ३६१ | २३ | माढ | माड |
| ३८१ | १ | भक्तिरसामृतांत | भक्तिसारामृतांत |
| ३८४ | २ | अध्यात्म्याचा | अध्यात्माचा |
| ३९६ | २१ | भक्तिरसामृतीत | भक्तिसारामृतांत |

श्रीशङ्कर

# संतकवि श्रीदासगणू महाराज

## व्यक्ति आणि वाङ्मय

### विभाग पहिला

### व्यक्तिदर्शन

**१. पूर्ववृत्त :**

भारताच्या इतिहासांत महाराष्ट्राचें स्थान महत्त्वाचें आणि मानाचें आहे. महाराष्ट्राच्या या माननीय पदाला त्याच्या अनेक उपप्रान्तांनीं श्रेष्ठ पुरुषांच्या रूपानें आपला करभार निरनिराळ्या शतकांत सतत सादर केला आहे.

राष्ट्राचें मोठेंपण हें कांहीं स्वयंभू वा काल्पनिक असत नाहीं. थोर व्यक्तींना तें स्वतःच्या शीलानें, त्यागानें, बुद्धिमत्तेनें आणि पराक्रमानें घडवावें लागतें; निर्माण करावें लागतें. त्यांपैकीं पेशवाईच्या काळांत ज्यांनीं आपल्या कर्तव्याचा वांटा तत्परतेनें उचलला, जीं अनेक नररत्नें या वैभवशाली राजवटींत स्वपराक्रमानें उदयास आलीं; त्या सर्वांचीं मूळ घराणीं बहुधा कोंकणांतल्या रत्नागिरी जिल्ह्यांतीलच आहेत. अटकेपासून तंजावरपर्यंतचा भारतवर्ष मराठी पराक्रमानें उजळवून टाकणाऱ्या दक्षिणी ब्राह्मणांचें आणि अगदीं अर्वाचीन काळीं हिन्दुस्थानचे अनभिषिक्त सम्राट् म्हणून सन्मानिलेल्या लोकमान्य टिळकांचेंहि मूलस्थान हा रत्नागिरी प्रान्तच.

पश्चिम सागराच्या भव्य प्रशान्त मंदिरांत विश्रान्तिस्तव जात असतांना तेजोनिधि भगवान् श्रीसूर्यनारायण आपलें अवशिष्ट तेज जणूं या रत्नागिरीच्या स्वाधीन करीत असतो. म्हणूनच अशा तेजस्वी पुरुषोत्तमांची परंपरा या प्रान्तांतून उगम पावली.

श्रीदासगणू महाराजांनीं या प्रान्ताला 'रत्नें प्रसविणारा गिरी' असें म्हटलें आहे. लो० टिळकांचें चरित्र लिहितांना आरंभींच ते म्हणतात—

**" जलाब्धी तिरीं एक होती खरी पश्चिमेला पुरी नाम रत्नागिरी "**

**" गिरी असल्याविण जन्मा नये रत्न तेजाळ तें कधीं या भूवरीं "**

या रीतीनें कोंकणांतील या वनश्रीयुक्त सुंदर भूभागाला रत्नागिरी म्हणणें ऐतिहासिक दृष्टिकोनांतूनहि यथार्थ वाटतें.

या रत्नागिरी प्रान्तांतील रत्नागिरी तालुक्यांतच 'कोतवडें' नांवाच्या एका लहानशा गांवांत 'सहस्रबुद्धे' या आडनांवाचें एक सुखवस्तु घराणें नांदत असे. सहस्रबुद्धे हे आश्वलायन सूत्राचे शाण्डिल्य गोत्री, ऋग्वेदी, चित्पावन ब्राह्मण. पुढें पराक्रमी सरदार म्हणून प्रख्यातीस आलेले 'पटवर्धनही' मूळचे या 'कोतवडें' गांवांतीलच. सहस्रबुद्धे यजमान आणि पटवर्धन हे त्यांचे उपाध्याय (पुरोहित) असा या दोन घराण्यांचा परस्परांशीं प्रथमचा संबंध. पुढें श्रीहरभट्टबाबा पटवर्धन हे कोंकण सोडून दैव काढण्यासाठीं देशावर आले. तत्पूर्वीं श्रीगणपतीची दीर्घकाल उपासना करून त्याची कृपा संपादन केली आणि पुढें ते इचलकरंजीच्या श्रीमंत घोरपड्यांच्या आश्रयास राहून इकडेच स्थाइक झाले.

श्रीहरभट्टबाबांचे पराक्रमी चिरंजीव गोविंद हरी यांनीं आपल्या शौर्याच्या बळावर मराठ्यांचा विजयध्वज दूरवर फडकवून अपार मान-मान्यता व वैभव संपादिलें आणि " उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मीः दैवेन देयमिति का पुरुषा वदन्ति " हें सुभाषित स्वतःच्या कृतीनें सोदाहरण सिद्ध करून दाखविलें. पटवर्धनांचा मान पेशवाईंत किती मोठा होता, हें कांहीं नव्यानें सांगण्याचें कारण नाहीं. " तलवार विश्वासाची हो या परशुरामभाऊची " असें वर्णन या वंशांतील पुरुषांविषयीं पोवाड्यांतून वारंवार आढळतें.

श्रीदासगणू महाराजांनींहि आपल्या रंगपंचमीच्या पोवाड्यांत—" परशुरामभाऊ पटवर्धन विश्वासाचा सरदार " असें महत्त्वानें लिहिलें

आहे. पटवर्धन थोर पदवीला चढले, पण मागील ऋणानुबन्ध विसरले नाहींत. सहस्रबुद्ध्यांना त्यांनीं आदरानें बोलवून आधार दिला. श्रीमंत पटवर्धनांच्या आग्रहानें सहस्रबुद्धे कुळांतील प्रयत्नशील पुरुष कोंकणांतून घाटावर आले. पटवर्धनांच्या राजवटींतील 'करकंब' या गांवीं राहून श्रीमंतांच्या आश्रयानें त्यांनीं आपला अभ्युदय करून घेतला. याच वंशाची एक शाखा अद्यापहि 'करकंब' येथें नांदत आहे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर झालेल्या संस्थानांच्या विलिनीकरणापर्यंत श्रीमंत राजे मिरजकरांचा आश्रय या घराण्यास होता. श्रीदासगणू महाराजांनीं गोदामाहात्म्यांत आणि इतरत्रहि "करकंब आमुचा मूळगांव" किंवा "आम्ही राहणार करकंबचे। मोडलिंब्यांत वतन आमुचें" असें स्वतःच्या घराण्याची माहिती देतांना लिहिलें आहे.

कालगतीच्या फेऱ्यांत सांपडून मराठ्यांच्या वैभवाला पुढें उतरती कळा लागली. दुसरे बाजीराव इंग्रजांच्या काव्यास बळी पडून पदभ्रष्ट झाले. पुष्कळशीं संस्थानें नष्ट झालीं. उरलेल्या थोड्यांचाहि पूर्वीचा जोम, दबदबा, ऐश्वर्य विशेषसें राहिलें नाहीं. श्रीदासगणूंनींच नोकरींत असतांना रचलेल्या एका पोवाड्यांत या स्थितीचें उत्तम वर्णन केलें आहे.

> " छत्रपतीचें राज्य बुडालें, पेशवाई लया गेली ।
> मोठे मोठे शहाणे गेले, फडणीस नाना बहु अकली ।
> शिंदे, होळकर, बडोदेवाले, इंग्रजांपुढें दीन जाहले ।
> छत्रपति महाराजामागें हिंदुवैभव मावळलें ॥ १ ॥ "

याप्रमाणें स्वराज्य गेलें, आणि परक्या इंग्रजांची धूर्त राजवट सर्वत्र कार्यवाहींत आली. अर्थातच या नवीन काळाला व परिस्थितीला अनुसरून वागणें सर्वांनाच भाग पडलें. त्यावेळीं सहस्रबुद्ध्यांच्या कुळांतील 'अप्पाजी नारायण' या कर्तृत्ववान् पुरुषानें कूपमण्डूकवृत्ति न धरतां करकंब हा मूळ गांव सोडला आणि नगर प्रांत जवळ केला. तेथें आपल्या गुणांनीं मामलत मिळविली. हे अप्पाजी नारायण सहस्रबुद्धे हेच आपले चारित्रनायक संतकवि श्रीदासगणू महाराज यांचे प्रपितामह

(पणजोबा). श्रीअप्पाजींच्यापासून श्रीदासगणूंचा वंशवृक्ष पुढीलप्रमाणें दाखवितां येईल.




भक्तिलीलामृत, गोदामाहात्म्य व भक्तिसारामृत या ग्रंथांतून महाराजांनीं आपल्या या गोत्रकुलाचा उच्चार केलेला आहे. श्रीअप्पाजी नारायण यांनीं नोकरींतून निवृत्त होतांच संन्यास घेतला आणि ते काशीस निघून गेले. तेथेंच त्यांनीं आपला देह ठेवला. श्रीअप्पाचींचे चतुर्थ पुत्र एकनाथपंत यांनीं वडिलांची मामलेदारी पुढें चालविली. स्वतःच्या कर्तृत्वानें व व्यवहारी टापटिपीनें घरेंदारें, शेतीवाडी असें वैभव मिळवून घराण्याच्या लौकिकांत पुष्कळच भर घातली. यावेळेपासूनच सहस्रबुद्ध्यांचें घराणें नगरांत मोठें प्रतिष्ठित गणलें जाऊं लागलें. श्रीएकनाथांच्या पत्नी सरस्वतीबाई ही माऊली फारच सत्त्वशील, निराभिमानी, धार्मिक, आतिथ्यशील व सुगृहिणी होती. वैभव आणि सत्ता असूनहि या साध्वीच्या शालीनतेला तोड नसे. मनाचा प्रेमळपणा

तर इतका उदार आणि निर्मळ असे कीं, नोकरचाकर आणि अतिथिअभ्यागत यांना जन्मदात्या आईची वत्सलता अनुभवायास मिळावी. आपल्या या आजीचा–सरस्वतीबाईचा–उल्लेख करतांना श्रीदासगणू महाराजांचे डोळे अद्यापहि पाणवतात. ऊर प्रेमळ स्मृतींनीं भरून येतो. त्यांनीं आपल्या या आजीचें 'भक्तिलीलामृत' ग्रंथांत अगदीं थोडक्यांत पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे.

**"एकनाथ–कान्ता सरस्वती । शांततेची प्रत्यक्ष मूर्ती ।**
**गृहलक्ष्मी खचित होती । नमन माझें तियेला ॥**
**तिनें अवघ्या आप्तांसी । वागविलें प्रेमेंसी ।**
**कोणा न दाखविले तोऱ्यासी । जरी होती श्रीमंती ॥**
**नवरा होता मामलेदार । तरी लीनता अंगीं फार ।**
**तिच्यापरी न होणार । दुजी स्त्री भूमंडळीं ॥**

अ. ४५

यावरून श्रीदासगणू महाराज आपल्या आजीला किती अलौकिक मानतात, तें लक्षांत येतें.

याच माऊलीच्या पवित्र पाखरणाखालीं श्रीदासगणूंनीं बाळपणींचें प्रेमळ कोडकौतुक अनुभविलें आहे. श्रीएकनाथ अप्पाजींना चार अपत्यें. त्यांतले ज्येष्ठ पुत्र दत्तात्रेय हे श्रीदासगणू महाराजांचे जनक. दत्तोपंतांचा विवाह नगराजवळील 'अकोळनेर' या गांवचे जहागीरदार श्री. अप्पाजी रामचंद्र दाभोळकर यांच्या कन्येशीं शके १७८४ मध्यें झाला. वधूचें नांव सावित्री ठेवलें गेलें.

दत्तोपंतांनीं विद्याभ्यास फारसा केला नाहीं. स्वच्छंद वृत्तीमुळें नोकरी मिळविण्याकडेहि त्यांचें अगदीं लक्ष नव्हतें. तेव्हां त्यांचे धाकटे बंधु जनार्दनपंत यांनींच आपल्या वडिलांची परंपरागत मामलेदारी पुढें चालविली. लो. टिळकचरित्रांत प्रसिद्ध असलेल्या 'क्रॉफर्ड प्रकरणीं' जनार्दनपंतांचा उल्लेख येतो. दत्तोपंत घरींच राहून शेतीभाती पाहूं लागले क्वचित् स्वतंत्र व्यवसाय म्हणून मुखत्यारी वकिलीहि करीत.

स्वभाव उदार, सरळ आणि विलासी. गाण्याबजावण्याची आवडहि फार. दहावीस मित्रांचें मंडळ सभोंवतीं नाहीं, असें कधींच होत नसे. त्यामुळें व्यवहारीपणास अर्थात्च मुरड बसली आणि शेतीकडे काळजीपूर्वक लक्ष द्यावयास हवें होतें, तें झालें नाहीं.

सदर्न मराठा रेल्वेचें काम चालू असतां, मजूर पुरविण्याचे गुत्तेहि दत्तोपंतांनीं पत्करले होते. आरंभीं त्यांत लाभहि झाला, पण पुढें काम चालू असलेल्या भागांत पटकीची सांथ सुरू झाली. मजूर काम सोडून पळून गेले. नवा मजूर तर मिळेना. त्यामुळें त्या उद्योगांत बरीच ठोकर बसून तो नाद सोडावा लागला. श्रीदत्तोपंतांचें कुटुंब सावित्रीबाई या फार करारी, बुद्धिमान्, तापट आणि मानी स्वभावाच्या होत्या. त्यांची शिस्त फार कडक असे, पण पतीच्या स्वच्छंदीपणामुळें बाईंना आपला स्वभाव गिळून शांत वागावें लागे. त्यामुळें त्या आपला बहुतेक वेळ देवघरांतच घालवीत. माहेरच्या वळणामुळें त्यांना दानधर्म, पूजाअर्चा-दींची विशेष गोडी होती.

याच साध्वीच्या उदरीं शके सतराशें एकुणनव्वदमध्यें पौष शुद्ध एकादशीच्या पुण्य दिवशीं ‘ अकोळनेर ’ गांवीं श्रीदासगणू महाराजांचा जन्म झाला. मूल जन्मास आलें आणि आप्तांनीं बाहेर येऊन पाहिलें, तों भगवान् सूर्यनारायणाचें तेजोबिंब दशदिशांना प्रसन्नतेनें उजळवीत क्षितिजाची सीमा टाकून नुकतेंच वर येत होतें. जातकर्म व्यवस्थित पार पडलें, पण बाळ स्तनपान घेईना. सारखा रडूं लागला. अनेक उपाय केले. वैद्यहि आणले, पण त्यांचा उपयोग झाला नाहीं. तेव्हां आजीनें (मातामहीनें) ग्रामदैवत खंडोबास नवस केला कीं, “हे खंडेराया, माझ्या मुलीच्या या पहिल्याच मुलाचें सर्व नीटपणें व चांगलें होऊं दे. मी नैवेद्याला भरीत-रोडगा करून तुझी तळीआरती दरवर्षीं भरत जाईन. माझ्या मुलीलाहि भरावयास लावीन. माझ्यावर कृपा कर.” मनापासून कळवळ्यानें केलेली प्रार्थना विफल कधींच जात नाहीं. नवसाचें म्हणून नव्हे, पण त्यामागील सद्भावनेचें आणि निष्ठेचें फळ मिळालेंच पाहिजे.

देव भावाचा भुकेला आहे ना! भक्तवत्सल खण्डेराय नवसास पावला आणि बाळानें रडें थांबवून दूध चोखलें. श्रीमंतांच्या घरचें पहिलें अपत्य, श्रीसरस्वतीबाई ( आजी ) नातवाचें मुख पाहण्यास मुद्दाम आलेल्या, मग बारशाचा समारंभ थाटांत पार पडला; हें सांगण्याचें कारण नाहीं. मुलाचें पाळण्यांतील नांव 'नारायण' असें ठेविलें.

## २. बाळपण :

पाळण्यांतलें नांव 'नारायण' ठेवलें असलें तरी तें रूढ होण्याचा मात्र योग नव्हता. प्रसूतीनंतरचा कांहीं काळ माहेरीं राहून सौ. सावित्रीबाई आपल्या नूतन पुत्रासह ज्यावेळीं प्रथमच पतिगृहीं परत आल्या, त्यावेळीं श्रीएकनाथपंतांनीं आपल्या गुटगुटीत नातवास मोठ्या प्रेमानें मांडीवर घेतलें नातवास पाहून ते म्हणाले, "नारायण नांव काय ठेवलेंत रे याचें? गुलामाचें पोट पहा ना! कसें गणपतीसारखें आहे. तेंच नांव शोभेल याला. कानसुद्धां पहा केवढे आहेत! याला आतां गणपतीच म्हणावयाचें बरें का!" आजोबांची ही सूचना सर्वांनाच एकदम मान्य झाली. नारायण नांव अगदीं मागें पडलें आणि गणपति, गणेश हेंच नांव प्रचारांत लौकिक पावलें. गणपति हें दैवत बुद्धिमत्तेचें अधिष्ठान आणि परममंगल आहे. श्रीदासगणूंच्या जीवनाशीं ज्यांचा चांगला परिचय आहे, त्यांना त्यांचें नांव गणपति असावें; हें उचित वाटेल. आजोबांना आपला हा नातू फार आवडला. शरीर बळकट, बाळसें चांगलें, रंग गोरा, किंचित् उभट चेहरा, त्या मानानें जरा मोठेच वाटणारे रेखीव कान, चौकस तेजस्वी डोळे, उंच कपाळ आणि त्या कपाळावर शंकराच्या लहानशा पिंडीप्रमाणें असलेला जन्मजात उंचवटा. श्रीएकनाथपंत या गोंडस चिमुकल्याचें फार कौतुक करीत आणि नेहमीं म्हणत—"हा माझा नातू फार भाग्यवान् आहे. खूप लौकिक मिळवील हा."

आजीला तर नातवास कुठें ठेवूं व कुठें नको, असें होऊन जाई. नातवाचे सर्व सोपस्कार आजीच करी आणि नातूहि आजीची मांडी

सोडावयास सिद्ध नसे. एकत्र कुटुंबामुळें बालकाच्या वांट्याला जेवढें कौतुक येणें शक्य तें सर्व या बाळानें पुरेपूर भोगलें. जणूं पुढील परिस्थितीशीं झगडण्याचें बळ आतांच सांठविलें जात होतें.

शैशवाचा ५–६ वर्षांचा काळ सर्वच वडील मंडळींच्या कोडकौतुकांत आनंदांत सरला. सशक्त आणि चपळ मुलाच्या बाळलीलांनीं, चतुर बोबड्या आलापांनीं मातेच्या आशा पल्लवित होऊं लागल्या. लहानगा गणपति आपल्या मातेसवें पुष्कळ वेळां अकोळनेरास आजोळीं जाऊन राहात असे. यावेळीं पुढील आयुष्यास पारमार्थिक वळण देणारे अत्यंत शुभसंस्कार या कुमाराच्या कोवळ्या अंतःकरणावर होत.

सावित्रीबाईंचे वडील अप्पाजी रामचंद्र दाभोळकर हे अत्यंत साधुवृत्तीचे सद्‌गृहस्थ होते. धर्माचरणाकरतां जणूं त्यांचा जन्म झाला होता. प्राचीन काळीं कांहीं राजांच्याविषयीं ‘ पुण्यःशब्दो मुनिरिति मुहुः केवलं राजपूर्वः ’ असें म्हटलें जात असे. त्याप्रमाणें श्रीअप्पाजी रामचंद्र हे जहागीरदारीच्या वैभवी गृहस्थाश्रमांत राहून तपस्वीच होते. यांनीं पुढें ‘ सर्वसंगपरित्याग ’ करून चतुर्थाश्रम स्वीकारला आणि पुणतांब्यास वास्तव्य केलें. येथेंच पवित्र गोदावरीच्या कांठीं त्यांची समाधी आहे. श्रीदासगणूंच्या ठिकाणीं असलेली परमार्थप्रवणता त्यांच्या या आजोबांच्या तपश्चर्येचाच परिणाम आहे, असें म्हटलें असतां वावगें होणार नाहीं. श्रीदासगणूंचे एक मामा श्रीकाशीनाथपंत हे आपल्या वडिलांप्रमाणेंच फार सात्त्विक व धार्मिक वृत्तीचे होते. भजनपूजनांतच त्यांचा सर्वकाळ जावयाचा. एवढे जहागीरदार पण श्रीपांडुरंगाच्या मंदिरांत विटेवरी उभ्या राहिलेल्या सुंदर ध्यानापुढें पायांत चाळ, हातांत चिपळ्या अशा थाटांत भजन करीत नाचतांना अगदीं देहभान विसरून जात. परमेश्वराच्या नांवाचा जयघोष करीत असतांना अष्ट सात्त्विकभाव प्रगट होत, अंगावर रोमांच उभे राहत, ऊर भरून येई, स्वर गाहिंवरे, डोळ्यांवाटें प्रेमाश्रूंचा पूर लोटे. हरिभक्तीच्या या भावसमाधींत तासामागून तास निघून जात, पण श्रीकाशीनाथपंतांना त्याचें भान उरत नसे. आजोळीं

छोट्या गणपतीच्या खोड्यांना अधिकच भर येई, पण त्या वयांतहि मामासवें देवळांत जाऊन भजनप्रसंगीं चिमुकल्या हातांनीं टाळया पिटीत साथ करण्यांत ही बालमूर्ति मोठ्या आनंदानें रंगून जाई. संस्कारसुलभ बालमनावर यामुळेंच हरिभक्तीचें बीजारोपण न कळत का होईना, पण झालें असलें पाहिजे. श्रीदासगणू महाराजांचें उत्तरायुष्य या बीजाचाच महान् वटवृक्ष आहे, असें मानणें सुसंगत होईल. कारण बालपणींची ही स्मृति श्रीदासगणू महाराज कधींच विसरले नाहींत. ‘ संतकथामृत ’ या आपल्या ग्रंथांत त्यांनीं आपल्या या मामांस पुढील शब्दांत आदरांजली वाहिली आहे.

“ तो अप्पाजी रामचंद्रसुत । नाम ज्याचें काशीनाथ ।
विट्ठलाचा परमभक्त । सेवा करी एकनिष्ठे ॥
श्रीमंतीचा अभिमान । पार दिला टाकून ।
पायांत चाळ बांधून । कीर्तन करी राऊळीं ॥
निजहस्तें गुंफून माळा । विठ्ठलाच्या घाली गळां ।
ज्ञानेश्वरी दासबोधाला । करी नित्य आवृत्ति ॥
उभे राहतां कीर्तनासी । प्रेमाश्रू यावे लोचनासी ।
आरंभ होता भजनासी । विठ्ठलमूर्ति डोलतसे ॥
मनींचा पूर्ण उदार । क्रोधा न जागा तिळभर ।
जरी होता जहागीरदार । झांक न अहंपणाची ॥
हे महाराज ज्येष्ठमासीं । जाते झाले वैकुंठासी ।
मरणसमयीं विठ्ठलासी । पाहिले डोळे भरून ॥
त्या काशिनाथ पदाला । मी भावें करितो वंदनाला ।
महाराज या लेकराला । विसरूं नका कदा काळीं ॥ ”

अ. ४७–९८–१०४

सातवें वर्ष सरत आलें तरी श्रीदासगणूंनीं शाळेचा उंबरठा पाहिला नाहीं, कीं धूळपाटीवर रेघोटी ओढली नाहीं. वडील मुलाचा पहिला मुलगा, शिवाय भाग्यसूचक लक्षणांनीं युक्त असें खेळकर पोर म्हणून

आजींचें आपल्या या नातवावर अपार प्रेम होतें. नातवाच्या खोडकर-पणास त्यामुळें निर्भय क्षेत्र लाभलें. कारण आजीच्या पाठीशीं जाऊन उभे राहतांच कोणत्याहि लहानमोठ्या अपराधाला शिक्षा होण्याचें भय उरत नसल्यानें इतरांच्या धाकदपटशास मोजण्याचें प्रयोजनच उरत नसे. अर्थात्च लहानपणीं शिस्त अशी लागली नाहीं. जेवणापुरते तेवढे घरीं एरवीं दिवसभर गल्लींतील समवयस्क मुलांसवें व्रात्यपणा करीत भटकावें. शिकण्याकडे थोडेंहि लक्ष देऊं नये. ‘अजून लहान आहे, शिकेल पुढें, वयच आहे हें खोड्या करण्याचें’ या समजुतीनें घरांतील वडील मंडळींनींहि प्रथम प्रथम तरी तिकडे फारसें लक्ष दिलें नाहीं

सहस्रबुद्धे मंडळी या वेळीं नगर येथें कोडत गल्लींत स्वतःच्या मोठ्या वाड्यांत राहात असत. (हा वाडा पुढें पटवर्धनांस विकला.) या गल्लींतील पुंडलिकाचें विठ्ठलमंदीर वा निसळांचें घर हें दासगणूंचें अत्यंत आवडीचें निवासस्थान. आज कोणत्या खोड्या करावयाच्या तें त्र्यंबक मोहिनीराज परांजपे. (यांनाच बंगाल्या या टोपण नांवानें संबोधीत), शंकर गोपाळ कुकडे, कृष्णाजी मोरेश्वर आहो, त्र्यंबक पांडुरंग साठे, शंकर साठे, दत्तात्रय सोहोनी, रामचंद्र माधव राजहंस, विश्वनाथ पांडुरंग शहाणे इत्यादि समवयस्क मित्रांच्या सभेंत या ठिकाणींच ठरावयाचें. या स्थानाविषयीं श्रीदासगणू महाराजांच्या मनांत अद्यापहि अतिशय मृदु भावना जागृत आहेत. त्यांच्या त्यावेळच्या बाळमित्रांपैकीं आतां कोणी उरलें नाहीं; पण नगरची ओढ त्यांना अजूनहि आहे आणि नगरास गेले म्हणजे प्रकृति कशीहि असो, पुंडलिकाचें विठ्ठलमंदीर आणि निसळांचें घर या दोन ठिकाणीं जाऊन आल्यावांचून त्यांना अगदीं चैन पडत नाहीं. तेथें गेले कीं, आजहि त्यांचें अन्तःकरण भरून येऊन डोळे ओलावतात.

श्रीविश्वनाथपंत निसळांचे एक चिरंजीव नाणावलेले डॉक्टर आहेत. त्यांचें श्रीदासगणूंना केवढें कौतुक! नगरामध्यें त्यांची भेट ज्यांनीं पाहिली, संवाद ज्यांनीं ऐकले, त्यांना याची पूर्ण कल्पना येईल. वस्तुतः

आज नगराशीं वा नगरप्रांताशीं त्यांचा तसा कोणताच संबंध राहिलेला नाहीं; पण महाराजांच्या नगरविषयींच्या प्रेमाला उपमा नाहीं. ठिक-ठिकाणीं त्यांनीं नगरप्रांताविषयींचा अभिमान आपल्या काव्यांतून मोठ्या प्रेमानें व्यक्त केला आहे. एके ठिकाणीं तर नगर जिल्ह्याचें वर्णन त्यांनीं शंकरस्वरूपामध्यें केलें आहे. अहिल्याबाईच्या आख्यानामध्यें ते म्हणतात —

"बा तो जिल्हा गमत प्रतिमा साच श्रीशंकराची।
एकालाही जगतिं नच ये योग्यता हो तयाची॥
दुर्भिक्षाची धवल-विभूति वीष-दुष्काळ कंठा।
शीर्षीं गंगा शिवदास कला नाहीं नाहीं करंटा॥'

निरपेक्ष प्रेमाचें हें एक उत्तम उदाहरण आहे. बालपणींच्या आठवणी हृदयामध्यें किती बद्धमूल असतात, तें अशा प्रसंगानें चांगलेंच प्रत्ययास येतें. 'उद्धवागमन' काव्याच्या चौथ्या सर्गात "गोपींनीं श्रीकृष्णाला 'गोकुळ ही तुझी जन्मभूमि आहे, लहानपणीं तूं येथें खेळलास, तिला विसरूं नकोस, तें तुझ्या मोठेपणास शोभणार नाहीं.' असा निरोप पाठविला;" असें श्रीदासगणूंनीं केलेलें वर्णन त्यांच्या वृत्तीशीं निःसंशय सुसंगत आहे.

या कोंडत गल्लींत राहात असतांनाच शके १७९८ मध्यें वयाच्या नवव्या वर्षीं दासगणूंची मुंज झाली. अध्ययनास येथून आरंभ व्हावयाचा. केवळ त्याकरितांच या उपनयन संस्काराचें महत्त्व, पण मौंजीबंधनानंतरहि दासगणूंना विद्याभ्यासांत गोडी वाटेना. वडिलांना आपल्या विविध व्यवसायांमुळें मुलाकडे लक्ष देण्यास फारशी सवड होत नसे. चुलते जनार्दनपंत मामलेदार असल्यानें बहुतेक फिरतीवर असत. कामाचा व्याप दांडगा, मधून मधून बदल्या, यामुळें त्यांनाहि आपल्या या पुतण्यावर जातीनें लक्ष ठेवणें शक्य होईना. पण विद्याभ्यासासंबंधीं यापुढें आबाळ होणें, अनिष्ट असल्यानें श्रीजनार्दन-पंतांनीं आपले स्नेही श्री. रघुनाथ बळवंत लिमये यांच्याकडे दासगणूं-

च्यावर देखरेख करण्याचें काम सोंपविलें. या गृहस्थांचा स्वभाव फार कडक असे. मुलांना शिस्त लावण्यास शिक्षेसारखें साधन नाहीं. ‘ छडी लागे छमछम विद्या येई घमघम ’ हें त्यांचें धोरण आणि तें कोणत्याहि परिस्थितींत सारखेंच कार्यवाहींत आणावें ही निष्ठा. उनाडक्यामुळें विद्याभ्यासाकडे दुर्लक्ष करणाऱ्या दासगणूंना त्यांनीं वरचेवर शिक्षा करावी, पण लिमयांच्या या धोरणाचा परिणाम मात्र उलट होई.

हट्टी आणि एककल्ली स्वभावाच्या मुलाला केवळ शिक्षेच्या धाकानें वळण लावणें, जवळ जवळ अशक्य आहे. निर्भय मनाला शिक्षेचें भयच फारसें वाटत नाहीं. नुसत्या शिक्षेमुळें प्रतिकाराचा निग्रहीपणा मात्र वाढत जातो. येथें असेंच झालें. अभ्यासाकडे प्रवृत्ति होण्याऐवजीं शिक्षणाविषयींचा तिटकाराच दासगणूंच्या मनांत बळावत चालला. शाळेला जाणें कौशल्यानें चुकवून उनाड मित्रांच्या संगतींत स्वैर भटकण्यांत दिवसांमागून दिवस लोटूं लागले. शाळेंतील उपस्थित दिवसांच्या संख्येपेक्षां खाड्यांची संख्याच दुपटीनें अधिक भरूं लागली. शाळेंत जाऊनहि विद्याभ्यासाऐवजीं दुसऱ्यांचा मार्मिक उपहास करण्याचें प्रावीण्य संपादण्याचाच अभ्यास झाला.

वयाच्या १६ व्या वर्षाचे सुमारास इंग्रजी तिसरींत असतांना एक दिवस शाळेमध्यें श्री. ताईबाई अवचट या नांवाच्या कोण्या एका विदुषींचें व्याख्यान झालें. तो काळ म्हणजे आगरकरांच्या ‘सुधारक’ पत्राच्या प्रसाराचा होता. स्त्रीशिक्षणाचा आणि स्त्रीपुरुषांच्या समानाधिकाराचा पुरस्कार मोठ्या हिरीरीनें केला जात असे. या बाई शिकलेल्या नीं समाज साधारणतः स्त्रीशिक्षणाच्या विरुद्ध. बाई आपलें व्याख्यान शाळेंतील विद्यार्थ्यांसमोर चाललें आहे, विद्यार्थ्यांना मार्गदर्शक होईल असा विद्येची श्रेष्ठता, शिस्तीचें महत्त्व यांपैकीं एकादा विषय असावा, हें लक्षांत ठेवण्याचें विसरल्या आणि त्यांनीं स्त्रीपुरुषांच्या समान योग्यतेचें आवेशपूर्ण भाषेंत प्रतिपादन केलें. आजपर्यंत स्त्रियांना स्वार्थापायीं अज्ञानांत आणि दास्यांत ठेविलें. या आरोपाखालीं पुरुष-

वर्गावर त्यांनीं हवें तसें तोंडसुख घेतलें. शाळेच्या चालकांनाहि हें सर्व अप्रस्तुत वाटलें, पण ते या प्रकरणीं काय करूं शकणार ?

श्रीदासगणूंनीं मात्र या अप्रासंगिकपणाचा मर्मभेदी उपहास करण्याचें मनाशीं योजून शाळेच्या बाहेर विद्यार्थीमित्रांची एक सभा भरविली. मुलांना काय, असल्या गोष्टींचा विशेष उत्साह असतोच. पुष्कळ दाटी झाली. दासगणूंनीं आपलें भाषण बाईच्याच थाटांत अगदीं हातवारे करीत आरंभिलें. " मित्र हो, आतां बाईनीं जें सांगितलें तें रास्त आहे. आजवर पुरुषांच्या हातून मोठाच अन्याय झाला आहे. स्त्रीपुरुषांची योग्यता अगदीं सारखी असल्यानें अमकें काम अमक्यानेंच करावें, हें म्हणणें चूक आहे. आपल्या कार्यक्षेत्रांत स्त्रियांना भाग घेऊं दिला पाहिजे आणि स्त्रियांचीं कामें पुरुषांनीं उचललीं पाहिजेत, हें बाईचें म्हणणें मला पूर्णपणें योग्य वाटतें. खरोखरीच स्त्रियांना फार छळ सोसावा लागतो. गर्भधारणेचें कष्टदायक काम आतांपर्यंत स्त्रियाच करीत आल्या आहेत. हे कष्ट नेहमीं त्यांनींच काय म्हणून सोसावे पुरुषांनींहि त्यांत भाग घेतला पाहिजे. पुरुषांचे गर्भ पुरुषांनीं व स्त्रीगर्भ स्त्रियांनीं धारण करावे. अशी तरी वांटणी झालीच पाहिजे. सर्वच्या सर्व भार स्त्रियांच्यावर हा अन्याय आहे. अशा परिस्थितींत बाईनीं पुरुषांना दोष दिले, हें वाजवीच झालें. आपण नव्या पिढीनें तरी ही चूक सुधारली पाहिजे. यासाठींच बाईनीं आपणांपुढें हें व्याख्यान दिलें. "

या खरमरीत विडंबनाचें स्वागत हास्याच्या कल्लोळांनीं टाळयांच्या कडकडाटांत झालें, हें सांगणें नकोच. बाईच्या अप्रस्तुतपणाचा हा मर्मभेदी, पण समर्पक उपहास आहे, याची मनोमन साक्ष मुख्याध्यापकांस पटली असली तरी शाळेंतील एका विद्यार्थ्यानें असा अतिप्रसंग करावा, हें शिस्तीच्या विरुद्ध झालें. त्यामुळें या विडंबनाचें फल दासगणूंना चांगल्या खरपूस शिक्षेच्या रूपानें भोगावें लागलें. या व अशा इतर कांहीं प्रसंगांनीं हा मुलगा विलक्षण बुद्धिमान् आहे, ही गोष्ट शिक्षकांच्या लक्षांत आली होती. उनाडक्यामुळें स्वतःच्या गुणांची हा मुलगा माती करील,

यानें सुधारावें या सदिच्छेनेंच शिक्षकांनीं कर्तव्यकठोर होऊन छडीचा उपयोग केला, पण त्यामुळें दासगणू शाळेविषयीं अधिकच अप्रीति निर्माण होऊन शिक्षणापासून दुरावले.

जनार्दनपंतांनीं शेवटीं दासगणूंना स्वतःच्या देखरेखीखालींच शिक्षण देण्याचें ठरविलें. ते त्या वेळीं ( सन १८८८–८९ ) संगमनेरास मामलेदार होते. तेथें इंग्रजी शिक्षणाची मुळींच सोय नव्हती, म्हणून ठकार नांवाच्या ग्रॅज्युएटपर्यंत शिकलेल्या गृहस्थास शिक्षक नेमून त्यांचे हाताखालीं सरकारी नोकरांची व इतर कांहीं सुखवस्तु लोकांचीं मिळून १४–१५ मुलें शिकूं लागलीं. अर्थात्च या वर्गाला लहानशा खाजगी शाळेचें स्वरूप प्राप्त झालें होतें. मुलांचें शिक्षणशुल्क पालकांच्या पगारावर व उत्पन्नावर ठरविलें होतें. श्रीदासगणू हे आपला धाकटा भाऊ राम यासह त्या वर्गांत जात असत. स्वभाव मनामिळाऊ, सरळ आणि मोकळा असला तरी श्रीदासगणू हे सहाध्यायी मुलांपेक्षां चार सहा वर्षांनीं वडील असल्यानें मुलें त्यांच्याशीं फारशीं मिसळूं शकलीं नाहींत. त्यांतून पुन्हां त्या काळीं मामलेदार म्हणजे मोठें प्रस्थ असे. तालुक्याचा तो राजाच म्हणा ना! अशा बड्या माणसाच्या पुतण्याशीं अरेतुरेचा जिव्हाळ्याचा स्नेहभाव ठेवण्यास स्वभावतःच मुलें बिचकत. या कारणानें दासगणूंचा मित्रपरिवार तेथेंहि गोंधळी, तमासगीर, विद्येपेक्षां उनाडकींतच रमणारे तरुण अशांचाच राहिला. घरीं दारावर जो पहारेकरी असे, त्याला गोड बोलून, चिरीमिरी देऊन यांनीं आपलासा करून ठेवला होता. त्याच्या साहाय्यानें विशेष गवगवा न होतां रात्रींच्या वेळीं यांना तमाशास सहज जातां येत असे. गांवांत चांगला तमाशा आला आहे, असें कळतांच चुलत्यास चुकवून कधींच पसार होत.

या काळांतच लावण्या, पोवाडे इत्यादि ग्राम्य गीताशीं श्रीदासगणूंचा परिचय वाढला. अनंत फंदी, प्रभाकर, रामजोशी, सगनभाऊ, होनाजी बाळ यांच्यासारखी लावण्या, पोवाडे, छक्कड इत्यादि रचना आपणहि करावी, अशी आकांक्षा निर्माण झाली. शाळेंत बसले असतांनाहि

अभ्यासाचीं टिपणें घ्यावयाचीं सोडून श्रीदासगणू लावण्या, छक्कड यांचीच रचना करीत असत. त्यामध्यें अवखळपणाहि भरपूर असे.

एक म्हातारी वेश्या नटून थटून चांदबिबीचा महाल पाहण्यासाठीं घोड्याच्या गाडींत बसून मोठ्या ऐटीनें जात असतांना यांनीं पाहिलें व लगेच त्या प्रसंगावर एक उपहासात्मक छक्कड तयार झाली.—

**" पडली झुरळी झुरळी तुझे खप्पड झाले गाल**
**काय × × बघतीस चांदबिबीचा महाल "**

अशा रीतीनें अंगामध्यें सुप्त असलेल्या कवित्वशक्तीला आडवाट मिळाली आणि ही काव्यगंगा नागरिकतेचा पवित्र, प्रशांत व सात्त्विक असा समप्रदेश सोडून वाकड्या वळणांनीं ग्राम्यतेच्या रानावनांतून स्वैरपणें वाहूं लागली.

श्रीदासगणूंना शिक्षणाची गोडी लावण्याच्या कामीं शेवटीं जनार्दन-पंतांनींहि हात टेकले. ' तुझ्या दैवांत असेल तसें होवो. आम्ही तरी किती प्रयत्न करणार ? ' असें म्हणून त्यांनीं उदासीनता स्वीकारली आणि इंग्रजी चौथींत असतांनाच शालेय शिक्षणास नित्याचा पूर्णविराम मिळाला. वडील मंडळींच्या प्रयत्नांत मुळींच कसूर नव्हती. दासगणूंची बुद्धिमत्ताहि उत्कृष्टांत मोडण्यापैकीं, पण शिक्षणाचा योग नव्हता, असेंच म्हटलें पाहिजे.

श्रीदासगणू महाराज आपल्या चुलत्याचें ऋण अजूनहि आदरानें आठवितात. ' माझा चुलता फार चांगला होता. त्यानें मला I. C. S. चा सर्व खर्च करून विलायतेलाहि पाठविलें असतें. पण मीच उनाड निघालों, मग ते बिचारे काय करणार ? ' हे उद्गार ऐकले म्हणजे नियतीच्या खेळाचा चमत्कार वाटतो. चौथीपर्यंतचें झालेलें शिक्षणहि सुरळीतपणें धड झालें नसल्यानें श्रीदासगणूंच्यावर त्याचा कांहींहि विशेष परिणाम झाला नाहीं. शालेय जीवनाच्या अभावीं उपजत सद्गुणांवर नागरतेचे शालीन संस्कार झाले नाहींत. त्या गुणांना वेगळेंच आडवळण लागलें. वाङ्मयाची आवड ग्राम्य गीतांकडे वळली. कवित्व-

शक्तीनें तमाशाचें क्षेत्र क्रीडेकरितां पसंत केलें. मनमिळाऊ स्वभावानें उनाड, असंस्कृत, तमासगीर मित्र जमविले आणि सरळ मनाच्या स्पष्टवक्तेपणाला फटकळ बोलण्याचें उर्मट स्वरूप प्राप्त झालें. ज्या स्थायीभावाला बाह्य संस्करणाची कोणतीच अपेक्षा कधींहि असत नाहीं, ती अन्तःकरणाची निरागसता मात्र या सर्व गुणावगुणांना आधारभूत असूनहि अविकृतच राहिली. या केव्हांहि न मळलेल्या निष्पाप वृत्तींतच श्रीदासगणू महाराजांची खरी थोरवी आहे.

### ३. नोकरी :

श्रीदासगणूंच्या मावशीचे यजमान श्री. बळवंत सदाशिव गोडबोले हे बडोद्यास मुन्सफ होते. शाळा सोडल्यावर जरा थारेपालट म्हणून श्रीदासगणू तिकडे गेले. आपल्या या भाच्याला उद्योगास लावावें, या हेतूनें श्री. गोडबोले यांनीं खाजगीकडील एका खात्यांत दासगणूंना स्वतःच्या वशिल्यानें प्रवेश मिळवून दिला. पण आखीव कामाचा कंटाळा आणि संस्थानांत अत्यंत वावडा असलेला स्पष्टवक्तेपणा, यामुळें बडोद्यासहि विशेष जमलें नाहीं. आठ नऊ महिन्यांतच नोकरीस रामराम ठोकून दासगणूंची स्वारी मायभूमीस परत आली. याच सुमारास शके १८१३ मध्यें जामखेड तालुक्यांतील बोरले अष्ट्याचे जहागीरदार नारायणराव रानडे यांच्या कन्येशीं श्रीदासगणूंचा विवाह पुणें येथें झाला. बडोद्याची नोकरी बहुधा लग्नानंतर लगेच सुटली असावी. नोकरी लागून मुलगा आतां मार्गी लागला, या कल्पनेनें वडील मंडळींनीं दासगणूंचें लग्न केलें असावें. पण संस्थानी नोकरीचा साचेबंद ठोकळ मार्ग हा दासगणूंना भावणारा मार्ग नव्हताच मुळीं. मग त्यांत ते कसे स्थिरावणार ? नगरास परत आल्यावर गांवांत भटकण्याचा कार्यक्रम यथापूर्व चालूं झाला. उद्योग, धंदा, नोकरी, शिक्षण कांहीं न करतां चकाट्या पिटीत उगाच भटकणें घरांतील वडील मंडळींना कसें रुचावें ? कड घेणारी वत्सल आजीहि आतां पाठीशीं नव्हती. घरांतील वातावरण

दासगणूंच्या विरुद्ध नेहमीं तापलेलेंच असे. घरांत प्रतिदिनीं खटके उडत. अशाच कांहीं कारणावरून एकदां थोडी अधिक कुरबूर झाली. दासगणूंची चुलती ( श्रीजनार्दनपंतांचें कुटुंब ) टोंचून म्हणाली, " डौल मिरवूं नकोस गणपती ! शेवटीं आमच्याच नांवावर विकावें लागेल तुला ! मी अमक्या अमक्याचा पुतण्या आहे, याच पतीवर तोंड वेंगाडून तुला पोट भरावें लागेल. खूप समजून राहा. नाहीं तर कोणत्या विद्येनें लोक ओळखणार तुला ? "

दासगणूंच्या मानी स्वभावास हे शब्द सहन झाले नाहींत. " विप्रकृतः पन्नगः फणां कुरुते " या न्यायानें ते ताबडतोब उठून उभे राहिले व भावजयीकडून दुखावलेल्या कविभूषणाच्या त्वेषानें त्यांनीं उत्तर दिलें, " काकी, पाणी पिण्यासहि मी आतां येथें थांबत नाहीं ! मात्र हें पक्कें लक्षांत ठेवा कीं, कांहीं झालें तरी मी तुमचें नांव सांगणार नाहीं. लौकिक मिळविला वा उपाशी मेलों तरी माझ्या एकट्याच्या नांवावर सर्व करीन." असें तोडून बोलून ते जे घराबाहेर पडले ते कायमचेच. घरांतून उठले ते तडक श्रीविश्वनाथपंत निसळ यांचे घरीं गेले. अत्यंत जिव्हाळ्याचें व पोट उकलतां येईल असें विसाव्याचें तेवढेंच एक ठिकाण होतें.

श्रीविश्वनाथपंतांची परिस्थितीहि कांहीं विशेष चांगली होती, असें नाहीं. पण झालेली घटना ऐकतांच त्यांनीं सांगितलें, " अरे, जाऊं दे रे ! काळजी मुळींच करूं नकोस. माझ्या पानांतल्या अर्ध्या भाकरींत तुझा चतकोर आहे, असें समज. " असा जिव्हाळ्याचा स्नेहसंबंध अलीकडच्या काळीं खरोखरीच फार विरळा झाला आहे. निसळांचें नांव निघतांच श्रीदासगणू महाराज अद्यापहि गहिंवरतात, तें उगीच नाहीं. घरच्या मंडळींनीं थोडीशी समजूत घालण्याचा प्रयत्न केला, पण उपयोग होणें शक्यच नव्हतें. 'जातो कुठें ? येईल कांहीं दिवसांनीं' या कल्पनेनें घरचे लोक मग स्वस्थ राहिले. श्रीदासगणू हे त्यानंतर कधींच घरीं गेले नाहींत. नगरच्या रस्त्यावरून हिंडत असतांना एके दिवशीं पोलीस सुपरिंटेंडेंट एम्. केनडी या युरोपियन गृहस्थाशीं गांठ

पडली. तो घोड्यावरून येत होता. श्रीजनार्दनपंतांबरोबर फिरतीवर असतांना त्या साहेबाची व दासगणूंची थोडी तोंडओळख झाली होती. त्यानें सहज विचारलें—

" कुठें निघालास असा ? "

" उद्योग मिळविण्याच्या खटपटींत आहे. "

" कां ? आजच अशी काय गरज पडली ? "

" घरीं परत जावयाचें नाहीं, अशा निश्चयानें बाहेर पडलों आहे. "

" मग पोलिसांत भरती होतोस का ? पहा, तुझी नेमणूक करून घेतों. "

श्रीदासगणू हे सशक्त आणि शरीरानें उंचांतच मोडणारे ( ५′–७″ ) असल्यानें भव्यतेच्या दृष्टीनें पोलिसांत भरती होण्यास योग्य आहेत, असें साहेबास वाटलें. शिवाय चांगल्या घरंदाज कुलांतील लोक शक्य तर पोलिसांत घ्यावे, असें त्या वेळचें सरकारी धोरण होतें. साहेबाच्या म्हणण्यास दासगणूंनीं लगेच मान्यता दर्शविली; पण आपली नेमणूक नगरास करूं नये, असें सुचविलें. साहेब हंसत हंसत म्हणाला, ' ठीक आहे. उद्यां मला पोलीस कचेरींत येऊन भेट. ' त्याप्रमाणें दासगणू पोलीस कचेरींत हजर झाले आणि त्यांनीं साहेबाची गांठ घेतली. श्रीगोंदें येथें ९ रुपयांवर शिपाई नेमल्याचें आज्ञापत्र तयारच होतें. तें घेऊन घरीं मुळींच न कळवितां दासगणू श्रीगोंद्यास परस्पर नोकरीकरितां निघून गेले.

कांहीं दिवसांनीं ही वार्ता चुलत्यांचे कानांवर गेली. श्रीजनार्दनपंतांस यामुळें फार वाईट वाटलें आणि रागहि आला. ज्या सहस्रबुद्धे घराण्यांत आज तीन पिढ्या मामलेदारी चालत आली होती, त्या प्रतिष्ठित वंशांतील एका तरुणानें नऊ रुपड्यांवर पोलिसची हलकी नोकरी करावी, हें त्यांना अत्यंत लाजिरवाणें वाटलें असल्यास नवल कोणतें ? ही अपमानास्पद नोकरी न करण्यासंबंधीं जनार्दनपंतांनीं आपल्या पुतण्याचें मन वळविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. अधिक पगाराची व

मानाची दुसरी नोकरी मिळवून देण्याचें आश्वासनहि दिलें; पण दासगणूंच्या निग्रही मनावर त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं.

" क ईप्सितार्थस्थिरनिश्चयं मनः ।
पयश्च निम्नाभिमुखं प्रतीपयेत् । "

एकदां धरलेली नोकरी सोडून देण्यास ते सिद्ध होईनात. श्रीजनार्दन-पंतांचा निरुपाय झाला. अशा रीतीनें घराण्याचा संबंध जो एकदां सुटला तो नित्याचाच. श्रीदासगणूंनीं यानंतर नगर प्रांतांतच विशेषतः श्रीगोंदें, जामखेड, खर्डा, नगर, नेवासें या गांवीं एकूण ११ वर्षें नोकरी केली.

सहस्रबुद्ध्यांच्या नाणावलेल्या कुळांत जन्माला येऊनहि आपल्या मुलाला पोलिसांत हलकी नोकरी कां करावी लागते, याचे ग्रहयोग तरी कोणते म्हणावे ? अशी सारखी विवंचना दासगणूंच्या मातुःश्रीस—श्रीसावित्रीबाईस—लागलेली असे. कोणी ज्योतिषी भेटला कीं, त्याला दासगणूंची कुंडली दाखवावी व भविष्य विचारावें. ते म्हणत, " फार चांगले आहेत हे ग्रहयोग. या ग्रहयोगांमुळें विद्वान्, श्रीमंत वा अधिकारी लोकहि या व्यक्तीला पूजनीय वंद्य मानतील. हा पुरुष दहांचा पोशिंदा नी मोठा लौकिकवान् होईल. " कोणत्या मातेस हें ऐकून आनंद होणार नाहीं ? ज्योतिषांची संभावना त्या फार चांगली करीत. असें वरचेवर घडे. एक दिवस दासगणू त्रासले आणि आपल्या मातेस म्हणाले, " बाई, तुला वेड लागणार आहे हं अशानें ! तुझ्याकडून पैसे उकळण्याकरितां हे लबाड लोक तोंडदेखले हवें तें सांगतात व तूं त्यांच्यावर विश्वास ठेवतेस. अग, इतकी चांगली कुंडली असल्यावर पोलिसांत बूट पुशीत कुणी राहील काय ? थांब जाळूनच टाकतों ती पत्रिका ! " आणि खरोखरीच त्यांनीं आपलें जन्मटिपण ' अग्नये स्वाहा ' केलें. कागद जळाला पण ग्रहयोग थोडेच पालटणार ? जें घडावयाचें होतें तें घडलेंच. इतकेंच नव्हें तर दासगणूंच्या वृद्ध मातुःश्रीसहि मुलाचा लौकिक, लोकांनीं त्यांच्याविषयीं दाखविलेला अतिशय आदर आणि दिलेला मान हें सर्व पहावयास मिळालें.

## ४. कवित्वाचा विकास:

नोकरीवर असतांनाच दासगणूंच्या काव्यगुणाचे पैलू तेजानें चमकूं लागले. घराण्याच्या प्रतिष्ठितपणाचें असें कोणतेंहि बंधन आतां उरलेलें नसल्यानें दासगणूंच्या कवितेस तमाशाच्या रंगेल क्षेत्रांत उघड उघड क्रीडा करण्यास कसलीच अडचण राहिली नाहीं. त्या काळीं तमाशा हेंच जवळ जवळ करमणुकीचें एकमेव साधन होतें. आजच्यासारखे चित्रपट तेव्हां मुळींच नव्हत; पण नाटकेंहि मोठ्या वस्तीच्या नगरांतून क्वचित् होत. एरवीं बहुतेक तमाशाच जनमनाचें रंजन करीत असे. त्यामुळें मामलेदार, फडणीस, वकील, शेठ, सावकार इत्यादि प्रतिष्ठित वर्गाचे लोकहि तमाशाचा यथाशक्य परामर्श घेत व आंतून उत्तेजनहि देत. अशा रसिकांच्या प्रोत्साहनानेंच दासगणूंच्या काव्याचा बहर रातराणीप्रमाणें या प्रांतांत मादकपणें दरवळूं लागला.

श्रीदासगणूंची या वेळची कविता तमाशाकरितांच रचली गेली असली, तरी तिच्या विविधतेचें क्षेत्र विपुल व सर्वंकष आहे. त्यांची ही कविता कधीं इतिहासाचा मागोवा घेत बाजीराव मस्तानीची भेट पोवाड्यांत करून देई, तर कधीं गांवांतल्या मामलेदारापासून हवालदारापर्यंतच्या अधिकाऱ्यांची नांवनिशी मजेदार पद्धतीनें सादर करी. कधीं निर्भेळ शृंगाराचें उत्तान वर्णन करण्यांत रसिकतेनें रममाण होई, तर कधीं निसर्गाच्या सौंदर्याचा आस्वाद घेत जोंधळा–बाजरीचें काव्यमय लग्न लावून सर्व पिकांची डौलदार वरात काढी. कधीं प्रह्लाद महाराजां-सारख्या संतांचे गुणानुवाद गाई, तर कधीं गांवांतील लब्धप्रतिष्ठितांचीं कुलंगडीं चव्हाट्यावर आणून झुळझुळीत पडद्यामागील अनाचाराचें दर्शन घडवी व श्रोत्यांना खदखदून हंसवावयास लावी. हा फटकळपणा असा वैशिष्ट्यपूर्ण असे कीं, ज्यांचा म्हणून त्यांनीं काव्यांत उपहास केला, तें काव्य चारचौघांच्या समोर त्या गृहस्थाच्या तोंडावर साथी-दाराकरवीं म्हणावयाचें. त्यामुळें स्वतःला प्रतिष्ठित समजून डौल

मिरविणारा माणूस श्रीदासगणूंच्या वाऱ्यासहि उभा राहात नसे. उलट वर्तनानें, सन्मानानें व योग्यतेनें तो दासगणूंनाच हलके लेखी. चांगला सज्जन माणूस घरच्याशीं भांडून असा पांचटपणा करीत पोलिसांत कशाला राहील, असा पुरावा तो आपल्या निंदेस देई. दासगणूंच्या सभोंवतीचा तमासगीर, गोंधळी, पोलिसांतील हवालदार इत्यादि परिवार पाहून आणि डफ, तुणतुणें यावर गायलीं जाणारीं ग्राम्य गीतें ऐकून वर वर विचार करणारा त्यांच्याविषयीं साशंक होत असे.

पण ज्यांचा ज्यांचा त्यांच्याशीं अगदीं निकट परिचय घडला, जे त्यांच्या संगतींत एकत्रपणें खाल्ले, प्याले, बसले, उठले आणि म्हणूनच जे त्यांना अन्तर्बाह्य पाहूं शकले, समजूं शकले, अशा लोकांना मात्र श्रीदासगणूंच्या विषयीं नितांत प्रेमादर वाटत असे. सेवानिवृत्त होऊन पंढरपुरास राहिलेले श्री. दत्तोपंत खेर हे पोस्टमास्तर (हे सध्यां दिवंगत आहेत), साईबाबांच्या समाधीपुढें शिरडीस नित्य म्हटली जाणारी आरती ज्यांनीं रचली ते श्री. माधवराव आडकर (या चरित्रांत पढें त्यांचा उल्लेख येणार आहे) हयातखाँ सरदारखाँ इत्यादि गृहस्थांना मी स्वतः भेटलों आहे. त्यांतील दत्तोपंत खैर आणि माधवराव आडकर या दोघांचें श्रीदासगणूंच्या बरोबर असलेलें नम्रतेचें व प्रेमादराचें वागणें मी वर्षानुवर्ष नवलानें पाहात आलों आहे श्री. दत्तोपंत खैर म्हणत, " श्रीमहाराजांचें त्या वेळचें म्हणजे नोकरींत असतांनाचें वागणें वर वर कसेंहि दिसलें, तरी आंतून अगदीं निर्भेळ होतें. पोलीस खात्यांतहि इतका निर्लोभीपणा असूं शकतो, याचें आम्हांस फार नवल वाटे. "

श्री. हयातखाँ सरदारखाँ या गृहस्थांची १९४६ सालीं जेव्हां मीं नगरास चरित्रविषयक माहिती गोळा करण्यासाठीं मुद्दाम गांठ घेतली, तेव्हां आठवणी सांगत असतांना श्रीदासगणूंचें वर्णन त्यांनीं मोठ्या काव्यमय शब्दांत केलें. हे हयातखाँ मला मोठे रसिक गृहस्थ वाटले. जातीनें मुसलमान असूनहि, तुकारामाचे इतके अभंग त्यांनीं म्हणून दाखविले कीं, मी आश्चर्यानें थक्क झालों. ज्ञानेश्वरी आणि रामदासी वाङ्मयांतीलहि किती तरी

अवतरणें त्यांचीं पाठ होतीं. बोलत असतांना एकाद्या प्रवचनकाराप्रमाणें ते त्यांचा सहज उपयोग करीत. हयातखाँ म्हणाले, “ गणपतराव आतां काबुली द्राक्षासारखे अन्तर्बाह्य मऊ आणि गोड झाले आहेत. त्या वेळीं मात्र फणसासारखे होते. उगीच लगट करणाऱ्याला कांटेच बोचावयाचे; परंतु प्रेमानें जरा आंत प्रवेश मिळाला कीं, गोड गऱ्याची मेजवानी. फटकळपणा आणि तमाशांतील काव्य सोडा, पण नीतीची मर्यादा त्यांनीं कधींहि ओलांडली नाहीं; एवढेंच नव्हे तर तसें त्यांच्या कधीं मनांतहि येत नसे. खरोखरीच एकाद्या लहान मुलाप्रमाणें त्यांचें वागणें अवखळ, पण सरळ नी निष्पाप होतें. मीं पोलिसांतील सबंध नोकरी पुष्कळच चांगली केली, याला तसें म्हटलें तर गणपतरावांची पुण्याईच कारण आहे. वावगें वर्तन त्यांना कधीं खपलें नाहीं. ”

या कारणानेंच माधवराव आडकरांसारखा विरक्त पुरुष आजहि दासगणूंच्याविषयीं शिष्यभाव धरून नम्रतेनें वागतांना दिसतो. यासाठींच केव्हांहि न मळलेल्या निष्पाप वृत्तींतच श्रीदासगणूंची थोरवी आहे. असा उल्लेख मीं मागील प्रकरणाच्या शेवटीं केला आहे. ही झाली त्यांच्या जिवलग आणि समाजांत मानाचें स्थान असलेल्या मित्राची गोष्ट.

तमासगीर, गोंधळी तर दासगणूंना आपले अन्नदाते मानीत. त्यांच्याविषयीं गुरूसारखा पूज्यभाव ठेवीत. त्यांच्या लावण्या, पोवाडे इत्यादींचे बळावर गोंधळी लोकांनीं आपले प्रपंच दुष्काळांतहि सुखानें केले. १९४६ सालीं रामा गोंधळी नांवाचा, त्यांच्या त्या वेळचा अबू गोंधळी या साथीदाराचा मुलगा व लावण्या, पोवाडे म्हणणारा मला भेटला होता. तो तर महाराजांचें त्या वेळचें जुनें काव्य सांगत असतांना ‘ खरा गणपतराव. गणपतरावांचे लई उपकार झाले आमच्यावर ’ असें कितीदां तरी म्हणाला. तुळशीराम दळवी—ज्याचा दासगणूमहाराजांनीं ‘शिष्यबोधा’मध्यें आपला पहिला शिष्य म्हणून उल्लेख केला आहे—या गृहस्थांना भेटण्यासाठीं जामखेडास मी गेलों होतों. ते नुकतेच दिवंगत झाले होते. त्यांच्या

घरच्या मंडळींनीं मी दासगणूंच्या चरित्राची माहिती गोळा करण्यासाठीं आलों आहें, असें कळतांच माझा अत्यंत आदर केला. " आमचे मालक गेले हो ! त्यांनीं तुम्हांला लई मदत केली असती. आपल्या गुरूचं चरित्र लिहिलं जाणार, हें ऐकून त्यांना फार आनंद झाला असता." असें म्हटलें आणि बाईनीं आपल्या घरांतील खाजगी पत्रांचीं सर्व दप्तरेंच्या दप्तरें माझ्या-सारख्या अगदीं अपरिचित माणसाच्या स्वाधीन केलीं. ' यांत तुम्हांला कांहीं उपयोगाचें सांपडेल का पहा ' असें सांगितलें.

हें सर्व सांगण्यांत माझा एवढाच हेतु कीं, पोलिसच्या नोकरींत आणि तमासगीर वातावरणांतहि दासगणूंच्या वागणुकीचें अंतरंग स्पष्ट व्हावें. कमळाच्या पानासारखें त्या वातावरणांत सतत राहूनहि त्याचा लेप त्यांच्या अंतःकरणास कधींच लागला नाहीं, हीच गोष्ट यावरून प्रत्ययास येते.

### ५. सद्गुरूपदेश :

आपल्या नोकरीचा आरंभ श्रीदासगणूंनीं श्रीगोंद्यास केला, हें मागें उल्लेखिलेलें आहेच. तेथेंच असतांना श्रीसद्गुरु वामनशास्त्री इस्लामपूरकर यांची भेट झाली. श्रीवामनशास्त्री यांची फारच थोडी माहिती उपलब्ध होते. ( श्री. लो. टिळकांच्या बरोबर ज्या श्री. वामनशास्त्री इस्लामपूर-करांचा उल्लेख येतो, ते हे नव्हेत. ) हे मोंगलाईतील परांडे या गांवाजवळ असलेल्या काजीच्या इस्लामपूरचे राहणारे. श्रीकल्याण महाराजांच्या परंपरेंतील सांप्रदायिक रामदासी. श्रीवामनशास्त्र्यांचे वडील लहानपणींच वारल्यानें त्यांच्या मामानें आपल्या या पोरक्या भाचाला आपलेकडे हैदराबादेस नेलें. श्रीवामनशास्त्री यांचें पदवीपर्यंतचें शिक्षण तेथेंच मामाकडे झालें. हे पुढें मद्रासकडे मोठे सरकारी अधिकारी झाले होते. यांचा संस्कृत विद्येचा व्यासंग फार दांडगा असे. कांहीं कारणानें प्राचीन संस्कृत ग्रन्थ पाहण्याचे प्रसंग आल्यास तें काम श्रीवामनशास्त्री

यांजकडेच सोंपविलें जाई. यांच्यापासूनच श्रीदासगणूंनीं मंत्रोपदेश घेतला. तो प्रसंग असा. श्रीगोंद्यास आबाशास्त्री भणगे या वृद्ध विद्वानाचे येथें कांहीं पुरातन संस्कृत ग्रन्थ आहेत, अशी माहिती लागल्यावरून श्रीवामनशास्त्री या ग्रन्थांच्या संशोधनासाठीं श्रीगोंद्यास आले होते. ते सरकारी अधिकारी असल्यानें त्यांची व्यवस्था सरकारकडून करण्यांत आली होती. श्रीदासगणूंना या कामीं वरिष्ठांकडून सूचना आली कीं, शास्त्रीबुवांच्या तैनातीस राहून त्यांना कोणतीहि अडचण पडणार नाहीं, असें करावें.

कचेरींतून घरीं परत येत असतांना आबाशास्त्री भणगे यांच्या दारावरूनच रस्ता होता. शास्त्रीबुवा विड्याचें साहित्य पुढें घेऊन पान कुटीत बसले होते. त्यांनीं ‘ ये गणपतराव ’ असें मोठ्या प्रेमानें स्वागत केलें. बैठकीवर जरा नीट बसल्यासारखे करून दासगणू म्हणाले, ‘ शास्त्रीबुवा, तुमच्या येथें कांहीं जुन्या पोथ्या आहेत ना ? त्या पाहण्यासाठीं एक शास्त्री सरकारनें मुद्दाम पाठविला आहे. जुनें वाङ्मय फार मूल्यवान् मानलें जातें. त्याची कोणीं किती आबाळ केली, तें पाहून सरकार त्याचा जाब विचारणार आहे. ’ तें ऐकतांच भाबडे भणगेशास्त्री गडबडले. त्यांना तें सर्व अक्षरशः खरें वाटलें. सरकार हें प्रकरण त्या काळीं अत्यंत भीतिदायक होतं. आज आपल्याला त्याची कल्पनाच करतां येणार नाहीं. शास्त्रीबुवा घाबरून म्हणाले, “ आतां रे गणपतराव ! मी अलीकडे फार थकलों बघ. गेल्या कित्येक वर्षांत मीं त्या पोथ्यांकडे नुसतें पाहिलें सुद्धां नाहीं. कांहीं भानगड आणूं नको बाबा ! ”

“ भानगड कशाची शास्त्रीबुवा ? ग्रंथ नीट झाडून झटकून ठेवा. पोथ्या चांगल्या व्यवस्थित आहेत, असें पाहिल्यावर सरकार झालें तरी काय करणार ? मी माणूस पाठवून देतों. त्याचेकडून नीट स्वच्छता करून घ्या, म्हणजे झालें ”

‘ ठीक आहे ’ असें म्हणून आबाशास्त्री कामास लागले आणि

वर्षानुवर्ष धूळ खात पडलेल्या पोथ्यांची प्रक्षाळपूजा झाली. या प्रत्यक्ष अनुभवलेल्या प्रसंगाचा उपयोग श्रीदासगणूंनीं पुढें ‘भक्तिसारामृत’ या ग्रंथांतील ३२ व्या अध्यायांत एका प्रकरणीं करून घेतला असावा. जुन्या वाङ्मयाची किती आबाळ होते, ऐहिक लाभ कांहीं नसल्यानें किती उपेक्षाबुद्धीनें त्याकडे पाहिलें जातें; याचें मोठें सुरेख वर्णन तेथें आलेलें आहे.

ठरलेल्या दिवशीं वामनशास्त्री येऊं शकले नाहींत. त्यांना दोन दिवस उशीर झाला. समागमें असलेला आचारी मागें राहिल्यामुळें वामनशास्त्री हे एका ब्राह्मण बाईनें चालविलेल्या घरगुती खाणावळींत जेवणास आले होते. श्रीदासगणूहि याच खाणावळींत जेवत असत. त्यांनीं शास्त्रीबुवांना अजून पाहिलें नव्हतें. नेहमींच्या थट्टेखोर स्वभावास अनुसरून श्रीदासगणू तेथील एकास म्हणाले, “सरकारनें कोण पंडित पाठविला आहे कोणास ठाऊक! दोन दिवस झाले. स्वारीचा पत्ता नाहीं. इतक्या लांब स्टेशनवर फुकट हेलपाटे झाले. विद्वत्ता कोणीं विचारावी? पण सरकारी शास्त्री म्हणून डौल मात्र पाहून घ्यावा लागेल. जुन्या ग्रंथांच्या रद्दींतून हे विद्वान् काय रत्नें काढणार आहेत, तें ईश्वर जाणे!”

हें सर्व भाषण समोरच बसलेले श्रीवामनशास्त्री ऐकत होते ते कांहींहि बोलले नाहींत किंवा त्यांच्या चेहऱ्यावर कुठलाहि भाव तिरस्काराचा व औत्सुक्याचाहि दिसला नाहीं. नेहमीं कोणी ना कोणी तरी प्रवासी जेवणास येतात. त्यांतीलच हे एक अशी श्रीदासगणूंची भावना. पुढें कचेरींत ज्या वेळीं ओळख करून घेण्याचा प्रसंग आला, तेव्हां हेच वामनशास्त्री असें समजल्यावर दासगणूंना फार कानकोंडें वाटलें. शास्त्रीबुवांनीं या प्रकरणाची थोडीहि जाणीव कोणत्याहि प्रकारांनीं दिली नाहीं. त्यामुळें तर अधिकच लाजल्यासारखें झालें. शास्त्रीबुवांचे सर्व व्यवहार अगदीं शांतपणानें आणि विशेष कांहीं झालेंच नाहीं, या भावनेनें चालले होते.

एक दिवस रात्रीं श्रीवामनशास्त्र्यांच्या खोलींत दासगणूंनीं सहज डोकाविलें. शास्त्रीबुवा शुचिर्भूत होऊन नित्यनियमाप्रमाणें पूजेस बसले होते. पूजा फारच तल्लीनतेनें चालली होती. नंतर श्रीमद्भागवताचें पारायण करीत असतांना, भक्तिरसाच्या उद्रेकानें त्यांच्या दोन्ही नेत्रांतून प्रेमाश्रूंच्या धारा ओघळत होत्या. मुद्रेवर एक तऱ्हेचें अलौकिक तेज चमकत होतें. या दृश्याचा श्रीदासगणूंच्या मनावर फार परिणाम झाला. श्रीवामनशास्त्र्यांच्या सहवासांत असतांना, त्यांचें सदाचरण, प्रशांत वृत्ति, सरळ स्वभाव यांचा अनुभव आल्यानें त्यांच्याविषयींची आदराची भावना यापूर्वींच दासगणूंच्या अंतःकरणांत उत्पन्न झाली होती, पण भावसमाधींत रंगून गेलेली शास्त्रीबुवांची ती दिव्यमूर्ति अवलोकून साध्या आदराला भक्तीचें स्वरूप प्राप्त झालें. परमार्थाला अवश्य असलेला गुरूपदेश घ्यावयाचा, तो याच सत्पुरुषांकडून असा त्यांचा निश्चय झाला.

श्रीगोंद्याचें काम संपत आलें होतें. आतां लवकरच परत जावयाचें असें ठरल्यानें शास्त्रीबुवांनीं दासगणूंना बोलावून प्रेमानें म्हटलें, " गणपतराव, तुम्ही फार साहाय्य केलेंत, याकरितां पारितोषिक म्हणून म्हणा वा तुमच्या माझ्या भेटीची आठवण म्हणून म्हणा तुम्हांस काय देऊं ? माझ्या मनांत ही अंगठी तुम्हांस द्यावयाची आहे. "

श्रीदासगणूंनीं पुढें होऊन पायांवर डोकें ठेविलें आणि हात जोडून गहिंवरलेल्या स्वरानें ते म्हणाले, " मीं आपला फार अपराध केला असतांनाहि आपण माझ्यावर थोडाहि रोष दाखविला नाहींत. याहून दुसरें पारितोषिक काय पाहिजे ? मला आतां पदरांत घ्या आणि उपदेश देऊन कृतार्थ करा. "

शास्त्रीबुवांनीं त्यांना झिडकारून टाकण्याचा नाना रीतीनें प्रयत्न केला, पण " आपण मला आपले म्हटल्यावांचून मी हे पाय सोडणार नाहीं; " असा हट्टच दासगणूंनीं धरला. त्यांचे डोळेहि अश्रूंनीं भरून आले. हा निग्रहाचा भाव पाहून श्रीवामनशास्त्री प्रसन्न झाले. त्यांनीं

दासगणूंना यथाविधि मंत्रोपदेश करण्याचें मान्य केलें. गुरुदक्षिणा म्हणून एक महिन्याचा पगार उपदेश घेतांना पुढें ठेवावा, अशी मनीषा होती; पण श्रीवामनशास्त्री यांनीं दासगणूंना मग घरीं जाऊं दिलें नाहीं. "अरे, एका पगारानें काय होतें? गुरूला सर्वस्व अर्पण करावें लागतें. तशी तयारी आहे का? जाऊं दे. तुझ्या सर्व नोकरीचीच मी गुरुदक्षिणा घेणार आहे, पण त्याला अवकाश आहे. कडोसरीला दोन पैसे आहेत ना? तेवढे सध्यां पुरेत" असें ते म्हणाले.

श्रीदासगणू हे प्रथम कट्टर शिवभक्त. सोमवार, प्रदोष, शिवरात्र हीं व्रतें ते मोठ्या निष्ठेनें व कडक रीतीनें पाळीत. महाशिवरात्रीचा सर्व दिवस तोंडांत कांहींहि न घालतां, शिवलिंगावर रुद्राचा अभिषेक करीत जागून काढीत. विष्णुदेवतेविषयीं त्यांना लवमात्र आदर नव्हता. उलट तिटकाराच असे. त्यांनीं गुरुमंत्र घेतला, तो सुद्धां बेलाचे पानावर. श्रीसद्गुरु वामनशास्त्री हे रामदाससांप्रदायी असूनहि पंढरपूरचे वारकरी होते. त्यांनीं अनुग्रह करतेवेळीं बेलाच्या पानांविषयींचा आपल्या शिष्याचा हट्ट पुरविला व उपदेशहि शिवमंत्राचाच केला, परंतु आज्ञा म्हणून पंढरपूरची वारी करावयास सांगितली. सद्गुरूचा उपदेश झाल्यानंतरच श्रीदासगणू हे 'दासगणू' या नांवानें प्रसिद्धीस आले. सद्गुरूंचा दास असा गणू किंवा गणू हा सद्गुरूंचा दास या भावनेनें ते काव्यामध्यें स्वतःचा उल्लेख दासगणू अथवा गणूदास असा दोन्ही रीतीनें करूं लागले. पुढें रामदास या नांवाप्रमाणें तेंच त्यांचें नांव प्रख्यातीस आलें. आपल्या नोकरींत असतांना केलेल्या काव्यांतून—

**"गणूदास रची हे कवनकथा सुन्दर।**
**वामनशास्त्रींचा हस्त मस्तकावर॥"**

अशा अर्थाचे अनेक उल्लेख त्यांनीं केले आहेत.

पंढरपूरच्या वारीची आज्ञा दासगणूंना फारशी रुचली नाहीं; परंतु "आज्ञा गुरूणां ह्यविचारणीया" या नियमानें मनापासून इच्छा

नसतांनाहि गुरूंची ही आज्ञा दासगणूंनीं निग्रहानें पाळली. नोकरींत असल्यामुळें ठराविक वेळींच जातां येत नसे. वर्षांतून कोणत्या तरी शुक्लपक्षांतील एकादशीस रजा मिळेल, त्याप्रमाणें ते वारीस जाऊन येत. नोकरींत असतांना व नंतरहि या नियमास अद्यापपावेतों कधीं खंड पडलेला नाहीं.

एकदां मात्र फार चमत्कारिक प्रसंग निर्माण झाला. वर्ष संपत आलें तरी पंढरपुरास वारीला जातां आलें नव्हतें. या येत्या एकादशीस गेलेंच पाहिजे, नाहीं तर नियम मोडतो म्हणून फौजदाराजवळ रजा मिळावी, अशी विनंति केली. फिलीप नांवाचा एक ख्रिश्चन त्यांचा फौजदार होता. तो म्हणाला, " मला माहीत आहे. पंढरपुरास जाण्यासाठीं तुला रजा हवी आहे. मी रजा देणार नाहीं. अरे! दगडाधोंड्यांत का देव असतो ? "

" मी कोठें जाणार याला काय महत्त्व आहे ? माझी रजा शिल्लक आहे. सध्यां महत्त्वाचें तसें कामहि कचेरींत नाहीं आणि मला रजा हवी आहे. लाकडाच्या फळकुटांत देव असतो का ? असें मीं विचारलें तर मात्र आपण रागवाल ! "

" बरं ! बरं ! फार बोलूं नको. देणार नाहीं तुला रजा. "

" मला गेलेंच पाहिजे. आपण रजा देत नसाल तर मी तसाच जाईन.

" तसाच गेलास तर तुझ्यावर खटला भरीन. तूं पोलिसांत आहेस. शिक्षा भोगावी लागेल. चेष्टा नाहींत या ! "

" आपल्या इच्छेस येईल तसें करा. माझें देव असेल तसें होईल. "

शेवटीं रजा मिळाल्यावांचूनच श्रीदासगणू पंढरपुरास वारीकरितां निघून गेले. इकडे फौजदारांनीं ' हवालदार रजा न घेतां काम सोडून निघून गेला. तरी पुढें काय करावयाचें त्याची आज्ञा व्हावी. ' असें वरिष्ठांस विचारलें. ' हवालदाराचा जबाब घेऊन लेखी पाठवावा. ' असें वरून सांगण्यांत आलें.

श्रीदासगणूंच्या मनांत आतां काय होतें, ही धागधुग होतीच. ते चंद्रभागेचें स्नान करून प्रदक्षिणेस जावयास निघाले असतां, झिक्रीपाडळीचा पाटील हांका मारीत धांवत येतांना दिसला. 'गणपतराव, अगदीं देव भेटलांत. माझे दोन बैल चार दिवसांपूर्वीं चोरीस गेले आहेत. त्यांतील एक आतां येथें पंढरपुरांत आहे. शोध केला तर दुसराहि सांपडेल. चला ना तिथंवर' असें तो म्हणाला. हें ऐकून दासगणूंना वाटणारी काळजी पार दूर झाली. त्या वेळीं पंढरपुरास श्री. बळवंतराव यादगिरी हे फौजदार होते. या दोघांचा स्नेहहि चांगला होता. त्यांच्या मदतीनें दोन्ही बैल पकडले आणि चार दिवस निर्धास्तपणें पंढरपुरास राहिले. नंतर मुद्देमाल, फिर्यादी आणि पंढरपूरच्या फौजदाराचें अधिकृत पत्र यांसह श्रीदासगणूंची स्वारी जामखेडास परत आली.

आपल्याविरुद्ध वर तक्रार झाली आहे, हें त्यांना माहीत होतेंच. त्यांनीं योग्य ती काळजी घेऊन सावधपणानें सर्व वृत्त वरिष्ठांकडे लेखी पाठविलें. त्याचा परिणाम असा झाला कीं, श्रीदासगणूंना कर्तव्यदक्षतेकरितां शाबासकी मिळाली आणि नीट चौकशी न करतां तक्रार करण्याचा खोडसाळपणा केला, म्हणून फौजदारास समज देण्यांत आली. या झालेल्या घटनेकडे आपापल्या भावनेनुसार कोणी चमत्कार म्हणून वा कोणी केवळ योगायोग म्हणून पाहील; परंतु या प्रसंगाचें कांहीं वैशिष्ट्य आहे, हें निश्चित. यानंतर पुढें केव्हांहि पंढरपूरच्या वारीसंबंधीं कोणतीहि अडचण उपस्थित झाली नाहीं.

पंढरपूरच्या वारीमुळें दासगणूंच्या अन्तःकरणवृत्तींत इष्ट तो पालट हळूहळू आपोआप घडून येऊं लागला. आरंभीं आरंभीं केवळ सद्गुरूंची आज्ञा म्हणून ते निरुपायानें पंढरीस जात. त्यांनाच पुढें पांडुरंगाच्या दर्शनाची ओढ लागूं लागली. सासुरवासी मुलीनें माहेरीं यावें, तसा जीवींचा विसांवा त्यांना श्रीक्षेत्र पंढरपुरांत लाभूं लागला. कटिवर कर ठेवून विटेवर उभे राहिलेल्या या सुंदर ध्यानाच्या चरणारविंदीं मनोवृत्ति

रंगून गेल्या, त्या नित्याच्याच. श्रीदासगणूंनीं आपल्या या स्थित्यंतराचें वर्णन ‘ भक्तिसारामृत ’ ग्रन्थांत स्वतःच केलें आहे.

“ तुझ्या कृपेनें अद्वेष्टी । भक्ति उपजली जगजेठी
होती मला आवडी मोठी । श्रीशंकराची प्रथमतः ।
तें विष्णुस्वरूपाचा । द्वेष मनीं होता साचा ।
त्या एकदेशी भक्तीचा । नाश झाला तुझ्या कृपें ।
आतां हरिहरांत । भेद, न मशीं वाटत ।
तुम्ही दोघे एकरूप सत्य । ऐसा सिद्धांत जाहला । ”

या तऱ्हेचे अनेक उल्लेख त्यांच्या सर्व काव्यभर सांपडतात. कट्टर शिवभक्त श्रीविठ्ठलाचा उपासक झाल्यामुळेंच नरहरी सोनार चरित्र इतकें सरस आणि रसाळ उतरलें. याचें कारण त्या परिस्थितींतून कवि स्वतःच गेले, हें होय.

श्रीवामनशास्त्री इस्लामपूरकर आणि दासगणू या गुरूशिष्यांची भेट मंत्रग्रहणानंतर दोनतीनदांच काय ती झाली. शास्त्रीबोवा पुढें फार दिवस राहिले नाहींत. एकदां ते आपल्या या प्रियाशिष्यास घेऊन पंढरीस गेले होते. तेथेंच त्यांनीं मी काशीस जाऊन देह ठेवणार आहें, हें श्रीदासगणूंजवळ बोलून ठेविलें होतें. पुढें ते ज्यावेळीं काशीस जाण्यासाठीं निघाले, त्यावेळीं दौंड येथें मला येऊन भेट, अशी त्यांनीं आपल्या शिष्यास आज्ञा केली. त्याप्रमाणें दासगणू दौंडास सद्गुरूंच्या दर्शनास गेले. गुरुमाउलीची ही शेवटची भेट या कल्पनेनें त्यांचें हृदय दुःखानें भरून आलें होतें. डोळ्यांत अश्रु मावत नव्हते. शास्त्रीबुवांनीं दासगणूंना दौंडावरून परत जाऊं दिलें नाहीं. भुसावळपर्यंत आपल्या-सवेंच नेलें. तिकिटाची व्यवस्था आधींच केली होती. आगगाडीच्या दुसऱ्या वर्गाच्या डब्यांतून प्रवास करीत असतांना या गुरुशिष्यांचें जें कांहीं गहनगूढ अंतरींचें असें वत्सल संभाषण झालें, त्याची कल्पना इतरांना कशी करतां येणार ? भुसावळ जवळ येत असलेलें पाहून श्रीसद्गुरु वामनशास्त्री यांनीं आपल्या प्रियशिष्याला हृदयाशीं धरून कुरवाळलें आणि

जें सांगावयाचें होतें, तें सर्व सांगितलें. श्रीसद्गुरूंच्या प्रेमाश्रुसिंचनानें श्रीदासगणूंचें मस्तक पावन झालें. जणूं या आसवांच्या मिषानें श्रीसद्गुरुमहाराजांनीं आपलें सर्वस्व दासगणूंच्या ठिकाणीं ओतलें. म्हणूनच संस्कृत भाषेचा वा वेदान्त शास्त्राचा अभ्यास झाला नसतांनाहि शांडिल्यांच्या अर्थगूढ भक्तिसूत्राचा मार्मिक भावार्थ श्रीदासगणू महाराज आपल्या बोधिनी टीकेंतून उत्तम रीतीनें विशद करूं शकले. याचें मूळ जर कुणी श्रीवामनशास्त्री यांच्या नयनांतून झालेल्या प्रेमाभिषेकांत शोधलें तर तो अगदींच चुकला, असें म्हणतां यावयाचें नाहीं. भुसावळहून पुढें जातांना श्रीशास्त्रीबुवांनीं दासगणूंना आग्रहानें परत पाठविलें आणि सांत्वन करीत सांगितलें, " वेड्यासारखें दुःख करूं नकोस. हा मुळीं मृत्युलोकच आहे. त्यांतूनहि मी नित्याचाच दुरावला आहें, अशी समजूत करून घेण्याचें कारण नाहीं. दोनतीनदां शिरडीस गेला होतास ना ? श्रीसाईबाबा योग्य विभूति आहेत. त्यांना माझेंच स्वरूप मान. आम्ही दोघे एकरूप आहोंत. तेच येथून पुढें तुला वेळोवेळीं मार्ग दाखवितील." या आदेशामुळेंच श्रीदासगणूंनीं श्रीसाईबाबांना उद्देशून पुढीलप्रमाणें विनंति केली आहे.—

हे श्रीसाई समर्था । तुझ्या पदीं ठेवून माथा ।
करितों विनंती हीच आतां । ती उदारपणें मान्य करा ।।
मी सकल संतांचा चरणरज । माझी राखा आपण लाज ।
तुम्हीं भवाब्धीचें जहाज । हें म्यां पक्कें जाणलें ।।
हीच विनंती साईनाथा । या वामनशास्त्र्यांच्या छात्रा ।
नको लोटूं कदा परता । बाबा दासगणूसी ।।
माझे गुरू मरून गेले । पोरकेपण मजला आलें ।
म्हणून पाहिजे संभाळिलें । या पोरक्या गणूसी ।।
तुम्ही एकरूप अवघे संत । तुम्हांमाजीं नसे द्वैत ।
तुम्ही वामनशास्त्री साक्षात् । आहांत बापा मजलागीं ।।

भक्तिसारामृत ५२–२९२

श्रीदासगणू आज्ञेप्रमाणें परत आले. श्रीवामनशास्त्री इस्लामपूरकर हे काशीस कांहीं दिवस राहिले. तेथेंच त्यांनीं शके १८१८ च्या ज्येष्ठ वद्य एकादशीस विश्वेश्वरचरणीं देह अर्पण केला.

श्रीवामनशास्त्री यांना संतती नव्हती. श्रीदासगणूवांचून दुसरा शिष्यहि नव्हता. पूर्वींच अर्पण केलेल्या आध्यात्मिक वैभवासवें त्यांनीं आपली ऐहिक संपत्तीहि एका मृत्युपत्रानें दासगणूंच्या स्वाधीन केली. गुरुपत्नीला हें मुळींच आवडलें नाहीं. ना नात्याचा ना गोत्याचा, अशा उपऱ्याची धन व्हावी हें सामान्य व्यवहारी माणसास कसें रुचावें? त्या बाई दासगणूंना हवें तें बोलल्या. कायद्याप्रमाणें बाईचें कांहीं चाललें नसतें. कारण काशीहून रजिस्टर्ड पोस्टानें आलेलें तें मृत्युपत्र अगदीं व्यवस्थित होतें. दासगणूंचे मित्र श्री. रामभाऊ ढमढेरे मामलेदार यांनीं दासगणूंना तसा सल्लाहि दिला, पण दासगणूंनीं तें मृत्युपत्र जसेंच्या तसें गुरुपत्नीच्या स्वाधीन केलें.

धनिकालाहि मोह पडावा, अशा मोठ्या संपत्तीवरचा सर्व अधिकार त्यांनीं स्वसंतोषानें सोडला. गुरुपत्नीच्या चरणीं मस्तक ठेवून ते म्हणाले, "माय, मला या संपत्तीची थोडीहि अपेक्षा नाहीं. हें सर्व खुशाल परत घ्या. गुरुमाउलीच्या पूजेंतील त्यांच्या आवडीची ही विठ्ठलमूर्ति तेवढी मला घेऊं द्या, म्हणजे मला आणखी कांहीं नको." सांसारिक दृष्टीच्या व्यवहारी माणसास तांब्याच्या मूर्तीच्या या मागणींत अमान्य करण्यासारखें काय आहे? बाईनीं तत्काळ संमति दिली. सर्व संपत्तीच्या मृत्युपत्राच्या बदल्यांत हा व्यवहार मुळींच तोट्याचा नव्हता. त्या होय म्हणतांच एका तनसडीलाहि हात न लावतां, श्रीदासगणू आपल्या सद्गुरूंची उपास्य देवता ती पांडुरंगाची मूर्ति तेवढी घेऊन अत्यंत समाधानानें परत आले. ही मूर्ति श्रीदासगणूंच्या पूजेंत आजहि आहे. श्रीसद्गुरूंच्या समागमाचा आणि वियोगाचा हा काळ साधारणपणें शके १८१६ ते १८ या दोन तीन वर्षांमधील आहे.

## ६ जामखेड :

श्रीगोंद्याहून दासगणूंची बदली जामखेडास झाली. हें गांव नगरपासून २५–२६ कोस दूर आहे. आज मोटारीची सोय चांगली झाली आहे. पण त्या काळीं म्हणजे शके १८२० मध्यें हें गांव सर्वच दृष्टींनीं फार त्रासाचें होतें. इंग्रजी ( त्या वेळीं ) व मोंगलाई यांच्या सीमा एकमेकांस भिडलेल्या असून खालसा नि संस्थानी गांवांची सरमिसळ झालेली होती. त्यामुळें चोर, दरोडेखोर वा इतर अपराधी यांना मोठें निर्धोक कुरण सांपडे. या ठिकाणची बदली म्हणजे एक प्रकारची हद्दपारीची शिक्षाच असे. अशा या जामखेडांतहि श्रीदासगणूंनीं आपले दिवस स्वतः हंसत व दुसऱ्यास हंसवीत अत्यंत आनंदांत काढले.

कोणत्याहि परिस्थितींत समाधानी राहण्यास बाहेरच्या अनुकूल परिस्थितीपेक्षां मनाची घडण कांहीं वेगळ्या प्रकारची आणि उच्च पातळीची असावी लागते. अशी मनोरचना ज्याची आहे वा ज्यानें ती प्रयत्नपूर्वक प्राप्त करून घेतली आहे, त्याच्या आनंदांत प्रतिकूल परिस्थितीमुळेंहि फारशी उणीव कधीं येत नाहीं.

या जामखेडाशीं श्रीदासगणूंच्या पूर्वायुष्यांतील अनेक रोमहर्षक प्रसंग निगडित झालेले आहेत. पण ज्यामुळें श्रीदासगणूंचा कीर्तिसौरभ अखिल महाराष्ट्रभर दरवळला, त्या कीर्तीचा पहिला धडाहि या जामखेड गांवांतच गिरविला गेला. गुरूपदेशानें अंतरंगांत रुजलेल्या भक्तीच्या सूक्ष्म बीजाला पहिला दृश्य अंकुर याच ठिकाणीं फुटला.

जामखेडास एका उत्सवप्रसंगीं आमंत्रण दिलेला हरदास आला नाहीं. उत्सवसमारंभ कीर्तनावांचूनच पार पाडावा लागला. त्यावरून एकदां तेथील मामलेदार शेटफळकर दासगणूंस म्हणाले, “ अरे गणपतराव, लावण्यापोवाड्यांत आपल्या बुद्धीचा अपव्यय करतोस, त्याऐवजीं जर कांहीं आख्यानें बसविलीं असतीस तर तुझ्या काव्यशक्तीचें खरें चीज झालें असतें. पण नव्हेच तें. तुम्हांला होळीच्या उत्सवाचे मानकरी होण्यांतच भूषण वाटतें. ”

" कां बरें ? मला देवळांतील कीर्तन करतां येणार नाहीं कीं काय ? पुढच्या एकादशीला माझेंच कीर्तन ठरवा. "

" म्हणजे माझी फजिती करून घेऊं होय तुझें कीर्तन ठरवून ? तुला काय ? कशाचेंच कांहीं बंधन नाहीं. मला भोंवतींचा व्यवहार पाहिला पाहिजे. कीर्तन म्हणजे मुंज्याच्या पारावरचा तुम्ही घालतां तसला डफ तुणतुण्याचा गोंधळ नाहीं. विद्वत्ता लागते त्याला ! "

" हें पहा, अनुभवावांचून बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. कीर्तनाची संवय व्हावी म्हणून कोणी तरी शाळामास्तर, पोस्टांतला माणूस, कचेरींतील कारकून असे धरून आणून उभे करतां ना ? मींहि उभा राहीन एकादे दिवशीं. काय होतें पहा तरी ! पुढची एकादशी माझी ठरली बरं ! "

हें बोलणें कोणींहि विश्वासार्ह मानलें नाहीं. श्री. हरी रघुनाथ तपस्वी हेडमास्तर, श्री. बापूसाहेब वरखेडकर सबरजिस्टार, श्री. दत्तोपंत खैर पोस्टमास्तर इत्यादींनीं एकाद्या पाक्षिक बैठकीसारखें हें कथेचें चक्र संवयीकरितां हौसेनें सुरू केलें होतें. श्री. दत्तोपंत खैर यांना मात्र आपल्या मित्राच्या सद्गुणांचा पूर्ण विश्वास होता. गणपतराव जें म्हणेल तें करून दाखवील, असा भरंवसा असल्यामुळें त्यांनीं मामलेदारांस भर देऊन दासगणूंचें कीर्तन ठरविलें. श्रीदासगणूंनींहि सर्वांस चकित करून सोडावयाचें, असा मनोमन निश्चय केला. त्यासाठीं संत दामाजीचें आख्यान स्वतंत्रपणें अगदीं नवीन असें रचलें. लावण्या म्हणणाऱ्या आपल्या साथीदारांकडून तें चांगलें पाठ करवून घेतलें. हयातखाँ सरदारखाँ या नांवाचे एक मुसलमान गृहस्थ दासगणूंच्या सवेंच पोलिसांत हवालदार होते. त्यांना दासगणूंविषयीं फार प्रेम आणि आदर वाटत असे. ते यांच्या लावण्या खड्या सुरानें मोठ्या सुंदर म्हणत असत. दासगणूंकरितां काय वाटेल तें करण्याची तयारी असलेले ते मोठे निष्ठावंत गृहस्थ होते. त्यांनीं दाढी वगैरे काढून गंध लावून रुमाल, उपरणें अशा हिंदू वेषांत श्रीदासगणूंच्या या पहिल्या कीर्तनाची साथ केली. कीर्तन

ऐकण्यासाठीं नुसता तोबा उडाला होता. 'तमाशाच्या शृंगारिक लावण्या रचणारा गणपतराव कीर्तन करणार आहे. पाहूं तरी काय सांगतो तें!' या कुतूहलानेंच बरीचशी मंडळी गोळा झाली होती. जवळ जवळ दोन तास कीर्तन झालें. टर उडविण्याकरितां आलेल्या मंडळींना नमनाच्या समाप्तीनंतर पूर्वरंगास जो भारदस्त आरंभ झाला, त्यांत आपला विचार कृतींत आणण्यास अवसरच गवसला नाहीं.

आख्यानास आरंभ होतांच त्यांतील दुष्काळाचें वर्णन, दामाजींची उदारता, जेवणाच्या पंक्तीचा थाट यांत मंडळी अगदीं रंगून गेली. दामाजीला धरणें येतांच संत दामाजीच्या साध्वी पत्नीनें तुळशी-वृंदावनाजवळ उभे राहून—

"हे अनंत पंढरिराया।
कां पातळ केलीस माया विठ्ठला।
चुकलें मी काय सेवेला।
म्हणुनियां मोकलिसी मजला।"

अशी जी करुणा भाकली, तिनें सर्वांस रडविलें आणि परमेश्वरानें आपल्या भक्ताच्या संरक्षणार्थ महाराच्या रूपानें बेदरास धांव घेतांच श्रोत्यांच्या मनांतील सर्व किल्मिषें भक्तिरसाच्या पवित्र गंगेंत वाहून गेलीं.

कीर्तनाचा थाटहि कांहीं वेगळाच. बाष्कळ विनोद नाहीं. तराण्याचा गडगडाट नाहीं. ओढून ताणून कोट्या करणें नाहीं. कृत्रिम हावभाव नाहीं वा पांडित्याचें उसनें प्रदर्शनहि नाहीं. आबालवृद्धांस सहज समजेल असा सोपा विषय, अकृत्रिम साधेपणा, हृदयाचा ठाव घेईल अशी जिव्हाळ्याची भाषा, हृदयांतून उमटणारें भक्तिप्रेम आणि या सर्वांना मधुरपणें उठाव देईल असें स्वकृत प्रेमळ काव्य. हें सर्व ऐकून लोक आश्चर्यचकित झाले.

'गणपतराव दिसतो वा वाटतो, तसाच केवळ नाहीं. कांहीं वेगळाच असला पाहिजे' अशीच बहुतेकांची भावना झाली. यानंतर मधून मधून श्रीदासगणूंचीं कीर्तनें होत. सुदाम, कबीरकांता, तुकाराम (पहिला भाग)

हीं आख्यानें या वेळींच रचलीं गेलीं आहेत. न सरावलेल्या प्रतिभेंतून तीं स्फुरलीं असूनहि त्यांची रसवत्ता अमूप आहे. पण हें सांगण्याचें काम चरित्राच्या मर्यादेपलीकडील आहे. काव्यविवेचकानें हाताळावा असा हा विषय आहे. असो. अशा रीतीनें ज्या कीर्तनांनीं पुढें महाराष्ट्राला वेड लाविलें, सुशिक्षितांच्या नास्तिक विचाराला धक्के दिले, बुवांचें ढोंग चव्हाट्यावर आणलें, भक्तिरसाचे पावन प्रवाह वाहविले आणि चार-पांच हजार श्रोत्यांना एकाच वेळीं आपल्या वयाचा आणि योग्यतेचा विसर पाडून हरिप्रेमाच्या आनंदांत देहभान विसरावयास लाविलें; त्या कीर्तनांचा पाया अशा रीतीनें घातला गेला.

श्रीदासगणूंच्या भोंवतीं त्यांच्या चाहत्यांचा परिवार या काळींहि फार मोठा असे. अडचणींत सांपडलेल्या अनेकांना आधार देऊन त्यांनीं जीवनांत स्थिर केलें आहे. श्री. सावळाराम झिक्रीकर, श्री. माधवराव आडकर, इत्यादि मित्र त्यांपैकींच होत. उदाहरणाकरितां म्हणून श्री. तुळशीराम दळवी यांचें नांव सांगण्यासारखें आहे. कॉलऱ्याच्या साथींत यांचे आईवडील वारले. हा १२–१३ वर्षांचा अल्पवयी पोरका मुलगाहि आजारी पडला. या अनाथ पोराला दासगणूंनींच स्वतः शुश्रूषा करून वांचविलें. संभाळून पुढें शिक्षण देऊन वाढविलें. जामखेडास हे गृहस्थ शाळामास्तर होते. दासगणूंचें काव्य लिहिण्याचें काम त्यावेळीं बहुधा श्री. तुळशीराम दळवी यांनींच केलें आहे.

**" हें चरित्र कामधेनू । दोहन करी दासगणू ।**
**लेखक झाला सुलक्षणू । तुळशीराम छात्र माझा ॥ "**

' भक्तिलीलामृत ' ग्रंथांत याप्रमाणें त्यांचा उल्लेखहि आहे.

त्या वेळच्या लावण्या छक्कडादि काव्यांत—

**" गणू कवन करी ।**
**बसून पारावरी ।**
**अंबु झील धरी ।**
**रामा पांडून बहार केली ॥ "**

असे ज्यांचे उल्लेख वरचेवर केले आहेत, तो अंबू गोंधळी आणि त्याचीं दोन मुलें रामा व पांडू यांचा संसार तर सर्वस्वीं दासगणूंच्या काव्यावरच चाललेला होता. श्री. रंगोबा लोहकरे, श्री. बापू डोंगरे, श्री. भाऊराव सवताडकर, श्री. बापू वाढकर अशा स्नेह्यांची संख्याहि बरीच होती. त्या वेळीं दासगणूंना स्वतःचा असा कोणताच व्याप नसल्यानें कचेरींतून सुटतांच ते या मंडळींत येऊन बसत आणि मुंज्याच्या पारावर डफ तुणतुण्याच्या झंकारांत ही बैठक मध्यरात्रींपर्यंत चाले. कारण कुटुंब सौ. सरस्वतीबाई ह्या थोड्या वेडसर असल्यानें श्रीदासगणूंना संसारसुख फारसें लाभलें नाहीं. 'कुटुंब वेडे सरस्वती' असा पत्नीचा उल्लेख त्यांनीं 'गोदामाहात्म्यां'त स्वतःच केला आहे. लावण्या, पोवाडे रचून त्या खड्या सुरानें म्हटलेल्या ऐकणें, हीच त्यांच्या आयुष्यांतील एकमात्र करमणूक होती. श्रीदासगणूंना स्वयंपाकहि पुष्कळदां स्वतः करावा लागे. अंबू गोंधळ्याची बायको चांगुणा ही त्यांचीं वरचीं कामें उरकी. त्या बाईनें धान्य निवडून नीट करून, दाणे असतील ते दळून यांचेकडे पोंचवावे आणि मग यांनीं ते शिजवून खावे, अशी पद्धत होती. श्री. सावळाराम झिक्रीकर वा श्री. माधवराव आडकर यांच्यासारखे त्यांचे कांहीं स्नेही मधून मधून दीर्घकाळपर्यंत यांचेकडेच राहात. तेच त्यांना स्वयंपाक करून घालीत. एकंदरींत श्रीदासगणूंच्या जीवनांत खाजगी असें कांहींच नव्हतें. सांसारिक पाश वा आप्तेष्टांचे संबंध तुटतच जावे, अशा चमत्कारिक घटना श्रीदासगणूंच्या आयुष्यांत सहजपणें घडून आल्या.

एकदां असें झालें कीं, श्रीदासगणूंचे चुलतबंधु ( जनार्दनपंताचे चिरंजीव ) श्री. बाबुराव यांच्या विवाहप्रसंगीं वधुपक्षाकडील भोजन-समारंभास वरपक्षाची मंडळी जमली होती. श्रीदासगणूंची स्थिति बेताची. ते एक जुना मळकट मुकटा नेसून भोजनास गेले आणि साधारण लोकांच्या पंक्तींत जाऊन बसले. त्या वेळीं एकानें म्हटलें, " तुम्ही वर जा. व्याहीमंडळींची विशेष व्यवस्था माडीवर केली आहे." त्याप्रमाणें

श्रीदासगणू माडीवरील पंक्तींत आले. खाशा स्वाऱ्या अद्यापि आल्या नव्हत्या. नवरदेवाचे आणि त्याच्या बंधूचें अशीं पहिलीं दोन पानें सोडून तिसरें पान त्यांनीं धरलें. सख्ख्या चुलतभावाच्या मानाची जागा निश्चितपणें तीच होती.

तेथील व्यवस्थापकानें दासगणू कोण तें ओळखलें नाहीं. साधा जुनवट मुकटा पाहून हा कोणी तरी आगांतुक ब्राह्मण असला पाहिजे, असें तो समजला आणि रागानें म्हणाला, " ही व्याह्यांची पंगत आहे. भटाभिक्षुकांचीं पानें खालीं मांडलीं आहेत. आपली योग्यता काय, कुठें बसावें, हें सुद्धां कळण्याची अक्कल नाहीं ? माणूसच आहांत ना ? उठा. खालीं व्हा. " इतकेंच म्हणून न थांबतां त्या उतावळ्या गृहस्थानें हात धरून त्यांना खालीं ओढलें. श्रीदासगणूंचा स्वभाव अत्यंत मानी नी तापट. हा अपमान त्यांच्या जिव्हारीं लागला. ते तेथून गेले ते थेट पुंडलीकाच्या विठ्ठलमंदिरांत आले आणि देवाच्या पायांवर हात ठेवून सद्गदित स्वरांत म्हणाले, " विठोबा, आजपासून कोणाच्या लग्नमुंजीला जाईन तर तुझ्या पायाची शपथ. "

मागाहून दासगणू हे जावयाचे बंधु असें कळल्यावर वधुपक्षांतील प्रमुख गृहस्थांनीं व्याह्यांची नाना प्रकारें क्षमा मागितली. घरच्या मंडळींनींहि पुष्कळ समजूत घालण्याचा प्रयत्न केला. पण व्यर्थ ! श्रीदासगणूंचा निश्चय ढळला नाहीं. ते शांत होऊन म्हणाले, " मला राग आला होता, पण आतां तो गेला आहे. त्या भरांत केलेली शपथ मात्र मला मोडतां येत नाहीं. माझ्या पांडुरंगाची ती शपथ आहे. " ही शपथ श्रीदासगणू महाराज आजपर्यंत अत्यंत कसोशीनें पाळीत आले आहेत. त्यांच्या स्वतःच्या मुलीचेंहि लग्न दुसऱ्यांनींच लावलें. श्री. दामुअण्णांचें लग्नाचें देवक श्री. भगवानराव मांजरमकर आणि त्यांच्या पत्नी सौ. हरिणाबाई याच प्रेमळ जोडप्यानें ठेविलें. यासाठींच आम्ही मुलें ( मी व माझी बहीण ) त्यांना आजोबा व आजी असेंच संबोधत असूं. नातवापेक्षांहि अधिक प्रेम त्यांनीं आमच्यावर केलें.

माझ्या बालपणचीं कांहीं वर्षें मीं या दांपत्याच्याच प्रेमळ सहवासांत काढलीं. माझ्या लग्नाच्या वेळींहि श्री. ती. दादा (श्रीदासगणू) पंढरपुरास दत्त घाटावरील दत्ताच्या देवळांत जाऊन राहिले होते. धान्य, भाजीसुद्धां त्यांनीं स्वतंत्रपणें बाजारांतून आणून शिजविली. लग्नाच्या कोठींतील कशासहि त्यांनीं स्पर्श केला नाहीं. गोरोबा काकांच्या चरित्रामध्यें शपथेसाठीं हात तोडून घेतल्याची कथा आहे. श्रीदासगणूंचा निश्चय आणि पांडुरंगावरील निष्ठा हीं त्या जातींतीलच आहेत, यांत शंका नाहीं.

अडाणी आणि खालच्या वर्गाचे लोकच तेवढे दासगणूंना मानीत, असें नाहीं. नोकरींत असतांनाहि वरिष्ठ अधिकाऱ्याशीं ते कधींच नमून वागले नाहींत. उलट कांहीं फौजदारच यांना बिचकून असत. यांच्या काव्यगुणाला मोहित झाल्यामुळें व मनमोकळया विनोदी स्वभावामुळें मामलेदारासारखे सत्ताधारीहि दासगणूशीं स्नेहानें वागत. हवालदार असूनहि दासगणूंचा मान त्या मंडळींत फौजदारापेक्षां अधिक असे.

जामखेडास एकदां श्री. बापू हरी गोडबोले मामलेदारांच्या घरीं शेठ सावकार, फौजदार, कचेरींतील कारकून आणि बरीच मंडळी दसऱ्याचें सोनें देण्यास आली होती. 'या, बसा.' असें म्हणण्याइतकेंच या मंडळींचें स्वागत झालें; पण दासगणू येत आहेत, हें पाहतांच मामलेदार डोक्यास पागोटें घालून पुढें आले. 'या, या गणपतराव' असें म्हणून हात धरून बैठकीवर बसविलें. कांहींना विशेषतः फौजदारास हा प्रकार म्हणजे स्वतःचा अपमान वाटला. माझ्या हाताखालच्या हवालदाराची प्रतिष्ठा माझ्यापेक्षां जास्त? मामलेदाराचें कांहींच करतां येणें शक्य नव्हतें, पण त्याचें उट्टें त्यांनीं दासगणूंवर काढलें. नोकरींत त्यांना अनेक प्रकारें त्रास दिला, पण श्रीदासगणू त्या सर्वांस पुरून उरले.

या फौजदारावर एक कवन करून गोंधळ्याकडून उघड म्हणविण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं. त्यांतील हयातखाँ सरदारखाँ या गृहस्थाकडून उपलब्ध झालेल्या कांहीं ओळी पुढीलप्रमाणें आहेत.

" खरवड नगर जिल्ह्याची जामखेडीं आली ।
पडली कीं तयावर कुऱ्याची साउली ।
टोपण ठेवीलें नांव तयाचें टिप्या ।
नरसिंह तुकाराम कोणी म्हणती त्या अप्या ।
हा चेहरा माशुक किति तरि सुंदर दिसे ।
ठोक्याचें तपेलें अंमळनेरी जसें ॥ "

दासगणूंच्या या वेळच्या लोकप्रियतेच्या रंगांत अशा विविधतेच्या छटा भरपूर आहेत.

## ७. कान्ह्या भिल्ल प्रकरण :

श्रीदासगणूंच्या जीवनास निराळें वळण लावण्यास कारणीभूत झालेल्या ज्या अनेक गोष्टी नोकरींत असतांना घडल्या, ज्यामुळें त्यांच्या अंतःकरणांतील परमार्थाची आवड अधिक दृढमूल झाली, अशा घटनांत कान्ह्या भिल्लाच्या तपासाकरितां गुप्त हेर म्हणून रहावें लागलें; या प्रसंगास बरेंच महत्त्व आहे. म्हणून तें प्रकरण जरा विस्तारानें सांगितलें पाहिजे.

कान्ह्या भिल्ल म्हणून एक दरोडेखोर सन १८९८ चे सुमारास बराच गाजला होता. त्याला धरण्याकरितां मोंगलाईतील व इंग्रजींतील पोलिसांनीं आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा केली, पण त्या सर्वांच्या हातावर तुरी देऊन कान्ह्यानें आपला धुडावा चालूच ठेवला होता. त्यानें अनेक गांवें लुटलीं. शेठसावकारांचे बळी घेतले. कित्येकांचीं नाकें कापलीं. पोलिसांच्याहि रक्ताचे पाट वाहविले. पूर्व सूचना देऊन दिवसाढवळ्या डाके घातले. लोकांचें जीवित वा वित्त भरवंशाचें उरलें नाहीं. या कान्ह्याला पकडण्यासाठीं सरकारनें गुप्त हेर नेमण्याचें ठरवून बऱ्याच ठिकाणांहून हुशार शिपायांचीं नांवें मागितलीं.

त्या वेळच्या एका पोलीस अधिकाऱ्याचें व दासगणूंचें थोडें वितुष्ट होतें. त्यानें दासगणूंचें नांव वर कळविलें आणि या धोक्याच्या कामावर

हटकून नेमणूक व्हावी, या हेतूनें 'गणेश दत्तात्रय हा चाणाक्ष शिपाई असून गुन्ह्याचा तपास फार चांगला करतो.' असें आपलें प्रशस्तिपत्रहि जोडलें. त्याप्रमाणें 'कांहीं गुप्त कामावर तुमची नेमणूक केली असून आपलें काम हाताखालच्या शिपायांवर सोंपवून नगरच्या मुख्य पोलीसकचेरींत दाखल व्हावें,' अशी दासगणूंना आज्ञा झाली. हें धोक्याचें काम आपणांकडे येऊं नये म्हणून त्यांनीं पुष्कळ खटपट केली; पण उपयोग न होतां गुप्तहेर म्हणून कान्ह्याच्या तपासासाठीं जावेंच लागलें.

पाथर्डीपासून १०–११ कोस दूर असलेल्या मोंगलाईतील लोणी या गांवीं रामदासाच्या वेषांत ते येऊन राहिले. लोणीच्या गंगाराम पाटलाशीं कान्ह्याचा संबंध आहे, अशी कुणकुण असल्यानें या भागांत शोध करण्याची आज्ञा श्रीदासगणूंना झाली होती. रामदासी वेषा-करितां आवश्यक असलेलें, कुबडी, रामनामी चिपळ्या, दासबोध, ज्ञानेश्वरी, पांढऱ्या घोंगड्या इत्यादि साहित्य त्यांना सरकारी खर्चानें मिळालें. सद्गुरूपदेशामुळें मी रामदासी झालोंच आहे, तेव्हां सोंगच घ्यावयाचें तर तें त्यांतल्या त्यांत खरें असावें; या कल्पनेनें रामदासी वेष दासगणूंनीं पत्करला होता.

लोणी हें गांव जरा डोंगराळ भागांत आहे. गांवाभोंवतीं थोडी झाडी असून जवळच पाण्याचा खळखळ वाहणारा ओढा होता. गांवांत एक लहानसें राममंदिर आहे. पुढें सोप्यासारखे पांच खण व मागें छोटासा गाभारा. आंत एका ओट्यावर रामरायाच्या वनवासी वेषांतील काळ्या शिलेच्या लहानशा मूर्ति. अगदीं साध्या मांडणीचें माळवदी घरवजा तें मंदिर होतें. याच ठिकाणीं श्रीदासगणू—छे! आतां रामदासीबुवा येऊन उतरले.

मंदिर जुनें असून किती तरी दिवसांत त्याकडे कोणींहि लक्ष दिलें नव्हतें. याची साक्ष सर्वत्र पसरलेला केर, पाचोळा, पाकोळ्यांची उबट घाण, आढ्याला लोंबकळणारीं मळकट जळमटें पाहून पटण्यासारखी होती. अशा स्थितींत देवाची पूजा कित्येक दिवसांत झाली नव्हती,

हें सांगण्याची गरज नाहीं. देवापुढें कांहीं उत्पन्न नसल्यानें पुजाऱ्याला रामसेवेची स्फूर्ति कशी व्हावी ? निःस्वार्थपणें परमार्थ करणारे किती आढळणार ? "सर्वः स्वात्मवशात् जनोऽभिरमते कस्यास्ति को वल्लभः" हें सर्वथा सत्य आहे.

मंदिराची अशी ही दैना व राममूर्तीची अनास्था पाहून दासगणूंना मनापासून वाईट वाटलें. त्यांचे डोळे भरून आले. श्रीरामाच्या पायावर मस्तक नमवीत ते म्हणाले, "रामराया, आपल्यामागें सदाचा वनवासच का हो ?" स्वतः पांच सहा तास खपून त्यांनीं पाकोळ्यांचीं घरटीं, केर-कचरा झाडून झटकून सर्व मंदिर स्वच्छ केलें. शेण आणून सारवूनहि टाकलें. वाण्याकडून ऊद आणून त्या ठिकाणीं जाळला. आतां त्या स्थानाला थोडें तरी मंदिराचें स्वरूप आलें. प्रभु रामचंद्राची पूजा करणें, हा श्रीदासगणूंच्या भाविक हृदयाला अत्यंत आनंद देणारा व्यवसाय होता. अगदीं मनापासून तासन् तास ते त्यांत रममाण होत. गुप्त वेशांत असूनहि या कामीं कृत्रिमतेचा लवलेश नव्हता. ओढ्यावर जाऊन रानकण्हेरीचीं बरींचशीं तांबडीं पांढरीं फुलें वेंचून आणावीं आणि त्यांच्या माळा गुंफून दाशरथीला अर्पण कराव्या. पवमान, रुद्राचीं आवर्तनें म्हणत अभिषेक करावा. स्वयंपाक करून नैवेद्य समर्पावा. दुपारीं विष्णुसहस्र-नामाचे १२ पाठ म्हणावे व संध्याकाळीं दासबोध, ज्ञानेश्वरी वाचावी. रात्रीं भजन करून निद्रा घ्यावी. दिवसभर याच पारमार्थिक कार्यक्रमांत देव देव करीत मग्न असावें. कोणाशीं विशेष बोलूं नये. अन्यत्र कोठें जाऊं नये. समोर सरळ पहात ओढ्यावर जाऊन स्नान करावें व सरळ परत येऊन मंदिरांत बसावें.

अशा रीतीनें कांहीं दिवस लोटले. हळू हळू देवळांत दर्शनाकरितां, पोथी ऐकण्यासाठीं वा भजनकीर्तनाला बरीच मंडळी येऊं लागली. रामापुढें कांहीं धान्य, खारका, शेंगा, गूळ असे पदार्थ येऊं लागले. क्वचित् पैसेहि येत. रामदासीबुवांनीं खारका, गूळ, शेंगा ठेवून घ्याव्या आणि धान्य व पैसे देवळाचा पुजारी बाळंभट यास नेण्यास सांगावें.

अर्थात्च रामदासीबुवाविषयीं बरेंच कुतूहल निर्माण होऊन गांवकऱ्यांत नानाप्रकारचे तर्कवितर्क होऊं लागले. भिन्न भिन्न कंड्या उठूं लागल्या. कोणी म्हणे, 'हा खराच रामदासी आहे.' दुसरा म्हणे, 'असेल कोणी लुच्चा. तोंड चुकवून येथें येऊन राहिला आहे?' कोणी म्हणे, 'हा पोलिसचा गुप्त हेर असावा.' त्यांत हा खराच रामदासी आहे, असें म्हणणाऱ्यांची बहुसंख्या होती. ते म्हणत, "पोलिसाला किंवा एकाद्या लुच्चा चोराला पवमान, रुद्र कोठून येईल? ज्ञानेश्वरी, दासबोध कसा कळेल? हा तर अहोरात्र देव देव करीत असतो. किती भाविकपणें देवाचें करतो पहा ना! किती घाण होतं हें मंदिर? आतां येथें आलें कीं कसं बरं वाटतं! खरोखरच हा साधुवृत्तीचा असल्यावांचून इतकी शांति, इतका निस्पृहपणा कसा असेल?" लोकांची रामदासीबुवाविषयींची भक्ति हळू हळू वाढत गेली. तरी पण हा गुप्त हेर असावा, असें म्हणणारीं २–४ माणसें होतींच. त्यांपैकीं अंताजीपंत कुळकर्ण्यानें तर बुवाचा ठाव घेण्याच्या दृष्टीनें आपल्याकडून बराच प्रयत्न केला.

"काय बुवा, ठीक चाललें आहे ना? कांहीं अडचण असेल तर सांगा हो! आम्ही तुमचेच आहों. तुम्हांला लागेल तें साहाय्य करण्याविषयीं तुमच्या वरिष्ठ पोलिसकचेरींतून लिहून आलें आहे."

"तुमचा कांहीं घोटाळा झालेला दिसतो आहे अंताजीपंत. पोलिसकचेरीचा आणि माझा काय संबंध? मला रामदाशाला गरज ती कशाची लागणार? माझा रामराय समर्थ आहे."

कुळकर्ण्याच्या मनांतील संशय नाहींसा झाला नाहीं. बुवा पक्का आहे. त्यापुढें आपली मात्रा चालणार नाहीं, हें मात्र तो समजून गेला.

रामदासीबुवांनीं माहिती मिळविण्याचा प्रयत्न करीत असतांना फारच सावधपणा ठेवला होता. संध्याकाळीं रानांतून आल्यावर गुराखी मुलें देवळांत जमत. रामापुढें आलेल्या पदार्थांतून वगळून ठेवलेल्या खारका, शेंगा, गूळ या वस्तु मुलांना वाटल्या जात. बुवा या पोरांशीं मात्र मोकळेपणानें बोलत. "आज तुझीं गुरें कोणत्या डोंगरावर गेलीं

होतीं? तिकडे लांडग्याची भीति आहे का? तुझीं गुरें किती? दूध किती निघतें?' अशा आस्थेनें विचारपूस करणारा भेटल्यावर मुलें मोठ्या प्रेमानें सर्व सांगत. क्वचित् एकाद्या दिवशीं 'गांवचा पाटील कोण आहे? गांवांत प्रमुख माणसें कोण? हे काळे पोलीस कशाला येतात?' असें विचारावें. मोकळ्या मनाचीं मुलें सर्व माहिती देत. 'कान्ह्या भिल्ल गंगाराम पाटलाकडे येतो. त्याला धरण्यास हे शिपाई येतात.' इत्यादि गोष्टी मुलें सांगत.

एक दिवस बुवांनीं गंगाराम पाटलाच्या मुलाचा हात सहज पाहिला आणि ऐकीव माहितीच्या आधारावर त्याला म्हटलें, 'तुला दोन आया आहेत नाहीं रे? तुम्ही तीन भावंडें. तुझ्या थोरल्या बहिणीचें लग्न झालंय, होय ना?' मुलाला हें ऐकून मोठें नवल वाटलें. त्यानें हें वृत्त बापास जाऊन सांगितलें. हात पाहून ज्योतिष सांगणारा भेटल्यावर, 'माझा हात पहा' असें कोण म्हणणार नाहीं? साधारणपणें तो एक नादच असतो माणसांना!

दुसऱ्या दिवशीं गंगाराम पाटील राममंदिरांत आले. 'माझा हात बघा कीं जरा' अशी त्यांनीं बुवांना विनंति केली. बुवांनीं प्रथम आढेवेढे घेतले. दुसरेच विषय काढले. शेवटीं 'उद्यां सकाळीं या. मग हात पाहतों.' असें सांगितलें. बुवांच्या बोलण्याचालण्यांतील गंभीर-पणाचा पाटलाच्या मनावर फारच चांगला परिणाम झाला. दुसरे दिवशीं सकाळींच पाटील बुवांच्याकडे आले. बुवांनीं बराच वेळ त्या हातावरील बुध, गुरु, शुक्र यांचे उंचवटे पाहिले. आडव्या उभ्या रेषांचें जाळें निरखिलें. निरनिराळ्या बोटावरचीं नी मुठीवरचीं इतर चिन्हें हात पालथा उताणा करून न्याहाळलीं. शेवटीं 'चांगला आहे कीं पाटील तुमचा हात' एवढेंच सांगून ते स्वस्थ राहिले. एवढ्यानें ऐकणाराच्या मनाचें समाधान कसें होणार? पाटलांनीं 'असें काय! नीट सांगा ना महाराज!' असें पुन्हां पुन्हां विनविल्यावर बुवा हळूच म्हणाले, "पाटील, तुम्हांला संतति, संपत्ति चांगली आहे. संसारसुखहि लाभेल. पण

तुम्हांला होणारा द्रव्यलाभ चोरांपासून होईल वा झाला असेल, चांगल्या मार्गानें नाहीं." ही अंतरींची खूण पाटलांना लागलीच पटली. त्यांची दृढश्रद्धा रामदासीबुवांवर बसली.

आतां पाटलांच्या घरून दोन्ही वेळां बुवांकरितां गाईचें दूध येऊं लागलें. देवापुढचें धान्य नी पैसे मिळत असल्यानें संतुष्ट झालेला बाळंभट पुजारी हा दशम्या करून आणून देत असे. यामुळें खाण्यापिण्याची पंचाईत नाहींशी झाली. गांवांत मानसन्मानहि बराच वाढला. पांच-पंचवीस नमस्कार घेण्याकरितां थांबल्यावांचून रस्त्यानें जाणें कठीण आलें. भजन व पोथी यांना दाटी होऊं लागली. एकंदरींत रामदासीबुवा हे खरे साधु, साक्षात्कारी सन्त आहेत, अशी लोकांची दृढभावना झाली. अंतोबा कुळकर्ण्यांच्या मनांतील अविश्वासहि डळमळला.

या सर्व घडामोडींत श्रीदासगणूंच्या अंतःकरणांत उठणारे विचारतरंग त्यांच्या मनोवृत्तीवर प्रकाश टाकणारे आहेत. लोकांची स्वतःविषयींची ती पूज्यबुद्धि पाहून ते व्याकुळ होत. श्रीरामचंद्राच्या मूर्तीपुढें बसून त्यांनीं प्रतिदिनीं क्षमायाचना करावी. "रामा, या भाबड्या लोकांची मी वंचना करीत आहें. लोक मला साधु समजून भजतात. माझ्यामुळें यांतल्या किती जणांवर तरी संकट येणार आहे! माझ्या कृतघ्नपणाला रामा, तूं कोणती शिक्षा देणार आहेस?"

वेषाकरितां म्हणून कराव्या लागणाऱ्या पूजापाठादि कृत्यांत विलक्षण गोडी वाटूं लागली. धर्माचरणांत किती उदात्त सुख सांठविलें आहे, त्याचा थोडासा तरी अनुभव येऊं लागला. स्वतःशीं ते आणीकहि एका गोष्टीची छाननी करीत. लोकांत साधुत्वाचा गवगवा आहे. बरेच लोक भजनीं लागले आहेत. एवढ्यानेंच एकाद्या व्यक्तीस सत्पुरुष मानणें धोक्याचें आहे. दुसरें असें वाटे कीं, थोड्याशा चांगल्या वर्तनाला जर एवढें फल मिळतें, तर ज्याचें आचरण अन्तर्बाह्य शुद्ध सात्त्विक झालें आहे; तो केवढ्या योग्यतेस चढेल!

कान्ह्यानें त्याच्या मागावर असणाऱ्यांची हत्या किती अमानुषपणें

केली, त्या भयंकर वार्ताहि कानावर येत. श्रीदासगणूंच्या सर्वेच गुप्त हेर म्हणून नेमलेल्या दोघांस कान्ह्यानें यमसदनास पाठविल्याचें समजलें होतें. त्यांतील मलकप्पा नागप्पा या वाघ्याच्या वेशानें हिंडणाऱ्या शिपायास तर कान्ह्यानें कुऱ्हाडीनें सरपणासारखा तोडला होता. मृत्यूची ही धाड केव्हां कोसळेल, याचा मुळींच नेम नसल्यानें जीव नेहमीं टांगणीला लागल्यासारखा असे. लोकांची फसवणूक करावी लागते आहे, नी मरणाची तरवार सदैव डोक्यावर टांगलेली आहे; याला कारण ही पोलिसची नोकरी. बुवांनीं प्रत्यहीं देवास प्रार्थना करावी, कीं—

> " नको नोकरी ही मला पोलिसाची ।
> बहु भ्रष्टवी कष्टवी चित्त साची ।
> मला त्यांतुनी सत्वरीं सोडवावें ।
> रमानायका, चित्तिं माझ्या वसावें ॥ "

असें तें एक करुणाष्टक आहे. या श्लोकांतील अर्थाकडे सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें तर श्रीदासगणूंच्या मानसांतील खळबळीचें प्रतिबिंब त्यांत पूर्णपणें उमटलें आहे, असें अनुभवास येईल. विशेषत; ' बहु भ्रष्टवी कष्टवी चित्त साची ' या ओळींतील भाव तर मीं वर वर्णन केलेल्या मानसिक विकारांतील अर्थ मूकरूपानें सांगणारेच आहेत.

एक दिवस कान्ह्या भिल्ल गंगाराम पाटलाकडे रात्रींचा आला आणि त्यानें पाटलास विचारलें—

" तो रामदासी कोण आहे पाटील ? "

" तो चांगला साधु आहे. नाईक, त्याला मुळींच त्रास देऊं नका. "

" साफ खोटें. तो पोलीस आहे. मी पक्की माहिती काढली आहे. चला आतां त्याच्याकडे जाऊं. "

दोघेजण राममंदिरांत आले. कान्ह्याच्या हातांत दारू ठासलेली तोडयाची बंदूक होती. पाटलांनीं बुवांना जागें केलें.

कान्ह्याची ती काळी, कुळकुळीत, ठेंगणी, पिळदार बांध्याची, उग्र मुद्रा असलेली, पुष्ट शरीराकृति पाहतांच बुवांचें धाबें दणाणलें. प्रत्यक्ष

काळ मृत्युपाश घेऊन उभा आहे, असें वाटलें. भीतीनें जिवाचा थरकांप झाला. कान्ह्यानें दरडावून विचारलें, "कोण आहेस तूं? तुझें नांव गणेश दत्तात्रय सहस्रबुद्धे. तुझा बक्कल नंबर ७२७. खरें आहे कीं नाहीं बोल?"

कान्ह्यानें बित्तंबातमी मिळविलेली पाहून बुवा त्याहि स्थितींत आश्चर्यानें थक्क झाले. आपल्या जोडीदारांची याच दरोडेखोरानें नुकतीच काय दशा केली आहे, तेंहि आठवलें. जीविताची उरली सुरली आशाहि नष्ट झाली. तोंड भीतीनें कोरडें पडलें. छाती धडधडूं लागली. मुखावाटें शब्द उमटेना. कान्ह्यानें पुन्हा दरडावतांच दासगणू चाचरत अडखळत म्हणाले, "बाबा, मी वाई-सातार्‍याकडील पांडववाडीचा राहणारा आहें. तूं हें पोलीसबिलीस काय म्हणतोस, तें मला माहीत नाहीं. समर्थांच्या जन्मभूमीचें दर्शन घ्यावें, म्हणून जांबेस गेलों होतों. परत येतांना आमच्या गांवाकडे प्लेग असल्याचें कळलें, म्हणून येथें राहिलों. माझें आयुष्यच सरलें असलें, तर तूं काय करणार? मार तुझ्या मनांत आहे तर. मी आंत जाऊन रामाच्या पायांवर डोकें ठेवतों. मागून तुझी बंदूक चालव." असें म्हणून कान्ह्याच्या होय, नाहीं, म्हणण्याची वाट न पाहतां रामदासी बुवा भरदिशीं गाभार्‍यांत आले. प्रभु रामचंद्रास घट्ट मिठी मारली आणि दीनपणें म्हणाले, "रामा, तुझ्या पदरांत आहे. योग्य वाटेल तें कर." पायांवर मस्तक टेकलें व बुवांचें भान हरपल्यासारखें झालें. अत्यंत भयानें थोडी मूर्छाच आली म्हणा ना!

मृत्यूच्या भीतीनें मिठी मारलेल्या मार्कंडेयास यमपाशांतून सोडविणारे भगवान् शंकर ज्याचें ध्यान प्रेमानें करितात तो जानकीपति रामराय पदनताची उपेक्षा कशी करील? कान्ह्या भिल्लास काय वाटलें कोणास ठाऊक? रोखलेली बंदूक मागें घेऊन तो तसाच परत फिरला. मंदिराच्या बाहेर आल्यावर त्यानें पाटलास बजावलें. 'या बुवास गांवांतून जाऊं देऊं नका. मी पुन्हा एकदां शोध काढून येतों.' कान्ह्या

गेल्यावर मंदिरांत जाऊन लोकांनीं बुवास सावध करून गाभाऱ्याबाहेर आणलें.

श्रीदासगणूंनीं यानंतर वरिष्ठांस गुप्तपणें पत्र लिहून कळविलें कीं, 'माझ्याविषयीं लोकांस संशय आला आहे. तरी युक्तीनें त्याचें निराकरण करावें.' त्याप्रमाणें लवकरच एक दिवस श्री. मारुती पंढरीनाथ या नांवाचे एक पोलीस इन्स्पेक्टर लोणीस आले आणि इकडे तिकडे तपास करून स्वारी मंदिरांत आली. बुवांच्या सच्चेपणाविषयीं संशय दाखवून फरारी माणसाची तपासणी करतात, तशी बुवांची अंगझडती घेऊन ते पाटलास म्हणाले, 'हा कान्ह्याचा हस्तक असावा. पांडववाडाकडे आम्ही याचा तपास करतों, तोंवर यास हलूं देऊं नका.' या प्रकारानें उरल्यासुरल्या लोकांच्याहि मनांतील संशय पार नाहींसा झाला.

एकदां लोणीपासून जवळच गंगाराम पाटलाचें गुऱ्हाळ लागावयाचें होतें. त्यांनीं हात जोडून रामदासीबुवांना विनंति केली. 'महाराज, आपण आलें पाहिजे. नाईकहि येणार आहेत.' बुवांनीं उत्तर दिलें, "मला ब्राह्मणाला कशाला बोलावतां? नाइकाला (कान्ह्या भिल्लाला) जेवणावळ म्हणजे वेडेवाकडें शिजणार! अशा ठिकाणीं मीं येणें बरें नाहीं. परत येतांना एकादा ऊस आणा म्हणजे झालें."

कर्तव्याला अनुसरून दासगणूंनीं 'कान्ह्या भिल्ल अमुक ठिकाणीं अमुक वाजतां येणार आहे. तरी योग्य ती व्यवस्था व्हावी.' असें वर कळविलें. त्याप्रमाणें पन्नास पोलिसांनीं जन्याच्या वाडीस गराडा दिला. गोळीबार सुरू झाला. कान्ह्याला पकडण्यास पोलीस आले आहेत, असें कळतांच पाटलाची तिरपीट उडाली. ते तसेच धांवत मंदिरांत आले आणि बुवांस म्हणाले, "महाराज, नाईकाला शिपायांनीं घेरलें आहे. नाईक यांतून सुटावे, म्हणून रामाची प्रार्थना करा. आपल्या आशीर्वादाशिवाय नाईकांना यश येणार नाहीं."

इकडे पोलिसांनीं घेरलें, तरी कान्ह्या डगमगला नाहीं. तो हाडाचा शूर होता. तो एका टेकडीवर चढून गेला. उभय पक्षीं गोळ्या झडूं

लागल्या. शेवटीं त्यानें त्या टेकडीवरील गवत पेटविलें आणि त्या धुराच्या लोटांतून मोठ्या छातीनें पोलिसांचा वेढा फोडून तो निघून गेला. या झटापटींत कान्ह्याचें कोणीच दगावलें नाहीं. चार पोलीस मात्र ठार झाले. कान्ह्या सुखरूप निसटला तो रामदासीबुवांच्या कृपेनेंच, अशी भाबड्या पाटलाची ठाम कल्पना झाली.

पुढें कांहीं दिवसांनीं लोणीस आला असतांना कान्ह्या पाटलास म्हणाला, ‘ पाटील, हा रामदासी पोलीसच आहे रे. ’ पाटलाला आतां जरा बळ आलें होतें. ते म्हणाले, “ वेड लागलंय कीं काय तुला नाईक? त्यांच्या आशीर्वादानें त्या दिवशीं तूं जिवानिशीं सुटलास पोलिसांच्या तडाक्यांतून. तूं त्यांना पोलीस म्हण; पण त्या दिवशीं त्यांना तुझा साथीदार म्हणून एका पोलीस इन्स्पेक्टरनें किती छळलें! त्यांना शिव्या काय दिल्या, अंगझडती काय घेतली! मी मध्यें पडलों, म्हणून मारहाण तरी झाली नाहीं. बापडा सात्त्विक ब्राह्मण! देव देव करीत राहिला आहे. त्याच्या पाठीस कां लागतोस उगीच? ”

कान्ह्या भिल्लाचें समाधान झालें, असें दिसलें. तो पाटलासह दर्शना-करितां म्हणून मंदिरांत आला. पायां पडत असतांना बुवांच्या पायां-वरील वहाणांचे घट्टे पाहून कान्ह्याचा संशय पुन्हां बळावला. रामदासी-बुवांकडे निरखून पाहात तो म्हणाला, “ बुवा, तुमच्या पायांवर तर पोलिसी वहाणांचे घट्टे दिसताहेत. ” बुवा मनांत चरकलेच. पण प्रसंगावधान राखून त्यांनीं उत्तर दिलें, “ आमच्या कोंकणांत आम्ही वहाणाच घालतों बाबा. ” हें उत्तर कान्ह्याला योग्य वाटलें. त्यानें लवून नमस्कार केला आणि गळ्यांतील १६ तोळ्यांचा सोन्याचा सात पदरी गोफ श्रीदासगणूंच्या पायांवर ठेवून तो म्हणाला, “ महाराज, कोणत्या इन्स्पेक्टरनें तुम्हांला शिव्या दिल्या, सांगा. पंधरा दिवसांतच त्याचा मुडदा न पाडीन तर भिल्लाच्या पोटचा म्हणवणार नाहीं. ”

यावर दासगणू म्हणाले, “ हें बघ. माझ्याकरितां कोणास मारूं नकोस! त्याला संशय आला म्हणून त्यानें तसें केलें. मागें तूं नव्हती

का बंदूक रोखलीस! आपल्या कपाळीं असतील ते भोग भोगलेच पाहिजेत. तुझा हा गोफहि मला नको. मला याचा काय उपयोग? तूं आपला हा परत ने. " पण कान्ह्या तो परत घेईना. तेव्हां श्रीदासगणूंनीं तो गोफ तेथेंच पाटलाच्या स्वाधीन करून 'यांतले तीन पदर बाळंभटास द्या आणि बाकीचे मोडून मोडकळीस आलेल्या मंदिराची डागडुजी करा.' असें शपथ घालून सांगितलें. पाटील आणि कान्ह्या दोघेहि थक्क झाले. ही निरिच्छ वृत्ति उसनी वा वरपांगी नव्हती. ती त्यांच्या हृदयाची सहजवृत्ति होती. पैसा न खाणें, हा जेथें केवळ अपवाद आहे; त्या पोलीस खात्यांत नोकरीस राहूनहि अशा द्रव्याची इच्छाहि दासगणूंनीं कधीं केली नाहीं.

खर्डें या गांवाच्या परिसरांत भामट्यांचा अगदीं सुकाळ असे. खर्ड्यास बदली व्हावी, म्हणून शिपायांनीं सत्यनारायण करावेत. इतका द्रव्यलाभ त्या गांवांत होत असे. कारण भामट्यांच्या मिळकतींतील ठराविक भाग पोलिसांचा असावयाचाच. अशा खर्ड्यास ज्या वेळीं दासगणूंची नेमणूक झाली, त्यावेळीं त्यांनीं तेथें थोडीहि लांच घेतली नाहीं; त्यामुळें इतर कोणाहिपेक्षां भामटे त्यांना वचकून असत. या कारणानें त्यांच्या कारकीर्दींत गुन्ह्यांची संख्या एकदम घटली. अशी माहिती दासगणूंच्या समकालीं खर्ड्यास असलेले शिक्षक श्री. अमृत बापूजी रसाळ यांनीं दिली. खरोखरीच पोलिसांत नोकरी असूनहि, पोलिसी वृत्तीपासून दासगणू अगदीं अलिप्तच राहिले.

अलीकडे त्यांच्यावर रचलेल्या एका अष्टकांत त्या वेळच्या परिस्थितीस अनुसरून असें वर्णन केलेलें आहे.—

**" जरी अधम चाकरी, कवन हीनशी लावणी ।**<br>
**निकृष्ट जन भोंवती, परि न लिप्त तद्दुर्गुणीं ।**<br>
**पटासह असूनहि जर खरा न कीं रंग तो ।**<br>
**समर्थ गणुदास ते सतत मी नमस्कारितों ॥ "**

भरजरी वस्त्राचें मूल्य त्यांतील जराच्या खरेंखोटेंपणावरच अवलंबून

असतें. नाहीं का ? खरा जर वस्त्रासवें रंगत नाहीं, त्याप्रमाणें दासगणूंचा जीवनपट बहुविध प्रसंगांच्या भल्याबुऱ्या रंगांत बुचकळला गेला असला, तरी त्यांत विपुलपणें भरलेला शुचितेचा जर त्या सर्व रंगापासून उज्ज्वलपणें अलिप्तच राहिला आहे. पोलिसाच्या नोकरींत असतांनाहि जेथें ही वृत्ति होती, तेथें पुढील आयुष्यांत अनेक संस्थानिकांनीं वेळोवेळीं देऊं केलेली सहस्रांनीं मोजतां येईल अशी बिदागी त्यांनीं कटाक्षानें नाकारली असेल; तर त्यांत आश्चर्य करण्यासारखें काय आहे ? असो. प्रस्तुत आपल्याला हें ' कान्ह्या भिल्ल प्रकरण ' संपवावयाचें आहे.

कान्ह्या भिल्लाला पकडणें कठीण आहे, असें अनुभवास आल्यावर सरकारच्या मनांत एक निराळाच विचार आला. कान्ह्या भिल्ल हा श्रीदासगणूंच्या समोर बराच वेळ येतो, असें पाहून वरिष्ठ अधिकाऱ्याकडून दासगणूस आज्ञा झाली कीं, " तुम्हांस एक सहाबारी पिस्तुल देण्यांत आलें आहे. त्यानें कान्ह्यास जायबंदी करून पकडावें. त्यांत त्याच्या जिवास धोका झाला तरी अडचण नाहीं. माणिकदौंडीच्या ठाण्यावर शक्य तितक्या लवकर येऊन सामान स्वाधीन करवून घ्यावें." त्याप्रमाणें श्रीदासगणू कांहींतरी निमित्त काढून मोठ्या युक्तीनें लोणीच्या बाहेर पडून माणिकदौंडीस आले. तेथें त्यांना सहाबारी पिस्तुल, काडतुसें, सहामाहीचा पगारभत्ता, उत्तम बातम्या पुरविल्यासाठीं पारितोषिक आणि कान्ह्या भिल्ल सांपडतांच एकदम दोन जागा वर बढतीचें आश्वासन, असें सर्व मिळालें.

तें सर्व घेऊन दासगणू मिरजगांवास आले. तेथील सरकारी दवाखान्यावर त्यांचा एक जिवलग स्नेही ( श्री. अण्णाजी पांडुरंग बार्शीकर कुलकर्णी ) डॉक्टर होता. श्रीदासगणूंनीं मनाशीं विचार केला, " मी ब्राह्मण, कोणाच्या रक्तांनीं आपले हात रंगविणें, हें चांगलें नाहीं. त्यांतून निशाण मारतांना माझी गोळी एकदांहि टारजेटास लागली नाहीं. फुकटचा पगार खातो, नालायक आहे, अशी वरिष्ठांचीं बोलणीं मीं वरचेवर खाल्लीं आहेत. अशा परिस्थितींत कान्ह्यावर झाडलेली गोळी

त्याला लागेलच कशावरून? गोळी चुकतांच कान्ह्या आणि त्याचे साथीदार माझा जीव घेतल्यावांचून राहणार नाहींत. तेव्हां कसेंहि करून आतां हा प्रसंग टाळलाच पाहिजे." त्यांनीं ही सर्व परिस्थिति आपल्या डॉक्टर-मित्रास सांगितली.

डॉक्टर म्हणाले, "गणपतराव, कांहीं चिंता करूं नका! मी माझ्या अधिकारांत एक महिनाभर तुम्हांस रोगी म्हणून येथें ठेवूं शकतों. मात्र बाहेर फारसें हिंडूं नका आणि हजामत करूं नका." डॉक्टरांनीं दासगणूंचें नांव रोगी म्हणून नोंदविलें आणि 'गणेश दत्तात्रय हा आजारी झाल्यानें त्यांला येथें ठेवून घेतलें आहे. त्यांच्याजवळील जोखमीचें साहित्य, कागदपत्र, व पोलिशी गणवेश ठाण्यावर परत पाठवीत आहे.' असें वर कळविलें. वरिष्ठांकडून तातडीनें उत्तर आलें. 'गणेश दत्तात्रय हा आमचा फार महत्त्वाचा माणूस आहे. त्यास नगरच्या मोठ्या दवाखान्यांत नेण्यास आम्ही समक्ष येत आहोंत.' वरिष्ठ येण्याच्या सुमारास डॉक्टरनें दासगणूंस कांहीं औषध दिलें. त्यामुळें त्यांना बराच ताप चढला. वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं दासगणूंना नगरास नेण्याचें निश्चित केलें. आतां मात्र या संकटांतून कसें पार पडावें, तें समजेना, पण परमेश्वरकृपेनें दासगणूंना पुन्हां या संकटांत पडावें लागलें नाहीं.

श्री. नानासाहेब चांदोरकरांच्या ओळखीचे श्री. बोस या नांवाचे एक डॉक्टर नगरास नुकतेच बदलून आले होते. श्री. नानासाहेबांकडून येथें वशिला लागला. त्यानें 'या माणसाचें हृदय अशक्त झालें आहे. कोणत्याहि धोक्याच्या जागीं पाठविण्यास हा अयोग्य आहे.' असा अधिकृत दाखला श्रीदासगणूंना दिला. वरिष्ठ अधिकाऱ्यांचा निरुपाय झाला आणि दासगणूंची नेमणूक पुन्हां जामखेडास झाली. अशा रीतीनें दासगणूंच्या पुरतें तरी तें प्रकरण समाप्त झालें.

या सर्व घटनांचे परिणाम दासगणूंच्या संस्कारसुलभ हृदयावर फार उत्कटतेनें झाले. अनन्यभावानें शरण आल्यावर ईश्वर उपेक्षा करीत

नाहीं, हें संतवाक्य त्यांनीं स्वतः अनुभविलें. अत्यंत खटाटोपानें मिळणाऱ्या आभासिक संसारसुखापेक्षां परमेश्वराच्या भजनपूजनांत दंग असतांना लाभणारा आनंद किती उच्च प्रकारचा नी निरागस असतो, ह्याचा त्यांना प्रत्यय आला. तसेंच भजनपूजन करणें, टिळे माळा लावणें, लोकांनीं पूज्य मानून नम्रपणें पायांवर डोकें ठेवणें हें खऱ्या साधुत्वाचें चिन्ह नसून संतांचीं लक्षणें कांहीं निराळींच असलीं पाहिजेत, असा त्यांचा निश्चय झाला.

"संत म्हणा त्याला" आणि 'तोचि म्हणावा जगीं संत' हीं दासगणूंचीं स्फुट पदें त्यांच्या याच विचाराचीं द्योतक आहेत. ईश्वराविषयींचें निष्काम प्रेम हृदयांत वाढूं लागलें आणि पुढें पुढें तेंच दासगणूंचा जीवनाधार झालें. लोणीस रामदासी वेषांत असतांना प्रत्यहीं विष्णुसहस्रनामाचे बारा पाठ करण्याचा जो नियम एकदां धरला होता, तो आज सत्तावन अठ्ठावन वर्षें झालीं, तरी अखंडपणें चालू आहे.

या कान्ह्या भिल्लावर दासगणूंनीं दहा बारा चौकांचा एक पोवाडाहि रचला होता. उमाजी नाइकाच्या पोवाड्याप्रमाणें हें काव्य त्या वेळीं नगरप्रांतांत लोकप्रिय होतें. घरोघर गोंधळ्याकडून हा पोवाडा लोक म्हणून घेत. त्या पोवाड्यापैकीं दोन तीन चौकच आज उपलब्ध आहेत. त्यांपैकीं नमुन्याकरितां म्हणून आरंभीचे कांहीं चरण येथें उद्धृत करतों.

**"जामखेडच्या आम्ही मुंजाच्या बैसुनियां पारावर।**
**केला पवाडा कसा कान्ह्यानें डोंगरास दिला कहर।**
**भिल्ल जातीचा, बडा छातीचा, आला पाटेवाडीवर।**
**घालुन डाका रुपये नेले चांदीसोन्याला नाहीं पार।**
**हळोपाळीला दहशत बसली रयत झाली बेजार।**
**घरफोडीची रस्तेलुटीची गणती करावी कुठवर।**
**घेटण, दातुल, जेऊर लुटलें पाथर्डीची केली माती।**
**घ्याटीवरले शिपाई बांधले केली गर्दी एक्या रातीं।" इत्यादि.**

जुन्या पोवाड्याप्रमाणेंच या काव्याची रचना जरा शिथिल व शब्दरचना खेडवळ असली, तरी हुबेहुब नी धांवतीं चित्रें दृष्टीसमोर उभीं करण्याचें त्यांतील कौशल्य कौतुकास्पद आहे.

## ८. श्रीसाईबाबांची भेट:

श्रीदासगणूंना आपल्या सद्गुरूंचा सहवास फारच अल्प काळ झाला असल्यानें हरिभक्तीचें रोप जरी त्यांच्या अन्तःकरणभूमींत सद्गुरुकृपेनें रुजलें गेलें होतें, तरी त्या बीजरूप रोपाला अनेक आर्त जीवाला सुखछाया देईल अशा महान् वृक्षाचें स्वरूप जें पुढें प्राप्त झालें; त्याला शिरडीकर श्रीसाईबाबांची कृपाच विशेष रीतीनें कारणीभूत झाली आहे. 'श्रीसाईबाबा हे माझेंच स्वरूप आहेत, असें श्रीसद्गुरु वामनशास्त्री यांनीं सांगितल्याचें मागें उल्लेखिलें आहे. त्याप्रमाणें श्रीदासगणू पुढें श्रीसाईबाबा यांना गुरुस्थानीं मानूं लागले. 'भक्तिसारामृत' या ग्रंथांतील त्रेपन्नाव्या अध्यायाच्या शेवटीं त्यांनीं तसा स्पष्ट उल्लेखहि केला आहे. पण असें असलें तरी प्रथम प्रथम साईबाबांचा आणि त्यांचा जो परिचय झाला तो कांहीं ते सत्पुरुष आहेत, त्यांची कृपा संपादन झाली तर आपलें कल्याण होईल, या भावनेनें झाला नाहीं. श्री. नानासाहेब चांदोरकरांच्या आग्रहामुळें ते प्रथम शिरडीस गेले.

श्री. नानासाहेब कलेक्टर कचेरींत पुढें चिटणीस झाले होते. त्यांना तमाशाचा विशेष नाद असे. दासगणूंच्या लावण्या त्यांच्या रसिक मनाला फार आवडत. त्यावरून त्यांची आरंभीं ओळख झाली. पुढें तर ते आपापसांतील उच्चनीच दर्जाचें अंतर पार विसरून एकमेकांचे जिवाभावाचे मित्र बनले. हे श्री.चांदोरकर शिरडीकर साईबाबांचे एकनिष्ठ भक्त होते. बाबांना ते प्रतिईश्वर मानीत. महिन्यांतून दोन तीनदां तरी शिरडीस दर्शनाकरितां गेल्यावांचून त्यांना चैन पडत नसे. त्यांनींच 'गणपतराव, अरे! एकदां तरी शिरडीस चल' असें सारखें पाठीस लागून श्रीदासगणूंना प्रथम शिरडीस नेलें. वरिष्ठ अधिकारावरील

माणसाच्या इच्छेला अगदींच नकार देणें इष्ट नाहीं, याच भावनेनें सुमारें १८९६ सालीं प्रथम दासगणू शिरडीस साईबाबांच्या दर्शनाकरितां गेले. आरंभीं तरी श्रीसाईबाबाविषयीं दासगणूंना फारसा आदर वाटला नाहीं. केवळ बाह्यांगावर भुलणें वा लोकांच्या सांगण्यावर विश्वास ठेवून गतानुगतिक होणें, हें दासगणूंच्या स्वभावांतच नाहीं. त्यांना स्वतःला एकादी गोष्ट पटेल, अनुभवास येईल तरच ते मानीत. त्यांच्या आत्यन्तिक निष्ठावंत श्रद्धेला असलेलें हें बुद्धिवादाचें अधिष्ठान मोठें विचार करण्यासारखें आहे. श्रीसाईबाबांशीं त्यांचा परिचय जसजसा वाढत गेला, त्यांच्या त्रिकालज्ञानाचा प्रत्यय आला, तसतसें श्रीसाईबाबा ही अलौकिक विभूति आहे; याची साक्ष पटून बाबांच्या चरणीं दासगणूंची निष्ठा स्थिरावली. या निष्ठेला शेवटीं तर—

**" शिरडी माझें पंढरपुर । साईबाबा रमावर ।**
**शुद्ध भक्ती चंद्रभागा । भाव पुंडलीक जागा ॥ "**

असें मानण्याइतकें उज्ज्वल स्वरूप प्राप्त झालें.

श्रीसाईबाबांनीं एक दिवस श्री. चांदोरकरांस सुचविलें, " नाना, सगळ्या संतमंडळींना जेवावयास बोलीव. सगळी सिद्धता चांगली कर आणि आपल्या या गणूवर सर्व संतांना बोलाविण्याचें काम सोपीव. तो आणील बोलावून सगळ्यांना. एवढें कर बरं का गणू ! तुझें लई कल्याण होईल. " याचा अभिप्रेत गूढार्थ असा कीं, संतकवि महिपतीनें आपल्या भक्तलीलामृतादि ओवीबद्ध ग्रंथांतून संतांचीं चरित्रें काव्यमय भाषेंत गायिलीं आहेत, तशीं यांनीं वर्णावीं. ही आज्ञा दासगणूंनीं अवमानिली नाहीं. संतचरित्रें लिहिण्यास त्यांनीं आरंभ केला.

गुन्ह्याच्या तपासाकरितां दासगणूंना मधून मधून गांवोगांव हिंडावें लागत असे, त्यावेळीं त्या ठिकाणीं वा आसपास होऊन गेलेल्या सत्पुरुषांची चरित्रविषयक माहिती गोळा करावी. त्यांचें टांचण करावें. घरीं आल्यावर ती माहिती ओवीबद्ध अध्यायामध्यें ग्रथित करावी. कधीं कधीं श्रीसाईबाबाहि ' अमुक गांवीं जा ', अशी सूचना करीत.

याप्रकारें श्रीदासगणूंची काव्यमंदाकिनी शृंगाराच्या दऱ्याखोऱ्यांतून खळबळत वाहण्याचें सोडून भक्तीच्या प्रशांत प्रदेशांतून वाहूं लागली. अर्थातच लावण्या रचण्याचा नाद यावेळीं पूर्णपणें लागलीच सुटला असें झालें नाहीं. लावण्या रचल्या जात होत्याच. पण त्यांच्या रचनेवर आणि अर्थावर बदलत्या मनोवृत्तींचा परिणाम निश्चितपणें झाला, असें प्रत्ययास येतें.

एका लावणीच्या शेवटीं ते काय म्हणतात, तें पाहण्यासारखें आहे.

> " गणुदास म्हणे बायांनो तुम्ही तरी ।
> सांडणें नाशिवंतासी लौकरी ।
> शाश्वत हरीचें नाम अंतरीं ।
> धरुनियां भवा या तरा, नखरा न बरा ।
> उमज मनिं धरा, फंद टाकावे ।
> हरिभजनीं, संतदर्शनीं आयु लावावें ॥ "

आरंभ आणि मध्य शृंगारिक असलेल्या या लावणीचा शेवट हा असा आहे. नटून थटून मिरविणाऱ्या सुंदर तरुणीच्या मिषानें श्रीदासगण आपल्या इंद्रियवृत्तींनाच उद्देशून बोलत आहेत, अशी कल्पना चरित्राची संगति लावतांना मनांत येते.

मनोवृत्तीचीं हीं अशीं स्थित्यंतरें घडतात तरी कशी, याची नीटशी कल्पना आपणांस येत नाहीं. असे शुभपालट होणें असंभवनीय वाटतें. सामान्यतः तें खरें असलें तरी ज्याच्या मनाची घडणच कांहीं निराळी आहे, भावना उत्कट असणें हें जेथें स्वाभाविक आहे, अभिरुचीमध्यें सुप्तपणें का होईना पण मूलभूत शुचिता आहे; तो दैववशात् कोणत्याहि परिस्थितींत सांपडलेला असला तरी सर्वसामान्याहून वैशिष्ट्यानें अलग उठून दिसतोच दिसतो. श्रीदासगणूंविषयींहि असेंच दाखवितां येईल. तो काळ म्हणजे मोठा बिकट होता. इंग्रज सरकारच्या विरुद्ध बोलणें, शिवाजी महाराज की जय म्हणणें, गतवैभवाला स्मरून दुःखाचे सुस्कारे टाकणें हे मोठे भयंकर असे राजद्रोही अपराध गणले जात असत.

अत्यंत तळमळीच्या प्रामाणिक देशभक्तांनाहि जपून बोलावें लागे. राजनिष्ठेच्या बुरख्याखालीं मिरवावें लागे. त्या काळींहि जळजळीत देशभक्तीनें भरलेला आणि सरकारच्या विशिष्ट धोरणावर कडक टीका करणारा पोवाडा दासगणू लिहीत आणि गोंधळ्यांकडून फडावर म्हणवीत. तो पोवाडा असा—

**“ मराठशाही सगळी बुडाली । कठिण काळ हा बहु आला ।**
**यांनीं पैसा विलायतेला चालविला ।**
**इंग्रजांचा विचित्र कावा । विद्या शिकवी लोकांना ।**
**शिकोनी झाले फरडे परंतु । मोठे अधिकार गोऱ्याला ।**
**न्यायाचा तो अजब तमाशा । शिक्षा होती भल्याला ।**
**लांच न घेती असें दाविती । टिकिट जबर परी अर्जाला ।**
**होन मोहरा साफ बुडविल्या । नोट कागदी चलनाला ।**
**नोटा राहतील, दौलत जाईल । निघून सर्व विलायतेला ॥ ”**

मागील भागांतील ‘ छत्रपतींचें राज्य बुडालें ’ या पंक्तीहि याच कवितेंतील आहेत. लो. टिळकांचा पोवाडा श्रीदासगणूंनीं रचला होता, पण तो त्याच वेळीं जप्त झाला. पोलिसांत असलेल्या एका मनुष्यानें हा पोवाडा रचला आहे, असें समजतांच ऑस्ट्रियन साहेब खवळून गेला होता. त्यानें दासगणूंना आपल्यापुढें हजर करावें, असा हुकूम केला. अर्थातच आतां कांहींतरी बालंट आपल्या अंगावर कोसळणार, याची दासगणूंना कल्पना होतीच. त्यांनीं साहेब आनंदांत असतील असें पाहून मी आल्याची वर्दी द्यावी, असें सुचविलें. भोंवतालची मंडळी दासगणूंच्याविषयीं प्रेम बाळगणारी असल्यामुळें हें सहज शक्य होतें. त्याप्रमाणें साहेब खुषींत आहे, असें पाहून दासगणू आल्याचें कळविण्यांत आलें. दासगणू पुढें येतांच खुर्चीच्या हातावर मूठ आपटून साहेब रागानें म्हणाला, “ तूं पोलिसांत आहेस, हें विसरलास काय ? राजद्रोही माणसाचें वर्णन तूं पोवाड्यांत कसें केलेंस ? ”

दासगणू म्हणाले, “ लायब्ररीमध्यें मधून मधून मला जावें लागतें.

एक दिवस असाच तेथें गेलों असतांना कांहीं वकीलमंडळी केसरी वाचीत बसली होती. सहज बोलण्यावरून बोलणें निघालें आणि त्या मजकुराचें सगळ्यांत लवकर कवितेंत रूपांतर कोण करतो, अशी पैज लागली. मला कविता करण्याचा नाद असल्याचें सर्वांना माहीत होतें. तुम्ही करता का गणपतराव कविता ? असें त्यांनीं मला विचारतांच मी होय म्हणालों. त्या मंडळींचा विश्वास संपादून घेणें, हें त्यांच्यांत नेहमीं मिसळण्याच्या दृष्टीनें आवश्यक होतें. मीं लगेच पोवाडा केला, तो त्यांनीं उतरून घेऊन छापला. यांत माझ्याकडे फारसा दोष नाहीं. मीं आपलाहि एक पोवाडा केला आहे साहेब !" साहेब म्हणाला, 'असं ! म्हण बघूं.'

दासगणूंनीं लगेच तेथल्या तेथें—

**" पोलीस नगर जिल्ह्याचे हुशारकी अती ।**
**ऑस्ट्रियन साहेब पोलीसचा अधिपती ॥ "**

असा एक पोवाडा लगेच रचून म्हटला. साहेब अर्थातच खूष झाला आणि दासगणूंवर कांहींहि न शेकतां ते या भानगडींतून मोकळे झाले.

दासगणू पोलिसांत नोकर असले तरी सेवकवृत्तीची लाचारी त्यांचे जवळ नव्हती. अनेक ठिकाणीं त्यांनीं व्यक्तविलेली राजनिष्ठा एक तर त्यांच्या तत्त्वज्ञानाचा भाग म्हणून किंवा आतां वर उल्लेखलेल्या प्रसंगाप्रमाणें व्यावहारिक मुत्सद्दीपणामुळें दाखविली गेली आहे. असंस्कृत तमासगिरांत वावरत असूनहि त्यांच्या अंतःकरणाची ठेवण किती उच्च प्रकारची होती, बुद्धीची घडण किती सुसंस्कृत होती, तें यावरून स्पष्ट होतें. दासगणूंनीं त्या काळीं मिळविलेली लोकप्रियता केवळ शृंगारिक लावण्यांवर आणि खुसखुशीत विनोदी छक्कड रचण्यावर मिळविलेली नव्हती. त्यांनीं लोकांकरितां निरपेक्षपणें जे तीव्र कष्ट सोसले, त्याचाहि फार मोठा वांटा या लोकप्रियतेच्या कारणांत आहे.

शके अठराशें अठरा ( १८१८ ) मध्यें प्लेगनें प्रथमच हिंदुस्थानच्या पवित्र भूमीवर अवतीर्ण होऊन सर्व मुंबई प्रांतभर धुमाकूळ घातला.

सरकारनें लोकहिताच्या नांवाखालीं प्रजेला अतोनात छळलें. तीन तीन मजली वाडे पाडून उध्वस्त केले. गांवें ओस पाडलीं. घरें शुद्ध करण्याच्या नांवाखालीं संपत्ति लुटून नेली. न नेतां येण्यासारखें सामान जाळून टाकलें. पिढ्यान् पिढ्या देवघरांत आदरानें पूजिलेल्या देवमूर्ति रस्त्यावर फेंकल्या गेल्या. कित्येक ठिकाणीं स्त्रियांचें शीलहि सुरक्षित राहिलें नाहीं. आपल्या प्लेगमधील पद्यांत श्रीदासगणूंनीं ही सर्व परिस्थिति मोठ्या मार्मिकपणें सूचित केली आहे. त्यांतील कांहीं चरणांच्या शब्दरचनेमागें किती खोल अर्थ दडलेला आहे, तें विचार करणाराच्या सहज लक्षांत येईल.

श्रीदासगणू वर्णितात—

“ असें कसें नशिबीं आलें।
असें नव्हतें कधीं पाहिलें।
छत्रपती राज्य बुडालें गेली पेशवाई।
कशी पातळ मायी केलीस विठाबाई ॥
कुणीकडून प्लेग हा आला।
त्यानें सर्व मुलूख नाडिला।
पहिल्यानें गण नेमिला पाहून मुंबई।
मुडद्यास मिळेना माती बरी गत नाहीं।
जिथं माणूस प्लेगनें मर।
तें धुतलें पाहिजे घर।
घालून पाण्यामध्यें जहर पाडून छपराला।
वरुनिया सर्व कपड्यास अग्नि लावियला।
प्लेगचा कायदा कडक।
महार शिरे घरांत बेधडक।
गुजराथी, प्रभु, ब्राह्मण विचार नच कांहीं।
सरकारचा हुकूम तो सक्त विलायतेला नाहीं।
रोज एक सर्क्युलर सुटं।
दवंडीवर दवंडी पिटं

ऐकतां धीर तो सुटे भीति लोकाला ।
काय करतां हा तरि भगवंतची झोंपी गेला ।'

स्वराज्य असतें तर रोगाची साथ इतकी त्रासदायक झाली नसती. प्रतिबंधक उपाय योजतांना लोकांच्या अडचणींचा सहानुभूतीनें विचार झाला असता असें सूचित करण्यासाठींच छत्रपतींचें राज्य गेलें, पेशवाई बुडाली, हें देवाची माया कमी झाल्याचें लक्षण होय. असें वर्णन आरंभीं आलें आहे. तें मोठें मार्मिक आहे.

प्रत्यक्ष प्लेगपेक्षांहि सरकारचें हें प्लेगपासूनचें संरक्षण लोकांना शतपटीनें नव्हे, सहस्रपटीनें तापदायक झालें; पण त्याविरुद्ध 'ब्र' काढण्याची सोय नव्हती. जनतेच्या अंतःकरणांत अहर्निश धुमसणारा हा क्रोधाग्निच जणूं चाफेकर बंधूंच्या रूपानें भडकला आणि त्यानें रँडची आहुति घेतली. या धामधुमींत दासगणूंच्याकडे प्लेगचें खातें आलें होतें. त्यांनीं आपल्या अधिकारांत क्वचित् वरिष्ठांचा रोष पत्करूनहि लोकांना जेवढें सुख देतां आलें तेवढें दिलें.

गणपतराव घर तपासणीस आले आहेत असें पाहिलें म्हणजे लोकांना बरेंच हायसें वाटत असे. प्लेगचा प्रसार वाढत होता. प्लेगनें लागून माणसें पटापट मरत. प्रेत वाहण्याकरितां कोणी मिळणें दुर्घट झालें होतें. प्लेगनें मेलेल्या आपल्या आप्तेष्टांचीहि पुढील विधि उरकण्यास लोक भीत. अशा स्थितींत दासगणू त्या प्रेतांची यथायोग्य वाट लावीत. कित्येकदां तर एकहि साथीदार नसे. परंतु दासगणूंची परोपकारशीलता इतकी उत्कट कीं, त्यांनीं आपल्या कष्टांची वा प्राणांची यत्किंचित्‌हि क्षिति न बाळगतां एकट्यानेंच प्रेत पाठकुळीस घ्यावें व रात्र, अपरात्र हा विचार दूर सारून तें स्मशानांत नेऊन पोंचवावें. 'मना चंदनाचे परि त्वां झिजावें' हें समर्थवचन सर्वांच्याच पाठांत आहे. पण तें कृतीमध्यें उतरविणारे किती असतील ? पोलीस खात्यांत तर अशी व्यक्ति अपवादात्मकच.

श्रीदासगणू हे पोलीस खात्यांत असले तरी त्यांच्या मनोवृत्तीची

बैठकच निराळी होती. असें निराळेंपण असलें तरच संतांचा सहवास, सद्गुरूचा उपदेश फलदायक होतो, वा आलेले प्रसंग शहाणपण शिकवितात. अन्यथा खडकावरील पर्जन्याप्रमाणें सर्व व्यर्थ जातें. गलितगात्र झालेले वृद्ध आणि रस्त्यावरून जाणारीं प्रेतें आपण सर्वजण प्रत्यहीं पाहतोच ना! पण गौतमबुद्धासारखें संसाराचा त्याग करून आपणांपैकीं कधीं कोणी बाहेर पडलेला आढळतो का? शुभसंस्कार होण्याला एक प्रकारची अनघ मृदुता अंतःकरणांत हवी असते. ती असली म्हणजे सन्मार्गाकडे प्रवृत्ति होण्यास वेळ लागत नाहीं.

## ९. नेवासें :

शके १८२२ च्या मागें पुढें श्रीदासगणूंची बदली जामखेडाहून नेवाशास झाली. नगर, खर्डे इत्यादि कांहीं गांवीं त्यांनीं काम केलें असलें तरी त्यांनीं नोकरींत काढलेल्या शके अठराशें चौदा ते पंचवीस या अकरा वर्षांच्या कालाकडे सामान्यपणें पाहिलें असतां दासगणूंनीं श्रीगोंद्यास नोकरीचा आरंभ केला. मध्यांतील काळ जामखेडास घालाविला आणि शेवटीं दोनतीन वर्षें नेवाशास काढलीं, असें दिसतें.

'भक्तिलीलामृत' या ग्रंथाची रचना यावेळीं चालूच होती. दासगणूंनीं हा ग्रंथ 'सीता बेदरी' या बाईस सांगितला आहे. ही बाई दासगणूंनीं रचलेल्या लावण्या तमाशांत म्हणत असे. तमाशाचा नाद प्रतिष्ठित मंडळींनाहि होता, हें मीं मागें सांगितलें आहेच. तमाशे व्हावेत, त्यांतील लावण्या, छक्कड इत्यादि काव्य एकाद्या बाईनें म्हणावें, आपल्याला सवड आणि इच्छा असेल त्यावेळीं हा कार्यक्रम व्हावा; असें सगळ्यांनाच वाटत होतें. पण या गोष्टीशीं आपला कांहीं विशेष संबंध आहे, असें उघडपणें दाखविण्यास इतर मंडळी बिचकत. दासगणूंच्या अंगीं तेवढें धैर्य होतें. आपण कांहीं पातक करीत नाहीं. साध्या करमणुकीपलीकडे आपणांस अन्य आस नाहीं, असा प्रामाणिक विश्वास असल्यानें चार लब्धप्रतिष्ठितांच्या दृष्टीनें आपलें वागणें कसें काय आहे,

याचा विचार करण्याची ते पर्वा बाळगीत नसत. म्हणून सीता बेदरीनें गणपतरावांकडेच राहावें, असें त्यांच्या मित्रांनीं ठरविलें व दासगणूंनीं त्याला संमतीहि दिली. लोक हवें तें बोलत, परंतु लोकांच्या निंदा-स्तुतीला भीक न घालणारा एककल्लीपणा त्यांच्या हट्टी स्वभावांत भरपूर होता. बोलणें फटकळ शिवाय त्यावेळीं ज्या कवितेचा गवगवा झाला होता, ती सर्व शृंगारिक लावण्या पोवाड्यांस वाहिलेली, त्यामुळें त्यांच्या अंतरींच्या अनासक्तीचा प्रत्यय इतरेजनांना कधीं आला नाहीं. ही गोष्ट त्यांच्या कल्पनेंतच येऊं शकत नसे. ते सर्व बाह्यवर्तनावरून निष्कर्ष काढीत आणि तो नेमका त्यांना इष्ट असा असे. अति निकट परिचयाच्या मित्रांना मात्र दासगणूंच्या वर्तनांतील शुद्धता अनुभवानें पटलेली होती. या जिवलगांचा त्यांच्याविषयीं नितांत आदर असे. यांतील कांहीं पुढें पसतीस चाळीस वर्षांच्या वियोगानंतर दासगणूंच्या भेटीस आले होते. त्या वेळीं दोघांचीहि जी स्थिति झाली, तिचें वर्णन करण्यास मी असमर्थ आहें. या दोन व्यक्तींची भेट ज्यानें पाहिली असेल, त्यालाच चौदा वर्षांचा वनवास संपल्यानंतर झालेल्या श्रीराम–भरत भेटींतील पावन भावनोत्कटतेची कल्पना थोडी तरी करतां येईल. एवढेंच मी सांगूं शकतों.

पुढील आयुष्यांत श्रीदासगणूंनीं लवंगीबरोबर असलेल्या जगन्नाथ पंडिताच्या चरित्रास लोकांच्या सर्वसामान्य समजुतीपेक्षां जी एक वेगळीच कलाटणी दिली आहे, तत्सदृश अनुभूति त्यांच्या जीवनांत त्यांनीं स्वतःच अनुभविली होती. ‘भक्तिलीलामृत’ ग्रंथांत त्यांनीं नेमकें तसेंच वर्णन केलें आहे. ‘लोक वाटेल तें म्हणोत पण सीते, परमेश्वर आपली उपेक्षा करणार नाहीं.’ या अर्थाशीं जगन्नाथ पंडिताच्या चरित्रांतील खालील ओळी अगदीं सुसंगत आहेत.

> “ खोटें खरें कळतसे जगदीश्वराला ।
> तो विश्वनाथ भविं तारिल आपणांला ॥ ”

आत्मप्रत्ययाची भावना यांत स्पष्ट दिसते.

श्रीसाईबाबांच्या आज्ञेप्रमाणें 'भक्तिलीलामृत' लिहावयास घेऊन संतचरित्रें नैसर्गिक रसाळ वाणीनें गात असतांना, श्रीदासगणूंच्या काव्यांचें मूळचें सोज्ज्वल स्वरूप प्रकट होऊं लागतें. अंतरंगांत ईशभक्तीची लालसा वाढत जाऊन ग्राम्य गीतांचा उबग येऊं लागला. आतांहि पद्यरचना होत होतीच, पण त्यांतील चाल तेवढी लावणीची, अर्थ सगळा अध्यात्मपर असे. "या विषयासाठीं कसा मना तूं वद होशी वेडा" यासारखीं पदें स्फुरूं लागलीं. स्फुट पदांच्या पुस्तकांत प्रसिद्ध झालेलें "नरतनु तुला लाभली पर्वणी भली" हें पद नेवाशास असतांनाच रचलें गेलें आहे. त्या पदाच्या शेवटीं "नेवासें प्रवरातटीं कवन करी गणू हें" असा उल्लेख स्वतः कवीनेंच केला आहे. नेवाशासच रामय्या नांवाच्या एका सत्पुरुषाची भेट होऊन कांहीं दिवस सहवासहि लाभला होता. पिशाच्च वृत्तीनें राहणारे हे एक सत्पुरुष सर्वसामान्य लोकांना अगदीं वेडे वाटत. अंगावरील वस्त्राचीसुद्धां त्यांना क्वचित्च शुद्धि असे. मोहिनीराज मंदिराच्या कट्टयावर ही स्वारी स्वस्थ पडून असे. गांजा ओढण्याची संवय होती, पण त्यासाठीं साधी चिलीमहि त्यांनीं कधीं वापरली नाहीं. मुठींत गांजा घेऊन त्यावरच निखारा ठेवून ओढीत.

नेवाशास श्री. काशीकर नांवाचे एक अग्निहोत्री सदाचारसंपन्न विद्वान् ब्राह्मण होते. ते मात्र या रामय्यांना प्रतिपरमेश्वर मानीत. मोहिनीराजांच्या दर्शनासाठीं येत असतांना मध्यंतरीं वाटेंत जर कुठें रामय्यांची गांठ पडली तर त्यांना नमस्कार करून शास्त्रीबुवा तेथूनच परत फिरत. हे रामय्या श्रीदासगणूंवर फार प्रेम करीत. जातां येतां त्यांना धरून ठेवीत आणि त्यांच्याशीं घटका घटका अस्ताव्यस्तपणें गप्पा मारीत बसत. काशिकरांनीं म्हणावें, "गणपतराव, देवाचें तुझ्यावर किती प्रेम आहे रे? तुझें भाग्य खरेंच थोर कीं असा पुरुष आपणहून तुझ्याशीं बोलत बसतो."

एक दिवस कचेरीच्या पगाराची थैली घेऊन जात असतां रामय्यानें

दासगणूंना हटकलें आणि म्हटलें, "ये थैली कहाँकी है? मुझे दो". सहज मागत असावे, अशा कल्पनेनें दासगणूंनीं ही पगाराची थैली आहे, म्हणून दाखविण्यासाठीं पुढें केली. ती हिसकावून घेऊन रामय्या कुठल्या कुठें पळत बेपत्ता झाले. दासगणूंना ही मोठी चिंता उत्पन्न झाली. थैली रामय्यांनीं नेली, हें कांहीं उघडपणें ते सांगू शकत नव्हते. शेवटीं निरुपायानें पत्नीच्या हातांतल्या पाटल्या व गळ्यांतील एकसर त्यांनीं श्री. केशवराव वाघ या गांवांतील एका मोठ्या दुकानदाराकडे गहाण टाकला आणि कचेरींतील पगाराच्या पैशाची भरपाई केली. रात्रीं रामय्या दासगणूंच्या घरीं आले आणि म्हणाले, "त्या वाघाच्या घरीं चल. त्यानें आमचें सोनें बळकाविलें आहे." त्याप्रमाणें पगाराची थैली परत करून दासगणूंच्या डोक्यावरील सावकाराचें ऋण उतरविलें. रामय्याच्या अशा पुष्कळ गमती श्रीदासगणू आजहि मोठ्या आवडीनें सांगतात. या सत्पुरुषाचा सहवास बरेच दिवस झाल्यामुळ दासगणूंचें अंतःकरण ईश्वरभक्तीच्या सुखांत अधिकच रमलें.

श्रीदासगणूंनीं तमाशाचा नाद संपूर्णतया सोडून देण्याचें ठरविलें. मात्र तो सोडतांना असें ठरविलें कीं, ज्यानें अतिशय रमणीय अशा स्त्रीचा नटवेश धारण करून आपल्या मोहक हावभावांनीं राक्षस मंडळींना फसविलें, त्या नटनर्तक मोहिनीराजापुढें एकदां तमाशा करून मग डफ फोडावयाचा. ही कल्पना विचित्र तर खरीच, पण सूक्ष्म दृष्टीनें पाहतां तिच्यांतहि एक प्रकारचें औचित्य आढळेल. विचार मनांत आल्यावर कृतींत उतरविण्यास श्रीदासगणूंना वेळ लागत नाहीं. त्यांनीं एक दिवस मोहिनीराजापुढें तमाशा करून डफ फोडून टाकला. या कृत्यानें गांवांत मोठी खळबळ उडाली. पुष्कळ मंडळी दासगणूंवर रुष्ट झाली. कांहींचा संताप अनावर झाला. त्यांपैकीं एकानें देवस्थानचा उपमर्द केला, या आरोपाखालीं दासगणूंच्या विरुद्ध फिर्याद नोंदविली. स्वतःच्या बचावाकरितां दासगणूंनीं सांगितलें, "मी जातीनें ब्राह्मण आहें.

देवस्थानाचा अपमान करावा, अशी बुद्धि माझी असणार नाहीं. देवळांत हजामती करणें हें पावित्र्यरक्षणाच्या दृष्टीनें घातक असूनहि नवसाचीं जावळें देवळांत निघतात. तें कांहीं कोणी अपवित्र समजत नाहीं. तसेंच मींहि नवस फेडण्याकरतां म्हणूनच देवळांत तमाशा केला. तो दत्तापुढें, शंकरापुढें, विठोबापुढें वा मारुतीपुढें केला नाहीं. जो स्वतःच स्त्रीवेशानें नाचला, त्या मोहिनीराजाला मीं हा नवस केला. त्यांत वावगें काय झालें ?" मॅजिस्ट्रेटनें हें म्हणणें मान्य करून त्यांचा हेतु वाईट नसल्याचा निर्वाळा दिला. मात्र हा पहिलाच अपराध असल्यानें लोकांच्या धार्मिक भावना दुखाविल्या जातील, असे रूढीविरुद्ध नवस पुन्हां न करण्याची ताकीद देऊन सोडून दिलें. यानंतर दासगणूंनीं आपल्या संग्रहीं असलेलें सर्व शृंगारिक काव्य फाडून जाळून टाकलें व पुन्हां तशी रचना केली नाहीं.

श्रीदासगणूंना नाटकें लिहिण्याचाहि थोडासा नाद होता. कचेरींतील कांहीं मंडळी जमून कांहीं खाजगी स्वरूपाचे प्रयोगहि करीत. मृच्छकटिक नाटकांतील पदें त्यांनीं स्वतंत्र रचलीं होतीं. नाटकाच्या प्रयोगांत श्री. माधवराव आडकर हे दासगणूंचे, सुंदर, उंच आवाजाचे स्नेही चारुदत्ताचें काम करीत. श्रीदासगणूंच्याकडे मैत्रेय भटजीची भूमिका असे. आपली ही विनोदी भूमिका ते फार चांगली वठवीत, असें म्हणतात. दासगणूंनीं 'मंजुरवा' नांवाचें एक स्वतंत्र पांच अंकी नाटक लिहिलें होतें. त्याच्या प्रस्तावनेंत सूत्रधाराकरवीं नाट्यकलेची प्रशंसा त्यांनीं केली आहे. ती अशी—

**"आहे नाटक उत्तमोत्तम जगीं ज्या वानिलेंसे बुधें।**
**प्याया लोलुप हो सदा त्वरित तूं या नाटकाच्या सुधे।**
**लोकीं लोक सुखें मना तुजप्रती वानोत निंदोत वा।**
**हें कीं सार कलामधें सकलही जैंवी क्षुधाचा खवा॥"**

या नाटकाचा मित्रमंडळींनीं केलेला खाजगी प्रयोग श्री. काशीनाथ नारायण साने या शिक्षणखात्यांतील अधिकारी गृहस्थांनीं पाहिला

होता. त्यांना नाटक फार आवडलें. ते म्हणाले, "गणपतराव, हें नाटक एकाद्या चांगल्या कंपनीस द्या. लोकांपुढें तें आलें पाहिजे, अशा योग्यतेचें आहे." त्याप्रमाणें कोल्हापुरास असलेल्या एका कंपनीकडे तें नाटक पाठविण्यांत आलें, पण वशिल्याच्या अभावीं यश आलें नाहीं. उलट लेखक पोलीस जमादार आहे हें समजल्यामुळें मंडळीचा व्यवस्थापक लिखाण न वाचतांच तुच्छतेनें म्हणाला, "कोणाहि रस्त्यावरच्या माणसानें उठून लिहावें आणि त्या भिकार नाटकाचे खेळ करून पोट भरण्याचा प्रसंग यावा, इतकी हीन स्थिति आम्हांस आलेली नाहीं." दासगणूंच्या मानी मनाला हा उपहास फार बोंचला. त्यांनीं त्या नाटकाची एकुलती एक हस्तलिखित प्रत जाळून टाकली. यामुळें मराठी भाषा एका चांगल्या नाटकास मुकली, असें म्हटलें पाहिजे. मित्रमंडळींनीं केलेला (या नाटकाचा) प्रयोगहि पाहण्याचें भाग्य दासगणूंना योगायोगानें लाभलें नाहीं.

दासगणूंचे कांहीं मित्र आणि विद्यार्थी मिळून त्या नाटकाचा खाजगी प्रयोग कोल्हापुरास करणार होते. दासगणूंनीं त्या प्रयोगास आलें पाहिजे, असें त्यांनीं कळविलें होतें. त्याप्रमाणें पुण्याहून एम्. एस्. एम्. रेल्वेनें ते कोल्हापुरास जाण्यासाठीं मिरजेस जात असतां वाटेंतच दासगणूंची चोरी झाली. एका लहानशा ट्रंकेंत ठेवलेलें सर्व सामान, पोशाख, कपडे, अंथरूणपांघरूण, पैसे, तिकीट हें सर्व गेलें. अंगांत असलेल्या साध्या सदऱ्याव्यतिरिक्त व खिशांतील दोन आण्यांव्यतिरिक्त जवळ कांहींच राहिलें नाहीं. अशा स्थितींत कोल्हापुरास जायचें तरी कसें? मिरजेहून चार पांच कोस पायीं चालत ते कुरुंदवाडास आले. कुरुंदवाडचे राजे श्रीमंत बापूसाहेब कुरुंदवाडकर 'भट्टवंश' काव्याचे कर्ते यांचें कांहीं काव्य दासगणूंच्या वाचनांत आलें होतें. तेव्हां ते अशा अडचणीच्या वेळीं आपणांस कांहीं मदत करतील, अशी भावना झाली व काव्यावरून ओळख काढणें शक्य होईल, असें वाटलें. इतर कोणाचीच ओळख नसल्यामुळें हाच एक मार्ग दासगणूंच्या पुढें शिल्लक

होता. स्वतःच पोलीस असल्यानें पोलिसकचेरींत तक्रार नोंदविण्याची कल्पना त्यांना रुचेना.

श्रीदासगणू कुरुंदवाडास आले; पण येथें तरी प्रथम गांठ कोणाची घ्यावयाची? उघड्या डोक्यानें नुसत्या सदऱ्यानिशीं श्रीमंतांच्या भेटीस जायचें तरी कसे? त्यांनीं पोस्टांत जाऊन एक पाकीट आणलें व तेथल्याच लेखनसाहित्यानें एक काव्यमय पत्र लिहून त्यांत आपल्या स्थितीचें इत्थंभूत वर्णन करून तें पत्र श्रीमंतांच्या पत्त्यावर पाठवून दिलें आणि ते एका धर्मशाळेंत येऊन उतरले. चार पांच कोस चालून आल्यामुळें जीव दमला होता. भूक लागली होती. जवळ कांहींहि शिल्लक नव्हतें. श्रीमंतांना पत्र पोंचून त्याचें उत्तर येईपर्यंत इतर कांहीं मार्ग नव्हता. धर्मशाळेच्या एका कोपऱ्यांत ते स्वस्थ पडून राहिले. आपली ही स्थिति मनांत येऊन त्यांना फार वाईट वाटलें. रस्त्यावरून अनेक लोक जात येत होते; परंतु त्यांपैकीं कोणीहि या अगतिक पांथस्थाची चौकशी करण्याची सहानुभूति दाखविली नाहीं. बराच वेळ असाच गेला.

शेवटीं धर्मशाळेच्या दुसऱ्या एका कोपऱ्यांत पडलेला एक रक्तपिती माणूस खुरडत त्यांच्याजवळ आला. "असें कां पडलात बावा? कोण तुम्ही? दमलेले दिसतां! कांहीं जेवणखाण करायचें नाहीं काय?" अशी मोठ्या जिव्हाळ्यानें चौकशी करूं लागला. दासगणूंनीं सर्व हकीगत सांगितली. ती ऐकून त्याला मोठें वाईट वाटलें. तो आपलें भांडें घेऊन खुरडत गांवांत गेला आणि त्यानें दोन चार ओंजळी भुइमुगाच्या शेंगा मागून आणल्या. त्या दासगणूंच्या पुढें टाकून तो रक्तपिती म्हणाला, "ह्या घे बावा! पाण्यांत धुवून मग खा! पाणी पी. पोटांत जरा गेलं म्हणजे बरं वाटेल." दासगणूंना त्याच्या या निरपेक्ष आस्थेवाईकपणाचें मोठें कौतुक वाटलें. आदरानें त्यांचें मन भरून आलें. स्वतःच अनाथ व अपंग असलेला एक माणूस दुसऱ्याची इतक्या आपुलकीनें चौकशी करतो व कष्ट सोसून त्यास मदत करतो, या प्रेमळ व उदार वृत्तीचा

त्यांच्या मनावर फार खोल परिणाम झाला. या रक्तपित्याची आठवण ते अजूनहि मोठ्या गहिंवरलेल्या शब्दांनीं सांगतात. दुसऱ्याला हरतऱ्हेनें मदत करण्याची दासगणूंची वृत्ति याच संस्कारांतून उत्पन्न झाली आहे वा पोसली गेली आहे; असें म्हणणें योग्य होईल. पत्र पोंचल्यानंतर राजे बापूसाहेब कुरुंदवाडकर यांनीं आपल्या कारभाऱ्यास पाठवून दासगणूंची सर्व व्यवस्था केली. त्या अपंग भिकाऱ्यानें अलौकिक उदारपणा दाखविल्याचें दासगणूंनीं त्यांना सांगितलें. त्यावेळीं श्रीमंत बापूसाहेबांना त्याचें कौतुक वाटलें. त्यांनीं आपल्या महानसांतून ( मुदपाकखान्यांतून ) त्याच्या दोन्ही वेळच्या जेवणाची व्यवस्था केली. दासगणूंनींहि परततांना फक्त तिकिटापुरते पैसे ठेवून बाकी बापूसाहेबांनीं दिलेलें सर्व द्रव्य त्या भिकाऱ्याच्या स्वाधीन केलें. तो तें घेईना. त्यावेळीं दासगणू त्याला म्हणाले, "बाबा, हें तुझ्याकरतां नव्हे. पण माझ्यासारखा कोणी अडलेला नडलेला येथें आला तर बाकी कोणी त्याची चौकशीसुद्धां करणार नाहीं. तूंच त्याची विचारपूस करणार. तेव्हां त्या पांथस्थांना मदत करणें तुला सोईचें जावें, यासाठीं तुला ही रक्कम देत आहें, असें समज." दासगणू कुरुंदवाडहून परत आले. आपलें नाटक पाहणें आपल्या नशिबांत नाहीं, असें त्यांच्या मनानें पक्कें घेतलें व तो नाद सुटला.

अशा रीतीनें दासगणूंचे तमाशाचे व नाटकाचे दोन्ही नाद संपूर्णतया सुटले. त्यांची नवनवोन्मेषशालिनी काव्यशक्ति केवळ भक्तिरसांतच रममाण झाली. या पवित्र रसांत त्यांची भावना, प्रबळ अंतःकरणवृत्ति इतकी रंगून गेली कीं, पुन्हां मागें वळून पाहण्याची इच्छा तिला कधींहि झाली नाहीं.

### १०. नोकरीचा त्याग :

श्रीसाईबाबांच्या आज्ञेप्रमाणें संतचरित्रें लिहिण्यास प्रारंभ झाल्यानंतर श्रीदासगणू बाबांच्या दर्शनाकरितां बरेच वेळां जात असत. श्रीसाईबाबां-विषयीं त्यांच्या मनांत आतां आदरभाव उत्पन्न झाला होता. श्रीसाई-

बाबांचेंहि दासगणूंवर फार प्रेम होतें. पुष्कळ लोकांवर बाबा कधीं कधीं फार रागावत. शिव्या देत. मारहाण करीत. दासगणूंवर मात्र ते रागावल्याचें कोणीं कधीं पाहिलें नाहीं. बाबांनीं नरसिंहाचा अवतार धारण केला कीं, इतरांचा थरकांप होई. मशिदीची पायरी चढण्याचाहि कोणाला धीर होत नसे. दासगणू तशाहि स्थितींत जवळ जाऊन नमस्कार करीत. बाबांनीं यांना पाहिलें कीं, त्यांचा राग नाहींसा होई व ते त्यांच्याशीं हितगुज करूं लागत. दासगणू जणुं बाबांचे प्रल्हाद होते. ‘ नोकरी सोडून दे रे गणू ’ असा सारखा आग्रह दासगणूंना करण्यास श्रीसाई-बाबांनीं आतांशा सुरवात केली होती. दासगणू त्यांच्या दर्शनास आले कीं ते म्हणत, “ गणू , नोकरी सोडून दे. अरे, आपण बूट पुसावयास जन्मलों काय ? आपण कोणाचे चाकर होऊं नये. ”

दासगणू म्हणत, “ बाबा, मला कोणाचा आधार नाहीं. ही नोकरी आहे म्हणून दोन प्रहरला गोळाभर अन्न तरी खायला मिळतें. मी आतां फौजदारीच्या परीक्षेस बसलों आहें. यश मिळालें तर बढती होईल. तेव्हां ‘ परीक्षेंत उत्तीर्ण होशील, ’ असा आशीर्वाद देण्याचें टाकून ‘ नोकरी सोड ’ असा भलताच आग्रह कां बाबा ? ”

“ तूं कशाचा परीक्षेंत उतरतोस ? माझें ऐक. नोकरी सोड. देवाला तुझी लई काळजी आहे. ”

दासगणूंनीं हें बोलणें मनावर घेतलें नाहीं. फौजदारीच्या परीक्षेच्या अभ्यासासाठीं असलेल्या पोलीस ॲक्टमधील विषय त्यांनीं कविताबद्ध केला. त्यामुळें पाठ करणें सोपें जाऊन सर्व विद्यार्थ्यांत दासगणूंचा क्रम पुष्कळ वर आला. अर्थात्च दासगणू श्री. चांदोरकरांकडे जाऊन म्हणाले, “ अहो नानासाहेब, मी नुसता उत्तीर्ण नव्हे तर पहिल्या वर्गांत आलों. बाबा तर म्हणाले होते पडशील म्हणून. ”

पुढें बाबांनीं यावर स्पष्टीकरण केलें. “ कागदावर पास होण्यांत काय अर्थ ? फौजदारी मिळविशील तेव्हां खरा ! माझं ऐक. नको या मोहांत पडूं. नोकरी सोड गणू ! ”

श्री. चांदोरकर म्हणाले, " गणपतराव, बाबांची आज्ञा मोडूं नको. तुला जेवढा पगार आहे, तितके पैसे मी देईन तुला प्रत्येक महिन्याला. मग तर झालें ? "

तरी दासगणूंनीं तें दुर्लक्षिलें. इतकेंच नव्हे तर त्या त्रासानें शिरडीस जाण्यास सुद्धां ते टाळूं लागले. एकदां गुन्ह्याच्या तपासाकरतां जात असतांना शिरडीवरूनच रस्ता होता, पण आडवाटेनें जात असतांनाहि बाबांची अकस्मात् भेट झाली. ते म्हणाले, " गणू, किती तोंड चुकवशील? बऱ्या बोलानें नोकरी सोडून दे. ऐकलें नाहींस तर पस्ताव्यांत पडशील बरें ! " बाबांच्या या बोलण्यावर कांहींच उत्तर न देतां नमस्कार करून दासगणू पुढें निघून गेले.

या गोष्टीला कांहीं महिने लोटले. बाबांचें बोलणें स्मरणांत राहिलें नाहीं. पण एकदां कठीण प्रसंग ओढवला. श्रीनरसिंगजी महाराजांची चरित्रविषयक माहिती मिळविण्याकरतां दासगणू नेवाशाहून आकोटास गेले होते. अधिकृत रजा अर्थात्च नव्हती. नेहमींसारखे फिरतीवर असल्यानें परभारेंच निघून गेले होते.

इकडे त्यांच्या अधिकारक्षेत्रांतील नेवाशाजवळच्या सातेगांव भालगांव येथें मोठा दरोडा पडून त्यांत गांवांतील मारवाडी ठार झाला. सोनें, चांदी, रोख रुपये मिळून सातआठ हजारांचा माल चोरीस गेला. पोलिसांची धांवपळ सुरू झाली. जमादार मात्र ठाण्यावर नाहीं, हें पाहून इन्स्पेक्टर वाडनसाहेब लाल झाला होता. " जमादार कोठें गेला? कां गेला? कोणाच्या संमतीनें गेला? " याची चौकशी त्यानें आरंभिली. दासगणूंच्या हाताखालीं एक मुसलमान शिपाई ' अडली ' म्हणून होता. त्यानें चहाडी केली कीं, " जमादार बेलापूर स्टेशनवरून गाडींत बसून कोठें तरी गेले. त्यांनीं आपलें घोडें निपाणी वडगांवच्या कुलकर्ण्याकडे ठेवलें आहे. " कुलकर्ण्याच्या येथें शोध करण्यास पोलीस आले असतांना, त्या चतुर गृहस्थानें दासगणूंची पोलीस डायरी व इतर सरकारी कागदपत्रांचें दप्तर बळदांतील अडगळींत टाकून दिलें व

चौकशीस आलेल्या अधिकाऱ्यास सांगितलें कीं, " गणेश दत्तात्रय येथें आला होता. हें घोडें त्याचेंच आहे. पण माझे रुपये त्याच्याकडून येणें असल्यानें मीं हें घोडें ठेवून घेतलें. त्याचें बाकीचें सामान त्यानें कोठें ठेवलें, तें मला माहीत नाहीं." चौकशीला आलेले शिपाई मग परत गेले.

आकोटाहून माघारी आल्यावर कुलकर्ण्यानें दासगणूस दरोड्याची सर्व हकीगत सांगितली. तो म्हणाला, "गणपतराव, आतां कसें होईल हो! वॉर्डनसाहेब संतापला आहे. तुमच्याविषयीं त्याला भलताच संशय आलेला दिसतो."

'परमेश्वर करील तें खरें' असें उत्तर देऊन दासगणू घोडें घेऊन बाहेर पडले. आतां कांहीं तरी बनाव केला पाहिजे, या विचारानें ते कापूस वडगांवास जाण्यास निघाले. रस्त्यानें जातांना श्रीसाईबाबांनीं दिलेली धमकी आठवली. बाबांची अवज्ञा केल्यानेंच हें संकट आपणांवर कोसळलें आहे, असें वाटूं लागलें. वाटेंत गोदावरी लागते. तेथें दासगणू येऊन पोहोंचले. मध्यरात्रीचा एक दीड वाजला असेल. नदींत उभे राहून दासगणूंनीं ओंजळींत पाणी घेतलें व शिरडीकडे तोंड करून ते म्हणाले, "बाबा, यांतून सुखरूप पार पडलों तर मी नोकरी सोडीन. याला गंगाबाईचीच साक्ष." असें म्हणून त्यांनीं पाणी सोडलें व ते पुढें निघून गेले. रात्रीं अंधारांत रस्ता नीट दिसत नव्हता. घोडें रस्ता चुकलें आणि कापूस वडगांवास न येतां तें भामाठाण बादाठाणास आलें.

हें गांव मोंगलाईंतील असून येथील भिल्लांनींच दरोडा घातला होता. पहाटेच्या सुमारास घोडें गांवाजवळ आलें. दरोडेखोर शेकोटी करून गप्पा मारीत होते. मालाच्या वांटणीसंबंधीं त्यांचा वाद पडला होता. 'मीं मारवाड्यावर घाव घातले म्हणून माझा वांटा मोठा.' 'मीं पेट्या पळविल्या म्हणून माझा वांटा मोठा.' असें ते भांडत होते.

जवळ आलेल्या दासगणूंनीं जरा लक्ष देऊन तें ऐकतांच सर्व परिस्थिति त्यांच्या लक्षांत आली. 'या चावडींत उतरूं का?' असें

त्या भिल्लांनाच विचारून ते सहज आल्यासारखे शेकोटीजवळ आले. धीर मोठा यांत कांहीं शंका नाहीं. दासगणूंनीं आपण वाटसरू असल्याचें भिल्लांना सांगितलें. 'माझें शिंगरूं हरवलें. आतां काय करावें? कसें सांपडेल कोणास ठाऊक?' असें त्यांनीं म्हटलें. तेव्हां त्यांपैकीं एकानें सांगितलें, 'इथल्या अमिनाला कळवा.' 'मी नवखा. मला अमिनाकडे घेऊन चलतोस का? तुला कांहीं देईन.' असें दासगणू म्हणाले.

त्या भिल्लाबरोबर जाऊन दासगणूंनीं अमिनाची गांठ घेतली. सर्व परिस्थिति त्याला सांगितली. गुन्हा पकडण्याचें सर्व श्रेय आपणांसच मिळेल, असें त्याला निश्चयानें सांगितलें. त्याप्रमाणें अमीन मदतीस आला व थोड्याच वेळांत बहुतेक सर्व आरोपी मुद्देमालासकट पकडले गेले. इकडे वॉर्डनच्या देखरेखीखालीं गुन्ह्याच्या तपासाची धामधूम चाललीच होती. दासगणूंनीं अमीनास विनंति केली कीं, "आमचा साहेब येथून जवळच आहे. तरी कृपा करून हे आरोपी व हा मुद्देमाल त्यांस दाखवा. मग सर्वांसह आपण ठाण्यावर जाऊं. पुढें कायदेशीर रीतीनें व्यवस्था होईल." अमिनानें तें मान्य केलें. वॉर्डन साहेबापुढें येतांच तो दासगणूंवर प्रथमं खूप संतापला, पण आरोपी व मुद्देमाल पुढें केल्यानें राग जाऊन स्वारी प्रसन्न झाली. दासगणूंच्या नोंदवहीवर त्यानें फार चांगला शेरा लिहिला. 'आधीं रिकामी होईल ती पहिली वरिष्ठ जागा इतरांच्या आधीं यास द्यावी.' असें त्यानें लिहिलें. याप्रमाणें दासगणू संकटमुक्त झाले.

बढतीची आशा उत्पन्न झाल्यावर नोकरी सोडणें, जिवावर येणें स्वाभाविकच होतें. शिरडीस आल्यावर बाबांनीं त्यांना हटकलेंच. 'गणू, गंगेंत शपथ कुणीं वाहिली नोकरी सोडीन म्हणून? अजून तरी डोळे उघड.' पण दासगणूंनीं तिकडे दुर्लक्ष केलें.

पुढें एका प्रसंगांत श्रीदासगणू खरोखरीच कायद्याच्या कचाट्यांत सांपडण्याची वेळ आली. गुन्ह्याच्या तपासासाठीं आरोपीस वागवितांना

मुळांत अनैतिक नव्हे, पण कायद्याच्या कक्षेबाहेरचें वर्तन झालें. हित-शत्रूंनीं या संधीचा फायदा घेऊन काहूर उठविलें. शिक्षा होऊन नांवाला बट्टा लागतो कीं काय, अशी भीति उत्पन्न झाली. श्रीदासगणू त्वरेनें शिरडीस गेले व बाबांना म्हणाले, " मागच्या प्रकरणीं माझ्याकडे चूक होती, तरी मला वांचविलेंत आणि आतां मी निरपराधी असूनसुद्धां शिक्षा देवविणार काय? तुमच्या पायांशपथ सांगतों. डाग न लागतां सुटलों, तर लगेच नोकरी सोडीन." बाबांच्या कृपेनें खरोखर तसें घडलें. चौकशींत श्रीदासगणू पूर्ण निर्दोषी ठरले.

यानंतर मात्र दासगणूंनीं नोकरी सोडण्याचा निश्चय करून राजीनामा पाठविला. राजीनामा दोन तीन महिने संमतच होईना. वरिष्ठ साहेबानें समक्ष बोलावून " वेड्यासारखें करूं नको. अजून राजीनामा परत घे. फकीराच्या नादीं काय लागलास! आपल्या पुढच्या आयुष्याचा कांहीं विचार करशील कीं नाहीं?" इत्यादि सांगून समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. स्नेही सोबत्यांनींहि तीव्र प्रकारें विरोध दर्शविला, पण कशाचाहि उपयोग झाला नाहीं. करारी माणसाचा विचार ठरेपर्यंत अवकाश असतो. एकदां निश्चय झाल्यावर मग त्याला मागें वळविणें, हें धबधब्यावरून कोसळणाऱ्या प्रवाहाला मागें फीर म्हणून सांगण्या-सारखेंच आहे.

नोकरी सोडून दासगणू शिरडीस आले. नोकरी सोडली. आतां आपलें पुढें काय? ही विवंचना मागें होतीच. त्यांना काळजी लागलेली पाहून श्रीसाईबाबा म्हणाले, " गणू, देव पाठीराखा असतांना चिंता कसली करतोस? नांदेडाकडे जा. तेथें मीं तुझी सर्व व्यवस्था केली आहे."

" बाबा, हें नांदेड कोणतें? पुण्याजवळचें का?"

" छे! तें नाहीं. वसमत नांदेड तिकडे जालन्याच्या खालीं आहे. तिकडे जा."

श्रीसाईबाबांची आज्ञा शिरसावंद्य मानून दासगणू महाराज प्रथमच मोंगलाईंत आले. त्यांचा ' संतकवि ' असा जो लौकिक झाला तो

याच प्रांतांत. संतरत्नांची खाणच असलेल्या अशा ह्या मराठवाडा प्रांतांतील वातावरण दासगणूंच्या मनःप्रवृत्तीस चांगलेंच मानवलें.

मधुर फळें देणाऱ्या फळझाडांचीं रोपें एके ठिकाणीं तयार करून मग दुसरीकडे रुजवितात, म्हणजे तीं मग फळांफुलांनीं बहरून जातात. तीं अनेक श्रांतांना आपल्या छायेंत सुखशीतल विश्रांति देऊन त्यांचा श्रमपरिहार करतात. मधुर रसानें त्यांना तृप्तवितात. श्रीदासगणूंच्या जीवनाचें तसेंच झालें. नगर प्रांतांत अंकुरित झालेलें त्यांच्या आध्यात्मिक जीवनाचें रोप मराठवाड्याच्या पवित्र सुपीक भूमींत चांगलेंच रुजलें, वाढलें आणि त्याला अनेकांना विसांवा देईल, अशा मधुर फळें देणाऱ्या आम्रवृक्षाची विशालता प्राप्त झाली.

## ११. श्रीसाईनाथांच्या सहवासांत :

श्रीसाईबाबांचे आज्ञेप्रमाणें नोकरीचा राजीनामा दिल्यानंतर श्रीदासगणू हे शिरडींतच कांहीं दिवस सुमारें दोन वर्षे राहिले होते. या काळांत श्री. नानासाहेब चांदोरकरांचें त्यांना फारच साहाय्य झालें. शिरडीस राहात असतांना श्रीसाईनाथ महाराजांच्या सहवासाचा दासगणूंच्या अंतःकरणावर फार खोल असा परिणाम झाला. मागें अनुभवलेल्या अनेक प्रसंगांनीं त्यांचें मूळचें सात्त्विक असलेलें अंतःकरण परमार्थप्रवण झालें होतेंच, पण तें आतां एकनिष्ठ बनलें.

परमार्थप्रवणता निराळी आणि निष्ठा निराळी. सर्वसामान्य माणसाचाहि कल भक्तिमार्गाकडे थोडाबहुत तरी असतोच. शंभरीशंभर नास्तिक अगदीं निराळा. कोणत्या तरी देवाची सामान्य स्वरूपांत का होईना उपासना करणें, कथा, कीर्तन, प्रवचन, भजन ह्यांत केव्हां तरी भाग घेणें आणि थोडा वेळ का होईना पण त्यांत रंगून जाणें, कोठलें-तरी स्थळ अधिक पवित्र मानून त्या ठिकाणीं कांहींसे हाल सोसूनहि यात्रेसाठीं जाणें इत्यादि सर्व गोष्टी प्रत्येक माणूस कमी अधिक प्रमाणांत करीतच असतो; परंतु हीं कृत्यें करीत असतांना त्यांत त्याची निष्ठा,

असत नाहीं. कोणत्या ना कोणत्या तरी स्वार्थ साधण्याच्या हेतूनें, करमणुकीचें वा शिणलेल्या मनाच्या विरंगुळयाचें सहजासहजीं मिळणारें एक साधन म्हणूनच केवळ ह्या धार्मिक गोष्टी केल्या जातात. मनुष्याच्या जीवनामध्यें अपूर्ण असण्याचा एक मोठा दोष आहे. त्याच्या स्वतःच्या सामर्थ्यानें सर्व गोष्टी त्याला प्राप्त करून घेतां येत नाहींत. मनाप्रमाणें ऐहिक सुख व त्या सुखाला साधनीभूत द्रव्य मिळविण्यास मनुष्याची बुद्धि, त्याची शक्ति, त्याचें कर्तृत्व हें सर्व अपुरें पडतें. त्यामुळें इच्छित सुखाच्या मार्गांतील अडथळा दूर व्हावा, यासाठीं आपापल्या कल्पनेप्रमाणें वरिष्ठ शक्तींना संतुष्ट करण्याचा एक उपाय म्हणून मनुष्य देवदेव करीत असतो. हा खरा परमार्थ नव्हे. खऱ्या परमार्थासाठीं मनुष्याचें अंतःकरण वरचेवर निर्लोभ आणि निष्काम होत गेलें पाहिजे. मदमत्सरादि स्वार्थी भावना क्रमाक्रमानें नष्ट होत गेल्या पाहिजेत. तरच देवदेव करण्याचें सार्थक आहे.

श्रीदासगणूंच्या जीवनामध्यें पूर्वी नोकरींत असतांनाहि सामान्य मनुष्याप्रमाणें ऐहिक सुखाची लालसा फारशी नव्हती. त्यावेळींहि त्यांनीं कांहीं विशिष्ट उद्देश साध्य करण्याकरितां आपलें जीवन दरिद्री अवस्थेमध्यें व प्रतिष्ठित वर्गाकडून मानखंडणा करून घेतच घालविलें होतें. भगवान शंकराची उपासना ते अत्यंत निष्ठेनें करीत; पण अमुक एक गोष्ट मिळविण्यासाठीं तिचा उपयोग होता, असें मुळींच नाहीं. मीं मागें लिहिलेंच आहे कीं, त्यांच्या मनाची घडणच कांहीं वेगळी होती. त्यामुळें सर्वसामान्यापेक्षां वागणुकीच्या दृष्टीनें वेगळेपणाहि त्यांच्या वर्तनांत भरपूर होता. एकादी गोष्ट करावयाची म्हटल्यानंतर तिच्या व्यवहारी बाह्यांगाकडे फारसें लक्ष न देतां मूळ हेतु साध्य होण्याच्या दृष्टीनें निष्ठेनें निग्रहपूर्वक कार्य करीत राहणें, हा त्यांच्या स्वभावाचा विशेष असल्यानें साधारण जनांना आकर्षित करणाऱ्या बाहेरच्या भपक्याचा मोह त्यांच्या मनाला कधीं पडला नाहीं. उलट असा भपक्याचा देखावा ज्या ठिकाणीं असेल

त्या ठिकाणीं चांगलेपणा कमी असण्याची शक्यता अधिक. असा सिद्धान्त त्यांनीं आपल्या मनाशीं बांधला होता. पोलिसांतील नोकरींत आलेला अनुभव या सिद्धान्तास अनुकूल असाच होता.

## १२. दंभाचा तिरस्कार :

शिरडींत असतांना या दृष्टीनें एक विशेष प्रसंग घडला. श्री. सुंदराबाई क्षीरसागर या नांवाच्या एक बाई श्रीसाईबाबांची सेवा करण्याच्या निमित्तानें शिरडीस येऊन राहिल्या होत्या. वयानें तरुण, रूपानें नीटस व परिस्थितीनें गतभर्तृका असल्यानें लोकांच्या मनामध्यें या स्त्रीविषयीं विशेष कुतूहल असणें, स्वाभाविक होतें. श्रीसाईबाबांची सेवा अनेक तऱ्हांनीं करण्याचा त्या प्रयत्न करीत. श्रीसाईबाबा जात असतील त्या रस्त्याची व मशिदीची स्वच्छता राखणें, त्यांचीं वस्त्रें प्रावरणें निर्मळ धुणें, भांडीं घासणें इत्यादि कामें श्री. सुंदराबाई मोठ्या तत्परतेनें करीत. साईबाबांना मात्र हा सर्व प्रकार रुचत नसे. ते बाईचा फार राग राग करीत. शिव्यागाळ तर नेहमींचीच होती; पण क्वचित् बडवूनहि काढीत. या सर्वांतूनहि बाईनीं आपला उपक्रम सोडला नाहीं. लोकांच्या मनावर त्यांच्या या निग्रहीपणाचा फार परिणाम झाला. साईबाबांच्या त्या एकनिष्ठ भक्त आहेत, अशी लोकांची दृढ भावना झाली. लोक त्यांना फार मानूं लागले. आज शिरडीला आरती, धुपारती, काकडा-आरती, चावडी, रथाची मिरवणूक इत्यादि जो सोहाळ्याचा नित्यक्रम आहे, तो सर्व या बाईनींच कार्यवाहींत आणलेला आहे. लोकांच्यावर छाप कशी ठेवावी, त्यांना श्रीसाईबाबांच्याविषयीं अनेक गोष्टी रंगवून फुगवून कशा सांगाव्या, पूजेच्या थाटामाटाकरितां लागणारीं निरनिराळीं साधनें, उपकरणें, साईबाबांना अर्पण करण्यास लोकांना कसें प्रवृत्त करावें, ही विद्या या बाईना चांगलीच अवगत झालेली होती. भक्तीच्या बाह्यांगाकडे आकर्षित होणें, पूजेच्या डौलदार पसाऱ्यांत रंगून जाणें, हें मानवी मनाला स्वाभाविक असेंच आहे; परंतु इष्ट मात्र नाहीं. बाह्यांगांत

रंगणें वा सहज साध्य होणारें हें बाह्यांग म्हणजेच खरी भक्ति समजण, हें वस्तुत: अत्यंत अनिष्ट असल्यानें श्रीदासगणूंना मात्र हें सर्व अनवश्यक वाटे. लोक तर या बाईच्या इतके भजनीं लागले होते कीं, ते त्यांना राधाकृष्ण आई म्हणत. त्यांची आज्ञा शिरसावंद्य मानीत. लौकिकाच्या या वेडांतून पुढें न लिहिण्यासारख्या इतरहि अनेक गोष्टी या ठिकाणीं होऊं लागल्या.

श्रीसाईबाबांच्यासारख्या वैराग्यभरित, निरिच्छ सत्पुरुषाच्याजवळ अशा तऱ्हेचा पसारा असावा, हें बरें न वाटून दासगणूंनीं या गोष्टीस विरोध करण्यास आरंभ केला. बाईच्या दिसणाऱ्या आणि मुळांत असणाऱ्या स्वरूपामध्यें वेगळेपणा आहे, अशी त्यांना आरंभींच शंका आली होती; पण आतां त्यांच्या सूक्ष्म दृष्टीला अनेक निंद्य प्रकार आढळून आल्यानें त्यांना स्वस्थ बसणें शक्य नव्हतें. लोक तर बाईच्याविषयीं कांहींहि शंका काढणें हें नास्तिकपणाचें मानीत. त्यामुळें श्रीसाईबाबांच्याकडे येणाऱ्या सर्व मंडळींत श्रीदासगणू हेच पुन्हां एकटे पडले. बडी बडी सर्व मंडळी एका बाजूस म्हणजे राधाकृष्ण आईच्या पक्षाची व एकटे श्रीदासगणू एका बाजूस असें द्वंद्व शिरडीस उत्पन्न झालें. प्रत्यक्ष श्रीसाईबाबाच श्रीदासगणूंना अत्यंत अनुकूल असल्याचें दिसत असल्यामुळें विरोधी पक्षीयांना कांहीं विशेष करतां येण्यासारखें नव्हतें. मनुष्यस्वभावाची चांगली पारख आणि चाणाक्ष स्वभाव यांमुळें श्री. नानासाहेब चांदोरकर मात्र श्रीदासगणूंच्याच मताचे होते. या सर्व प्रकरणाचा आपल्या पूर्वीच्या संवयीप्रमाणें उपहास करण्यासाठीं श्रीदासगणूंनीं एक विडंबनात्मक काव्य लिहिलें. त्याचा प्रसारहि झाला. या काव्याचें वृत्त समजतांच शिरडीस येणाऱ्या एका फार मोठ्या श्रीमान् गृहस्थानें श्रीदासगणूंना बजावून सांगितलें. " याद राखा. आईच्याकरितां मी तुमच्यावर अब्रूनुकसानीची फिर्याद करीन आणि त्यासाठा कितीहि खर्च आला तरी शेवटपर्यंत लढेन. श्री. चांदोरकरांचा वशिला वरच्या कोर्टांतून तुमच्या कामीं येणार नाहीं, हें पूर्ण

लक्षांत ठेवा. ” ही गोष्ट घडणें खरोखरीच शक्य होतें. म्हणून उगीच कोर्टकचेऱ्या नकोत, ह्या हेतूनें श्रीदासगणूंनीं आपलें तें विडंबनात्मक काव्य फाडून टाकलें. तें प्रसिद्ध केलें नाहीं. हें सर्वच प्रकरण भक्तींच्या खऱ्या मार्गामध्यें विक्षेप निर्माण करणारें असल्यानें आणि साधकाच्या दृष्टीनें या प्रकारच्या प्रवृत्तींचा निषेध करणें, अत्यंत अवश्य असल्यानें दासगणूंनीं या वस्तुस्थितीचा निराळ्या तऱ्हेनें उपयोग करून घेतला.

पुणतांबें येथील प्रसिद्ध सत्पुरुष श्रीचांगदेव यांचें कीर्तनोपयोगी आख्यान श्रीदासगणू लिहीत होते. त्या आख्यानाच्या संविधानकांत चांगदेवांच्या जवळ एक विगतधवा ब्राह्मणी सेवा करण्यास येऊन राहिली, अशी काल्पनिक घटना गृहीत धरली आणि शिरडी येथील वस्तुस्थितीला धरून तिचें वर्णन केलें.

आर्या

“ पुण्यस्तंभीं केला मठ केशवदास चांगदेवांनीं ।
तैं त्याजवळ रहाया आलीसे एक ब्राह्मणी तरुणी ॥

अभंग

कुंचा करोनी केसाचा । पंथ झाडी सद्गुरूचा ।
ऐशी निर्वाणीची भक्ति । पाहुनि भोळे आनंदती ।
परि चांगदेवा मनीं । येई तिटकारा क्षणोक्षणीं ।
गणू म्हणे गारे प्रत । पारखी का वाखाणित ॥

साकी

तिची पाहुनी दांभिक भक्ति चांगदेव साधूसी ।
क्षणाक्षणा संताप बहुत ये अनीति ही संतासी ।
पटते का सांगा, द्विज न गौरवी मातंगा ॥

श्लोक

एके दिनीं बहुत कोपचि चांगयाला ।
आला करें धरुन झोडियलें तियेला ।
त्याचा ति अर्थ उलटा करुनी जगासीं ।
सांगे म्हणे अजि मी पात्र गुरुकृपेसी ॥

दिंडी

साधुपुरुषा संताप कसा येतो।
काय कौमुदिपासून ताप होतो।
असे वदती जन बघुनि चांगयाला।
कुणी न बघती त्यांतील इंगिताला॥'

शेवटीं अती झालें, त्यावेळीं कांहीं विचारवंत मंडळी एकत्र झाली. ते बाईस म्हणाले,

पद (लावणी)

"तूं विगतधवा ब्राह्मणी सकेशा खरी।
आहेस तरुण त्यांतुनी नको राहूं मठाभीतरी।
नेसशी धवल पातळा विरक्तापरी।
डोईस तेल वासाचें, बुचड्यांत सुमनमंजिरी।
मनगटीं मणी तुळशिचे, तुवां बांधिले।
ढळढळित तसें निज भाळां, वैष्णवी चिन्ह रेखिलें।
चपलता तुझ्या अंगिची, अलौकिक खरी।
शृंगाररूप मेघाची, तूं वीज मन्मथांबरीं।

चाल कृष्णाची मूर्त ती करीं। धरिली त्वां जरी।
परि न ती खरी। ढोंग तें बाळे, समजलें आम्ही अंतरीं॥
वाचिशी भारतभागवता। भोळे फसविण्या।
नको रांधू मुखीं ज्या दंत, त्या कळति वाळूच्या कण्या।
श्रीचांगदेव महासिद्ध, तयांच्या मठीं।
राहे न सांग शोभे का, केशरा गुवाची उटी।

चाल गणु म्हणे जेथ अस्सल। तेथ नक्कल फाजित पावेल।
म्हणुन जा दूरीं। नको वर्ख सराफा घरीं॥

ओवी

ऐसें बोलून ब्राह्मणी। बाहेर काढिली मठांतुनी........."

असें हें सर्व स्वतंत्र प्रकरण काल्पनिकरीत्या रचून चांगदेवांच्या चरित्रामध्यें समाविष्ट केल्यानें कायद्याच्या कक्षेंत राहून इष्ट हेतु साध्य

करण, हें सहज सोपें झालें. हें आख्यान शिरडीस त्यांनीं श्रीसाईबाबांचे समोरच कथा करतांना लाविलें. तें ऐकून बाबा हळूच हंसत होते. राधाकृष्ण आईविषयीं आदर असणारी मंडळी मात्र कथेंतून उठून गेली. विरोधी लोक पुष्कळ जळफळले; पण त्यांना आतां प्रत्यक्ष कांहींहि करतां येण्यासारखें नव्हतें. श्रीदासगणूंच्याविषयीं मनामध्यें आढी धरून त्यांतील कांहींनीं त्यांना छळण्याचा अनेक प्रकारें प्रयत्न केला, पण श्रीदासगणूंचा हेतु मुळामध्यें अत्यंत सोज्वळ होता. त्यांची भूमिकाहि परमार्थतः अत्यंत शुद्ध होती आणि वस्तुस्थितीहि प्रत्यक्षांत वर्णन केल्याप्रमाणेंच असल्यानें त्यांना स्वतःला याची कांहींहि खंत वाटली नाहीं. लोकांच्या निंदेला वा उपहासाला वा छळालाहि न मोजण्याइतका खमंगपणा त्यांच्या वृत्तींत मूळांतच होता. हें मीं मागें उल्लेखिलें आहेच.

असें हें कटुतेचें वातावरण बऱ्याच काळपर्यंत टिकलें होतें. हळूहळू थोडी थोडी मंडळी श्रीदासगणूंच्या पक्षाला येऊन मिळूं लागली होती. पुढें या बाई अत्यंत लांच्छनास्पद स्थितींत मरण पावल्या. पंचनाम्या-पर्यंत वेळ आली. कसेंबसें तें प्रकरण मिटवावें लागलें. त्या वेळीं मात्र बहुतेक सर्वांचा भ्रमनिरास झाला आणि श्रीदासगणूंचें म्हणणें शब्दशः किती खरें होतें, हें लोकांच्या प्रत्ययाला आलें. श्रीदासगणूंनीं आपल्या आयुष्यांत अनेकांचा असा दंभस्फोट केला आहे.

या बाईच्याविषयीं अजूनहि श्रद्धा बाळगणारे कांहीं गृहस्थ श्रीदासगणू महाराजांच्या जिवलग मित्रपरिवारांत आज आहेत. महाराज त्यांच्या निष्ठावंत वृत्तीचें अतिशय कौतुक करितात आणि म्हणतात, "परमार्थांत शेवटीं फळ मिळतें, तें निष्ठेचेंच. कोठेंहि बसली तरी फळ देणारच. 'निष्ठा एकविधा कुठेंहि बसतां निष्ठाच ती पावते.'" मीं विचारलें, "मग ज्याच्या भजनीं लागावयाचें तो कसा असावा? कसा आहे? याची पूर्ण चौकशी करून मग संगत धरावी, असें वर्णन आपण ज्ञानेश्वर चरित्रांत केलेंत."

पद—

‘ कोणा भजती, कोठें राहती, उदर कशावर ते भरती ।
शेती अथवा घेणें देणें, वा किमयेला ते करती ।
अथवा बांधुनि मठ मठीं गांवीं, शिष्याशिष्यिणी भोंदिती ।
दास गणु म्हणे शोध करावा, प्रत्येकानें याच रीतीं ॥ ’

प्रत्येकानें पूर्ण चौकशी करूनच श्रद्धा ठेवावी. स्वतःची फसवणूक करून घेऊं नये. असें आपण कां म्हणतां ? ”

त्यावर ते म्हणाले, “ अरे, वाईट व्यक्तीवर ठेवलेल्या श्रद्धेमध्यें निष्ठा कायम टिकत नाहीं. अंतःकरणाचा विक्षेप होतो. श्रद्धेय व्यक्ति जितकी चांगली श्रेष्ठ तितकी निष्ठा अधिकच स्थिर राहते. निष्ठेची स्थिरता हीच परमार्थामध्यें लाभदायक असल्यानें चांगल्या योग्य व्यक्तीवर निष्ठा ठेविली पाहिजे, असा नियम बांधला गेला. तो सापेक्ष आहे. निष्ठा स्थिर राहील अशा निग्रही अंतःकरणाचा मनुष्य असेल तर कोणावरहि निष्ठा ठेवण्यास हरकत नाहीं. दुर्वर्तनी गुरु असूनहि श्रीसंतोबा पवार नाहीं का उद्धरून गेले ? ”

श्रीदासगणूंनीं आपल्या आयुष्यामध्यें कथाकीर्तनांतून वा संभाषणांतून ढोंगी लोकांच्या भक्तांची कधींहि थट्टा केली नाहीं वा त्यांच्याविषयीं कधीं तिरस्कारहि बाळगला नाहीं. परमार्थाच्या नांवाखालीं तत्त्वज्ञानाच्या आधारानें उपदेशिला जाणारा दुराचार मात्र अत्यंत कडक शब्दांत तिरस्कारला. साकोरीच्या श्रीउपासनीबोवाविषयींचा प्रसंगहि या संदर्भांत सांगण्यासारखा आहे. श्रीउपासनीबोवांवर केली तेवढी कठोर टीका त्यांनीं दुसऱ्या कोणावर क्वचित्‌च केली असेल.

जालंदरनाथ चरित्र आणि मुकुंदराज चरित्र यांत अगदीं स्पष्ट शब्दांत श्रीदासगणूंनीं उपासनीबोवांचा अधिक्षेप केला आहे. गोपीचंद राजाची माता मैनावती हिला आपण योग्य सत्पुरुषाकडून उपदेश घ्यावा, अशी इच्छा उत्पन्न झाली. त्यासाठीं ती संताच्या शोधांत होती. तिच्या दासी तिला एकेका व्यक्तीचें चरित्र व वर्तन वर्णून सांगत

आणि मैनावती त्यांतील वैगुण्यें वा अपूर्णता स्पष्ट करून दाखवी व त्या व्यक्तीस गुरु म्हणून शरण जाण्याचें नाकारी. या वेळीं एक दासी मैनावतीला म्हणाली, " बाईसाहेब,

दिंडी—

> ' उठा आतां पट्टणीं साधु एक ।
> पातलासे साधुत्व अलौकीक ।
> समिप गांवाच्या वसत स्मशानासी ।
> निवळ नंगा ना वसन नेसण्यासी ॥ ' "

त्यावर मैनावती म्हणाली,

> " त्याचें नको मुळींच घेउंस नांव बाई ।
> नंग्या मुखें सदुपदेश मिळेल काई ।
> दुर्वर्तनी खचित तो गमतें असावा ।
> मद्यांतुनी कुठुन पीयुष लाभ व्हावा ॥ "

यावर दासी म्हणाली, " बाईसाहेब, ज्यांची गोष्ट आपण नेहमीं वैराग्याचें उदाहरण म्हणून सांगतां, ते शुकाचार्य तर नेहमींच नग्न असत. भागवतासारखा बहुमोल उपदेश त्यांचेच मुखांतून स्रवला ना? मग यांच्यावरच तुमचा एवढा रोष कां ? "

मैनावती म्हणाली, " भगवान् शुकदेवांचें नांव कशाला घेतेस ? कुणीकडे त्या थोर पुरुषाची योग्यता !

पद—

> ' शुकमुनी, निबिड काननीं, रमे निशिदिनीं, हा तों बसला ।
> समिप गांवाच्या, साधु कसला गे भोंवती ।
> भोंवती, स्त्रियाही अती, म्हणुन मजप्रती, सांगतेस ।
> अणिक त्यालाच, साधु म्हणतेस भोंदु तो ।
> भोंदु तो, जगा ठकवितो, सत्य लपवितो, करून ढंगा ।
> ठेवितो उपाधीस, संगा गे यावरून ।
> यावरून, विचारा करून, नीतिपथ धरून, असा जगतीं ।
> गणूची हीच तुम्हां विनती हो सर्वदा ॥ ' "

श्रीमुकुंदराजांच्या चरित्रांतहि असाच एक प्रसंग श्रीदासगणूमहाराजांनीं वर्णिला आहे. एका सिद्ध पुरुषाच्या बोलण्यामुळें उपरति होऊन राजा जयत्पाल ब्रह्मसाक्षात्कारासाठीं अत्यंत आतुर झालेला असतो. ब्रह्माचें दर्शन होईल, या अपेक्षेनें अनेक साधुसत्पुरुषांची तो भेट घेतो. त्यांत अनेक प्रकारच्या साधूंचें वर्णन येऊन जातें. एकजण सांगतो, " महाराज, हे फार चांगले साधु आहेत. काय वैशिष्ट्य यांचें ?

**पद—**

**'वसत नागवा कटघरिं हा कीं लावुन पोतें उगिच वरी ।**
**शिष्यवरातें म्हणे निजभार्या करा रे अर्पण मज आदरीं ।**
**तरीच नेइन वैकुंठाप्रत करिन तुम्हांला साच हरी ।**
**दासगणु म्हणे मजशि कळेना, गोम यांतली काय खरी ।' "**

हें वर्णन ऐकतांच जयत्पाल राजा अत्यंत संतापला आणि म्हणाला,

**श्लोक—**

**" या नागव्याप्रति नका शहरांत ठेवूं ।**
**संतत्व एक शशि, त्याप्रति हाच राहू ॥**
**याचा विसंगत विधी, श्रुतिशास्त्रमार्गा ।**
**दुर्वर्तनी नरपशू , करि व्यर्थ सोंगा ॥ "**

हे उद्गार किती तिखट आहेत, याचा वाचकांनींच विचार करावा. या तऱ्हेची टीका त्यांनीं केवळ कीर्तनांत आणि आख्यानांतील काव्यांत पाठीमागें तेवढी केली असें नव्हे. उपासनीबोवांसमोर त्यांच्या तोंडावरहि श्रीदासगणूंनीं स्पष्ट बोलण्यास मागें पाहिलें नाहीं.

१९१९ सालांतील गोष्ट. उपासनीबोवांनीं श्रीदासगणूंना कीर्तनासाठीं साकोरीस मुद्दाम बोलाविलें होतें. त्याप्रमाणें श्री. दामूअण्णा व श्री. किसनराव कासार या आपल्या दोन साथीदारांसह महाराज साकोरीस जाण्यास निघाले. श्रीदासगणू महाराजांच्या जिव्हाळ्याचीं शिरडीचीं शंभरसव्वाशें माणसेंहि त्यांच्यासवें साकोरीस गेलीं. कीर्तनामध्यें उपासनीबोवा समोरच बसले होते. त्यांना उद्देशूनच

**" नहिंम हमारी रीत न हारी नंगेपन तुम छोडो जी "**

आणि

"इनसान हो तुम प्यारे हैवान क्यों होते हो"

अशीं दोन नवीन पदें रचून कीर्तनांत म्हटलीं. तीं ऐकतांच उपासनीबोवा फार संतापले. अद्वातद्वा बोलूं लागले. 'हें कीर्तन बंद करा. नाहींतर भलतेंच होईल.' अशी शापवाणी उच्चारूं लागले. तेव्हां श्री. दुर्गाबाई म्हणून त्या वेळच्या उपासनीबोवांच्या पट्टशिष्या बोवांना शांत करीत म्हणाल्या, "महाराज, शांत व्हा. शांत व्हा. गणू (दासगणू) आपला आहे."

श्रीदासगणू यावर उसळून म्हणाले, "दुर्गाबाई, माझी रदबदली करण्याचें कांहींच कारण नाहीं. हे काय करणार असतील, तें करूं देत. काय होतें, तें मलाहि पाहावयाचें आहे. माझ्या अंगावर येऊन दोन हात करणार असतील, तर त्यालाहि माझी हरकत नाहीं, पण उभें राहिलेलें कीर्तन मधेंच थांबणार नाहीं."

श्रीदासगणूमहाराजांच्या बरोबर शिरडीची बरीच मंडळी असल्यानें केवळ बोलाचाली पलीकडे विशेष प्रसंग आला नाहीं.

उपासनीमहाराज व दासगणूमहाराज यांची १९३५ सालीं शिरडीस रामनवमी उत्सवाचे वेळीं पुन्हां एकदां भेट झाली. त्यावेळीं घडलेलें वृत्त रामनवमीच्या इतिवृत्तांत श्रीदासगणू महाराजांनीं स्वतःच सविस्तर दिलें आहे. 'साईलीला' मासिकाच्या बाराव्या वर्षाच्या दहाव्या अंकांत पृष्ठ १४ वर प्रसिद्ध झालेला हा मजकूर श्रीदासगणू महाराजांच्या शब्दांतच असल्यानें जसाच्या तसाच पुढें देत आहे. 'यंदाच्या उत्सवांत एक विशेष गोष्ट झाली ती अशी कीं, साकोरी येथील उपासनीबोवा यांना दरसाल शिष्यशिष्यिणींसह उत्सवास येण्याबद्दल रीतीप्रमाणें आमंत्रण जात असतें; पण ते कधींहि उत्सवास आले नाहींत. चालू सालीं मात्र आपल्या कांहीं निवडक गणांसह एकादशीच्या दिवशीं सायंकाळीं आले. प्रथम ते दीक्षितांच्या वाड्यांत गेले. त्या ठिकाणीं श्री. माधवराव देशपांडे यांच्याबरोबर थोडें बोलून त्यांच्यासह

श्रीसाईमहाराजांचे समाधीपाशीं आले. या वेळीं श्री. बाळासाहेब देव यांचें कीर्तन नुकतेंच संपलें होतें. मी मंदिरांतच होतों. त्यांनीं मला पाहून नमस्कार केला. मींहि त्यांना वारकरी पद्धतीप्रमाणें नमस्कार केला व म्हटलें, "मी दरसाल आपणांस येण्याबद्दल पत्र पाठवीत असतों. पण आपलें येणें कधींच झालें नाहीं आणि या बारीला कां झालें ?" त्यावर उपासनीबोवा म्हणाले कीं, "मी तुमचें कीर्तन ऐकण्याकरितां मुद्दाम आलों आहें." मीं म्हटलें कीं, "माझें कीर्तन तुम्हांला पटणार नाहीं." तेव्हां ते म्हणाले, "छे! छे! तुमचें कीर्तन मला फार आवडतें. थोडा वेळ का होईना पण कीर्तन कराच." त्यानंतर मी कीर्तनास उभा राहिलों. श्रीएकनाथ चरित्रापैकीं त्यांचा शिष्य महाद्या महार या भागावर कीर्तन करून उपासनीबोवांच्या अश्लील, शास्त्रबाह्य व रिवाजाला विरुद्ध असलेल्या वर्तनाचा निषेध एका शास्त्रीबोवाची गोष्ट दृष्टान्तादाखल घेऊन केला. माझ्या निषेधाची जाणीव त्यांना ते धूर्त असल्यानें सहजच झाली. पुढें कीर्तनाचा समारोप करतांना स्पष्टच सांगितलें कीं, "आपण जर चांगलें वागलां असता तर किती चांगलें झालें असतें! अजून तरी आपण आपल्या वर्तनांत फरक करा. लोकांनीं निंदा करण्यासारखें कांहीं एक ठेवूं नका." पण माझें हें म्हणणें त्यांना पटलेलें दिसलें नाहीं. कीर्तन संपल्यावर पुन्हा मी त्यांच्या पायां पडलों. हें माझें पायां पडणें, त्या वेळीं हजर असलेल्या कांहीं लोकांना पटलें नाहीं. त्याला माझा नाइलाज आहे. कारण या रामनवमीच्या उत्सवाची जबाबदारी माझ्यावर असल्यानें लोकरिवाजाप्रमाणें मला आलेल्या पाहुण्यांचें आदरातिथ्य करणें, जरूर असल्यानें त्याप्रमाणें मीं केलें. उपासनीबोवा जातांना म्हणाले, "आतां साकोरीस येऊन असेंच कीर्तन करा. मला कीर्तन फार आवडतें!" मीं म्हटलें, "सतरा वर्षांपूर्वीं आपल्या बोलावण्यावरून साकोरीस कीर्तनाला आलों होतों. तेव्हां कीर्तनांत म्हटल्या गेलेल्या दोन पदांनीं आपला कोपाग्नि इतका भडकला कीं, आतां याचा परिणाम काय होतो, अशी

धास्ती लोकांना पडली; पण शिरडीचें शंभर सव्वाशें माणूस माझ्या-बरोबर असल्यानें कांहीं एक न होतां मी सुखरूप परत आलों. तेव्हां आतां पुन्हा कशाला साकोरीला बोलावितां? आपलें वर्तन चांगलें सुधारा. मग मी आपोआपच साकोरीस येईन. तुमचा आमचा तंटा थोडाच आहे ? "

इतकें बोलणें झाल्यावर उपासनीबोवा साकोरीस परत गेले. दुसऱ्या दिवशीं त्यांनीं आपल्या कांहीं गणांकडून मला बोलावणें केलें, पण त्या वेळीं गणांनासुद्धां मीं तेंच उत्तर देऊन वाटेस लाविलें. त्यानंतर माझ्या-कडे कोणीहि आलें नाहीं.'

श्रीउपासनीबोवांवर महाराजांचा एवढा रोष असण्यास त्यांचें वागणें हें तर कारण आहेच, पण श्रीसाईबाबांचे भक्त असें स्वतःस म्हणवि-णाऱ्या या उपासनीबोवांनीं 'साईवाक्सुधा' या नांवानें प्रसिद्ध केलेल्या ग्रंथांत तत्त्वज्ञानाच्या नांवाखालीं अत्यंत ओंगळ, अमंगळ, अश्लील असें लिखाण केलें आहे. त्याचा श्रीदासगणू महाराजांना अतिशय तिटकारा आला आणि मग ज्या ज्या वेळीं संधि मिळेल, त्या त्या वेळीं अगदीं कडक शब्दांत त्यांनीं त्यावर वरीलप्रमाणें फटके ओढले.

खऱ्या संतत्वाविषयीं श्रीदासगणू महाराजांच्या कल्पना अगदीं ठाम आहेत आणि त्यांनीं वेळोवेळीं काव्यरूपानें त्या प्रगटहि केल्या आहेत. निवडक अवतरणामध्यें उल्लेखिलेलीं 'संत म्हणा त्याला' आणि 'तोचि म्हणावा जगीं संत' हीं त्यांचीं दोन स्फुट पदें या दृष्टीनें अभ्यासण्यासारखीं आहेत. महाराज ज्या वेळीं टीका करतात, त्या वेळीं त्यांत द्वेषबुद्धि खरोखरच नसते. संतत्वाची महति यथार्थपणें गात असतांना त्याशीं विपरीत वा विसंगत अशा आचारविचारांवर टीका करण, त्यांना भाग होतें.

एकदां बैठकीमध्यें एका श्रोत्यानें त्यांना विचारलें, "बोवा, परनिंदा करूं नये म्हणतात. मग आपण कीर्तनांत करतां, ती निंदा नाहीं काय ? "

महाराज त्यावर हंसून म्हणाले, "असेलहि कदाचित्. पण त्याला

माझा निरुपाय आहे. मी बोलून चालून केरसुणी आहे. देवळें, देवघरें झाडून काढणें हें माझें काम. उगीच धूळ उडविणें चांगलें नाहीं, हें खरें. पण केर हा तर काढलाच पाहिजे ना? देवाची पूजा करण्यास आरंभ करण्यापूर्वी आपण देव्हारा झटकत नाहीं का? त्याच भावनेनें मी बोलतों, टीका करतों." श्रीसाईबाबांच्या स्तुतीपर रचलेल्या एका पद्यांत महाराज स्वतःविषयीं 'अपने मशिदका झाडू गनू है' असा उल्लेख करितात आणि हें पद प्रत्येक कीर्तनाच्या आरंभीं नमनाचें म्हणून म्हटलें जातें. यावरून टीका करण्याच्या पद्धतीमागची महाराजांची भूमिका स्पष्ट होईल.

संतत्वाचीं खरीं लक्षणें सांगत असतांना श्रीदासगणू महाराजांनीं अगदीं चोख धारवाडी कांटा वापरला आहे. किंवा अगदीं यथार्थ उदाहरण द्यावयाचें झालें तर ज्यावर हिऱ्यांचा चव ठरविला जातो असा जवाहिऱ्याचा कांटा ते वापरतात, म्हटलें तरी चालेल. पासंगांतील अगदीं सूक्ष्म फरकहि त्यावर नोंदला जातो. गोजीवन श्रीचौंडेमहाराज हे श्रीदासगणूंचे जिवलग स्नेही आहेत. परस्परांची गांठ घेतल्यावांचून त्यांना चैन पडत नाहीं. पुण्याच्या मुक्कामांत दोन चारदां तरी भेट होऊन विचारांची देवघेव व्हावयाचीच. या दोघांचा परस्पर प्रेमादर किती उत्कट आहे, तें दोघांच्या परिवारांतील लोकांना चांगलें माहीत आहे. श्रीचौंडेमहाराजांविषयीं वाटणारा आदर श्रीदासगणूंनीं 'भक्तिसारामृत' या ग्रंथांत त्रेसष्टाव्या अध्यायांत भक्तिमार्गांतील थोर सज्जनांचीं नांवें उल्लेखितांना सर्वारंभीं पुढील ओव्यांतून प्रगट केला आहे.

"चौंडेबोवा कृष्णातिरीं। गोरक्षणाचा कैवारी।
श्रद्धा दासबोधावरी। जयाची ती अनुपम।
वैराग्य ज्याचें कडकडीत। देह गोरक्षणा प्रीत्यर्थ।
लावून स्वरूप सांप्रदायाप्रत। चालविती श्रीसमर्थांच्या।
सज्जनगडीं पालख्यांचा। सोहळा वाढविला यांनींच साचा।
परम दयाळू मनाचा। नमन माझें तयास।"

चौंडे महाराजांचें कार्य जें गोरक्षण त्याविषयींहि महाराजांना किती जिव्हाळा आहे, तें तद्विषयक अनेक ठिकाणच्या उल्लेखांवरून सहज प्रत्ययास येतें. गोदामाहात्म्यांतील कांहीं ओव्या उदाहरणार्थ पाहण्या-सारख्या आहेत.

"पहा श्रोते गोधनाची । किंमत केवढी थोर साची । उन्नती व्हावया राष्ट्राची । गोधनाची आवश्यकता ॥ धेनूस उपाशी ठेवून । जो भोजन करी ब्राह्मण । तयाचें तें अन्नसेवन । विष्टाभक्षण समजावें ॥ करावया धेनुरक्षण । क्षत्रियांनीं वेचणें प्राण । गोछलकालागून । नृपें करावी जबर शिक्षा ॥ एवंच ही गाय । प्रत्येकानें मानणें माय । कांकीं प्रत्येकाचा पुष्ट काय । झाला हिच्याच दुग्धावरी ॥ माता शिशूंना जन्म देती । त्यांना धेनु संरक्षिती । ऐसें असून तयाप्रती । विकतां हाटीं हें काय ॥ रंजनावया धेनूस । पांवा वाजवी श्रीनिवास । ऐशा त्या पवित्र गोधनास । विकणें हाटीं बरें नव्हे ॥ क्षात्रकुलावतंस भूपती । श्रीशिवाजी छत्रपती । यांनीं गोधनाची जाणून महती । गोपालक म्हणवून घेतलें ॥ आतां हीच विज्ञप्ती । तुम्हां अवघ्या हिंदूप्रती । गोरक्षणाचा उबग चित्तीं । येऊं न द्यावा बाप हो ॥"

चौंडेमहाराज व त्यांचें कार्य याविषयीं आदर असूनहि महाराज ज्यावेळीं पुढील श्लोक लिहितात, त्या वेळीं त्या मागील हेतु नीट लक्षांत घेतला पाहिजे.

श्रीगाडगेमहाराजांच्या कार्याविषयींहि श्रीदासगणू आदरानेंच बोल-तात. पण तरीहि मुकुंदराय चरित्रामध्यें त्यांनीं हा श्लोक लिहिलाच आहे.

"हा वर्गणी करुन बांधित धर्मशाळा ।
क्षेत्रामधें दिन जनां उतरावयाला ।
हा तो फलाहर करी न शिवेच अन्ना ।
गोरक्षणा करित हा करि धूम्रपाना ॥"

यावर भाष्य करितांना ते सांगत, 'गोरक्षण करणें, धर्मशाळा बांधणें हीं कृत्यें चांगलीं आहेत. समाजाच्या कल्याणासाठीं आणि सुखासाठीं

त्यांचा उपयोग आहे, हें निःसंशय. पण संतत्वाचें कांहीं तें लक्षण होऊं शकत नाहीं. धर्मशाळा बांधणें, हें श्रीमंतांचें काम. गोरक्षण करणें हें राजसत्तेचें कर्तव्य. तें ते पाळीत नाहींत. म्हणून यांनीं समाजहिताचीं हीं कामें केलीं. चांगलें केलें. या श्लोकापुढच्याच कवितेच्या ओळींत श्रीदासगणू महाराज स्वतःचाच उल्लेख करितात.

"हा आहे काव्यनिपुण, प्रेमळ बहु यत्कीर्तन।
हरिदिनीला करित गमन पंढरीस हा॥"

श्री. मोरेश्वर विश्वनाथ प्रधान या साईभक्तांना श्रीदासगणू महाराजांच्या विषयीं फार आदर असे. मुकुंदरायांचें चरित्र ऐकल्यानंतर त्यांनीं श्रीदासगणू महाराजांना आग्रहानें विनंति केली कीं, "आपण स्वतः विषयींच्या या ओळी या आख्यानांतून काढून टाका. परमेश्वराचें नांव आपल्या कीर्तनांत किती प्रेमळपणानें येतें, आपलें काव्य किती भक्तिरसपूर्ण आहे, अनेकांच्या हृदयाला त्यामुळें कसें समाधान लाभलें आहे, किती तरी लोक आपल्या कीर्तनामुळें परमार्थाकडे ओढले गेले आहेत; याची आपणांस नसली तरी मला चांगली कल्पना आहे. मग या ओळी उगीच कां लिहितां ? मला हें बरें वाटत नाहीं." त्यावर दासगणू महाराजांनीं दिलेलें उत्तर मोठें विचार करण्यासारखें आहे. "हे पहा मोरेश्वरराव, एकच प्याला नाटकांत बालगंधर्व अगदीं गहिंवरून रडतो, असें म्हणतात. त्याप्रमाणें कीर्तनांत माझ्या डोळ्यांना पाणी येतें. याला फार तर वर्ण्य विषयाशीं तन्मयता आली, असें म्हणतां येईल. संतत्वाची ती कसोटी कशी ठरेल ? कविता करणें हें तर त्या दृष्टीनें अगदींच कमी महत्त्वाचें. काव्यशक्तीचा संतत्वाशीं कांहीं अपरिहार्य संबंध नाहीं. या ओळी तुम्हांला बऱ्या वाटत नाहींत. इतर आणखी कोणाला रुचणार नाहींत. त्यांत कांहीं अर्थ नाहीं. मी लिहिलें तें अगदीं बरोबर आहे."

कीर्तनप्रसंगीं श्रीदासगणू महाराजांच्या नयनांतून वाहणारा प्रेमाश्रूंचा प्रवाह आणि रंगभूमीवर अभिनयपटु नटाच्या डोळ्यांना येणारें पाणी

यांत किती फरक आहे, तें विचारवंतांच्या ध्यानांत सहज येईल. पण संताचीं लक्षणें सांगत असतां श्रीदासगणू महाराज किती सूक्ष्म विचारानें बोलतात, किती सावधपणा बाळगतात, एकाद्या गोष्टीचा निर्णय घेतांना त्यांची विवेचक बुद्धि किती बारकावा करते; तें यावरून लक्षांत येतें.

महाराजांनीं केलेली ही टीका वेळप्रसंगीं कितीहि भेदक असली तरी ती 'पापात् निवारयाति योजयते हिताय' या सुहृद्भावनेनेंच केलेली असते. अंतःकरणांत द्वेषमत्सराचा लवलेशहि कधीं असत नाहीं, ह त्यांच्या निकटवर्तियांना चांगलें ठाऊक आहे. त्यांच्या सर्ववत्सल हृदयाचा अनुभव आला नाहीं, असा संबंधी माणूस विरळा.

> "वर्तन बघतां गूखार्डी, जणुं डामडौल तो वर भारी।
> गरतीपेक्षां सुंदर वेश्या, सहज चमकते बाजारीं॥"

या रीतीनें दुर्वर्तनावर फटके ओढणाऱ्या आपल्या एका फटक्याच्या शेवटीं ते म्हणतात—

> "दासगणु म्हणे वर्म काढुनि, शर्मायासी वृथा कुणा।
> सत्य सांगतों बुधश्रेष्ठ हो, नाहीं रचलें या कवना।
> मीही तुमच्यांतील एक मग, वर्म काढुं तरि कवणाचें।
> वर्तन आपुलें आहे बिघडलें, म्हणुन बोललों या वाचें।
> आतां अवघ्या हीच विनंती, दुष्कर्माला देऊन रजा।
> घ्या आपुलासा करुनि भक्तिनें, पंढरिचा तो विठुराजा॥"

या ओळींतून प्रगट होणारा प्रांजलपणा आणि जिव्हाळा किती हृदयस्पर्शी आहे, हें रसिक जाणतीलच. लाडक्या मुलाला उद्देशून आईच्या तोंडून बाहेर पडणाऱ्या 'मेल्या चांडाळा' या शब्दासारखीच हितकारिता महाराजांच्या टीकेमध्यें असते. त्यामुळें ही टीका 'यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम्' अशी सुखपूर्ण आहे, असेंच म्हटलें पाहिजे.

## १३. कीर्तन-पद्धति :

शिरडीस राहात असतांना एकदां रामनवमीच्या उत्सवासाठीं म्हणून कीर्तनास जाण्याचा प्रसंग आला. कीर्तनकाराच्या नेहमींच्या पद्धती-प्रमाणें झिरमिळ्यांची सुरेख पगडी, करवतकांठी उपरणें आणि डेरेदार पांढराशुभ्र अंगरखा असा पोशाख करून श्रीदासगणू कीर्तनास निघाले. जातांना नमस्कार करण्यासाठीं श्रीसाईबाबांचेकडे गेले असतांना बाबांनीं विचारलें, " कुठें निघालास रे गणू ? "

" कीर्तन करण्यास जातों बाबा. "

" असा नवऱ्यामुलासारखा नटून ? अरे, परमार्थाकरतां कीर्तन ना ? संसारांत अलिप्त रहावें, हें सांगणार ना तुम्ही ? मग हा थाटमाट आणि नखरा कशासाठीं ? काढ, काढ तें सगळें. "

बाबांनीं दासगणूंच्या अंगावरील अंगरखा, पगडी काढून घेतली. उपरणें तेवढें अंगावर घ्यावयास दिलें आणि म्हणाले " जा. आजपासून असेंच करीत जा कीर्तन. "

तेव्हांपासून श्रीदासगणू महाराज उघड्या अंगानें अंगावर एक उपरणें तेवढें घेऊन कीर्तन करूं लागले. मोठमोठ्या संस्थानिकांच्या दरबारांतून केलेलीं कीर्तनेंहि त्यांनीं अशींच उघड्या अंगानें केलीं. दरबारी शिस्तीकरतां आपली पद्धति सोडली नाहीं. राजे लोकांनींहि महाराजांना त्या बाबतींत छेडलें नाहीं. कारण 'निःस्पृहस्य तृणं जगत्' या नियमाशीं ते अपरिचित नव्हते. नारदाच्या गादीला शोभण्यासारखीच ही विरागी वेशभूषा आहे आणि दासगणूंच्या कीर्तनप्रसंगींच्या एकंदर रंगाशीं ती सुसंगतहि आहे. कीर्तनामध्यें जें मनांत तेंच बाहेर. मधें आडपडदा म्हणून कशाचा नाहीं. बोलणें स्पष्ट. एक घाव दोन तुकडे अशा स्वरूपाचें आणि लपवाछपवीचें म्हणून कांहींच नाहीं. मग अंगरखा पागोट्याचा हा डामडौल कशाला ? कीर्तनाला उभे राहण्याची त्यांची स्थिर पद्धतहि निष्ठावंत भावाची द्योतक आहे. भाव स्थिर हवा.

स्थिरपणा, निस्पृहपणा आणि वैराग्य हींच परमार्थाचीं मुख्य लक्षणें. त्या दृष्टीनें कीर्तनाची ही पद्धति अत्यंत उचित अशी वाटते.

### १४. मराठवाड्यांत आगमन :

'नांदेडास जा' असें सांगितलें असल्यानें आणि संतचरित्रें लिहिणें हें बाबांच्या आज्ञेप्रमाणें पतकरलेलें काम करावयाचें असल्यानें श्रीदासगणू महाराज हे या काळांत मुख्यतः शिरडीस राहात असले तरी मधून मधून कांहीं दिवस मराठवाड्यांत जाऊन येत असत. या दोन चार वर्षांच्या काळांत मराठवाड्यांतील सर्व भाग व कांहीं तैलंगणी मुलूख त्यांनीं आपल्या पायाखालीं घातला. त्यांचे पूर्वायुष्यांतील शिक्षक, पण आतां मित्र बनलेले श्री. बळवंतराव खेडकर या नांवाचे एक गृहस्थ नांदेडास राहात असत. हे गृहस्थ मोठे साक्षेपी होते. त्यांच्या चौकस-पणाचा फायदा श्रीदासगणू महाराजांना बराच झाला. कांहीं संतचरित्र-विषयक माहिती बळवंतरावांनीं श्रीदासगणूंना वेळोवेळीं दिली आहे. आपल्या ग्रंथांतून महाराजांनीं त्यांचा तसा उल्लेखहि केला आहे. 'संतकथामृता' च्या त्रेपन्नाव्या अध्यायांत—

> "हें शहासाहेब चरित्रामृत । पाजिलें मजशीं नांदेडांत ।
> माझ्या विद्यागुरूनें सत्य । बळवंतराव खेडकरें ॥" १०१

असा त्यांचा उल्लेख केला आहे. आरंभीं महाराजांचा मुक्काम नांदेडास या खेडकरांकडेच असे. या काळांत ते कीर्तनेंहि करीत. गाण्याचें अंगही फारसें नव्हतें. साथीदार कोणीहि नसे. आवाज मोठा असला तरी किंचित् घोगरा असे; पण महाराजांचा ताल पक्का. आवाजाला एक तऱ्हेचा जिव्हाळा आणि अंतरींच्या निष्ठेमुळें बोलण्याला एकप्रकारची गोडी प्राप्त झालेली. त्यामुळें त्यांचीं कीर्तनें या वेळींहि लोकप्रियच होतीं. याशिवाय आख्यानांतील संविधानकाची वैशिष्ट्यपूर्ण मांडणी आणि काव्यरचनेंतील नावीन्य यांचेंहि फार आकर्षण असे. या कारणानें एकट्यानें कीर्तन करीत असूनहि कीर्तन-रंगांत तशी उणीव

पडली नाहीं. त्यांच्या आख्यानाचें वैशिष्ट्यच असें आहे कीं, जरा बरें बोलतां येणारा कोणीहि कीर्तनकार गाण्याचें अंग नसूनहि या आख्यानांच्या आधारें कीर्तनरंगांत रसाळपणा आणूं शकतो. कीर्तनाची बिदागी कांहींहि घ्यावयाची नाहीं, असा नियम असल्यानें तोहि कीर्तनकाराविषयींचा लोकांच्या मनांतील आदर वाढविण्यास कारणीभूत होत असे. श्रीदासगणू महाराजांची ओळख या कारणानें या मराठवाडा प्रांतांत पुष्कळच होऊं लागली. त्यांच्याविषयींचा सद्भाव लोकांच्या मनांत वाढूं लागला आणि श्री. पुंडलिकराव नांदेडकर वकील यांच्यासारख्या सद्गृहस्थांनीं त्यांचें शिष्यत्वहि पतकरलें.

## १५. निस्पृहता :

कीर्तनाची बिदागी न घेण्याचें हें व्रत ते किती निष्ठेनें पाळीत, तें इंदुरास घडलेल्या एका प्रसंगावरून सहज ध्यानीं येण्यासारखें आहे. इंदूर येथील श्री. रघुनाथ बळवंत अळेकर या सद्गृहस्थांनीं स्वतः अनुभवलेला तो प्रसंग त्यांच्याच शब्दांत पुढें देत आहे.

" शके १८४७ मध्यें श्रावणमास कीर्तनासाठीं श्रीमंत सरकार सवाई तुकोजीराव होळकर यांजकडून ह. भ. प. दासगणू महाराजांना बोलाविलें होतें. महिनाभर ' यशवंतनिवास ' राजवाड्यांत कीर्तन होत असे. गुरूभक्तिपरायण श्री. दाभूअण्णा कैलासवासी झालेले असल्यामुळें व कै. किसनराव यास इंदुरास येण्यास विलंब असल्यानें महाराजांचे कीर्तनास मागें साथ करण्याचें सौभाग्य प्रथमच प्राप्त झाल्यामुळें प्रत्यक्ष पाहिलेली हकीगत पुढें देत आहे.

कीर्तनाची वेळ दुपारीं चार ते सहापर्यंत असे. कीर्तनश्रवणास महाराजासाहेबांच्या मातोश्री, दोघी महाराणीसाहेब आणि प्रसंगीं युवराज यशवंतराव होळकर व राजकन्याहि असत. याशिवाय कांहीं मानकरी मंडळी निमंत्रित असत. महाराजांचें भक्तिरसानें ओथंबलेलें कीर्तन ऐकतांना स्वतः महाराजांचे व इतर श्रोत्यांचे डोळे प्रेमाश्रूनें

डबडबलेले दृष्टीस पडत. श्रावण महिनाभर याप्रमाणें कीर्तन झाल्यावर शेवटीं समाप्तीचे कीर्तनाचा दिवस उगवला. श्रीदासगणू महाराजांचा निस्पृहपणा व कीर्तनाबद्दल कांहीं न घेण्याचा नियम सर्वश्रुत होताच. राजवाड्यांत तर बिदागीची तयारी सुरू होती. येथील कांहीं प्रतिष्ठित मंडळी ज्यांचा संबंध राजघराण्याशीं होता, महाराजासाहेबांचे स्वभावाशीं जे पूर्ण परिचित होते व जे श्रीदासगणू महाराजांचे भक्त होते, त्यांनीं येऊन सांगितलें कीं, 'आपणांस कांहीं बिदागी जर श्रीमंतांनीं दिली, तर आपण तिचा अव्हेर करूं नये. कारण तसें केल्यानें श्रीमंतांस राग येण्याचा पूर्ण संभव आहे.' यावर महाराजांनीं त्या सर्वांचें समाधान केलें व आश्वासिलें कीं, 'तुमच्या राजांचा अपमान न होऊं देतां माझा नियम पाळण्याची खबरदारी घेतली जाईल.' कीर्तनाची वेळ झाली. समाप्तीचा दिवस असल्यानें इतर बरीच बडी बडी मंडळी आमंत्रित होती. बिदागीदाखल एका सोन्याच्या थाळींत सोन्याच्या मोहरा व चांदीचे ताटांत रुपये भरून देवापुढें ठेविले होते. शुभचिंतक लोकांचे मनांत आजचा प्रसंग कसा निभावतो, याबद्दल एक प्रकारची धास्ती व कुतूहल होतें. आख्यान संपलें. समारोप सुरू झाला. समारोपादाखल श्रीदासगणू महाराजांनीं जें भाषण केलें, त्यामुळें श्रीमंत होळकर सरकार व इतर श्रोते तर थक्क झालेच. पण वाचकवर्गहि तें भाषण वाचून मंत्रमुग्ध झाल्याशिवाय राहणार नाहीं.

श्रीदासगणू महाराज म्हणाले, "श्रीमंत होळकर सरकारांचा असा लौकिक प्रसिद्ध आहे कीं कोणी विद्यार्थी नवीन विद्या शिकण्याच्या इच्छेनें श्रीमंताकडे मदत मागण्यास गेला, तर श्रीमंताची विद्याप्रियता त्यास शिष्यवृत्ति देण्यास भाग पाडते. असे अनेक विद्यार्थी श्रीमंतांचे साहाय्यानें विद्या संपादन करून मोठेपणास प्राप्त झाले आहेत. मीहि एक विद्यार्थी आहे आणि श्रीमंतांचेकडे शिष्यवृत्ति मागणार आहे. माझी खात्री आहे कीं, श्रीमंत उदार अंतःकरणानें मला ती देतील." हें वाक्य ऐकतांच सर्वांचे मनांत विचारांचें काहूर माजलें. कोणास वाटलें

कीं, महाराज कांहीं तरी निराळें का होईना पण मागणार व घेणार. कोणास वाटलें कीं, बिदागी पाहून मोह सुटलाच. इत्यादि इत्यादि. पण हें विचारांचें वादळ श्रीदासगणू महाराजांच्या पुढील वाक्यानें एका क्षणांत पार मावळलें. श्रीमहाराज म्हणाले, "मी परमार्थ कॉलेजांत प्रवेश चाहतों आहे. या कॉलेजांत निर्लोभतेची शिष्यवृत्ति लागते. ती श्रीमंतांनीं मला देऊन आपला नांवलौकिक राखावा. हीच माझी श्रीमंतांना नम्र मागणी आहे."

झालें. कीर्तन संपलें. आरती झाली. खिरापत वांटली गेली. बिदागीची ताटें जशीं बाहेर आलीं, तशीं आंत गेलीं. श्रीमंतांसह सर्व श्रोते जणुं मंत्रमुग्ध झाले होते. सर्वांच्या अंतःकरणांत श्रीदासगणू महाराजाविषयीं एक आदराचीच भावना भरून राहिली होती. कांहींना ती बोलून दाखविल्याविना राहवे ना. "मी मी म्हणविणारांना मोह पाडणारी विपुल संपत्ति समोर आली असतांना तिचा लोभ मनास न शिवूं देतां अत्यंत सौजन्यानें व निगर्वीपणानें संपत्तीला नाकारण्याचें अद्वितीय उदाहरण आज प्रथमच दृष्टीस पडलें." असें ते म्हणाले.

आणखी एक असाच प्रसंग या वेळींच घडला आहे. देवास मोठ्या पातीचे राजे श्रीमंत तुकोजीराव पवार हे कृष्णभक्त असत. जन्माष्टमीचा उत्सव ते मोठ्या प्रमाणांत करीत. सात दिवस नामसप्ताह असे. राजेसाहेब रात्रीं दोन तास उभे राहून नामसप्ताहांत पहारा करीत.

याच वर्षीं म्हणजे शके १८४७ मध्यें श्रीदासगणू महाराज इंदूर मुक्कामीं असतांना एक दिवस तरी कीर्तनास येण्यासाठीं देवासचें आग्रहाचें आमंत्रण आलें. साथीदार म्हणून आम्ही (श्री आळेकरादि लोक) बरोबर गेलों होतों. रात्रीं कीर्तन झालें. कीर्तन अवर्णनीय प्रेमरसानें ओथंबलेलें असल्यानें सर्वांस विशेषेंकरून राजेसाहेबांस फारच आवडलें. दुसरे दिवशीं सकाळीं निघतांना राजेसाहेबांनीं चांदीचे तबकांत एकशें एक रुपये भरून श्रीदासगणू महाराजांस दिले. कीर्तनाबद्दल कांहीं न घेण्याचा नियम महाराजांनीं श्रीमंतास सांगितला.

त्यावर राजेसाहेब म्हणाले, ‘ हा गोपाळकृष्णाचा प्रसाद आहे. आपण याचा अव्हेर करूं नये. ’ हें ऐकतांच महाराजांनीं ती रक्कम उचलली व तेथें जी ब्राह्मणमंडळी जमली होती, त्यांस वांटण्यास आरंभ केला. कोणी घेईनात. तेव्हां श्रीदासगणू महाराज म्हणाले, “ गोपाळकृष्णाच्या प्रसादाला कोणी नाहीं म्हणूं नये. ” राजेसाहेबांस कांहीं बोलतां येईना. कारण ते त्यांच्याच शब्दांत पकडले गेले होते. श्रीदासगणूमहाराजांच्या निस्पृहतेचें सर्वांनाच फार आश्चर्य वाटलें.

## १६. संतचरित्राचें लेखन :

संतचरित्राची माहिती गोळा करीत असतांना श्रीदासगणू महाराज हे गांवोगांव प्रवास करीत, हें वर लिहिलेंच आहे. त्या वेळीं त्यांची पद्धति पुढीलप्रमाणें असे. प्रातःर्विधी उरकून तास दीड तास स्नानसंध्या व इतर जपजाप्य यांत घालवावा. मग गांवांतील निरनिराळ्या थरांतील लोकांच्या प्रत्यक्ष जाऊन गांठीभेटी घ्याव्या. त्यांना या गांवामध्यें कोणी संत, सत्पुरुष होऊन गेले कीं काय, याची माहिती विचारावी. त्या संतांचे कोणी वंशज, वारस वा मठाधिपति असल्यास त्यांची भेट घ्यावी. पाहावयास मिळतील तेवढे सर्व कागदपत्र काळजीपूर्वक पाहून नोंद करावी. त्या संताविषयीं पूर्वी होऊन गेलेले वा त्यानें स्वतः रचलेलें कांहीं वाङ्मय असल्यास त्याचें अवलोकन करावें आणि देश, काल, परिस्थिति या सर्वांचा विचार सतत डोळ्यापुढें ठेऊन संतचरित्र ओवीबद्ध करावें. या कारणामुळें श्रीदासगणू महाराजांनीं लिहिलेल्या चरित्रांना एक प्रकारची ऐतिहासिक प्रतिष्ठाहि लाभलेली आहे. श्रीदासगणू महा-राजांच्या या लिखाणाचा जुन्या पिढींतील कांहीं विद्वान संशोधकांनीं अधिकृत म्हणून आधार घेतला आहे. महाराष्ट्र सारस्वतकार श्री. विना-यकराव भावे, महाराष्ट्रभूषण श्री. आजगांवकर, ह. भ. प. पांगारकर इत्यादींनीं आपापल्या ग्रंथांतून निरनिराळ्या संतांचें वर्णन करीत असतांना श्रीमहाराजांच्या ग्रंथाचे आधार कांहीं ठिकाणीं घेतलेले

आढळतात. महिपतीशीं तुलना करतांना साहित्यसम्राट् न. चिं. केळकर यांनीं लोकव्यवहाराचें ज्ञान व चतुरस्रपणा हे गुण श्रीदासगणूंच्या काव्यांत अधिक आहेत, असें उल्लेखिलें तें यामुळेंच. हा सर्व प्रवास करीत असतांना दासगणूंना बराच त्रास सहन करावा लागे. जेथें कोठें ओळख असे, तेथें ठीक. पण ओळख नसलेल्या गांवीं फार कष्ट होत. निवाराहि धड न मिळाल्यानें जवळील सामानसुमान, पैसेअडके चोरीस जात आणि त्यामुळें अत्यंत अडचण उत्पन्न होई. अशा रीतीच्या नुकसानीची त्यांनीं एकदां ईश्वराकडेच आगळीक केली आहे.

**ओवी**

> " संतचरित्रें मिळविण्याशीं । मी आलों अति हर्षी ।
> नुकसान माझें व्योमकेशी । मध्यंतरीं कां केलें ? ।
> तुझ्यावरी ही मोडकी काठी । आली असे कीं जगजेठी ।
> द्रव्य माझें उठाउठी । नेलें असे तस्करानें ।
> तुझ्या मनीं येईल जैसें । तैसें तैसें घडतसे ।
> माझी लाज तुला असे । नको उपेक्षा माझी करूं ॥ "

भक्तिलीलामृत ४१

जवळ पैसाअडका अगदीं बेताचा, त्याचीहि अशी वाट लागली म्हणजे कसा प्रसंग ओढवत असेल, त्याची कल्पनाच केलेली बरी. स्वयंपाक वगैरे ते बहुधा हातानेंच बनवीत. भाजी मिळाली तर ठीक, नाहीं तर नुसतें भातपिठलें उकडून खावें, अशी पद्धत असे. वेष अगदीं साधा. अंगामध्यें बंडी, डोक्यास पांढरा रुमाल, अंगावर साधें उपरणें, जरा आखुडच असें नेसलेलें धोतर आणि खांद्यावर पडशी. यामुळें एकादा पांथस्थ भिक्षुक समजून क्वचित् ठिकाणीं अवहेलनाहि होई. निवाऱ्यास जागा वा स्वयंपाकास भांडींहि मिळत नसत. भुसावळ येथें घडलेली गोष्ट सांगण्यासारखी आहे. शहरामध्यें ओळख कोणाचीच नव्हती. मंदिरेंहि त्या दृष्टीनें पांथस्थांच्या हक्काचीं निवासस्थानें समजलीं गेलीं पाहिजेत. पण मंदिराच्या चालकांना मंदिर हें स्वतःचेंच घर वाटतें, असा तेथें अनुभव आला.

एका राममंदिरामध्यें श्रीदासगणू महाराज जाऊन उतरले. बरोबर दोन माणसेंहि होतीं. जागा मोठ्या मिनतवारीनें पडवीच्या एका कोपऱ्यांत मिळाली, परंतु इतर कोणतीहि मदत करण्यास मंदिराची व्यवस्थापकबाई मुळींच तयार होईना; उलट सामान्य माणुसकीलाहि न शोभणारा तुसडेपणा तिनें दाखविला. श्रीदासगणू महाराजांना या गोष्टीचें फार दुःख झालें. जीं मंदिरें आल्यागेल्या अतिथिअभ्यागताची विश्रांतिस्थानें व्हावयाचीं, अडल्यापडल्यावेळीं मदत करणें हें ज्यांचें कर्तव्य, त्याकरितांच केवळ भारतीय संस्कृतीमध्यें या मंदिरांचें महत्त्व. त्याचीच एक व्यवस्थापिका या रीतीचें वर्तन करतें, याचा त्यांना मोठा खेद वाटला. त्यांनीं जवळील होते ते सर्व पैसे खर्च करून बाजारांतून पंचवीस तीस रुपयांचीं नवीं भांडीं आणलीं आणि तीं त्या व्यवस्थापक बाईच्या स्वाधीन करून नमस्कारपूर्वक विनविलें कीं, " बाई, यापुढें तरी कोणाला अडल्या वेळीं नाहीं म्हणून झिडकारूं नका. रामराय तुम्हांला सद्बुद्धि देवो. " हें पाहून मग बाईंना फार लाजल्यासारखें वाटलें.

अशा रीतीचे अनुभव अगदींच थोडे येत, असें नाहीं; परंतु महाराजांनीं आपलें व्रत कधीं सोडलें नाहीं. साईबाबांची आज्ञा त्यांना प्राणापलीकडे प्रिय होती आणि त्यासाठीं वाटेल तें करण्याची त्यांच्या मनाची सिद्धता असे. पुढें पुढें अर्थातच ही परिस्थिति पार पालटली. लोक श्रीदासगणू महाराजांना मुद्दाम आदरानें बोलावून आपल्या गांवीं नेऊं लागले. शेगांव येथील प्रसिद्ध सत्पुरुष श्रीगजानन महाराज यांच्या चरित्रलेखनप्रसंगीं या गोष्टीचा चांगला अनुभव आला. श्रीगजानन महाराज संस्थानचे मुख्य व्यवस्थापक श्री. रामचंद्र कृष्णाजी पाटील हे श्रीगजानन महाराजांचें ओवीबद्ध चरित्र लिहवून घेण्यासाठीं श्रीदासगणूंना शेगांवास नेण्याच्या उद्देशानें पंढरपुरास आले. मोठ्या आग्रहानें व प्रेमानें शेगांवास चलण्याची विनंति केली. अगदीं धरणें धरलें. त्या वेळीं १९३९ सालीं श्रीदासगणू महाराज शेगांवास प्रथम

गेले. शेगांवकर मंडळींनीं स्टेशनवर फारच मोठें स्वागत केलें. शेंकडों लोक स्वागताकरितां उभे होते. एक उत्तम रथ श्रृंगारून तयार केला होता आणि त्यांतून महाराजांना समारंभानें मिरवीत नेण्याची त्यांची इच्छा होती. महाराजांनीं ती गोष्ट मान्य केली नाहीं, तें निराळें. परंतु केलेल्या तपश्चर्येला व्यावहारिकरीत्या का होईना पण कसें आदराचें स्वरूप प्राप्त होतें, याचें प्रतीक म्हणून पुढें घडलेली ही गोष्ट प्रकरणानुरोधानें मी येथेंच सांगितली.

## १७. परोपकारः पुण्याय :

अडचणींत सांपडलेल्या माणसाला मदत न करणें हें पातक आहे असें महाराज मानतात, त्यामुळें अडीअडचणींत असलेल्या माणसांना आपणांकडून होईल ती मदत करणें, हा श्रीदासगणू महाराजांचा एक स्वभावविशेष झाला आहे. मनमाडच्या स्टेशनवर नांदेडकडे जाणाऱ्या गाडीची वाट पाहात आम्ही बसलों होतों. महाराज फर्स्टक्लास वेटिंग रूमच्या बाहेर बाकावर बसले होते. इंग्रजी वेशभूषा केलेले एक गृहस्थ महाराजांच्याकडे न्याहाळून निरखून पाहात व पुन्हा वेटिंग रूममध्यें जात. कांहीं तरी निमित्तानें बाहेर येऊन त्यांनीं दोन तीनदां याप्रमाणें केलें. शेवटीं ओळख पटली वाटतें. त्यांनीं लांबूनच पण अगदीं वाकून नम्रपणें नमस्कार केला व विचारलें, “ मला ओळखलेंत का महाराज ? दहा बारा वर्षांपूर्वीं कीर्तन संपल्यानंतर ज्याला आपण पन्नास रुपयांची मदत केली तो मी. मी आतां मामलेदार झालों आहे. आपल्याच कृपेमुळें हा योग आला. ”

वस्तुस्थिति अशी होती कीं, जातीनें महार असलेला एक विद्यार्थी परीक्षेची फी भरण्याच्या अडचणींत होता. अनेक ठिकाणीं प्रयत्न करूनहि त्यास मदत मिळाली नाहीं. शेवटीं कीर्तनास निघालेल्या श्रीदासगणूंना त्यानें दारांतच अडवून कांहीं मदत देण्याविषयीं विनंति केली. ती मान्य करून महाराजांनीं कीर्तनामध्यें जमलेली आरती त्यास

नंतर देऊन टाकली. हाच गृहस्थ पुढें मनमाडच्या स्टेशनवर भेटला. महाराजांनाहि त्याची ओळख पटली. मोठ्या प्रेमानें त्यांनीं त्यास जवळ बसवून घेतलें. गृहस्थ संकोचत होता. तेव्हां महाराज म्हणाले, "अरे, मी प्रवासांत आहे. आगगाडींतून जातांना किती सोवळें पाळणार! संकोचूं नको." मुलाबाळासंबंधीं आस्थेनें विचारपूस करून त्यांनीं मामलेदारास निरोप दिला. कृतज्ञतापूर्वक नमस्कार करून ते गृहस्थहि त्यांच्या गाडीची वेळ झाल्यामुळें निघून गेले.

मोंगलाईत प्रवास करतांना एका खेडेगांवीं मुक्काम होता. त्या वेळीं त्या भागांत कॉलऱ्याची तुरळक साथ होती. एका झोपडीमध्यें एक मराठा शेतकऱ्याचें जोडपें साथींत सांपडून मरून पडलें होतें. बहिर्दिशेहून परत येत असतांना महाराजांनीं तो प्रकार पाहिला. पांच सहा वर्षांची एक लहान पोर प्रेताच्या अंगावर पडून 'आई ऊठ, बोल ग' असा आक्रोश करतांना त्यांनीं पाहिली. श्रीदासगणू महाराज जवळ गेले व त्यांनीं त्या मुलीस विचारलें 'काय झालं ग बाळ?'

'माझी आई कवाची निजली हाय मामा, हलविली तरी बोलतच नाय.' महाराजांना कींव आली. त्यांनीं त्या मुलीला जवळ घेऊन कुरवाळलें. तें दीन लेकरूंहि मामा म्हणून त्यांना बिलगलें. महाराजांनीं आपल्या मंडळीकरवीं त्या अनाथ प्रेतांची व्यवस्था लावली. जनाबाईच्या आख्यानांतील जनीच्या आईवडिलांच्या मृत्यूचा हृदय-द्रावक प्रसंग वर्णितांना महाराजांच्या डोळ्यापुढें या पोरीच्या आई-बापांचा मृत्यु असावा असें वाटतें. मुक्काम हालतांना मुलगी मागें राहीना. रडूं लागली. तिला महाराजांचा लळा लागला होता. अर्थात् तिला बरोबर घेणें महाराजांना भाग झालें. पांच सहा महिने ती पोर—ताई तिचें नांव—महाराजांच्याबरोबरच होती. पुढें नांदेडजवळील एका खेड्यांतील पाटलाला महाराजांनीं त्या मुलीचा संभाळ करण्यास सांगितलें. पाटलास मूल नव्हतें. म्हणून तो महाराजांना आपल्या गांवीं आग्रहानें घेऊन गेला होता. पुढें योगायोगानें त्या पाटलास मुलगा झाला. महाराजांची

कृपा म्हणून ही चांगल्या पायगुणाची मुलगी आपल्या घरीं आली, असें पाटलास वाटलें. त्यामुळें त्या अनाथ मुलीचा—ताईचा—त्यानें प्रेमानें प्रतिपाळ करून पुढें तिचें लग्नकार्यहि करून दिलें.

आज सिद्धार्थ कॉलेजांत सायन्सचे प्रमुख प्राध्यापक असलेले श्री. गोविंद रामचंद्र गोगटे D. Sc. हेही महाराजांच्याविषयीं कृतज्ञ आहेत. महाराजांचें श्री. गोगटे यांच्यावर फार प्रेम आहे. भेट झाली म्हणजे तासन्‌तास ते एकमेकांशीं जिव्हाळ्यानें बोलत असतात. श्री. गोविंद-रावांची मूळची घरची अगदीं गरिबी होती. वडील लहानपणींच निवर्तलेले व आजोबा शाळेंत शिक्षक. कॉलेजमधील शिक्षण श्री. गोविंदरावांना आपल्या हुशारीवर व अभ्यासूपणावर फ्रीशिप्स व स्कॉलरशिप्स मिळवून पुरें करावें लागलें. त्यांच्या अडचणीच्या वेळीं श्रीदासगणू महाराजांनीं त्यांना अनेक प्रकारें हस्तें परहस्तें साहाय्य केलें व करविलें. श्रीगोविंदरावांच्या ठिकाणीं यामुळेंच महाराजांच्याविषयीं विशेष प्रेमादर आहे. उत्सवविशेषीं आपणांसहि कांहीं सेवा लाभावी, अशी त्यांची उत्कट इच्छा असते व ती पूर्णहि होते.

कदाचित् कुरुंदवाडास भेटलेल्या रक्तपिती सज्जनामुळें असेल, पण श्रीदासगणू महाराजांच्या परोपकारी स्वभावाला एखाद्या व्रताचें वा निष्ठेचें स्वरूप आलेलें आहे असें दिसतें.

## १८. भक्तिलीलामृताचें प्रकाशन :

नोकरी सोडल्यानंतर कांहीं दिवसांनीं श्रीदासगणू महाराजांनीं आपला ‘ भक्तिलीलामृत ’ हा ग्रंथ पुरा केला. श्री. नानासाहेब चांदोरकर यांनीं तो छापण्यास साहाय्य करण्याचें मान्य केलें. श्रीदासगणू महाराज हे या कामासाठीं पुण्यास येऊन राहिले होते. पुण्यास ते एका घरगुती खानावळींत जेवीत व श्री. वामन मोरेश्वर पोतदार यांचेकडे बसत उठत. येथेंच इतिहासाचार्य श्री. वि. का. राजवाडे यांचा आणि महाराजांचा परिचय झाला. राजवाडेहि पोतदारांचेकडे रोजच्या बैठकींत येणारे होते.

अर्थात् दोघांची भेट होणें अपरिहार्य होतें. परिचयाचा आरंभ कांहीं मोठा चांगलेपणानें झाला नाहीं. राजवाड्यांचा फटकळपणा प्रसिद्धच आहे. श्रीदासगणूंच्या पोलिसांतील (आतां सोडलेल्या) नोकरीस उद्देशून राजवाडे उसळून जाऊन वाटेल तें बोलले. दासगणूंच्या संत-चरित्रात्मक लिखाणाची तर त्यांनीं फारच टर केली. ग्राम्य शब्दांत शिव्या देण्यासहि कमी केलें नाहीं. ते म्हणत, "तुम्ही मातींत घातलंत राष्ट्राला. कांहीं तरी भाकडकथा वर्णन करतां. लोक दुबळे होतात यामुळें. तेलाचें पाणी, पाण्याचें तूप सगळे कागद या पायीं खर्च करावयाचे."

महाराज आरंभीं कांहीं बोलले नाहींत. पण जरा परिचय वाढल्यावर म्हणाले, "अहो, तुमचें पाहूनच शिकलों आम्ही. सुतानें स्वर्गास जाण्याचें कौशल्य तुमचेंच अधिक. कल्पनेच्या वावड्या अधिक कोण उडवतं? तुम्ही संशोधक तरी काय दिवे लावतां? सगळे वाद गोष्ट सत्तावीस सालीं घडली कीं तीस सालीं घडली, पंचवीस तारीख खरी कीं अठ्ठावीस खरी, अमुक ऐतिहासिक व्यक्तीची उंची किती, यासाठींच ना? प्रसिद्ध तरवारीची लांबी तीन फूट दोन इंच होती का तीन फूट चार इंच होती, याकरितांच सगळा वादविवाद आणि श्रमाचा व वेळेचा अपव्यय. घडलेल्या घटनांच्या मागील ऐतिहासिक मूल्य असलेला हेतु कितीदां उघड करून सांगतां? सगळा भर परमार्थतः निरुपयोगी असलेल्या स्थलकालाच्या निश्चितीवर." या बोलण्यावर श्री. राजवाडे हंसले. पुढें दोघांचा चांगला स्नेह जमला. 'भक्तिलीलामृत' या ग्रंथाचीं प्रुफेंहि श्री. राजवाडे यांनीं तपासलीं आहेत. कारण प्रुफ तपासण्याच्या विशिष्ट पद्धतीची श्रीदासगणूंना माहिती असणें मुळींच शक्य नव्हतें. संतचरित्राच्या प्रकाशनाचें हें काम अशा रीतीनें श्री. राजवाड्यांच्या साहाय्यानें झालें. कै० वामन मोरेश्वर पोतदार श्री. राजवाड्यांच्या भेटीचा हा प्रसंग मोठ्या गमतीनें सांगत असत.

## १९. सच्छिष्य दामूअण्णा :

पुण्यास पोतदारांच्या येथें राहात असतांना श्रीदासगणू महाराजांचे प्रसिद्ध साथीदार, मानसपुत्र आणि पट्टशिष्य श्री. दामोदर वामन आठवले यांची व महाराजांची भेट झाली.

एक दिवस महाराज पोतदारांच्या माडीवर बसले असतांना खालीं रस्त्यावरून एक तेरा चौदा वर्षांचा, नाकींडोळीं सुरेख, असा ब्राह्मणाचा मुलगा माधुकरी मागत चालला होता. त्यास एका टांगेवाल्याचा धक्का लागला. मुलानें हातांतील माधुकरी खालीं ठेविली व तो रडूं लागला. श्रीदासगणूंना या गोष्टीचें फार नवल वाटलें. त्यांनीं त्या मुलाला वर बोलाविलें आणि विचारलें, 'कां रडतोस रे बाळ?'

"टांगेवाला मधुकरीला शिवला."

"मग रडायचें काय कारण?"

"ही विटाळलेली माधुकरी मी कशी खाऊं? आणि पुन्हा आतां मला मधुकरी कोण घालणार? जवळ जवळ सर्व घरें माझी मागून झालीं आहेत."

दासगणूंना मोठें कौतुक वाटलें. पुण्यासारख्या सुधारक शहरांत परिस्थितीनें नाडलेल्या मुलाच्या मनांतहि सोवळयाओवळयासंबंधीं एवढी निष्ठा जागृत असावी, हें विशेष आहे. श्रीदासगणू महाराज मुलाला म्हणाले, "हें पहा. आज येथेंच जेव आणि मी येथें आहे तोंपर्यंत माझ्याबरोबरच जेवत जा."

'भक्तिलीलामृत' ग्रंथाचे शेवटचे शेवटचे अध्याय पक्के करण्याचें काम या वेळीं चालूं होतें. श्रीदासगणू महाराजांना स्वतः लिहिण्या-पेक्षां दुसऱ्यानें लिहावें व आपण सांगावें, हें अधिक बरें वाटत असे. कोणा तरी स्नेहासोबत्याला पकडून ते लिहिण्याचें काम सांगत असत. हें ग्रंथलेखनाचें काम या मुलानें आवडीनें पत्करिलें. वेद-शाळेंत जात असल्यामुळें त्यास बराच वेळ मोकळा असे. अक्षर मोत्यासारखें वळणदार असून लिहिणेंहि त्वरित गतीचें असे. अर्थात्

श्रीदासगणू महाराजांचें लिखाणाचें काम फार सुकर झालें. एकमेकांशीं परिचय वाढून जिव्हाळाहि उत्पन्न झाला. अधिक चौकशी करतां समजलें कीं, हा मुलगा तसा निराधार आहे. याला वडील भाऊ आहे. त्याचें लाकूडकामाचें दुकान येथें पुण्यांतच आहे, पण तो याची फारशी काळजी वाहात नाहीं. या मुलाला आईहि आहे, पण ती तिकडे कोकणांत असते. हाच महिन्याकांठीं एक दोन रुपये तिला पाठवितो. मुलाचें हस्ताक्षर जसें सुंदर होतें, तसा आवाजहि खूप मोठा, उंच पहाडी असूनहि अत्यंत मधुर होता. महाराजांनीं रचलेल्या आख्यानां-तील पदें सुस्वर कंठानें म्हणत, कीर्तनाची साथ करण्यास त्याचा उपयोग होण्यासारखा होता. या सर्व गोष्टींचा विचार करून एक दिवस महाराजांनीं त्याला विचारलें,

" बाळ, तूं माझ्याजवळच नेहमीं राहशील का रे ? "

पायावर डोकें ठेवीत दामुअण्णा म्हणाले,

" दादा, आतां तुम्हांला सोडून दूर कोठें जाऊं ? दुसऱ्या कोणाचा आधार आहे मला ? "

दासगणूंनीं दामुअण्णांच्या थोरल्या बंधूस म्हणजे श्री. रामचंद्र वामन आठवले यांस बोलावून आणविलें व विचारलें, " तुमच्या या भावास आम्ही आमच्याबरोबर न्यावें काय ? " त्यांची आडकाठी असण्याचें कांहींहि कारण नव्हतें; उलट ती इष्टापत्तीच होती. वडील भावाची संमति मिळण्यास अर्थातच वेळ लागला नाहीं. श्रीदासगणूंच्या मनावर दामूअण्णांच्या या कौटुंबिक परिस्थितीचा फार खोल परिणाम झालेला होता. आप्तेष्टांचा मतलबीपणा आणि दामूअण्णांच्या स्वभावां-तील सरलता यांतील फरक त्यांना चांगलाच जाणवला. ' भक्तिसारामृत ' अध्याय पांचमध्यें एका चरित्राच्या प्रसंगानें दामूअण्णांच्या गृहस्थितीचें महाराजांनीं अन्योक्तीनें केलेलें वर्णन पाहण्यासारखें आहे.

**" जें गृहांचें आगर । बाई तुझें सासर । तेथें एक साचार । गृहस्थाश्रमी द्विज होता ॥ बाई तया द्विजाशीं । पुत्र चार निश्चयेंसी । शिकवून शाळेंत**

मुलासी । उदरभरण करितसे ॥ तो बिचारा मेल्यावर । तयाचे ते पुत्र चार । कलहाचा बाजार । भरून भांडूं लागले ॥ त्यामुळें त्यांची आई । दुःखित झाली असे पाही । धाकट्याला ते समयीं । नव्हता कुठें आधार ॥ तिघे होऊन शिरजोर । गेले निघून देशावर । वडिलार्जित घरदार । गहाळ टाकिले साहूकडे ॥ ज्येष्ठ होता नोकर । अवघा जीव कांतेवर । दुसरा श्वेत सर्प साचार । तिसरा बैसला दुकानीं ॥ ओम् भवति भिक्षांदेही । धाकटा करी ग्रामीं पाही । भिक्षा मागून आपली आई । पोषिली त्या बालकानें ॥ तिघे रावण कुंभकर्ण । गेले जननीस टाकून । धाकटा मुलगा बिभीषण । शोभला त्या चौघांमध्यें ॥ कधीं भिक्षा न मिळे पुरी । तैसाच उपाशी निजे घरीं । अवघा जीव मातेवरी । आई त्याचें दैवत ॥ एके दिनीं निरंकार । उपास घडला साचार । तें मातेस जोडून कर । करूं लागला विनवणी ॥ तूं माझी जन्मदात्री । माझ्यामुळें तुजप्रती । उपास होती निश्चिती । कसें देऊं दुःख तुला ॥ दयार्द्र मुलुख म्हणती घाट । भूतदयेचें केवळ पीठ । जो भरतखंडीं अति श्रेष्ठ । बहु पवित्र गोदेमुळें ॥ मी त्या देशांत जाऊन । तुझ्यासाठीं धाडीन धन । तुझें झालें म्हातारपण । गृह सोडणें उचित नव्हे ॥ असो एवंच तो पुत्र । मिळवून मातेची संमत । भिक्षुकी ती करण्याप्रत । गेला देशीं निघोनी ॥ जें जें कांहीं मिळेल धन । तो तें धाडी आईकारण । ती न जननी त्याचा प्राण । कोंकणासी राहिला ॥ आई मरतां यानेंच केलें । उत्तरकार्य तिचें भलें । इतरांनीं केलें काळें । गोष्ट खर्चाची म्हणून ॥ ती मातृसेवा त्याला फळली । पांडुरंगीं प्रीती जडली । मग कशाची वाण उरली । झाला भक्त हरीचा ॥ असो ते मातंगहृदयी सहोदर । मधुर बोलती वरच्यावर । परी विषानें तदंतर । भरून गेलें बहुवसी ॥ त्यांनीं धाकट्या बंधूंसी । थापा देऊन बहुवसी । फारकत ती एके दिशीं । मागून घेतली पहा गे ॥ ऐसे मतलबी गुहागर । –"

असो. वडील भावाची संमति मिळतांच दामूअण्णा त्यानंतर दासगणूंचे बरोबरच राहूं लागले.

पुण्यांतील काम पुढें संपलें. त्यावेळीं महाराजांच्या मनांत विचार आला कीं, 'मी फटिंग माणूस. गांवोगांव भटकणार. मला घर ना दार. या होतकरू मुलाला माझ्याजवळ ठेवन याचें नुकसान कशाला करावें ?

कोणा श्रीमंताच्या येथें ठेविलें, तर याचें हित तरी होईल. हा तेथें राहील. पूजाअर्चादि कामें करील. जेवील व अभ्यास करून मोठा होईल.' दासगणूंनीं आपले मित्र श्री. नानासाहेब चांदोरकर यांस विनविलें.

"या मुलाला तुमचेकडे ठेवा नानासाहेब. हा गुहागरचा. याला विचारणारें कोणी नाहीं. पुण्यांत मधुकरी मागतो. चांगला हुशार असून ऋग्वेदी कोंकणस्थ ब्राह्मण आहे, त्याला षोडशोपचार पूजाअर्चा करतां येते. संस्कृत पाठशाळेंत, वेदशाळेंत तो शिकत आहे. तुमच्याकडे राहूं द्या याला. पूजा करील, जेवील व शाळेचा अभ्यास करील."

श्रीदासगणू व श्री. नानासाहेब चांदोरकर यांचा संबंध अत्यंत जिव्हाळ्याचा होता. श्री. नानासाहेबहि अंतःकरणानें उदार, वृत्तीनें सात्त्विक व शक्य तो दुसऱ्याच्या उपयोगी पडावें, या स्वभावाचे असल्यानें श्रीदासगणूंच्या म्हणण्यास त्यांनीं तत्काल संमति दिली. त्याप्रमाणें श्री. दामोदर वामन आठवले हे श्री. नानासाहेबांकडे दीडदोन वर्षें होते. पुढें एकदां सर्व मंडळींना घेऊन श्री. नानासाहेब शिरडीस गेले. त्यांत दामूअण्णाहि होते. त्यांना पाहतांच श्रीसाईबाबा श्री. चांदोरकरांना म्हणाले, "अरे नाना, हें गणूचें पोरगें. तूं आपल्याबरोबर कशाला ठेवतोस? ज्याचीं पोरें त्यांनीं सांभाळावीं. तुला ही नसती पंचाईत कशाला? जाऊं दे ज्याचा मुलगा त्याच्याकडे." श्री. नानासाहेब हे पक्के गुरुभक्त. श्रीसाईबाबांचें वाक्य म्हणजे त्यांना वेदवाक्य. त्यांनीं तत्काल श्रीदासगणूंना पत्र लिहिलें का, "मी या मुलास ठेवून घेण्यास तयार नाहीं. तुम्ही आपला घेऊन जा. कारण श्रीसाईबाबांची मी दामूला सांभाळूं नये, अशी आज्ञा आहे." श्रीसाईबाबांची गांठ पडल्यावर श्रीदासगणू म्हणाले,

"बाबा, माझी सोय मी कशी तरी लावतो आहे. त्यांत या मुलाला कोठें संभाळत बसूं. श्री. नानासाहेब चांगले श्रीमंत आहेत. त्यांना याचें ओझें थोडेंच आहे? मग त्यांना नको म्हणून कां सांगितलेंत?"

" अरे गणू, तुझा मुलगा तो. नानाजवळ काय म्हणून? तुझा तूं संभाळ. आपली काळजी देवाला."

श्रीसाईबाबांची आज्ञा प्रमाण मानून श्रीदासगणू महाराजांनीं त्या मुलाला मग नेहमीं जवळ ठेविलें. श्रीदासगणूंचें काव्य सुंदर अक्षरांनीं लिहिणें, त्यांच्या कीर्तनांत पाठीमागें उभे राहून खड्या गोड आवाजांत साथ करणें, हे त्याचे आवडीचे व्यवसाय असत. हेच श्री. दामोदर वामन आठवले किंवा दामूआण्णा या नांवानें श्रीदासगणूंच्या सर्व परिवारांत प्रसिद्ध असलेले त्यांचे पुत्रनिर्विशेष पट्टशिष्य. या गुरुशिष्यांचे एकमेकांवर अत्यंत प्रेम बसलें. श्री. दामूआण्णांच्या मनामध्यें श्रीदासगणू महाराजाविषयीं अत्यंत कृतज्ञताबुद्धि होती. केवळ महाराजांच्यामुळेंच आपल्या परिस्थितींत हें इतकें अंतर पडलें, याची जाणीव श्री. दामूअण्णा कधींहि विसरले नाहींत. श्रीदासगणूंवर रचलेल्या एका अष्टकामध्यें त्यांनीं याविषयीं कृतज्ञतेचे उद्गार काढिले आहेत.

'समर्थ गणुदास तो गुरुपिताच म्या वंदिला' असें त्या अष्टकाचें ध्रुपद मोठें भावमधुर आहे. श्रीदासगणू महाराजांना श्री. दामूअण्णाविषयीं फारच जिव्हाळा वाटत असे; इतका कीं, या दोघांचें परस्पर कांहीं नातें नाहीं, हें शपथ वाहून सांगितलें तरी खरें वाटूं नये. आपल्या या भेटीचा वा संगमाचा उल्लेख करतांना 'शिष्यबोध' या श्री. दामूअण्णांना केलेल्या उपदेश प्रकरणामध्यें महाराज म्हणतात,

**" तूं परशराम क्षेत्रांतरीं। जन्म घेतला निर्धारीं। मी जन्मलों घाटावरी। पहा अंतर केवढें ॥ जैसें लवण समुद्राचें। बाळा आवडे डोंगरीचें। एके ठिकाणीं होती साचे। तैसा हाचि प्रकार ॥ तुशी न कोणाचा आधार। मीहि निपुत्रिक साचार। तुला मला परमेश्वर। करता झाला एके ठायीं ॥ तेल करडी कान्हाळ्याचें। वात हें अंग कापसाचें। कांहीं संबंध नसतां साचे। एके ठिकाणीं जाहलीं ॥ तैल वात एक्या ठायीं। जैं झाली परापायीं। तैं तदंगीं सामर्थ्य येई। प्रकाश परातें करावया ॥ "**

या ओवींत आलेल्या उपमेंतून जणूं आपल्या जीवनाचा हेतुच महाराज ध्वनीनें प्रगट करीत आहेत. पुढें ते म्हणतात.

"तूंच माझी म्हाताऱ्याची। काठी आहेस निश्चयेंसी। मजला कधीं गटाराची। गांठ तान्हुल्या घालूं नको॥ माझी भिस्त तुझ्यावर। येथून अवघी साचार। मी जो भक्तिरूप लाविला तरुवर। त्यास पाणी घालावें॥ मी जें जें करीन संपादन। तें तें आहे तुझेंच पूर्ण। माझ्यामागें तूंच जाण। आहेस त्याचा अधिकारी॥ तुझ्या बन्धा वाइटाची। मी काळजी वाहीन साची। आण वाहून विठ्ठलाची। करतों ऐसी प्रतिज्ञा॥ या उपदेशा-प्रमाणें। त्वां जगीं चालणें। हेंचि माझें मागणें। आहे आतां तुजलागीं॥ ज्या ज्या वेळीं तुला पोरा। रागें भरितो साजिरा। परि तिळ तिळ तुटतो खरा। जीव माझा ते काळीं॥ तूंच मजला आतां सुत। तूंच अवघें गणगोत। आतां माझी अवघी भिस्त। आहे तान्हुल्या तुजवरी॥"

या ओव्यांवरून श्रीदासगणूंच्या मनामध्यें श्री. दामूअण्णांच्याविषयीं कोणता भाव होता, तें स्पष्ट होतें. श्री. दामूअण्णांनींहि कधीं ह्या ह्या प्रेमभावास धक्का बसेल, असें वागण्याचें मनांतहि आणलें नाहीं. श्री. दामूअण्णांचा गोड पहाडी आवाज व सुंदर रूप पाहून एका प्रसिद्ध नाटककंपनींतील व्यवस्थापक त्यांचेकडे आले आणि म्हणाले, "कीर्तनांत काय मिळणार हो? आमच्या नाटकमंडळींत येतां का? बघा. आरंभींच महिना शंभर रुपये पगार देईन."

त्या काळीं नाटक फारच लोकप्रिय होतें. उत्तम आवाजाच्या आणि नीटस रूपाच्या माणसाला फार मोठी कीर्ति मिळत असे. श्री. दामू-अण्णांनीं होय म्हटलें असतें तर कोल्हटकर, गंधर्व, हुल्याळकर, भोसले यांच्याप्रमाणें उत्तम गायक नट म्हणून त्यांनींहि अपार लौकिक मिळविला असता. नाट्यानुकूलता त्यांच्यामध्यें होती. गुहागर येथें होणाऱ्या उत्सवांतून नाटकें केलीं जात. त्यांत श्री. दामूअण्णांनीं आपल्या बालवयांत बरींच कामें केलीं होतीं. तीं मोठीं सुरेख असत, असें पाहिलेले लोक सांगतात. अभिनयाची कला त्यांना चांगली अवगत होती. एकाद्याची नक्कल ते हुबेहुब वठवीत. त्यांनीं लिहिलेलें कान्होपात्रा नाटक संवाद व संविधानकाची मांडणी या दृष्टीनें फारच चांगलें आहे. नाटक अपूर्ण राहिलें आहे. पण नट होण्याइतपत अनुकूलता त्यांना

सर्व बाजूंनीं होती, हें दाखविण्यापुरताच येथें मी हा उल्लेख केला. असें असतांनाहि नाटकाच्या व्यवस्थापकांना त्यांनीं स्पष्ट शब्दांत नकार दिला. 'महाराजांच्याकडून मी स्वतः खटपट करून परवानगी काढतों,' असें म्हटल्यावरहि श्री. दामूअण्णा म्हणाले कीं, "दादांनीं कदाचित् परवानगी दिली, तरी मी नाटकांत येणार नाहीं. मला एके काळीं दोन प्रहरची भ्रांत होती. त्यावेळीं नाहीं तुम्हांपैकीं कोणी चौकशी केली ? आतां मी दादांचे पाय सोडून कोठेंहि जाणें शक्य नाहीं." अनेक प्रकारें प्रयत्न करूनहि व्यवस्थापकास या कामीं यश आलें नाहीं. अशा या निष्ठावंत वृत्तीमुळें सच्छिष्य दामूअण्णांविषयीं श्रीदासगणूमहाराजांना पोटच्या पोराप्रमाणें प्रेम वाटूं लागलें असल्यास काय नवल ?

श्री. दामूअण्णांच्या पहाडी पण मधुर कंठाचा कीर्तनाच्या दृष्टीनें फारच उपयोग झाला. महाराजांच्या कीर्तनाची ख्याति जी सर्वदूर दुमदुमली, त्याचें अर्धें तरी श्रेय श्री. दामूअण्णांचेंच होतें. श्रीदासगणू महाराज अद्यापहि आठवणीनें गहिंवरून म्हणतात, 'दामूमुळें मी पुढें आलों.' दामूअण्णा साथीला उभे राहिले व 'रामदास माय माझी' हे नमनाच्या पदाचे पहिलेंच चरण झांजेच्या अत्यंत गोड झंकाराबरोबर खड्या उंच आवाजांत मधुर स्वरानें त्यांच्या कंठांतून बाहेर पडूं लागलें कीं, चार चार पांच पांच हजारांचा विराट समुदाय ध्वनिक्षेपक नसलेल्या त्या काळांतहि मंत्रमुग्ध नागासारखा तटस्थ होऊन डोलूं लागे. श्रोत्यांची ही नादसमाधि तीन चार तासपर्यंत सतत टिके. 'हेंची दान दे गा देवा' म्हणून महाराजांचा हात जमिनीला लागला व आरती सुरू झाली म्हणजेच काय ते श्रोते भानावर येत. पद्य गात असतांना श्री. दामूअण्णा हे निराळे राहूंच शकत नसत. त्यांचे भावकोमल हृदय पद्याच्या अर्थाशीं इतकें तन्मय होऊन जात असें कीं, प्रत्यक्ष ती ती व्यक्तीच पुन्हां मूर्तरूपानें श्रोत्यांच्या पुढें प्रगट झाली आहे, असा भास व्हावा. करूणरसाचीं पद्यें गात असतांना गळ्यांतून निघणाऱ्या मधुर ध्वनीला नेत्रांतून वाहणारे अश्रुप्रवाह अशी विलक्षण आर्द्रता आणीत

कीं, श्रोतृवर्ग आपल्या भावना आवरूं शकत नसे. महाराजांनीं ‘ अरे, पुरे पुरे ’ म्हणून हात दाखवून सारखें रोखीत असावें; परंतु तल्लीन झालेल्या श्री. दामूअण्णांना किती वेळ तरी त्याची दादच लागत नसे. कीर्तनाचे तीन चार तास कोठें गेले हें उभयतांच्याहि आणि श्रोत्यांच्याहि लक्षांत येत नसे.

अनेक दुःखांनीं पोळले गेले असल्यानें श्री. दामूअण्णांचें हृदय इतकें कोमल झालें होतें कीं, फुलाचाहि स्पर्श त्यांना दुःसह व्हावा. करुण-रसामध्यें किंवा भक्तिरसामध्यें श्रीदासगणू महाराज नेहमीं अक्षरशः वाहात जात व श्रोत्यांनाहि वाहवीत. हृदयाची कोवळीक त्यांचेहि जवळ अतिशय; परंतु कांहीं प्रसंग असे येत कीं, त्यावेळीं श्रीदासगणू आणि श्री. दामूअण्णा यांच्यामध्यें अधिक कोवळ्या मनाचे कोण, याचा संभ्रम इतरांना व्हावा.

एकदां सर्व मंडळी जेवावयास बसली होती. त्या वेळीं एक भिकारी दाराशीं भिक्षा मागत उभा राहिला. त्याला झिडकारीत कोणी तरी म्हणाले,

“ अरे, जा. चालता हो. आतां कांहीं मिळावयाचें नाहीं. आमचीं जेवणें झाल्यावर ये. ”

भिकारी गयावया करीत होता, पण तो स्वयंव्यवस्थापक तें मानीना. अधिकच दटावूं लागला. भिकाऱ्याच्या केविलवाण्या बोलण्यानें श्री. दामूअण्णांच्या डोळ्यांत टचदिशीं पाणी आलें. ते म्हणाले,

“ भिकाऱ्याला परत पाठवूं नका रे. दोन प्रहरीं पोटामध्यें भडकलेली भूक घेऊन उन्हातान्हांतून वणवणत दाराशीं येणाऱ्याला हकलून देण्यांत काय दुःख आहे, त्याच्या मनाची स्थिति कशी विलक्षण हळवी होते, याची तुम्हांस कशी कल्पना येईल ? ‘ जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे. ’ ”

श्री. दामूअण्णांनीं अजून चित्राहुति घातल्या नव्हत्या. ते चटकन् उठले आणि आपलें भरलेलें पान त्यांनीं भिक्षेकऱ्याच्या पदरांत ओतलें.

असे कितीतरी प्रसंग आहेत. श्री. दामूअण्णांचा प्रेमळपणा आणि त्यांच्या पहाडी आवाजाचें अलौकिकत्व यांचा ठसा ज्यांचा ज्यांचा त्यांच्याशीं थोडा वेळहि सहवास घडला, त्यांच्या त्यांच्या अंतःकरणावर कधींहि न पुसला जाण्याइतका स्पष्ट उमटला आहे. श्री. दामूअण्णांच्या या तऱ्हेच्या आठवणी त्यांना पाहिलेली अनेक मंडळी अजूनहि गहिंवर-लेल्या भावानें सांगत असतात. श्री. दामूअण्णांच्या आवाजांतील गोडवा आणि पदें म्हणण्यांतील कुशलता यांचा थोडा तरी नमुना ज्यांच्या कीर्तनांतून आज अनुभवास येतो, ते श्री. तुकाराम केशव अजेगांवकर श्री. दामूअण्णांच्या आठवणी सांगतांना किती कृतज्ञतेनें बोलतात; तें पाहण्यासारखें आहे. श्री दामूअण्णांनींच श्री. अजेगांवकरांना अगदीं लहानपणापासून कीर्तनाचें व गाण्याचें शिक्षण देऊन तयार केलें आहे. श्री. दामूअण्णांचा स्वभाव पराकाष्ठेचा लाघवी, मनमोकळा व रसिक. माणूस आपलेसें करून घेण्याची हातोटी त्यांच्याजवळ फार दांडगी होती. अगदीं अपरिचित मनुष्यहि पहिल्याच भेटींत ते आपलासा करीत. १९२१ च्या सिंहस्थामध्यें श्रीदासगणू महाराज हे पंचवीस तीस मंडळीसह गोदावरीच्या प्रदक्षिणेस गेले होते. तेव्हां गांवोगांव उतर-ण्याच्या जागेची, भांड्याकुंड्याची, दूधदुभत्याची इत्यादि सर्व व्यवस्था श्री. दामूअण्णांच्या हातून जशी उत्तम होई, तशी इतरांना साधत नसे. गांवें बहुधा अनोळखीच असत; परंतु श्री. दामूअण्णांच्या भरदार देखण्या शरिराची, नीटनेटक्या पोशाखाची, चतुर वागण्याबोलण्याची आणि लाघवी स्वभावाची परक्या अनोळखी गांवांतहि तेव्हांच छाप पडे.

श्री. दामूअण्णांची स्मरणशक्तीहि मोठी तीव्र होती. श्री. दासगण महाराज हे शिघ्रकवि. ७०–८० कवितांचीं आख्यानें ते एकाद दुसऱ्या दिवसांत तयार करीत. तर हे त्यांचे पट्टशिष्य आख्यान पुरें होतांच त्याच दिवसाच्या कीर्तनांत तोंडपाठ म्हणून साथ करीत. साथीच्या वेळीं श्री. दामूअण्णांना पुस्तक कसें तें लागतच नसे.

श्री. दासगणूंच्या जीवनचरित्रांत श्री. दामूअण्णांचें स्थान फार

महत्त्वाचें आहे. मारुतीशिवाय रामायण, अर्जुनावांचून कृष्णचरित्र, कल्याणाविना रामदासांचें कार्य, तानाजीला वगळून छत्रपतींच्या पराक्रमाचा इतिहास जसा अपूर्ण वाटेल, त्याचप्रमाणें श्री. दामूअण्णा-व्यतिरिक्त श्रीदासगणूंच्या चरित्रांतहि उणीव भासेल. श्रीदासगणूंच्या काव्यरत्नाला श्री. दामूअण्णा हें सुवर्णकोंदण लाभलें होतें. श्री. दामू-अण्णांचेमुळेंच महाराजांच्या भक्तिरसाला विलक्षण आर्द्रता आली आणि कीर्तनाला अलौकिक रंग चढला. श्री. दासगणूंचा वात्सल्यमेघ श्री. दामूअण्णांच्या मस्तकावर अविरत वर्षला. उलट श्री. दामूअण्णांनींहि आपल्या आदरभावाचीं पुष्पें ओंजळी भर भरून श्रीदासगणू महाराजांच्या चरणीं नित्य वाहिलीं आहेत.

श्री. दामूअण्णांचें आतां लग्न करून द्यावें, असें श्रीदासगणू महाराजांनीं ठरविलें. महाराजांना यमूताई म्हणून एक मुलगी होती. आपली ही कन्या श्री. दामूअण्णांना अर्पण करावी, अशी कल्पना महाराजांच्या मनांत प्रथम आली, पण याचा सुगावा लागतांच श्री. दामूअण्णांना फार दुःख झालें. ‘ दादांना मी अजूनहि परका वाटतो काय ? मी त्यांना माझे प्रत्यक्ष जन्मदाते वडील मानतों. अशा स्थितींत यमूताईशीं विवाहाची कल्पना करणेंहि अनिष्ट आहे. ’ असे विचार त्यांच्या मनांत आले. आपलें कोणी ऐकणार नाहीं, असें वाटून ते पळून गेले. श्रीदासगणूंनीं त्यांना परत बोलावण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण ‘ यमुताईशीं लग्न करण्याचा आग्रह धरणार नाहीं. ’ असें वचन देत असाल तरच परत येतों, असें त्यांनीं निश्चयपूर्वक कळविलें. अर्थातच श्रीदासगणू महाराजांना आपला विचार सोडून द्यावा लागला. यमूताईचा विवाह पुढें पुणें येथील श्री. गणेशपंत फडके या सद्गृहस्थाशीं झाला. श्री. दामूअण्णांच्याकरतां म्हणून पुष्कळ मुली सांगून आल्या, त्यांतील सांगोल्याचे देवीडॉक्टर श्री. श्रीपादराव महाबळ यांची ज्येष्ठ कन्या कमळाबाई हीच वधू श्रीसाईबाबांच्या आज्ञेप्रमाणें नेमस्त झाली. श्री. श्रीपादराव महाबळ व श्रीदासगणू महाराज यांचा पूर्वीपासून



तुकाराम आजेगांवकर, पांडुरंग जोशी, दत्तोपंत कस्तुरे, पर्वतराव गोसावी, अनंत आठवले, श्री. तां. दादा, छगन बारटक्के,
प्रकाश मेहेंदळे, मुक्ता आठवले, मधु आजेगांवकर, शंकर आठवले, वामन मेहेंदळे (१९५३)

स्नेहभाव होताच. विवाहसमारंभ शिरडी येथें सन १९१४ च्या वैशाखांत झाला. नववधूचें नांव राधा असें ठेविलें.

श्री. दामूअण्णांना एकूण पांच अपत्यें झालीं, परंतु त्यांतील तीन अत्यंत अल्पवयांतच कालवश झालीं. श्रीदासगणूमहाराजांचा हा संपादित प्रपंच लेक, सून व नातवंडें यांच्या सहवासांत सुखानें चालला असतांना मध्येंच त्यावर काळाची कुऱ्हाड कोसळण्याची वेळ आली. श्री. दामूअण्णांना क्षयाची भावना झाली. श्रीदासगणूंनीं आपल्या या प्रिय शिष्यासाठीं हजारों रुपये खर्चले. वाई, महाबळेश्वर अशा हवेच्या ठिकाणीं ठेविलें. पुण्यामुंबईच्या प्रसिद्ध डॉक्टरांचे उपचार करवून प्रयत्नांची शिकस्त केली; परंतु दुखण्याचें पाऊल रेसभरहि मागें पडलें नाहीं.

शेवटीं पंढरपूर येथें घरांतील अंगणांतच एक लहानशी झोपडी बांधून त्यांत श्री. दामूअण्णांना ठेविलें. नानातऱ्हेचे उपचार चालूंच होते; परंतु रोगावर कोणाचीच मात चालली नाहीं. तेजस्वी चेहऱ्याचा हा धिप्पाड पुरुष अंथरुणापासून वेगळा ओळखतां येईनासा झाला होता. भोंवतालच्या सर्व मंडळींना काळजी वाटून अत्यंत दुःख होत असे. श्री. दामूअण्णा मात्र अत्यंत शांतस्थितींत असत. आपल्या भवितव्याची पूर्ण जाणीव असल्यामुळें त्यांच्या चित्तवृत्ति जणुं स्थिरावल्या होत्या. सर्व व्यवहार अगदीं शांतपणें चालले होते. कोणास बोलवावयाचें झालें तर तें सोपें जावें, ओरडावें लागूं नये यासाठीं घरामध्यें एक घंटा बांधून त्याची दोरी झोपडींत श्री. दामूअण्णांच्या हातांशीं टांगून ठेवलेली होती.

अशा स्थितींत शके १८४५ चा पौष महिना उजाडला. शुद्ध पक्षांतील तृतीया किंवा चतुर्थी असेल. एकाएकीं श्री. दामूअण्णांना वात झाल्यासारखें झालें. ते म्हणूं लागले, 'आणखी सहा सात दिवसांत मी जाणार. मंडळी दयालोभ ठेवा.' भोंवतालचे लोक धांवून आले. त्यांनीं डोळ्यांस पाणी वगैरे लावून श्री. दामूअण्णांना शुद्धीवर आणलें. पुढील

घोर प्रसंगाची तितकीशी कल्पना कोणासच आली नाहीं. महाराज मात्र अधिक गंभीर झाले होते. दशमीच्या दिवशीं रात्रीं एकाएकीं मोठ्यानें घंटानाद होऊं लागला. काय झालें म्हणून घाबरून सर्वजण धांवत आले. श्रीदासगणूमहाराजहि आले. श्री. दामूअण्णा अत्यंत अस्वस्थ झालेले होते. तोंडावाटे रक्ताची गुळणी येत होती. ती मोठ्या प्रयत्नानें आवरून धरून ते सारखे क्षीण स्वरांत 'दादा दादा' अशा हांका मारीत होते. महाराज पुढें येतांच अंगांत होतें नव्हतें तेवढें बळ एक करून श्री. दामूअण्णा पलंगावरून ताडदिशीं उठून बसले. दासगणूंच्या अत्यंत गंभीर झालेल्या मुद्रेकडे त्यांनीं एकवार आर्त दृष्टीनें पाहिलें. महाराजांनीं आपला हात शांतवन करण्याकरितां त्यांच्या मस्तकावरून फिरविला. श्री. दामूअण्णांनीं 'दादा' अशी गहिंवरून हांक मारिली आणि पायांवर ठेवण्यासाठीं डोकें जें खालीं वाकविलें, तें पुन्हा वर झालें नाहीं. श्री. दामूअण्णांचा आत्मा शाश्वतांत विलीन झाला. जड देह तेवढा खालीं उरला.

ज्याला पुत्रापेक्षांहि अधिक वत्सलतेनें वागविलें, तो आपला अत्यंत लाडका शिष्य स्वतःच्या डोळयांदेखत निर्घृण काळाच्या स्वाधीन झाला, याचा श्रीदासगणू महाराजांच्या अंतःकरणावर केवढा दुःखद आघात झाला असेल, त्याची कल्पनाच करावी. शब्द तेथें अपुरे आहेत. महाराजांच्या अत्यंत कोवळ्या अंतःकरणाखालीं अलौकिक अशा स्थितप्रज्ञतेचें अधिष्ठान होतें, म्हणूनच हा दुःसह शोक ते सहन करूं शकले. आपलें दुःख त्यांनीं आवरिलें. स्वतःचा सर्व प्रपंच स्वतःच्याच हातानें दूर सारला असूनहि आपल्या दिवंगत शिष्याच्या अनाथ पत्नीचा व पोरक्या पोरांचा भार त्यांनीं अतीव वात्सल्यानें आपल्या शिरावर घेतला. सर्व ओझें श्री. दामूअण्णांच्या खांद्यावर सोपवून आपण संन्यास घ्यावा, अशी महाराजांची तीव्र इच्छा होती; पण आपली ही इच्छा गुंडाळून ठेवून त्यांना सर्वसामान्य माणसाप्रमाणें वर वर दिसण्यांत तरी प्रापंचिक बनावें लागलें. 'अंतःत्यागी बहिःसंगी लोके विहर

राघव' हा योगवासिष्ठाचा उपदेश त्यांना प्रत्यक्षांत अनुभविणें प्राप्त झालें.

## १९. श्रीसाईबाबांचे अनुभव :

शिरडीस असतांना श्रीसाईनाथांच्या अलौकिक विभूतिमत्वाचा श्रीदासगणू महाराजांना अनेक रीतींनीं अनुभव आला. त्यामुळेंच 'शिरडी माझें पंढरपुर। साईबाबा रमावर' असें ते अंतःकरणपूर्वक मानूं लागले. त्यांतील कांहीं अनुभव मी या प्रकरणांत सांगणार आहें. तत्पूर्वी पारमार्थिक अनुभवाविषयींच्या महाराजांच्या कल्पना स्पष्ट करणें आवश्यक आहे.

आजकाल श्रीसाईबाबांच्या व्यक्तित्वाभोंवतीं चमत्कारांचें इतकें दाट जंगल वाढलें आहे कीं, श्रद्धावंत मनुष्यहि त्यामुळें गांगरावा आणि घायाळ व्हावा. कोणाला पुत्रप्राप्ति झाली. कोणाचे रोग गेले. कोणाला नोकरी मिळाली. कोणाचें लग्न झालें. कोणी गुन्हा करून शिक्षा न होतां सुटला. कोणाला काळ्या बाजारांत अतोनात फायदा झाला. कांहींना स्वप्नदृष्टांत झाले. नारळ, उदी, अक्षता यांचा प्रसाद अलौकिकरीत्या मिळाला. कोणाला साईबाबांचें प्रत्यक्ष दर्शन झालें. श्रीसाईबाबा कोणाच्या अंगांत येतात. कोणाच्या येथें त्यांच्या पावलांचे ठसे उमटले. कोणाशीं ते प्रत्यक्ष बोलतात तर कोणाच्या बोलण्याची जबाबदारी त्यांनीं आपल्या शिरावर घेतली आहे. गेल्या दहा पंधरा वर्षांत तर या प्रकारच्या चमत्कारांचें जणुं पेंवच फुटलें आहे.

१९४० सालापूर्वी जेथें नित्याच्या आरत्यांसहि माणसांचा तुटवडा भासत असे, घंटा बडविणाऱ्या पुजाऱ्याव्यतिरिक्त मंदिरांत सात आठ माणसें कांहीं आरतीसाठीं नसत, यामुळें संस्थानांतील वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं, संस्थानच्या सर्व नोकरांनीं प्रत्येक आरतीला उपस्थित राहिलेंच पाहिजे, असा नियम केला; तेथें आज उत्सवाच्या वेळीं अथवा गुरुवार-सारख्या विशेष दिवशीं तर राहूं द्याच पण एरवींहि काकडआरतीसुद्धां

सर्व वेळीं शें-दोनशें लोक सहजच उपस्थित असतात. श्रीसाईबाबा हे जणुं आजच्या काळाचें एक वेड बनले आहेत. रावापासून रंकापर्यंत, लहानापासून थोरापर्यंत, पदवीधरापासून आंगठेबहाद्दरापर्यंत, सनातनी शास्त्रीबोवापासून सिनेमानटापर्यंत सहस्रावधि लोक शिर्डीस गोळा होतात. अनेक चमत्कार त्यांच्याविषयीं विपुलतेनें सांगितले जातात. त्यांच्या खरेंखोटेंपणाविषयीं मला येथें कांहींच सांगावयाचें नाहीं. श्रीदासगणूंची श्रीसाईबाबांच्यासंबंधीं निष्ठा व त्यांना आलेले अनुभव सर्वसाधारणांच्यापेक्षां वेगळ्या जातीचे आहेत, हें मात्र लक्षांत ठेविलें पाहिजे.

मुंबई प्रांतामध्यें वा आज सर्व हिंदुस्थानभर श्रीसाईबाबांच्या अलौकिकत्वाचा जो एवढा प्रचार झालेला आहे, त्याला मूळ कारण श्रीदासगणू महाराजच आहेत. महाराजांच्या श्रुतिमधुर कीर्तनामुळेंच सर्वसाधारण समाज श्रीसाईबाबांच्या संतत्वाशीं परिचित झाला. श्री. नानासाहेब चांदोरकरांच्यामुळें कांहीं सुशिक्षित, श्रीमंत आणि वरिष्ठ अधिकाराची मंडळी तेवढी श्रीसाईबाबांची भक्त बनली. यासाठींच श्रीदासगणू महाराज व श्री. चांदोरकर यांना उद्देशून श्री. गोविंदराव दाभोळकर उर्फ हेमाडपंत यांनीं आपल्या श्रीसाईसच्चरित्रामध्यें “ मुंबई प्रांतीं जी साईभक्ति। त्यास कारण या दोन व्यक्ति। साईबाबा कृपामूर्ति। यांचे हातीं प्रगटले॥ ” असा उल्लेख केला आहे.

श्रीदासगणू महाराज श्रीसाईबाबांचे एकनिष्ठ भक्त बनले. श्रीसाई-बाबांनीं केलेल्या अनुग्रहाचें स्मरण होतांच ते अद्यापिहि गहिंवरून जातात. याला अगदीं किरकोळ म्हणतां येतील, असे ऐहिक सुखें पुरविणारे चमत्कार कारणीभूत नाहींत. पोलिसांत आयुष्याचीं कांहीं वर्षें काढलेल्या श्रीदासगणू महाराजांसारख्या चोखंदळ बुद्धीच्या पुरुषाची श्रद्धा स्थिर होण्यास सामान्यापेक्षां कांहीं तरी विशेष घडणेंच अवश्य होतें. वर उल्लेखिलेल्या चमत्कारांना चमत्कार म्हणावयास ते तयार नाहींत.

संतत्वाच्याभोंवतीं सामान्य ऐहिक सुखें पुरविल्याच्या चमत्कारांचें तण उगवणें, हें अत्यंत स्वाभाविक असतें. कारण अपेक्षेची धांव यापलीकडे बहुधा जात नाहीं. कांहीं वेळां खरोखरीच संतांच्या कृपा-प्रसादामुळें भाविकांना तीं तीं ऐहिक सुखें प्राप्त झालेलीं असतात, तर पुष्कळ वेळां श्रद्धाळू मनाचा तो एक भाबडा समज असतो. श्रीदासगणूंच्याविषयींहि अशा रीतीचे चमत्कार सांगणारे लोक आहेत, हें मला स्वतःला अनुभवानें माहीत आहे. अशा लोकांना श्रीदासगणू महाराज काय उत्तरें देतात, तेंहि मी अनेक वेळां ऐकिलें आहे.

एका गृहस्थानें महाराजांना भाविकपणें अगदीं गहिंवरून सांगितलें, "महाराज, केवळ आपल्या आशीर्वादानें माझा अगदीं मरणाच्या दारीं पडलेला मुलगा वांचला."

महाराज म्हणाले, "वेड्या, अरे असें जर असतें तर माझा दामू मी कां मरूं दिला असतां?"

आणखी एक गृहस्थ एकदां म्हणाले, "महाराज, मला आपण पुष्कळदां स्वप्नांत दिसतां."

"हा माझा गुण नाहीं. तुमच्या मनावर घडलेल्या संस्कारांचा आणि धरलेल्या भावनेचा तो परिणाम आहे. माझ्याशिवाय स्वप्नांत इतर कोणी दिसत नाहीं का? दिसतें ना? झालें तर. स्वप्नांत दिसणें हा कांहीं साक्षात्कार नव्हे."

उदाहरणाकरितां केवळ दोन गोष्टी येथें उल्लेखिल्या. अनेकांना त्यांनीं याप्रमाणें झिडकारिलें आहे. आपल्याविषयीं कोणी कांहीं अलौकिकत्व प्रस्थापित करील असा नुसता वास येतांच त्यांनीं अनेक प्रकार करून त्याची या प्रकारची श्रद्धा टिकणार नाहीं, असें केलें आहे. महाराजांच्याकडे निरनिराळ्या दर्जाचीं, वेगवेगळ्या वृत्तीचीं, भिन्न भिन्न परिस्थितींतील माणसें किती तरी येतात. कांहीं त्यांच्याजवळ वर्षानुवर्ष राहिलींहि आहेत. त्यांच्याशीं होणारे महाराजांचें वागणें, बोलणें पाहिलें म्हणजे मन अचंब्यानें थक्क होतें.

व्यावहारिक दृष्टीनें पाहतां, किती तरी विविधता आणि विसंगति त्यांत आढळते, परंतु या परस्परविरोधाच्या मुळाशीं एकच सामान्य सूत्र आहे; असें माझ्या निश्चितपणें प्रत्ययास आलें आहे. मनुष्याच्या श्रद्धेला, आदराला व भक्तीलाहि एक प्रकारच्या ऐहिक स्वार्थाचें अस्तर कळत न कळत लागलेलें असतें आणि या सापेक्षतेपायींच परमार्थाचें खरें सुख हातीं येत नाहीं. हें अस्तर नष्ट करणें, ही सापेक्षता दूर करणें हेंच महाराजांच्या हेतूचें सूत्र होय. परमार्थाचा उपयोग ऐहिक स्वार्थ-साधनाकरितां करणें हें महाराजांना त्याज्य वाटतें. आमच्या येथें वर्षांतून अनेक वेळां निरनिराळ्या उत्सवांच्या निमित्तानें दोन चार ब्राह्मण बोलावून रुद्रपवमानाच्या आवर्तनासह षोडशोपचारें पूजा करण्याची पद्धति आहे. माझी मुंज झाल्यापासून मीच ही पूजा करीत आलों आहे. पूजेचा संकल्प सामान्यतः ' अस्माकं सहकुटुंबानाम् क्षेमस्थैर्यायुरारोग्यैश्वर्याभिवृद्ध्यर्थम् अमुक देवतानाम् पूजनम् करिष्ये ' असा असतो. यालाच ' श्रुतिस्मृतिपुराणोक्तफलप्राप्त्यर्थम् ' ची पुष्टीहि जोडली जाते, परंतु श्रीदासगणू महाराजांनीं हा परंपरागत संकल्प ब्राह्मणांना कधींहि उच्चारूं दिला नाहीं. त्यांचा नेहमींचा संकल्प ' श्रीपांडुरंगदेवताप्रीत्यर्थम् पांडुरंगपूजनंच करिष्ये ' असा असतो. मी विचारल्यावरून त्यांनीं एकदां याचें स्पष्टीकरण केलें होतें. त्याचा उपयोग मी माझ्या अधिकमासवर्णनाच्या वेळीं केला आहे. त्या ओळी येथें उद्धृत करतों.

" पूजा सकाम ना व्हावी आज्ञा श्रीगुरूची अशी ।
देवासी काळजी सारी मागावें काय त्याजसी ।
दादांनीं कथिला विप्रा, तदा संकल्प यापरी ।
प्रीत्यर्थ पांडुरंगाच्या, पूजार्चन घडो करीं ॥ "

भक्तीचें स्वरूप असें सामान्य व्यावहारिक कधीं असतां कामा नये. भक्तीकरितां केलेली सेवा हा कांहीं इष्टमित्रांच्या लग्नांत केलेला आहेर नव्हे कीं, खण द्यावा आणि लुगड्याची इच्छा धरावी. जी गोष्ट

व्यवहारांतहि कधीं घडत नाहीं, ती परमार्थांत घडावी अशी इच्छा धरावी, अपेक्षित अनुभव आला नाहीं तर परमार्थच सोडावा; पण व्यवहारांतील दुःखांनीं मात्र व्यवहाराचा कंटाळा करण्याऐवजीं त्यास अधिकच चिकटून बसावें, ही माणसाची वृत्ति विलक्षण आहे. श्रीदासगणूमहाराज अनेक वेळां म्हणतात 'परमेश्वराला, गुरूला किंवा सत्पुरुषाला आपण आई मानतों याचा अर्थ खाऊ मागण्याचें एक हक्काचें स्थान असा का करावयाचा? आईजवळ खाऊ मागणें हा मुलाचा हक्क आहे, यांत शंका नाहीं. दुसरीकडे कधीं कांहीं मागूं नये. दिलें तरी नाहीं म्हणावें. आईजवळच काय तें मागावें, हा व्यवहार फारच चांगला आहे. आपण तो मुलांना शिकवतोंहि, पण मागितल्या प्रत्येक वेळीं आईनें खाऊ दिलाच पाहिजे, असा नियम कसा करतां येईल? मूल आजारी असलें, इतका खाऊ खाणें त्याच्या हिताचें नसलें वा खाऊ मागण्याची प्रवृत्ति वाढत जाईल हें न रुचलें तर आई खाऊ देण्याचें नाकारतेच ना? उलट असें आहे कीं, खाऊ कोणीहि शेजारीणदेखील देऊं शकते. मुलाच्या मुस्कटांत मारण्याचा हक्क मात्र आईचाच आहे. परमार्थांतहि अगदीं असेंच कां मानूं नये? मला दुःख भोगावें लागतें, त्याला माझींच बरीवाईट कृत्यें कारणीभूत आहेत. मग त्यांचीं फळें भोगतांना तेवढा भ्याडपणा कां पतकरावा? जें वांट्यास येईल, तें समाधानानें भोगावें आणि धीर येण्यासाठीं परमेश्वराची प्रार्थना करीत राहावें. आईच्या हातचा मार खात असतांहि तिच्याच पायाला मिठी मारून बसणाऱ्या लडिवाळ बालकाप्रमाणें लोक परमार्थांत कां वागत नाहींत? परमार्थमार्गाला लागावें यासाठीं कांहीं ऐहिक इच्छा संत आपल्या सामर्थ्यानें पुरवितात हें निश्चित; पण त्याचा उपयोग ऐहिकांतच बुडून राहणाऱ्या जीवांना अलौकिकत्वाच्या प्रत्ययानें परमार्थाकडे वळवावें, एवढ्यापुरताच असतो. शाळेची गोडी लागावी, अभ्यास नीट व्हावा म्हणून अगदीं लहान मुलांना खाऊ-खेळण्याची

लालूच दाखविण्यापैकींच तो प्रकार आहे. खाऊची चटक लागून तोच हट्ट प्रत्येक वेळीं घेऊन बसाल तर मार खाल."

चमत्कारांविषयीं दासगणूमहाराजांची विचारसरणी काय पद्धतीची आहे, तें ध्यानांत यावें यासाठींच मी इतकें लिहिलें. श्रीसाईबाबांचें अलौकिकत्व श्रीदासगणूंच्या मनावर कसें ठसलें हें सांगण्यास मी आरंभ केला होता, तें माझ्या लक्षांत आहे. कांहीं अनुभव येथें पुढें देत आहे.

एकदां कांहीं विशेष पर्वाच्या निमित्तानें गोदास्नानास जावें, असा श्रीदासगणूंचा विचार होता. त्यासाठीं ते बाबांची गोदास्नानासाठीं पुणतांब्यास जाण्याकरितां संमति मागत होते. बाबा कांहीं ती देत ना. अनेक तऱ्हांनीं विनवण्या केल्या, तरी बाबा मानीनात. हा प्रकार नेहमींचाच होता. शिरडी सोडून बाहेर जाण्याची परवानगी श्रीदासगणूंनीं मागितली आणि बाबांनीं ती लगेच दिली, असें कधींच होत नसे. 'उद्यां जा. परवां जा. इतक्यांत काय घाई आहे?' अशा शब्दांनीं त्यांनीं श्रीदासगणूंना अडवावें. दोन दोन तीन तीन महिने शिरडींतून हलूं देऊं नये; परंतु या वेळीं गोदावरीच्या स्नानास जाण्याची इच्छा महाराजांच्या मनांत प्रबळ झाली होती. गोदावरीविषयीं त्यांना अत्यंत जिव्हाळा. गोदेचा उल्लेख केव्हांहि करण्याचा प्रसंग आला तरी 'माय माझी गोदावरी' या शब्दांत करावा. मागणें मागितलें तरी 'दास गणु म्हणे वसती राहो गोदेच्या कांठीं' हेंच त्यांनीं मागावें. इतकी गोदा त्यांना प्रिय. महोदयासारखें पुण्यकारक पर्व. गोदावरी चार कोसांवर. पण पुन्हा पुन्हा विनवूनहि बाबा जाऊं देत ना. याचा त्यांना फार खेद वाटूं लागला. आज्ञा मोडून जाणें तर बरें वाटेना. उद्यां महोदय पर्व. आज तरी होय म्हणतील, या विश्वासानें श्रीदासगणूंनीं श्रीसाईबाबांना पुन्हा एकदां कळवळून विनंति केली. तेव्हां बाबा म्हणाले, "इतकी तळमळ रे कशासाठीं गणू? विशेष दिवशीं गोदास्नानांतच कांहीं अधिक आहे का? तुकारामबोवांच्या भोपळ्याची गोष्ट माहीत आहे ना तुला? ओतून स्वच्छ व्हावें, पवित्र व्हावें. कातडी

भिजवून काय होणार? याहि गोष्टी कराव्या, पण तेथेंच थांबावें का? पर्वदिवशीं गोदा हवी आणि एरवीं नको? गोदा नेहमींच जवळ असावी. आपल्याजवळ आहे. उगीच दुःख कां करतोस?"

श्रीदासगणूंना यावर कांहीं बोलतां आलें नाहीं; पण मनाची तळमळ शांत होईना. पर्वदिवशीं सकाळींच श्रीदासगणू श्रीसाईबाबांचे दर्शनास गेले. बाबांचे चरणावर मस्तक ठेविलें आणि चरणांस हात लाविला तों बाबांच्या पायांच्या दोन्ही अंगठ्यांतून निर्मल जलधार स्रवूं लागली. श्रीदासगणूंनीं तें पाणी अंजलींत घेतलें. अत्यंत श्रद्धेनें स्वतःच्या डोक्या-वर शिंपडलें आणि गोदास्नानापेक्षांहि निरुपम आनंद उपभोगिला. बाबा म्हणाले, "झालें का समाधान गणू?"

या चमत्कारामुळें श्रीदासगणूंच्या मनामध्यें श्रीसाईबाबांच्याविषयींची श्रद्धा दृढ झालीच; परंतु तीर्थस्नानाचें खरें उद्दिष्ट काय तेंहि या प्रसंगानें त्यांच्या मनावर कायमचें ठसलें. आध्यात्मिक दृष्ट्या हेंच खरें महत्त्वाचें आहे. श्रीसाईसच्चरित्रकारांनीं हा प्रसंग आपल्या ग्रंथामध्यें पुढीलप्रमाणें वर्णिला आहे.

"एकदां पर्वविशेष जाणून । करावें प्रयागतीर्थी स्नान ।
दासगणूंचें जाहलें मन । आले आज्ञापन घ्यावया ॥
बाबा देती प्रत्युत्तर । नलगे तदर्थ जाणें दूर ।
हेंच आपुलें प्रयागतीर । विश्वास धर दृढ मनीं ॥
खरेंच सांगावें काय कौतुक । बाबांचे चरणीं ठेवितां मस्तक ।
उभयांगुष्ठीं निथळलें उदक । गंगायमुनोदक पाझरलें ॥"

या प्रसंगाच्या निमित्तानेंच श्रीदासगणू महाराजांनीं श्रीसाईबाबांचे-वर रचिलेलें पद पाहण्यासारखें आहे. त्यांतील शब्दांवरून मी वर उल्लेखिलेला अर्थच निघतो कीं नाहीं, तें सूज्ञांनीं ठरवावें. पद पुढील-प्रमाणें आहे.

"अगाध शक्ति अघटित लीला तव सद्गुरुराया ।
जड जीवातें भवीं तराया तूं नौका सदया ।

वेणीमाधव आपण होऊन प्रयाग पद केलें ।
द्वय अंगुष्ठीं गंगायमुना प्रवाह दाखविले ।
कमलोद्भव कमलावर शिवहर त्रिगुणात्मक मूर्ति ।
तूंच होऊनी साईसमर्था विचरसी भूवरतीं ।
ऐसें असतां उगीच मन्मन भटकत हें फिरतें ।
आतां विनंती हीच तुला गा स्थिर करणें त्यातें ।
अधमाधम मी महापातकी शरण तुझ्या पायां ।
आलों निवटा दासगणूचे त्रिताप गुरुराया । "

संत जातिधर्मानें आणि व्यक्तिविशेषानें वेगळाले भासले तरी त्यांच्यांत किती एकरूपता असते, हें श्रीदासगणूंनीं श्रीसाईबाबांच्या संगतींत अलौकिकरीत्या एक दोनदां अनुभविलें. ते प्रसंग असे—

श्रीदासगणू महाराज आपल्या कांहीं इष्टमित्रांसह जगन्नाथपुरीच्या यात्रेस गेले होते. तेथून परत येत असतांना राजमहेंद्रीस त्यांची आणि प्रसिद्ध सत्पुरुष वासुदेवानंदसरस्वती टेंबेस्वामीमहाराज यांची गांठ पडली. अधिकारी पुरुषाविषयीं श्रीदासगणूंना अत्यंत प्रेमादर वाटतो. वासुदेवानंदांच्या चरणींहि त्यांची भक्ति होती. स्वामीमहाराजहि श्रीदासगणूंच्यावर प्रेम करीत. स्वामींचें सोवळेंओवळें फार कडक असे. भलत्या माणसाला वाटेल त्या वेशभूषेंत त्यांच्याजवळ जाणें कधींच शक्य नव्हतें; परंतु श्रीदासगणूंना मात्र श्रीवासुदेवानंदानीं कधीं आड-काठी केली नाहीं. उभयतांचे कधीं कधीं विनोदानें संवादहि होत. श्रीदासगणूंच्याजवळ सोवळयाओवळयाचा एवढा तीव्र आग्रह नाहीं. या गोष्टीस उद्देशून स्वामींच्या भक्तमंडळींपैकीं कोणी कांहीं विचारलें. तें मनांत धरून श्रीदासगणूंना उद्देशून शंका विचारणारास स्वामी म्हणाले,

" अरे, हा पंढरपुरच्या भ्रष्ट देवाचा भक्त. कोणीहि शिवलें तरी त्या देवाला चालतें. मग हा कशाला फारसें सोवळेंओवळें पाळतो ? " त्यावर श्रीदासगणू महाराज हंसले व म्हणाले,

" महाराज, आपल्या श्रीदत्तापेक्षां माझा देव पुष्कळच बरा हं !

सोवळें जरा कमी पण त्यानें धर्म कधीं सोडला नाहीं. दत्तानें मुसलमानाचें रूप कितीदां तरी घेतलें!" श्रीवासुदेवानंद हें ऐकून मनापासून खदखदां हंसले आणि म्हणाले,

"आपल्या आराध्य देवतेवर अशी निष्ठा असावी."

श्रीवासुदेवानंदाच्यावर श्रीदासगणूंनीं स्तुतिपर अशीं कांहीं पद्यें केलीं आहेत. आपल्या ग्रंथांतून त्यांचेविषयीं फार आदरानें लिहिलें आहे. असो.

स्वामींची भेट झाल्यावर त्यांनीं सहज चौकशी केली.

"आतां येथून कोठें जाणार?"

"आधीं नांदेडास जाणार आहों. तेथून शिरडीस जाऊं."

"मग आमचा हा एवढा नारळ साईबाबांना द्या आणि नमस्कार सांगा."

"ठीक आहे." असें म्हणून श्रीदासगणूमहाराजांनीं तो नारळ घेतला.

स्वामींना नमस्कार करून ते परत निघाले. बाबांना देण्यासाठीं तो नारळ त्यांनीं आपल्या पडशींत ठेवून दिला. पुढें सर्व मंडळी नांदेडाहून शिरडीस यावयास निघाली. वाटेंत मनमाड स्टेशनवर फराळ करीत असतांना चिवडा फार तिखट लागला. त्यावेळीं श्री. पुंडलीकराव नांदेडकर म्हणाले, 'अहो, महाराजांच्या पडशींत एक नारळ आहे. फोडाना तो. खोबऱ्याबरोबर तिखट इतकें जाणवणार नाहीं.' श्रीदासगणू महाराज कोठें बाहेर गेले होते. इतरांना नारळासंबंधींची कांहींच कल्पना नव्हती. परत आल्यावर इतरांच्याबरोबर श्रीदासगणूंनींहि तें खोबरें खाल्लें. सर्व मंडळी दुसरे दिवशीं शिरडीस आली. श्रीसाईबाबांच्या दर्शनास गेले असतांना मशिदीच्या पायऱ्या चढतात तों श्रीदासगणूंना उद्देशून बाबा श्री. माधवराव देशपांडे यांना म्हणाले,

"शाम्या, हा गणु लई चोरटा आहे. माझ्या भावानं मला खाऊ दिला होता. यानं मधल्यामध्येंच खाऊन टाकला." प्रथम श्रीदासगणूंच्या तें लक्षांत येईना.

" खाऊ कसला बाबा ? "

" वारे ! चोर तो चोर आणि वर शिरजोर. माझा नारळ नाहीं खाल्लास तूं ? "

मग तो प्रकार श्रीदासगणूंच्या लक्षांत आला. आठवण होतांच आपल्या विठ्ठलमंदिरांतील निवासस्थानीं ते परत आले. पाहतात तों पडशींत नारळ नाहीं. चौकशी करतां समजलें कीं, मनमाडवर सगळयांनीं खाल्ला तो हाच नारळ. बाबांच्या या अंतर्ज्ञानाचा श्रीदासगणूंच्या मनावर परिणाम झालाच, पण त्याहिंपेक्षां संतांच्या एकरूपतेचा जो साक्षात्कार त्यांना घडला; त्याचें त्यांना विशेष महत्त्व वाटलें. कोठें श्रीवासुदेवानंद सरस्वती, अत्यंत कर्मठ, कडक सोवळें पाळणारे तर कोठें शिरडीचे श्रीसाईबाबा, त्यांच्याजवळ सोवळयाओवळयाच्या आचाराला थाराच नाहीं. अशांनींहि परस्परांशीं जिव्हाळयाचा संबंध ठेवावा; एकानें दुसऱ्याला आदरानें भेट पाठवावी, तर दुसऱ्यानें पहिल्याचा सख्खा भाऊ म्हणून उल्लेख करावा. संतांची अलौकिक समत्वबुद्धि ती हीच. संत ही एकच जाति आणि जगताचें रक्षण हा एकच धर्म. बाकीचा भेद हा सर्व वरवरचा आणि सापेक्ष.

श्रीदासगणू महाराजांचा संतविषयक दृष्टिकोन या तऱ्हेच्या अनुभवांमुळेंच फार व्यापक झाला. दुसराहि एक अनुभव असाच आहे.

नांदेडास रतनजी शेठ म्हणून एक पारशी गृहस्थ होते. त्यांना संतति नव्हती. श्रीदासगणूंच्या प्रेरणेनें श्रीसाईबाबांच्या दर्शनास ते शिरडीस आले. नेहमींप्रमाणें साईबाबांनीं त्यांचे जवळ दक्षिणा मागितली. श्रीसाईसच्चरित्रकार श्री. दाभोळकर यांनीं या प्रसंगाचें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे.

**" शेठीपाशीं दक्षणा मागतां । साई कथिती पूर्ववृत्ता । परी तो नाठवे शेठीचे चित्ता । वाटली विस्मयता तयास ॥ तीन रुपये चौदा आणे । त्वां मज दिधले ते मी जाणें । बाकीचे आणिले दक्षिणेकारणें । ते मज दाक्षिणे देई गा ॥ हेंच बाबांचें प्रथम दर्शन । ऐकून बाबांचें हें वचन । रतनजी-**

**शेठ विस्मयापन्न। करूं स्मरण लागती॥ शिरडीस पूर्वीं आलों नाहीं। कोणासवें न पाठविलें कांहीं। ऐसे असतां आश्चर्य काई। महाराज साई वदती हे ॥ मग आज्ञापन घेतले। रतनजी परतून नांदेडा आले। जें जें जैसें जैसें घडलें। सविस्तर कथिलें गणुदासां॥ तीन रुपये चौदा आणे। त्वां मज दिले तें मी जाणे। बाबांचें हें काय बोलणें। सांगा स्पष्टपणें मज सारें॥ हा तरी एक चमत्कार। दासगणू करिती विचार। काय असावें यांतील सार। मनाचा निर्धार होईना॥ आठवे पूर्ण विचारांतीं। एक अवलियाची मूर्ति। मौलीसाहेब जया वदती। आठवती चित्तीं बुवांच्या॥ जातीचे हे मुसलमान। कार्यक्रम संतासमान। धंदा हमालीचा करून। प्राक्तनाधीन वर्तती॥ शिरडीस जाणें ठरल्यावरी। मौलीसाहेब यांची फेरी। सहज शेठजीचे घरीं॥ स्वेच्छाचारी जाहली॥ शेठजीस होऊन प्रेरणा। दिधला मौलवींस छोटा खाना। तेथील खर्चाची कल्पना। स्मरली तत्क्षणां गणुदासां॥ खर्चाची यादी आणविली। पै न पै सर्वही धरिली। तयाची एकंदर केली। बेरीज झाली बरोबर॥ तीन रुपये चौदा आणे। तंतोतंत अधिक ना उणें। तयांची पावती बाबांनीं देणें। आश्चर्य बहुगुणें सर्वत्रां॥"**

संतांमधील ही एकता श्रीसाईबाबांच्या साहचर्यांत अनेक वेळां प्रत्ययास आल्यानें श्रीदासगणू हे त्या विचाराशीं अगदीं एकरूप झालेले दिसतात. त्यांनीं आपल्या सर्व ग्रंथभर संतांच्या या अलौकिक एकत्वाचा अनेक वेळां, अनेक प्रकारांनीं उल्लेख केला आहे.

अध्यात्म मार्गांतील तत्त्वज्ञानासंबंधींच्या श्रीदासगणूमहाराजांच्या कांहीं शंकाहि श्रीसाईनाथांनीं मोठ्या युक्तीनें दूर केल्या आहेत. त्यांतील एक प्रसंग विशेष उल्लेखनीय आहे.

श्रीदासगणूमहाराज त्या वेळीं ईशावास्य उपनिषदावर ओवीबद्ध टीका लिहित होते. या अर्थगंभीर उपनिषदाचा पहिलाच श्लोक—

> **"ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत्।**
> **तेन त्यक्तेन भुंजीथाः मागृधः कस्यस्वित् धनम्॥"**

असा आहे. यांतील 'तेन त्यक्तेन भुंजीथाः' 'त्यागपूर्वक त्याचा उपभोग घे.' या सूत्रांतलि अर्थ कांहीं केल्या श्रीदासगणूंच्या मनाला

उलगडेना. त्यागपूर्वक उपभोग म्हणजे काय? त्याग आणि भोग हे परस्परांच्या अगदीं विरूद्ध त्यांना एकत्र आणणें म्हणजे वदतो व्याघातच. टीका टिपणें पाहिलीं, संस्कृतभाष्यें अवलोकिलीं, शास्त्रीमंडळींना विद्वानांना, प्रवचनकारांना विचारिलें; पण मनाचें समाधान कोठेंच झालें नाहीं. प्रथमग्रासे असा मक्षिकापात झाल्यामुळें श्रीदासगणूंना फारच खेद होत होता. सारखा विचार ते करीत. तासचे तास चिंतनांत घालवीत; पण 'तेन त्यक्तेन भुंजीथाः' हें कोडेंच राहिलें. पुढें शिरडीस गेले असतांना श्रीसाईबाबांच्या पुढें त्यांनीं आपली ही शंका नमस्कारपूर्वक मांडिली. शंकेचें उत्तर बाबांनीं कांहींच दिलें नाहीं. त्यांनीं विचारलें.

"येथून कुठें जाणार आहेस गणू?"

"विलेंपारल्यास. श्री. काकासाहेब दीक्षितांकडे."

"मग काकाची मोलकरीण देईल तुझ्या या प्रश्नाचें उत्तर."

इतर मंडळींना या बोलण्याचें फार आश्चर्य वाटलें. प्रश्न उडवून देण्याचा तो एक मार्ग आहे असें वाटलें त्यांना; परंतु श्री. दासगणूंच्या मनांत मात्र तशी शंका आली नाहीं. बाबांच्यावर त्यांची पूर्ण श्रद्धा होती. मोलकरीण सांगेल याचा अर्थ, तिच्या निमित्तानें आपला प्रश्न सुटणार असेंच ते समजले आणि नेमकें त्याप्रमाणेंच घडलें.

श्री. काकासाहेब दीक्षित आणि श्रीदासगणू यांचा संबंध पुढें पुढें फारच जिव्हाळ्याचा झाला होता. राधाकृष्णाआईच्या प्रकरणीं जरी दोघांत पुष्कळ मतभेद झाला होता, तरी उभयतांमधील स्नेहांत त्यामुळें कधीं तूट आली नाहीं. उदार माणसांच्या निरपेक्ष प्रेमामध्यें हें असेंच घडतें. माझ्यासारखा कधीं होशील, अशी भावना त्यांच्या मनांत कधींच येत नाहीं. एकमेकांच्या आचारविचारांना जर स्नेहाचा जाच होत असेल, तर तो खरा निरपेक्ष स्नेह नव्हेच. दीक्षितांची मैत्री ही खरी मैत्री होती. श्रीदासगणू महाराज मुंबईला आले कीं, त्यांचें राहणें बहुधा विलेंपारल्यास श्री. हरि सीताराम दीक्षित यांचेकडे असे. त्याप्रमाणें यावेळींहि ते श्री.

काकासाहेब दीक्षितांकडेच उतरले. तेथें श्रीसाईबाबांनीं सांगितल्याप्रमाणें घटना घडून आली.

श्रीदासगणू महाराज हे सकाळच्या वेळीं पूजेस बसले होते. बाहेर मोलकरणीची लहान बारा तेरा वर्षांची एक मुलगी भांडीं विसळत एका जरतारी साडीचें गाणें गात होती. त्या दिवशीं कांहीं विशेष सण असल्यामुळें घरांतील मुली चांगलीं चुंगलीं वस्त्रें नेसून वावरत होत्या. या गरीब पोरीच्या अंगावर मात्र फाटकें पटकूर होतें. त्यामुळें ती फार खिन्न होती व साडीचें गाणें गातांना तिचा स्वर मोठा दीन आणि करुण भासत होता. तें पाहून श्रीदासगणू महाराज त्यांना भेटावयास आलेल्या रावबहादूर मोरेश्वर विश्वनाथ प्रधान या सद्गृहस्थांना म्हणाले, "मोरेश्वरराव, या मुलीला द्या ना एखादी चांगली साडी आणून. सणावाराचे दिवस. बिचारी लक्तरें नेसून हिंडत आहे." श्री. मोरेश्वररावांनीं लागलीच ती गोष्ट मान्य केली. बाजारांतून एक उत्तमपैकीं साडी आणून त्या मोलकरणीच्या मुलीला देऊन टाकली. कधीं कल्पनेंतहि येणार नाहीं, अशी देणगी मिळाल्यानें त्या मुलीला अर्थात्च फार आनंद झाला. संतोषानें तिचा चेहरा अगदीं उजळून निघाला. तिचें फुललेलें समाधान पाहून दोघांनाहि फार बरें वाटलें. दुसऱ्या दिवशीं तीच मुलगी पूर्वींचेच फाटके कपडे नेसून कामावर आली होती आणि कालचेंच गाणें म्हणत होती; परंतु गाणें म्हणत असतांना तिचा भाव आज सर्वस्वीं वेगळा होता. गाण्यांतल्या जरतारी साडीची ती आज मालकीण होती. नवें वस्त्र अंगावर नव्हतें; पण मुद्रेवर कालची खिन्न दीनताहि नव्हती. उलट प्रसन्नता होती.

श्रीदासगणू महाराजांनीं ज्या वेळीं हें सर्व दृश्य पाहिलें, त्या वेळीं त्यांच्या जातिवंत कविप्रतिभेला 'तेन त्यक्तेन भुंजीथाः' यांतील गूढ अर्थाचा एकदम साक्षात्कार झाला आणि अवर्णनीय आनंदानें त्यांचें हृदय भरून आलें. सर्व जगत् ईश्वरानेंच व्याप्त असल्यानें ईश्वरावेगळा कोणी राहूंच शकत नाहीं तेव्हां जगांतील सर्व पदार्थ माझेच आहेत.

मीच त्यांचा मालक आहे. ही भावना एकदां अंतःकरणांत जागृत झाली कीं, मग ती वस्तु प्रत्यक्ष जवळ असलीच पाहिजे असें नाहीं. व्यापक अनुभूतीमुळें वस्तुवांचूनहि तिच्यापासून होणारें सुख भोगतां येतें. मोलकरणीच्या त्या मुलीजवळ पहिल्या दिवशीं साडी नव्हती आणि मिळालेली साडी ती घरींच ठेवून आल्यामुळें दुसऱ्या दिवशींहि तिच्या- जवळ साडी नव्हतीच; परंतु साडी माझी झाली आहे, या केवळ भावनेनेंच मुलगी आनंदित झालेली होती. याच भावनेनें जर माणूस जगांत वागेल तर त्याच्या मनांत लोभ हा कधीं उत्पन्नच होणार नाहीं आणि त्याचा आनंद कधींहि मळणार नाहीं. 'हें विश्वचि माझें घर। ऐशी मति जयाची स्थिर। किंबहुना चराचर। आपणचि जाहला॥' ही ज्ञानेश्वर महाराजांनीं वर्णिलेली परमोच्च स्थिति ज्याच्या अंगीं बाणली, त्याला हव्यास कशाचा उरणार? आणि मग प्रत्यक्ष न भोगतांहि म्हणजेच त्यागानें जगांतील सर्व भोग भोगून होणारा आनंद त्याला उपभोगतां येईल. हाच 'तेन त्यक्तेन भुंजीथाः' या सूत्राचा अर्थ. श्रीसाईसच्चरित्रकारांनीं आपल्या ग्रंथाच्या अध्याय वीसमध्यें या प्रसंगाचें विस्तारानें वर्णन केलें आहे. जिज्ञासूंनीं तें तेथें पाहावें.

'ईशावास्य भावार्थ बोधिनी' टीकेंतील श्रीदासगणू महाराजांच्या या सूत्रावरील कांहीं ओव्या येथें अवतरित करणें उचित वाटतें.

**"ज्याची इच्छा करशील पाह्य। तें अवघें ईश्वरमय। ईशें व्याप्त जगत्त्रय। तूंही न वेगळा त्यापासुनी॥ मग इच्छा कशाची। तूं बापा करणार साची। जग ही मूर्तीच ईशाची। वेगळें त्या मानूं नये॥ जें जें कांहीं जगतांत। तें तें तुझेंच आहे सत्य। म्हणोनियां एषणांकित। होऊं नये सूज्ञांनीं॥ पैसा पुरून जमिनीसी। तो सावकार मानी मजपाशीं। प्रत्यक्ष पाहतां त्यापासी। एकही कवडी दिसेना॥ तें अवघें पुरलेलें धन। सावकार मानी माझें म्हणून। त्याचा अर्थ इतुकाच जाण। मनांत आणितां उपयोगी॥ खरें पाहतां तें धन। वेगळें न ईशाहून। इच्छा करितां सावकार जाण। तोही न वेगळा त्याहुनी॥ सागरें का इच्छावें क्षारपण। दिनकरें का तेज जाण। वा साखरेनें गोडपण। इच्छावें का सूज्ञ हो॥ जें ज्याच्या**

जवळ आधींच आहे। त्याची इच्छा न करिती पाहे। जैसें सागर सूर्य शर्करा हे। नेच्छिती क्षार, तेज गोडी ॥ तैसेंच या जगतांत। जें जें कांहीं आहे सत्य ॥ तें तें अवघें तुजप्रत। उपभोगितां येइल कीं ॥ आप आणि पर। हे भेद नुरावे साचार ॥ जगत् जें दिसे आडंबर। तें अवघा तूंच कीं ॥ ही भावना ज्याचे मनीं। रूढ झाली असे जाणी। तोच म्हणावा महाज्ञानी। ब्रह्मवेत्ता निश्चयें ॥ ”

विचार परिपक्व झालेले असले, मनोभूमि श्रद्धायुक्त असली आणि एकाद्या प्रश्नाच्या उत्तराविषयीं चित्ताची तळमळ उत्कट असली कीं, संतांच्या बारीक सारीक सूचनेंतूनहि ज्ञान कसें प्राप्त होऊं शकतें; याची ही वरील घटना एक उत्तम उदाहरण आहे.

लहान मुलाला मऊ भात करून पुन्हा पुन्हा कालवून गुरगुट्या करून इवलाले घांस देत काऊचिऊच्या गोष्टी सांगत भरवितात, त्याप्रमाणें परमार्थातहि सद्गुरूंनीं करावें, अशी सामान्यांची अपेक्षा असते. लहान मुलाप्रमाणें सर्व कांहीं आयतें हवें असतें; पण बालकाप्रमाणें मनाचा मोकळेपणा, निष्पाप भाव, आणि अनन्यता मात्र असत नाहीं. सर्व गोष्टी सद्गुरूंनीं पतकराव्या, आपण फक्त एकदां केवळ शरीरानें नमस्कार केला म्हणजे झालें, अशी जी लोकांची कल्पना असते ती खरोखरीच व्यर्थ आहे. संतांचें माहात्म्य सामान्यांच्या मनावर ठसवावें, ‘संतचरणरज लागतां सहज। वासनेचें बीज जळून जाय’ अथवा ‘आपणासारिखे करिती तात्काळ। नाहीं काळवेळ तयालागीं’ यासारखीं कांहीं संतवाक्यें असलीं तरी त्यांचें प्रयोजन नीट लक्षांत घेतलें पाहिजे. सद्गुरुचें काम हें पदवीनंतरच्या अभ्यासासाठीं असलेल्या मार्गदर्शका-सारखें आहे. ते फक्त कांहीं सूचना देतील. बाकीचा सर्व प्रयत्न विद्यार्थ्यांनींच करावयास पाहिजे. स्वतःचे सर्व अहंकार, सर्व तऱ्हेचे स्वार्थ, सर्व वासना आणि इच्छा यांचा संपूर्ण त्याग करून जर कोणी सद्गुरुच्या चरणीं अनन्य होऊन मस्तक नमवील तर मात्र गोष्ट वेगळी; पण ही योग्यता कांहीं सहजासहजीं प्राप्त होणारी नव्हे. एकनाथ

महाराजांनीं ‘ मंत्रतंत्र उपदेशिते । घरोघर गुरू आईते । जो शिष्यास मिळवी सद्वस्तुतें । सद्गुरू त्यातें कृष्ण मानी ” असें जें म्हटलें आहे, त्यांतील भाव साधकांनीं लक्षांत घेतला पाहिजे.

श्रीदासगणू महाराजांची मनोभूमि श्रीसाईनाथांच्या सहवासांत कशी कशी तयार होत जात होती, हें या वर उल्लेखिलेल्या चार घटनांतून स्पष्ट होणारें आहे.

## २०. अमृतानुभव लेखन :

‘ ईशावास्यबोधिनी ’ लिहितांना झालेली तयारी व विचारांची पूर्णता पुढें ‘ अमृतानुभव ’ लिहिण्याच्या वेळीं उत्तम उपयोगी पडली असली पाहिजे. ‘अमृतानुभव’ हा श्रीज्ञानेश्वर महाराजांचा ग्रंथ समजण्यास किती अवघड आहे, हें सर्वत्रांस माहित आहेच. श्रीदासगणू महाराजांच्या त्यावरील ‘ भावार्थ मंजरी ’ टीकेमुळें अमृतानुभवाच्या शब्दांत लपलेला गूढ अर्थ स्पष्ट होण्यास फार उपयोग होतो. सुप्रसिद्ध तत्त्ववेत्ते व संत श्री. रा. द. रानडे यांनींहि श्रीदासगणू महाराजांच्या टीकेचें हें महत्त्व आपल्या लेखांत उल्लेखिलें आहे. या ग्रंथाच्या निर्मितीचा प्रसंग गमतीचा आहे.

पंढरपुरास एकदां श्रीदादामहाराज सातारकर यांच्या प्रवचनास श्रीदासगणू महाराज गेले होते. श्रीदादामहाराज हे ज्ञानेश्वरीचे रसाळ प्रवचनकार म्हणून प्रसिद्ध होते. अनेक श्रीमंत श्रीमंत मंडळी त्यांच्या भजनीं होती. त्यांचे मठादि ऐश्वर्यहि पुष्कळच होतें. श्रीदासगणू महाराजांना त्यांच्या प्रवचनांतील रसाळपणा तेवढा फार आवडे. इतर गोष्टींकडे लक्ष न देतां सवड असेल, त्याप्रमाणें ते प्रवचनास जात. एकदां प्रवचन संपल्यावर श्रीदादामहाराज म्हणाले,

“ बोवा, आतां कहाण्या ( संतचरित्रें ) लिहिणें टाकून द्या. पुष्कळ लिहिल्यात. आतां कांहीं वेदान्ताचा अभ्यास करा. ”

“ असें कसें म्हणतां ? ‘ संतचरित्रें परम पवित्रें सादर वर्णावीं ’ असें थोर लोक सांगतात ना ? ”

" अहो, किती झालें तरी काऊचिऊच्या गोष्टी त्या. वेदान्ताची का सर येणार आहे त्यांना ? "

" मला हें पटत नाहीं. माणसाच्या मनाची तयारी करण्याचें संत-चरित्राचें सामर्थ्य फार मोठें आहे. त्या काऊचिऊच्या पोरकट कथा नव्हेत. खरा वेदान्त कळण्यास त्यांचीच मदत होणारी आहे. वेदान्ताच्या गोष्टी सांगणें अवघड आहे असें नाहीं. "

" तोंडच्या गोष्टी नव्हेत बोवा ! सांगतां का एकादी अमृतानुभवांतील ओवी ? वर्षानुवर्षं मेहनत करावी लागते त्यासाठीं. "

" सांगतों काय ? लिहूनच दाखवीन. "

" माझ्याजवळ येऊन राहा त्यासाठीं. तुमची उत्तम तयारी करून देतों. "

" आपल्याजवळ कशाला महाराज ? पांडुरंग कृपा करील, तर माझें मलाहि समजेल कीं. "

" तुमचा हा ब्राह्मणपणाचा अभिमान आड येत आहे बोवा ! माझ्याकडे शिकावयाला येण्याची म्हणून तुमची तयारी होत नाहीं. "

" छे ! तसें मुळींच नाहीं. परमार्थाच्या बाबतींत जातीचा कांहींच प्रश्न नाहीं; पण सगळयांनीं माझ्याकडेच आलें पाहिजे. कोणी आला नाहीं; तर तो अभिमानी असें जें आपल्याला वाटतें आहे, तें मात्र एक प्रकारच्या अहंकारामुळेंच असं नाहीं का ? "

" बरं बरं बोलूं नका. करून दाखवा. "

" ईश्वरीकृपेनें तसेंहि होईल. माझ्या हातांत काय आहे ? "

घरीं येतांच श्रीदासगणू महाराजांनीं श्री. दामूअण्णांना बाजारांतून अमृतानुभवाची एक प्रत आणावयास सांगितली आणि ते श्री. विश्वनाथ गोपाळ बडवे यांस म्हणाले,

" विश्वनाथबोवा, आज रात्रीं हा ग्रंथ पांडुरंगाच्या उजव्या हातावर कुशींत ठेवून द्या. उद्यां सकाळीं तो तेथेंच राहतो कीं नाहीं, तें मला बघावयाचें आहे. जर ग्रंथ तसाच राहिला तर ईश्वरी प्रसाद समजून मी

अमृतानुभवावर ओवीबद्ध टीका लिहिण्यास आरंभ करीन. खालीं पडला तर देवाच्या मनांत नाहीं, म्हणून गप्प बसेन. ”

श्री. विश्वनाथबोवा बडव्यांनीं ही गोष्ट सहज मान्य केली. श्रीदासगणू महाराजांवर त्यांची फार श्रद्धा होती. महाराजांचा पंढरपुरचा निवास महिनोमहिने त्यांच्याकडेच असे. त्यांचें नातें क्षेत्रोपाध्ये आणि यात्रेकरू असें उरलेंच नव्हतें. अत्यंत घरगुती जिव्हाळ्यानें श्री. विश्वनाथबुवा व त्यांचें सर्व कुटुंब महाराजांशीं जोडलें गेलें होतें. श्री. विश्वनाथबोवांच्या पत्नी सौ. पार्वतीबाई या तर महाराजांच्या अनुग्रहित भक्त होत्या.

कार्तिक शुद्ध एकादशीच्या दिवशीं संध्याकाळीं अमृतानुभवाची प्रत श्रीपांडुरंगाच्या उजव्या हातावर ठेविली गेली. तो दिवस म्हणजे कोण गडबडीचा ! हजारों लोक दर्शनास यावयाचे. देवाचे सर्व उपचार त्या दिवशीं बंद असावयाचे. रात्रींही दर्शनाला रांग्या लागलेल्या असावयाच्या. लोकांच्या गर्दीला उणीव नसावयाची. सहस्रावधी हार देवाच्या गळ्यांत पडावयाचे व तेवढेच काढले जावयाचे; परंतु या सर्व धांदलींतही कुशींत ठेवलेली प्रत तशीच होती. ती खाली पडली नाहीं. ग्रंथ लिहिण्यास ईश्वराची अनुज्ञा आहे, या भावनेनें श्रीदासगणू महाराजांनीं टीका रचण्यास आरंभ केला. तीन चार वर्षे हें लेखन चाललेलें असावें. मध्यंतरीं अमृतानुभवाच्या दहा प्रकरणांपैकीं सात प्रकरणें पूर्ण झाल्यावर श्री. दामूअण्णांच्या स्वर्गवासाचा घोर प्रसंग उद्भवला; त्यामुळें ग्रंथाचें लेखन बरेच दिवस थांबलें होतें. श्री. दामूअण्णांच्या मृत्यूचा महाराजांवर गंभीर परिणाम होऊन त्यांची लेखणी खुंटते कीं काय, अशी भीति परिवारांतील पुष्कळच लोकांना वाटत होती. नांदेडचे सुप्रसिद्ध कवि श्री. देविदास लक्ष्मण महाजन यांनीं या काळजींतून स्फुरलेलें कविताबद्ध पत्र त्यांना पाठविलें होतें. तें सर्वच येथें उद्धृत करणें उचित वाटतें.

**साशंकित शारदा :**

श्रीसंत कवि दासगणूंचे शिष्य श्री. दामोदर वामन आठवले यांच्या चिरवियोगप्रसंगीं श्रीदासगणूंना पाठविलेली विनयपत्रिका.

## गीति वृत्त.

"भुवैकुंठीं ठेवुन नश्वरसा मर्त्य मानवी काय । काळें ओढुन नेलें दामूअण्णांस शेवटीं काय ॥ गेले दामूअण्णा नच तुमचा पुत्र पोटचा गेला। केला भग्न मनोरथ कर उजवा तोडुनी तयें केला ॥ स्वरमाधुर्य गुणास्तव दैन्यांतुनि जो समूळ काढविला। त्यजिला तुम्ही प्रपंचहि परि उलटा तत्प्रपंच वाढविला ॥ झाले कष्ट तुम्हां जे ते सारे तन्मुखें मला कळले। त्याचेंहि चित्त तिळभर तुमच्या पदसेवनांत ना चळलें ॥ श्रीहरिकीर्तनरंगीं अनुपम तुमचीच पाहिली जोडी। परि आपुल्या स्वभावें अदयपणें काळ हा तिला तोडी॥ प्रेमळ, निरुपम, सुखकर निश्रेयस्करहि एक अंगाला। आतां मुकणार दिसे जनता तुमच्या कथाप्रसंगाला॥ शतशः व्याख्यानांनीं जो का परिणाम अल्पसा न घडे। एकाच कीर्तनानीं तुमच्या होतो मला दिसे उघडे॥ करिती रसिक सुहृद्‌जन कौतुक मम अल्प काव्य पाहून। कारण अन्य नसे त्या तुमच्या प्रिय काव्यकीर्तनाहून॥ परि मम कृति जलकणिका युष्मत्काव्योदधींतली खचित। मी प्रार्थना करावी नम्रपणें हें असे मला उचित॥ द्वारांत मंदिराच्या बसुन यथामति जिच्या पदां सेवी। साशंकिता दिसे ती आज महाराष्ट्र शारदा देवी॥ होऊनि अनन्य पुसतां हेतु तिनें जो निवेदिला मजला। तो याचनास्वरूपें कळवाया नम्र दास हा सजला॥ 'माझी निवासभूमि संतकवींनींच शोभली सारी। माझ्या सेवेपुढतीं ज्यांना सुख वाटलें न संसारीं॥ मागें महीपतीनें गाजविला संतकीर्तिचा डंका। वाङ्मयतप त्या परिचें कोण करिल हीच वाटली शंका॥ ऐशा खडतर काळीं कारण झालें असे महत्त्वाचें। जड संस्कृतिच्या पुढतीं उरलें नच नांव आत्मतत्त्वाचें॥ सांप्रत मजभोंवति जी ही माझी भक्तमंडळी जमली। श्रृंगाररसीं ह्यांची वाणीसह वृत्ति सर्वदा रमली॥ मन्मनमंदिर जें होतें गजबजलें थोर थोर संतांनीं। गेलें भरून आतां प्रेमाच्या वैषयीक गीतांनीं॥ श्रीसाईबाबांच्या योगानें योग हा असा जुटला। मनिं आशेचा अंकुर उत्तेजनवारिसिंचनें फुटला॥ सीनातटीं गणूनें लावणिची लावणी स्वयें केली। फंदी किंवा जोशी यांनीं जणुं मांडणी पुन्हा केली॥ त्यांनीं संतचरित्रें दासगणुकडुनि नित्य गावविलीं। प्रतिकृति महीपतीची जड संस्कृतिच्या युगांत दाखविली॥ परि कोसळला त्यावरि सांप्रत जो का प्रसंग दुर्धरसा। तो अग्नितुल्य घेइल वाटे शोषून

काय काव्यरसा ॥ कवितालतिका त्याची एकाएकीं जरी अशी सुकली। तरि मात्र वृत्ति माझी पुढतीं सत्चरितसंग्रहा मुकली ॥ 'यापरि सरस्वतीचें झालें साशंक चित्त कविराया। कोण तुम्हांविण सांगा या शंकेतें दुजें निवाराया ॥ प्रह्लाद तालधारी रमती हरिकीर्तनीं शुकाचार्य। प्रह्लाद तुम्हां मुकला झाला जरि का असाल गतधैर्य ॥ गेला तरि जाऊं द्या न म्हणे मी हरिकथेंतला रंग। तदभावीं नच होइल परि तितका शारदा मनोभंग ॥ त्यागाल जरि चिपोळ्या वामकरांतिल तरी त्यजा मात्र। सव्य करीं राहूं द्या काव्यास्तव लेखणी अहोरात्र ॥ न म्हणा लेखक नाहीं म्हणुनि ही लेखणी बसे स्तब्ध। प्रक्षुब्ध करितसा का कवितादेवी तुम्हांवरी लुब्ध ॥ लेखक निजभाग्यें गुरू-काव्यविलेखानें समर्पती काय। परि कवि-काव्यें असती अवलंबुन लेखकावरी काय ॥ ज्ञानेश्वरी लिहाया होता जरि शिष्य सच्चिदानंद। अमृतानुभवाविलेखन तदभावीं काय जाहलें बंद ॥ वेडें पोर म्हणा मज परि माझा शब्द हा नका मोडूं। सेवा सरस्वतीची कांहीं झालें तरी नका सोडूं ॥"

सुदैवानें श्री. महाजनांची ही विनंति, सफल झाली. प्रिय शिष्याच्या मृत्यूनें महाराज दुःखित अवश्य झाले, पण हतप्रज्ञ झाले नाहींत. अनेक प्रकारची काव्यरचना पुढेंहि त्यांच्या हातून विपुलपणें झाली आणि महाराष्ट्र शारदेला साशंकित राहण्याचें कारण उरलें नाहीं. तिची प्रसन्नता रसिकांना यथेच्छ आस्वादितां आली. अमृतानुभवाच्या सात प्रकरणांपुढील तीन प्रकरणें श्री. विठ्ठल यशवंत मराठे व श्री. भगवानराव मांजरमकर या उभय लेखकांनीं लिहून पुरीं केलीं आहेत. या प्रसंगाचा श्रीदासगणू महाराजांनीं शेवटीं उल्लेख केला आहे.

"शके अठराशें एक्कूण पन्नास। प्रभवनाम संवत्सरास ॥ मासोत्तम ज्येष्ठ मास। श्रीगोदेच्या तटाकीं ॥ स्थान रत्नेश्वर रामपुरीं। वद्य प्रतिपदा गुरुवारीं। गायत्री पुरश्चरणाभितरी। ग्रंथ कळसा गेला हा ॥ हा ग्रंथ लिहिण्याची। कलम दामू नांवाची ॥ होती ती मोडली साची। सात प्रकरणें झाल्यावरी ॥ कलम सर्वांग सुंदर। मोत्यापरी काढी अक्षर ॥ तिचा झाला चक्काचूर। कालरूपी वाऱ्यानें ॥ उत्तम कलम निघून गेली। ग्रंथरचना रेंगाळली ॥ ती कशीबशी पुरी केली। भगवान्-विठ्ठल

**काव्यांनीं ॥ स्वस्ती श्रीअनुभवामृत मंजिरीं । भवरूप तमाच्या पथावरी । मार्गदर्शक होवो खरी । जगासी म्हणे दासगणू ॥ ''**

'अमृतानुभव' ग्रंथ लिहून तर तयार झाला. त्यांतील तज्ज्ञ मंडळींनीं ही टीका मान्य केली तरच ती लिहिण्याचें सार्थक. अमृतानुभवांतील जाणकार मंडळींवांचून इतरांच्या उत्तम अभिप्रायाला विशेष मोल अर्थात्च नसणार. तज्ज्ञांतहि 'बोद्धारोमत्सरग्रस्ताः' असेच फार. काय करावें हा मोठा प्रश्न उपस्थित झाला.

पुणें येथील ज्ञानेश्वरीचे सुप्रसिद्ध प्रवचनकार, निष्ठावंत वारकरी व संत श्री. केशवराव महाराज देशमुख यांच्याविषयीं श्रीदासगणूंना विशेष आदर व प्रेम वाटत असे. त्यांनीं आपला हा ग्रंथ पाहावा, असें श्रीदासगणू महाराजांना वाटलें. श्री. केशवराव हे थोर अधिकारी आहेत. त्यांनीं जर अनुकूल अभिप्राय दिला तरच टीका चांगली झाली, असें मानतां येईल. तो निस्पृह पुरुष तोंडदेखलें बोलणार नाहीं, ही निश्चिति होती.

श्री. केशवराव महाराजांच्या प्रवचनास नियमानें उपस्थित असणारे व श्रीमहाराजांच्या भेटीस प्रेमानें वरचेवर येणारे श्री. नानासाहेब आठवले यांना महाराज म्हणाले,

"नानासाहेब, मी अमृतानुभवावर ओवीबद्ध टीका लिहिली आहे. ती श्री. केशवराव महाराजांनीं पहावी, अशी माझी इच्छा आहे. मी फक्त त्यांचें नांव ऐकून आहे. कांहीं प्रवचनें ऐकिलीं आहेत, पण माझी त्यांची प्रत्यक्ष ओळख नाहीं; म्हणून तुम्ही हें माझें लिखाण त्यांना नेऊन दाखवा व अभिप्राय विचारा."

त्याप्रमाणें श्री. नानासाहेबांनीं श्री. केशवराव महाराज देशमुख यांच्या कानावर ती गोष्ट घातली; पण त्यांनीं ती गोष्ट मान्य केली नाहीं. ते सरळ वृत्तीचे. आंत एक बाहेर एक असें त्यांच्याजवळ कधींच नसे. ते श्री. नानासाहेबांस स्पष्टपणें म्हणाले,

"श्रीदासगणूंना म्हणावें या भानगडींत पडूं नका. संतचरित्रें लिहिणें

आणि अमृतानुभव लिहिणें या दोन वेगवेगळ्या गोष्टी आहेत. एक जमली म्हणजे दुसरी जमेलच असें नाहीं. अमृतानुभव हा सामान्य ग्रंथ नव्हे. ज्ञानेश्वर महाराजांच्या सखोल आध्यात्मिक अनुभवाचा तो अमृतमय सांठा आहे. केवळ शब्दांच्या साहाय्यानें त्यांतील अर्थ समजणें सोपें नाहीं. अनेक लोकांनीं अमृतानुभवावर आजपर्यंत गद्यपद्यात्मक टीका लिहिल्या आहेत; परंतु शिवकल्याणाच्या मागून अमृतानुभवाच्या अर्थाचा उलगडा झाल्याचें कोणाच्याहि टीकेंत आढळून येत नाहीं. मग बुवा या भानगडींत कां पडत आहेत ? "

हा निरोप श्री. नानासाहेबांनीं श्रीदासगणू महाराजांना जशाचा तसा सांगितला. त्यांना या निरोपामुळें वाईट वाटलें. त्यापेक्षां श्री. देशमुखांच्या स्पष्टवक्तेपणांतून अनुभवास येणारा मनाचा मोकळेपणा पाहून आदरच वाटला. त्यांनीं नंतर स्वतःच श्री. केशवराव महाराज यांना एक ओवीबद्ध पत्र लिहिलें. त्याचा आशय पुढीलप्रमाणें होता.

" केशवराव महाराज, आपण अनेक वर्षे श्रीज्ञानोबारायांच्या वाङ्मयाचा निष्ठेनें व्यासंग करीत आहां. या विषयांत आपला अधिकार फार थोर आहे. वैराग्यपूर्ण केलेल्या भक्तीचा आणि निष्कामवृत्तीचा लाभ आपणांस झाला आहे. आपण श्रद्धायुक्त निष्ठेचे वारकरी आहां, त्यामुळें अध्यात्माच्या पीठांतील आपलें स्थान विद्वान् प्राध्यापकाचें आहे. मी या महाविद्यालयांतील विद्यार्थी आहे. श्रीसाईबाबांच्या कृपेनें, सद्गुरु श्री. वामनशास्त्र्यांच्या आशीर्वादानें मला येथें प्रवेश मिळाला आहे. होईल तसा अभ्यास करून मी परीक्षेला बसलों आणि उत्तरपत्रिका लिहिली. त्यामध्यें अनेक प्रकारच्या चुकाहि असतील; परंतु परीक्षकानें चुकांची कल्पना आधींच करून उत्तरपत्रिका तपासण्याचें नाकारणें हें योग्य होईल का ? आपण मला उत्तीर्ण करा, असें मला मुळींच म्हणावयाचें नाहीं. तसा वशिला लावणें, हें पातक आहे याची मला पूर्ण जाणीव आहे, परंतु माझें लिखाण तपासा एवढेंहि म्हणण्याचा अधिकार मला नसावा काय ? आपल्याच म्हणण्याप्रमाणें

आजपर्यंत मी संतचरित्रलेखनरूप सेवा निष्कामबुद्धीनें केली आहे. मग अध्यात्माच्या विद्यालयांत प्रवेश मिळून परीक्षेस बसण्याइतकीहि योग्यता त्या सेवेमुळें मला मिळूं नये का ? आपणांस यासाठीं नम्रपणें प्रार्थना करतों कीं, आपण माझें लिखाण तपासावें व मत कळवावें. आपल्या इतक्या योग्यतेचा पुरुष मला दुसरा कोणी आढळला नाहीं. यासाठींच आपणांस विनंति करीत आहे. इतक्यावरहि आपला नकार असल्यास माझें दुर्दैव ! सर्व लिखाण मी चंद्रभागेंत टाकून देतों. "

असें सुमारें शंभर ओव्यांचें पत्र पुण्यांतल्या पुण्यांतच पोस्टानें श्री. केशवराव महाराजांच्या पत्त्यावर पाठविलें. पत्र पोंचलें. तें वाचून श्री. केशवराव हंसले आणि श्री. नानासाहेबांस म्हणाले, " बोवा मोठा विचित्र दिसतो. नाहीं म्हणण्याची सोयच ठेविली नाहीं त्यानें. त्यानें लिहिलेलें पहिलें प्रकरण घेऊन या. कसें आहे तें पाहूं. "

त्याप्रमाणें श्री. नानासाहेबांनीं श्रीदासगणूंच्या जवळून अमृतानुभव भावार्थमंजिरीचें पहिलें ओवीबद्ध प्रकरण श्री. देशमुखांकडे नेऊन दिलें. नीट लक्षपूर्वक वाचून ते म्हणाले, " नानासाहेब, बुवांच्या जवळून सर्व ग्रंथ घेऊन या. मी तो वाचीन पण त्याला वेळ लागेल. घाईनें उरकणारें हें काम नाहीं. " त्याप्रमाणें हा निरोप श्री. नानासाहेबांनीं श्रीदासगणूंना सांगितला.

" महाराज, देशमुखांना तुमचा ग्रंथ आवडल्यासारखा दिसतो. त्यांनीं सर्व टीका पाहण्यासाठीं मागितली आहे; पण बरेच दिवस लागतील. तोंवर सर्व कागद त्यांच्याकडे राहिले तर चालतील का ? "

" हो. हो. का नाहीं ? श्री. केशवराव माझें लिखाण पहाणार आहेत. यांतच मला सर्व भरून पावलें. "

श्री. देशमुखांना देण्यासाठीं सर्व ग्रंथ श्री. नानासाहेबांना देण्यांत आला. या गोष्टीस पांच सहा महिने लोटले. पुढें दसऱ्याचे वेळीं नेहमींच्या कार्यक्रमाप्रमाणें महाराज पंढरपुरास गेले. कार्तिक शुद्ध एकादशीच्या दिवशीं सकाळींच श्री. केशवराव महाराज श्रीदासगणूंच्या घरीं

दामोदराश्रमांत आले. शुद्ध तुळशीच्या मंजिरींचा एक मोठा हार त्यांनीं बरोबर आणिला होता. तो स्वागतास पुढें आलेल्या श्रीदासगणूंच्या गळ्यांत घालून लवून नमस्कार केला आणि घट्ट आलिंगन देऊन ते भारावलेल्या स्वरानें म्हणाले,

"उत्तम झाली आहे तुमची टीका. मला क्षमा करा. मी उपेक्षा-बुद्धीनें आपणांस वाटेल तें बोललों. खरोखरीच सांगतों. अमृतानुभवा-वरील सर्व टीकांत शिवकल्याणांच्या नित्यानंददीपिकेमागून तुमच्याच भावार्थमंजिरीचें नांव घ्यावें लागेल."

श्री. केशवराव महाराजांच्या या वागण्याबोलण्यामुळें कोमल मनाच्या श्रीदासगणूंना थोडें भांबावल्यासारखें झालें. नम्रतापूर्वक नमस्कार करून ते श्री. केशवरावांना म्हणाले,

"ही आपली कृपा आहे. आज मला धन्य वाटलें." अमृतानुभव ग्रंथ शके १८५१ मध्यें छापून प्रसिद्ध झाला. अनेक वृत्तपत्रांचे व विद्वानांचे अनुकूल अभिप्राय मग त्यावर मिळाले; पण श्री. केशवराव महाराजांच्या शब्दाइतके महाराजांना इतरांच्या विस्तृत उत्कृष्ट अभिप्रायाचेंहि महत्त्व वाटलें नाहीं.

## २१. श्री. देशमुख महाराजांशीं प्रेमाचा ऋणानुबंध :

अमृतानुभवाच्या प्रसंगापासून श्री. केशवराव महाराज व श्रीदासगणू महाराज या दोघांचा फारच जिव्हाळ्याचा असा ऋणानुबंध जडला. श्री. केशवराव वारकरी सांप्रदायाचे कट्टर अभिमानी. 'एकविधा भाव भक्ताचा स्वधर्म' ही त्यांची निष्ठा; परंतु रामदासी पंथाच्या श्रीदासगणूंविषयींहि त्यांना विशेष आदर वाटत असे. श्रीदासगणूंच्या-कडून कांहीं पत्र, चिठ्ठी आली कीं, नमस्कारासाठीं तें पत्र आधीं मस्तकीं लावून मग वाचीत. उलट श्री. दासगणूंच्या मनामध्यें श्री. केशवराव महाराजांविषयींहि तितकाच आदरभाव होता. आपल्या अनेक अध्यात्म-विषयक अडचणी त्यांनीं श्री. देशमुखांना समक्ष वा पत्ररूपानें

कळवाव्या व त्यांचा सल्ला मागावा. दोन थोर माणसें एकमेकांशीं किती प्रेमादरानें वागतात, हें ह्या दोघांच्या वर्तनावरून पाहावयास मिळे. एक प्रसंग या दृष्टीनें उल्लेखनीय आहे.

गुरूपदेशाच्या वेळीं दासगणू महाराजांच्या गळ्यांत त्यांनीं घातलेली जी माळ होती, ती पुढें फार दिवस टिकली नाहीं. श्री. वामनशास्त्री कैलासवासी झाल्यावर मग माळेचा विशेष प्रश्नहि उरला नाहीं. पुढें श्रीदासगणू महाराज कीर्तनें करूं लागल्यावर एकदां सहज धामणगांवास गेले होते. श्री. माणकोजी बोधले या नांवाचे एक फार थोर सत्पुरुष या गांवीं होऊन गेले आहेत. त्यांचें चरित्र मोठें रमणीय आहे. त्यावर एक अत्यंत रसाळ असें आख्यान रचून श्रीबोधलेबोवांच्या समाधीपुढें श्रीदासगणूंनीं कीर्तन केलें. सर्व लोक त्या आख्यानांतील अभिनवता, निर्दोष मांडणी आणि पराकाष्ठेचें भक्तिप्रेम पाहून संतुष्ट झाले. श्रीबोधलेबोवांच्या गादीवर असलेल्या गृहस्थांनीं कीर्तनानंतर श्रीदासगणू महाराजांविषयींचा आदरभाव व्यक्त करण्यासाठीं कांहीं चांगलीं वस्त्रें व बरेंच रोख रुपये याप्रमाणें बिदागी आणली. श्रीदासगणूंनीं ती भेट नाकारली.

“वा ! असं कसं बोवा ? आम्ही आपल्यासारख्यांचा आदर करावयाचा नाहीं, तर करावयाचा तरी कोणाचा ? हा श्रीबोधलेबोवांचा प्रसाद समजा. बिदागी नव्हे.”

“प्रसाद म्हणून देणार असाल, तर हें नको. श्रीबोधलेबोवांच्या समाधीवर जी टपोऱ्या मण्यांची तुळशीची माळ आहे, ती तेवढी मला द्या. हा खरा प्रसाद आहे. माझें रामदासीपण आज वारकरीपणाशीं मिळून जाऊं दे.”

श्रीदासगणू महाराजांना ती माळ देण्यांत आली. तीच त्यांच्या गळ्यांत पुष्कळ दिवस होती. पुढें पुढें त्या माळेंतील मणीहि झिजून उलून कमी होऊं लागले, त्यावेळीं तुळशीची तशीच एक नवीन माळ बनविली. ती कोणा तरी पवित्र माणसाच्या हातानें धारण करावी, या भावनेनें श्री. केशवराव महाराजांच्या हातांत देऊन स्वतःच्या गळ्यांत

घालण्यास विनविलें. श्री. केशवराव महाराज या गोष्टीस तयार होईनात. 'आपल्याला माळ घालण्याचा मला काय अधिकार महाराज ?' असें ते नम्रपणानें म्हणाले; पण श्रीदासगणू महाराजांच्या आग्रहापुढें त्यांचें चाललें नाहीं.

श्री. केशवरावांनीं ती माळ श्रीदासगणू महाराजांच्या गळ्यांत घातली. दोघांनीं परस्परांस कडकडून मिठी मारली. श्रीदासगणूंचें हृदय तर भावभक्तीचा सागरच. त्यांचे डोळे अशा प्रसंगानें तेव्हांच ओघळूं लागतात; परंतु श्री. केशवरावांच्याहि डोळ्यांतून अश्रु ओघळूं लागले. मी लहान होतों; पण तो प्रसंग माझ्या डोळ्यांपुढें आजहि जसाच्या तसा उभा आहे.

मी जीं कीर्तनें करूं लागलों, त्यांची पहिली सुरवात ती. दादांनीं ( श्रीदासगणूमहाराजांनीं ) श्री. केशवरावमहाराजांच्या हातूनच करविली. मी १५-१६ वर्षांचा असेन त्यावेळीं. पहिलें कीर्तन म्हणून पूर्वरंग आणि आख्यान पार घोकून तयार केलें होतें. दोन तीनदां रंगीत तालीमहि केली. पण ज्यावेळीं कीर्तनाला उभा राहिलों, श्री. केशवरावमहाराज देशमुख, त्यांचे एकनिष्ठ भक्त रावबहादूर गोविंदराव वैद्य इत्यादि मंडळी श्रोते म्हणून बसलेली पाहिली, त्यावेळीं अक्षरशः माझ्या अंगाला घाम सुटला. " वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते " अशी माझी स्थिति झाली. पाठ केलेल्यांतील एक अक्षरहि आठवेना आणि नवीन काय बोलावें, तेंहि सुचेना. अर्ध्यापाऊण तासांत कसें-बसें सर्व आख्यान गुंडाळून मी खालीं बसलों. त्यावेळीं कीर्तनाची माळ श्री. केशवरावांनींच माझ्या गळ्यांत घातली आणि ते माझ्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाले,

" बाळ, अरे नदी उगवते तेथें टिपटिपतच असते. तिचा मोठा प्रवाह पुढें होतो. कांहीं काळजी करूं नकोस. घाबरावें कोणाला ? श्रीदासगणूंच्या कृपेनें सर्व ठीक होईल. " कीर्तनाला उभा राहिलों कीं, आजहि तो प्रसंग मला बऱ्याच वेळीं आठवतो. त्यावेळीं ती. दादा मला म्हणाले होते.

" अरे, पाठ करून उभा राहिलास म्हणून फजिती झाली. पाठ करून कधीं कथा करूं नये. आज आपल्याला काय सांगावयाचें आहे, त्या विषयापुरती आधीं तयारी करणेंहि फारसें चांगलें नाहीं. खूप वाचावें, खूप विचार करावा आणि प्रामाणिकपणें आपणांस वाटतें तें स्पष्ट सरळ शब्दांत सांगावें. पुन्हां घोकण्याच्या भानगडींत कधीं पडूं नकोस. " हा उपदेश मी अक्षरशः पाळला आणि त्याचा मला फार उपयोगहि झाला. असो.

श्रीदासगणू महाराज हे वारकरी सांप्रदायांतील अनुग्रहीत नाहींत. पंथानें ते रामदासी आहेत. ते स्वतःला श्रीसाईबाबांचे भक्त म्हणवितात. ही खिचडी वाटे लोकांना. कट्टर वारकरी आणि पुष्कळसे मठपतिहि आरंभीं आरंभीं श्रीदासगणूमहाराजांना दुजाभावानें वागवीत. कांहीं दुराग्रही मंडळी तर शक्य होईल तेथें त्यांचा पाणउतारा करण्याचाहि प्रयत्न करीत. कीर्तनांत मेलेले साप टाकणें, बेटकुळ्या सोडणें यासारखे प्रसंग तर पुष्कळच घडत. एकदां अतिप्रसंगाची पराकाष्ठा झाली. पंढरपूरच्या जुन्या पेठेंतील चौकांत श्रीदासगणू महाराजांचें कीर्तन चालू होतें. साथीला मागें श्री. दामूअण्णा आणि श्री. किसनराव होते. दोन अडीच हजार लोक कथा ऐकण्यांत तल्लीन झाले होते. कथा ऐन रंगांत आली होती. तोंच कोणी तरी तीन चार डुकरें आणून त्या गर्दींत सोडलीं. ईऽशीऽ करीत लोक बाजूला होऊं लागले. फार गडबड उडाली. गोंधळ झाला. डुकरें आलीं तीं थेट महाराजांच्या पायाशीं असलेल्या मोकळ्या जागे-पर्यंत. तेथें तीं थोडीशी घोटाळलीं. कथेचा विक्षेप झाला; पण त्याचा राग न धरतां हंसून श्रीदासगणू महाराज आपल्या खणखणीत आवाजांत गर्जून म्हणाले, "श्रोते हो, मुळींच गडबड करूं नका, शांत रहा. बिचाऱ्या डुकरांना श्रीहरीचे गुणानुवाद ऐकण्याचा प्रसंग कधीं येणार ? त्यांनीं ईश्वराकडे अर्ज केला. ' पंढरपुरांत नामांकित कीर्तनें होत आहेत; पण फार कामामुळें आम्हांला तिकडे जातांच येत नाहीं. आम्हांला रजा मिळावी. थोडा तरी कीर्तनश्रवणाचा लाभ मिळावा.' ईश्वरानें उत्तर पाठविलें.

'डुकरांनो, आपापलें कर्तव्य करीत राहणें हीच माझी भक्ति आहे; परंतु तुम्ही जर कोणाला बदली देत असाल आपलें काम करण्यास, तर कीर्तनाला जावयाला माझी ना नाहीं' पंढरपूरचे कांहीं वारकरी मोठे दयाळू. ते डुकरांना म्हणाले, 'बाबांनो, जा तुम्ही आजच्या कथेला. आम्ही तुमचें काम करतों.'"

श्रीमहाराजांचें हें भाषण ऐकतांच सर्व समाज असा खदखदून हंसला कीं, विचारतां सोय नाहीं. विक्षेपामुळें आलेला व्यत्यय पार दूर झाला आणि कीर्तनकारांच्या समयसूचकतेचें कौतुक करीत व खेळकर शांतपणाविषयीं आदर बाळगीत श्रोते पुन्हां कथानंदांत रंगून गेले. श्री. तात्यासाहेब कवठाळकरांसारखे कांहीं पंढरपूरचे लोक त्यावेळीं घडणाऱ्या या तऱ्हेच्या गमती आजहि मोठ्या मौजेनें सांगतात. श्रीदासगणूमहाराज याविषयीं सांगतांना म्हणतात कीं, "मला पंढरपुरांत आरंभीं विटाळ होता. पुढें बरेच दिवसांनीं तो गेला. गेल्या कांहीं वर्षांत मात्र मी पूर्णपणें सोवळा झालों आहें."

पंढरपुरांत असलेला श्रीमहाराजांविषयींचा हा दुजाभाव पुढें पार नष्ट झाला. सगळ्या मठपतींच्या मठांतून मग श्रीदासगणूमहाराजांचीं कीर्तनें वरचेवर होऊं लागलीं. कांहीं तर त्यांचे जीवश्चकंठश्च मित्र बनले. कै. श्रीमहिपतीमहाराज यांचें नांव या मैत्रीचें उत्तम उदाहरण म्हणून सांगतां येईल. कै. श्री. थोरल्या अंमळनेरकरमहाराजांच्या प्रेमळ आग्रहावरून श्रीदासगणूमहाराज रामानुजपद्धतीचे दोन्ही बाजूला गोपीचंदनाचे रुंद पट्टे व मध्यंतरीं कुंकवाची जाड रेघ अशा रीतीचें गंध कपाळावर लावूं लागले. थोरले अंमळनेरकरमहाराज होते, तोंपर्यंत कुंकवाकरितां आरसा बसविलेली चांदीची डबी व गंध लावण्यासाठीं चांदीची काडी ते दर वर्षीं प्रेमाची भेट म्हणून श्रीदासगणूंना देत. महाराजहि प्रतिवर्षीं अंमळनेरकरांना आपल्या घरीं (पंढरपूर येथील दामोदराश्रम) बोलावून विशेष आदरानें सत्कार करीत. पंढरपुरास झालेल्या मंदिरप्रवेशाच्या भानगडीपर्यंत ही पद्धति चालू होती.

गेल्या कित्येक वर्षांत श्रीदासगणूंविषयींचा दुजाभाव कोठें आढळत नसला तरी विविध संप्रदायाचें मिश्रण असणाऱ्या त्यांच्या आचार-पद्धतीविषयीं मात्र अद्यापहि कांहींच्या मनांत थोडी शंका आहेच. महाराजांच्या आचारपद्धतींतील ही विविधता त्यांच्या तत्त्वज्ञानविषयक सिद्धातांतून निर्माण झाली आहे, हें मात्र येथें लक्षांत ठेवलें पाहिजे.

## २२. व्रतें व अनुष्ठानें :

तीर्थजननी गोदावरीच्या कांठीं मराठवाड्यामध्यें 'रत्नेश्वराची रामपुरी' या नांवाचें एक रमणीय क्षेत्र आहे. त्या ठिकाणीं गायत्रीचें चोवीस लक्षांचें पुरश्चरण करण्याचें महाराजांनीं ठरविलें. आपल्या बरोबरीच्या वीस पंचवीस मंडळींसह महाराज अनुष्ठानाच्या उद्देशानें तेथें गेले असतांना ग्रामस्थ म्हणाले,

"येथें पुरश्चरण करण्याचा विचार सोडून द्या. आजपर्यंत कोणाचेंहि पुरश्चरण येथें तडीस गेलें नाहीं. अनेक तऱ्हेचीं संकटें येतात. कित्येक वेळां कर्त्याच्या जीवासहि धोका होतो. असा अनेक वर्षांचा अनुभव आहे."

श्रीदासगणूमहाराज म्हणाले, "माता गायत्रीचें पुरश्चरण करतां करतांच जर मरण येणार असेल, तर यापेक्षां अधिक भाग्याची गोष्ट कोणती? पुरश्चरणाच्या हेतूनें मी येथें श्रीरत्नेश्वराच्या चरणीं आलों आहें. पुरश्चरण न करतां परत जाणार नाहीं."

समागमें असलेल्या मंडळींचा धीर थोडा खचल्यासारखा झाला होता. परंतु श्रीदासगणू महाराजांवर विश्वास असल्यानें कोणी बाहेर कांहीं दाखविलें नाहीं. पुरश्चरण योग्य प्रकारें सुरू झालें. रात्रींच्या वेळीं मंदिराच्या जवळच असलेल्या जंगलांतून रडण्यासारखा एक विचित्र आवाज येत असे. बरोबरची मंडळी फारच घाबरली. येणाऱ्या संकटाची ही पूर्वसूचना वाटली सर्वांना. महाराज शांत होते. ते म्हणाले, "जें स्वतःच रडतें, त्याला रे कसले भितां?" पुरश्चरणा-

करितां आलेल्या लोकांत श्री. भगवानराव मांजरमकर या नांवाचे भूतविद्या, जादूटोणा यांच्या अभ्यासांत कांहीं वर्षें घालविलेले व कंटाळून नंतर भक्तिमार्गी बनलेले महाराजांचे एक निस्सीम भक्त होते. ते बरोबर दोन धीट माणसें घेऊन त्या आवाजाच्या शोधासाठीं रात्रीं दहा वाजतां निघाले. ज्या बाजूस जावें, त्याच्या विरुद्ध बाजूस रडण्याचा आवाज येत असे. दोन तीन तास हिंडून सर्व जंगल धुंडाळूनहि हा आवाज कोणाचा, कोठून येतो, याचा पत्ता लागला नाहीं. चार पांच दिवस हा आवाज येत होता. मग पुढें मात्र येईनासा झाला. सर्व पुरश्चरण निर्विघ्नपणें पार पडलें.

पुरश्चरणाचा दैनिक कार्यक्रम एखाद्या ऋष्याश्रमांत शोभण्यासारखा नियमबद्ध, पवित्र व धार्मिक असे. सकाळीं साडेचार वाजतां सर्व मंडळी झोपेंतून उठत. प्रातर्विधी उरकून पांच ते सहा प्रातःस्मरण करीत. अनेक प्रकारच्या भूपाळ्या म्हणत, नंतर सहा वाजतां नदीवर सर्वांचीं स्नानें होत. अर्ध्या तासांत आपापलें संध्यावंदनादि आन्हिक उरकून साडे सहा वाजतां सर्वजण गायत्रीच्या जपास बसत. बसण्यासाठीं प्रत्येकाला खालीं कुशासन व वर मृगचर्म घातलेलें असे. जपाचा कार्यक्रम दुपारीं बारा वाजेपर्यंत चाले मग भिक्षा होई. महाराजांच्याविषयीं आदर असलेला कोणी तरी एक स्नेही ही भिक्षा करी. ज्या दिवशीं अन्य कोणी नसे, त्या दिवशीं श्री बाबासाहेब नांदेडकर भिक्षा करण्यास सिद्ध असत. भोजनोत्तर थोडी विश्रांति घेऊन दोन वाजतां श्रीज्ञानेश्वरी, दासबोध, गाथा, श्रीमद्भागवत इत्यादि ग्रंथांचें वाचन होई. मधून मधून श्रीदासगणू महाराज त्यांतील एखाद्या ओवीवर विवेचन करीत. हा कार्यक्रम पांच वाजेपर्यंत चाले. नंतर सर्व मंडळी संध्यावंदनादिकाकरितां गोदेवर जात. परत आल्यावर भजन व धूपारती होई. थोड्याशा अल्पोपहारानंतर रात्रीं नऊ वाजतां सर्व व्रती निद्रावश होत.

श्रीदासगणूमहाराज साठीनंतरच्या उतरत्या वयांतहि सर्व कार्यक्रम निष्ठेनें व निग्रहानें पार पाडीत. इतरांनाहि मग आपल्या वागणुकींत

अळंटळं करतां येत नसे. या कार्यक्रमाव्यतिरिक्त महाराजांचे नित्य-नियमाचे विष्णुसहस्रनामाचे बारा पाठ असतच. हें विष्णुसहस्रनाम जणुं त्यांचें जीवन बनलेलें आहे. कान्ह्या भिल्लाच्या प्रकरणापासून सुरू झालेलें हें व्रत आज ५६–५७ वर्षें झालीं, अखंडपणें चालू आहे. जीवावरचीं तीन चार दुखणीं येऊन गेलीं; पण त्या मुदतींतहि विष्णुसहस्रनामाच्या पाठांत कधीं खंड पडला नाहीं. मध्यंतरीं त्या व्रताचें उद्यापनहि झालें, परंतु पाठ करणें कांहीं थांबलें नाहीं. बाराच पाठ करावे, असा नियम राहूं नये व पाठ न झाला तरी चालावें यासाठीं वास्तविक उद्यापन केलें; परंतु अलीकडे पाठांची संख्या अधिकच झाली आहे. असो.

पुरश्चरण यथासांग पार पडलें. सांगतेच्या वेळीं देवतेच्या प्रस्थापने-साठीं श्रीयंत्र मिळालें, तर उत्तम असें ब्राह्मणांनीं सांगितलें. समाप्तीच्या आधीं तीन चार दिवस एक अतिशय वृद्ध ब्राह्मण गृहस्थ श्रीदासगणू-महाराजांकडे आले आणि म्हणाले,

“ श्रीवासुदेवानंद सरस्वतीमहाराजांनीं हें यंत्र आपणांस द्यावें, असा दृष्टान्त स्वप्नांत दिला. त्याप्रमाणें मी तें आपणांस देण्यासाठीं आलों आहें. स्वामीमहाराजांनींच हें श्रीयंत्र उपासनेसाठीं फार पूर्वीं मला दिलें होतें. आतां आपण त्याचा स्वीकार करा. ”

“ श्रीस्वामीमहाराजांनीं तुम्हांला दे म्हणून दृष्टान्त दिला; पण घे म्हणून मला कोठें दृष्टान्त दिला? केवळ तुमच्यावर भरंवसून उगीच्या उगीच या वस्तूचा स्वीकार मी कसा करूं ? ”

तो गृहस्थ केविलवाणेपणानें म्हणाला, “ महाराज, काय सांगूं आपणांला! आजपर्यंत जीवाभावानें संभाळलेली ही वस्तु आहे. हिच्या सेवेव्यतिरिक्त मीं आयुष्यांत कांहीं केलें नाहीं. माझ्या लेखीं हिचं मोल करतां येणार नाहीं, इतकें आहे. उगीच्या उगीच हें यंत्र दुसऱ्याच्या स्वाधीन करण्याला मी कसा धजेन? श्रीस्वामीमहाराजांची आज्ञा म्हणूनच मी हें आपणांस देण्यास आलों आहें. आपण स्वीकार करीपर्यंत मी अन्न घेणार नाहीं. ”

तो वृद्ध गृहस्थ अन्नाचा एक कणहि न घेतां दोन दिवस महाराजांपुढें निग्रहानें बसून राहिला. इतरांनीं मग महाराजांना म्हटलें, "आपणहून अनुष्ठानाच्या समाप्तीकरतां लागणारें श्रीयंत्र घरीं चालत आलें आहे. उगाच कां नाकारावें? मुद्रेवरून हा गृहस्थ खोटें सांगेल, असें वाटत नाहीं. गृहस्थ भाविक दिसतो. बरं, ती वस्तु आपणांस देण्यांत त्यास कांहीं अपेक्षा आहे, असेंहि नाहीं."

"हा गृहस्थ श्रीटेंबेस्वामींजवळ होता," असें श्री. त्र्यंबकराव वाकुडकरांनींहि सांगितलें.

श्रीदासगणूमहाराजांना काय वाटलें कोणास ठाऊक. त्यांनीं तें पवित्र श्रीयंत्र स्वीकारलें. महाराजांच्या पूजेंत तें आजहि आहे. महाराजांनीं यंत्र स्वीकारतांच वृद्धास फार आनंद झाला. मोठ्या प्रेमानें नमस्कार करून तो परत निघून गेला. पुरश्चरणाच्या समाप्तीचें होमहवन यथाविधी पार पडलें. सर्व गांवास पक्वान्नाचा भंडारा झाला. सात आठ हजार माणसांनीं गायत्रीचा प्रसाद म्हणून जेवण केलें. यावेळींच 'गायत्रीस्तव' या नांवाचें २८३ ओव्यांचें एक स्तोत्र श्रीदासगणूमहाराजांनीं लिहिलें आहे. त्या स्तोत्राच्या शेवटीं ते म्हणतात,

**"अभ्युदय चहू वर्णांचा। करी उद्धार राष्ट्राचा। व्हावा वेदोक्त धर्माचा। जयजयकार चोहींकडे॥ प्रभवनाम संवत्सरीं। पुनित गोदेच्या उत्तरतीरीं। पाहून रत्नेश्वरनामपुरी। पुरश्चरण मीं केलें॥ आम्ही सोळा जणांनीं। एके ठायीं मिळोनी। पुरश्चरणालागोनी। आरंभ तुझ्या केला असे॥ मी भगवान-मांजरमकर। त्र्यंबकराव वाकुडकर। नानू बाप्पाजी आळेकर। माधव दत्तू गोविंदा॥ विठ्ठल नारायण दिगंबर। भगवान त्र्यंबक खंदारकर। राम भगवान माझोडकर॥ हे आम्ही सोळाजण॥ या आम्ही अवघ्यांनीं। तव पायीं निष्ठा ठेवुनी। शक्य तीं व्रतें पाळुनी। पुरश्चरण केलें कीं॥ आम्हीं न यांत विशेष केलें। स्वधर्मातें पाळिलें। तुझ्या दृष्टीखालीं भले। कांकीं तूं माय आमुची॥ न्यूनाधिक जें कांहीं। घडलें असेल ये ठायीं। त्याची क्षमा करी गे आई। रोष आमचा धरूं नको॥ आम्हां अवघ्यांचा दंडवत। असो मातुःश्री तुजप्रत। सद्वासना मनांत उत्तरोत्तर**

**उपजावी ॥ आमुच्या बऱ्या वाईटाची । काळजी तूं वाहणें साची । हेंच दासगणू याची । कर जोडून अत्यादरें ॥ शांति शांति त्रिवार शांति । असो या चहु वर्णांप्रती । इहपरलोकींची यात्रा ती । होवो सुखद सर्वांची ॥ "**

श्रीदासगणू महाराजांनीं शके १८४९–५०–५१ अशीं क्रमानें तीन वर्षें गायत्रीचीं तीन पुरश्चरणें केलीं. त्यांतील पहिलें हें रत्नेश्वर रामपुरीस केलेलें २४ लक्षांचें, दुसरें वऱ्हाडांतील लोणार-मेहकर येथें केलेलें १२ लक्षांचें व तिसरें सुप्रसिद्ध ज्योतिर्लिंग भीमाशंकर येथें केलेलें ३ लक्षांचें. हीं तिन्हीं पुरश्चरणें सामुदायिक स्वरूपाचीं होतीं. पवित्र आचरणाची काय गोडी आहे व त्यामुळें कशी मनःशांति मिळते, हें साधकाच्या नीट लक्षांत यावें, यासाठींच या पुरश्चरणांचें अनुष्ठान होतें.

शके १८४३ च्या सिंहस्थामध्यें श्रीदासगणू महाराजांनीं गोदेची प्रदक्षिणा पायीं केली. पस्तीस मंडळी मिळून महाराजांच्या समागमें यात्रेस निघाली होती. रोज सकाळीं उठून पांचसहा कोस चालावें व सोईस्कर गांव पाहून मुक्काम करावा. गांवामधील सर्व व्यवस्था श्री. दामूअण्णा ठेवीत. श्री. भगवानराव माजरमकर यांचा उल्लेख मागें एक-दोन वेळां आला आहे. हे हरहुन्नरी आणि निष्ठावंत गृहस्थ सर्व मंडळींचीं पादत्राणें नीट करण्याचें काम करीत. यांची सेवावृत्ति खरोखरीच अलौकिक होती. जातीनें हे ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण; पण अमुक एक काम मी करीत नाहीं, असें ते कधींहि म्हणाले नाहींत. भीमाशंकर येथील गायत्रीपुरश्चरणाचे वेळीं श्रीदासगणू महाराजांना प्रायश्चित्त-विधीसाठीं क्षौर करणें अवश्य होतें. सह्याद्रीच्या त्या शिखरावर न्हावी कुठला ? शेवटीं महाराजांच्या सहवासांत कांहीं दिवस घालविण्यासाठीं इंदूरहून मुद्दाम आलेले श्री. भगवानराव बनसोडे यांचीं स्मश्रूचीं साधनें घेऊन श्री. भगवानराव माजरमकरांनींच तें काम पार पाडलें. गंगा-प्रदक्षिणेच्या वेळीं बरोबरीचें सामान नीट बांधणें व गांवांतून आणलेलें सामान ज्याचें त्यास परत करणें हीं कटकटीचीं कामेंहि श्री भगवानराव

माजरमकर करीत. नासधूस न होऊं देतां कोठी कशी संभाळावी हें त्यांचेपासून शिकावें.

प्रदक्षिणेच्या वेळीं दुपारीं निरनिराळ्या पोथ्यांचें पारायण व रात्रीं भजन होऊन सर्व यात्रेकरू निद्रा घेत. दुसरे दिवशीं सूर्योदयापूर्वी प्रवासास आरंभ होई. सामानासुमानासाठीं बरोबर बैलगाड्या होत्या. या यात्रेचे वेळीं एक चमत्कार वाटण्यासारखी आश्चर्यकारक गोष्ट घडली आहे. प्रदक्षिणेस सुरवात करतांच दुसऱ्या तिसऱ्या दिवशींच श्रीमहाराजांच्या या मंडळीबरोबर एक कुत्रा आला. उंच आणि पुष्ट बांध्याचें हें जनावर दिसण्यांत उग्र दिसत असलें तरी त्याच्या स्वभावामध्यें फार अलौकिकता होती. चालतांना तो कुत्रा महाराजांच्या मागें पुढें असे. भजनाचे वेळीं कान टवकारून समोर बसे. रात्रीं बैलगाड्यांच्या भोंवतीं राहून सामानाची राखण करी. बरोबर कडक सोवळें असलेली कांहीं स्त्रीपुरुष मंडळी होती; पण त्यांच्या वस्त्रपात्रांस हा कधीं शिवला नाहीं. एकादशीसारख्या उपासाच्या दिवशीं तो भाकरीस तोंड लावीत नसे. महाराजांनीं त्याचें नांव कौतुकानें गंग्या ठेविलें होतें. पहिल्या दोन तीन दिवसांत त्याला हकलून देण्याचा मंडळींनीं प्रय न केला; पण त्याचे सद्गुण प्रत्ययास आल्यावर गंग्या सर्वांनाच हवासा वाटूं लागला. रोज आपणहून गंगास्नान केल्याशिवाय गंग्या कधीं राहिला नाहीं. सर्व तीर्थांत त्यानें स्नान केलें. त्र्यंबकेश्वरीं कुशावर्त तीर्थांत माणसासहि स्नान करूं देत नाहींत. गंग्याचा स्वभाव माहीत असल्यामुळें महाराजांनीं त्यास आवरून धरण्यास सांगितलें होतें; पण सर्वांची नजर चुकवून गंग्या कुशावर्तांत बुडी मारून आलाच. परकें कुत्रें दिसलें कीं, कुत्रीं कशीं गुरगुरत उठतात व त्यांची कशी कळवंड जुंपते, हें सर्वांस माहीत आहे; पण रोज नवीन गांवांत येत असूनहि कोणतेंहि कुत्रें गंग्यावर भुंकलें नाहीं. अंगावर धांवून येण्याची गोष्ट तर दूर राहिली. उलट गांवांतील कांहीं कुत्रीं गंग्याबरोबर पुढच्या गांवापर्यंत येऊन परत जात. महाराजांचें या गंग्यावर फार प्रेम होतें. त्याच्या

खाण्यापिण्याची चौकशी ते स्वतः करीत. गंगाप्रदक्षिणा झाल्यानंतर त्यांनीं या कुत्र्याला संभाळण्यासाठीं हिंगोलीचे वकील श्री. दादासाहेब वरूडकर यांचे स्वाधीन केलें होतें; पण गंग्या तेथें राहिला नाहीं. कुणीकडे निघून नाहींसा झाला.

गंगाप्रदक्षिणेस श्रीदासगणू महाराजांना सुमारें तीन साडे तीन महिने लागले. ही प्रदक्षिणा त्यांनीं नाभीस्थानापर्यंतची केली होती. नांदेड हें गोदावरीचें नाभीस्थान समजण्यांत येतें. तेथून श्रीगोदावरीस उजवे घेऊन प्रदक्षिणेस आरंभ झाला. त्र्यंबकेश्वर येथील ब्रह्मगिरीस प्रदक्षिणा घालून महाराज परत फिरले आणि नांदेड येथेंच प्रदक्षिणेची समाप्ति केली. गोदामाहात्म्याचे शेवटीं समागमें असलेल्या मंडळींचा उल्लेख महाराजांनीं केला आहे. तो असा—

"हे गंगे जगन्माउली। तुझी प्रदक्षिणा आम्हीं केली। होती पस्तीस मंडळी। स्त्रीपुरुष समागमें॥ दामू, केशव, भगवान्। मारुती भाऊ, दंडनाईक जाण। विठोबा, जळ्या, लक्ष्मण। भारती गोसावी पर्वता॥ गोळेगांवकर संन्यासी। होते प्रदक्षिणेसी। आल्या गेल्या पाहुण्यासी। उगीच कोठवर सांगावें॥ काकी, ताई, आई, माई। गंगा, मथू, हरणाबाई। चंद्रभागा, दुर्गा आत्याबाई। ऐसा स्त्रिया होत्या कीं॥ या अवघ्यांनीं मिळून। तुझी प्रदक्षिणा केली जाण। गंगे, तुझें अभयदान। असो या अवघ्यासी॥"

या प्रदक्षिणेच्या वेळीं महाराजांना शारीरिक कष्ट फारच पडले. गोदावरी दृष्टिपंथांत ठेवून चालावयाचें असा नियम असल्यामुळें चांगला रस्ता असा कधीं मिळत नसे. फार तर पाऊलवाट मिळावयाची. काटेकुटे, दगडधोंडे आणि उंचसखलपणा यांच्या त्रासाला प्रमाणच नसे. योग्य अंतरावर राहण्यास योग्य गांव मिळेल, याची शाश्वति नसे. कित्येकदां आकाशाच्या छत्राखालींच राहण्याचा प्रसंग येई. ऊन, वारा, धूळ, थंडी, क्वचित् पाऊस यांचाहि त्रास फार होई; पण या सर्व अडचणी सोसून महाराजांनीं आपलें व्रत पुरें केलें.

शके १८६६ च्या मार्गशीर्ष महिन्यांत त्या वेळच्या मिरज संस्थानां-

तील मोडलिंबजवळच्या अरण गांवीं श्रीसांवतामहाराजांच्या समाधीसमीप श्रीदासगणू महाराजांनीं संहिता स्वाहाकार केला. युद्धजन्य परिस्थितीमुळें अन्नधान्याची परिस्थिति मोठी बिकट होती; पण महाराजांचें हें कार्य कोणतीहि उणीव न पडतां मोठ्या थाटानें पार पडलें. श्रीमंत राजे तात्यासाहेब पटवर्धन यांचे या कामीं बरेंच साहाय्य झालें. शके १८७२ च्या फाल्गुन वद्य एकादशीस गोरटें येथें रुक्मिणी-पांडुरंगाच्या मूर्तींची स्थापना केली. शके १८७४ च्या कार्तिक वद्यांत पंढरपूर येथें भागवत स्वाहाकार केला. शके १८७५ च्या फाल्गुन महिन्यांत गोरट्यास श्रीपांडुरंगाचे समोरच्या बाजूस शनिदेवाची स्थापना केली. त्यावेळीं मीं मुद्दाम प्रश्न केला,

"दादा, पांडुरंगाची स्थापना केल्यावर पुन्हां शनीची प्राणप्रतिष्ठा करण्याची आवश्यकता कां वाटली ?"

"हें बघ, मामलेदारापुढें पट्टेवाला अवश्य पाहिजे. लोकांच्या धार्मिकतेच्या मुळाशीं असलेल्या मनोवृत्तीची तुला कल्पना नाहीं. माणूस जी एकादी गोष्ट करतो, ती कोणत्या तरी धाकानें वा लालुचीनें. शनीचा धाक वाटतो लोकांना. माझ्या पांडुरंगाचा नाहीं. शनीसाठीं लोक येथें येतील आणि मग पांडुरंगास नमस्कार केल्यावांचून जाणार नाहींत. पांडुरंगाच्या स्थापनेच्या वेळेपेक्षां यावेळीं किती अधिक गर्दी झाली, हें पाहिलेंस ना तूं ? पांडुरंगाला लोकांनीं नुसता नमस्कार केला, पण स्थापना झाल्यावर शनीपुढें पांचशें नारळ फुटले. आहे कीं नाहीं मौज ?"

असें स्पष्टीकरण होतांच मला अर्थातच फार बरें वाटलें. मी आतांपर्यंत अनेक वेळीं असें अनुभविलें आहे कीं, श्रीदासगणू महाराजांच्या या निरनिराळ्या व्रतानुष्ठानामागें त्यांचा जीवनहेतुच कोणत्या ना कोणत्या रूपानें अधिष्ठित असतो. लौकिकासाठीं त्यांनीं आजपर्यंत एकहि कृत्य केलें नाहीं. त्यांच्या सर्व जीवनांत कोणताहि क्षण स्वार्थसाधनाकरितां घालविला आहे वा कोणत्याहि गोष्टीची कधीं विशेष अपेक्षा केली आहे, असें मला आठवत नाहीं.

'यथालाभांत संतोष' हें अनासक्तीचें दृश्यरूप मानलें तर श्रीदासगणू महाराजांच्या आयुष्यक्रमांत त्याचा पुरेपूर प्रत्यय आलेला आहे. निरनिराळ्या उत्सवांच्या रूपानें त्यांनीं प्रतिवर्षीं सहस्रावधि रुपये खर्च केले; पण एक पैहि कधीं शिल्लक टाकली नाहीं. ज्या वेळीं जसें जमेल तसें त्यांनीं केलें. आग्रह असा कधीं कोणताच धरला नाहीं. वर्षांतून श्रीज्ञानेश्वर महाराजांची पुण्यतिथि, दासनवमी, तुकारामबोवांची बीज, नाथषष्ठी, श्रीसद्गुरु वामनशास्त्र्यांची पुण्यतिथि व श्रीसाईबाबांचा दसऱ्याचा उत्सव हे सत्पुरुषांच्या निमित्तानें केले जाणारे उत्सव, रामनवमी, परशुरामजयंती, नृसिंहजयंती, कृष्णजयंती, वामनजयंती अशा जयंत्या ते समारंभानें साजऱ्या करतात. त्यांची पद्धति ठरलेली आहे. सकाळीं दोन चार ब्राह्मणांकरवीं पंचसूक्त पवमानाचा व रुद्राचा देवावर अभिषेक, जयंती असेल तर जन्माचे वेळीं व संतांच्या पुण्यतिथीच्या दिवशीं संध्याकाळीं कीर्तन एवढाच कार्यक्रम महत्त्वाचा व नियमित. बाकीचें सर्व देशकालपरिस्थितीप्रमाणें बदललें जाई. याचें कारण महाराज सांगतात, तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. महाराज म्हणत,

"बाकीच्या लौकिक गोष्टी या लौकिकाकरितां व लौकिक साधनांनींच पुऱ्या होणाऱ्या असल्यामुळें व साधन इतक्या प्रमाणांतच उपलब्ध होईल, असा भरंवसा कोणीहि देऊं शकत नसल्यामुळें साधनांत जर उणीव पडली, तर चित्ताला अस्वस्थता येते. ती परमार्थाला विघातक आहे. यासाठीं लौकिक गोष्टींची अभिलाषा न धरणेंच उचित. अमुक इतकीं माणसें जेवावयास घालीन, अमक्याला अमुक देईन, असा नियम करणें म्हणजे आपल्या जिवाची उगाच ओढाताण करून घेणें आहे. माझा देव भावाचा भुकेला आहे. दानधर्म करावा, अन्नसंतर्पणहि अवश्य करावें; पण त्याबद्दल आग्रह असतां कामा नये. आपल्याजवळ जमलेल्या वस्तूंचा स्वतःला मोह पडूं नये. भोगाविषयीं आसक्ति वाढूं नये. मनामध्यें विकार बळावूं नयेत. वैराग्य बाणावें म्हणून त्यागबुद्धीनें दानधर्म करावा, केला पाहिजे. मन सात्त्विक होण्यास त्याचा फार उपयोग होतो;

पण त्यासंबंधीं दुराग्रह धरणें इष्ट नाहीं. कारण मग दानाकरितां साहित्य जमविण्यांतच मनुष्याला वाममार्ग पतकरावे लागतील. ‘ जोडुनियां धन उत्तम व्यवहारें । उदास विचारें वेंच करी ’ या श्रीतुकाराम महाराजांच्या वचनांतील प्रत्येक शब्द महत्त्वाचा आहे. परमेश्वराच्या लेखीं गोकुळांत पेंद्यानें दिलेलें शिळें ताक आणि इंद्रप्रस्थामध्यें धर्मराजानें राजसूय यज्ञप्रसंगीं मोठ्या समारंभानें केलेली अग्रपूजा हीं दोन्हीं सारखींच आहेत.”

मला केलेल्या उपदेशांत-छात्रबोधांत-या कार्यक्रमासंबंधीं पुढील ओव्या त्यांनीं लिहिल्या आहेत.

> “ पंढरीची वारी चुकूं नको । दासनवमी टाकूं नको । ज्ञानेश्वरा विसरूं नको । तैसें नाथ-तुकोबासी ॥ साई, वामनाची पुण्यतिथि । करावी कीं यथाशक्ति । गाजावाजा भूवरतीं । तिचा कधीं न माजवावा ॥ पुण्यतिथि उत्सवार्थ । जें होईल सहजीं प्राप्त । वा जें आपणां सहज शक्य । त्यांत साजरें करावें ॥ ”

महाराजांचें हें उत्सवासंबंधींचें म्हणणें त्यांच्या वागणुकींत अक्षरशः प्रत्ययास येत असे. त्यांनीं आपल्या परिवारांतील जिवलगांजवळ अमुक उत्सव करणें आहे. शक्य होईल तें साहाय्य करावें, असें म्हणणें केलें. ग्रंथप्रकाशनासाठींहि त्यांनीं आपल्या लोकांच्याकडे कधीं द्रव्यसाहाय्य मागितलें; पण त्यांत आग्रह किंवा अभिलाषा कधींच नसे. होणारें प्रकाशन किंवा आलेला उत्सव यांमध्यें आपला कांहीं तरी हातभार असावा, असें महाराजांच्या परिचितांपैकीं बहुतेकांस वाटत असे. ते म्हणत, “ महाराज, आमच्या हातून एरवीं कांहीं घडत नाहीं. आपल्या-सारख्यांच्या निमित्तानें अशा पुण्यकृत्यांत भाग घेण्याची आम्हांस संधि मिळते. आम्हांला तिचा फायदा आपण घेऊं द्यावा. ” यामुळेंच महाराज या मंडळींना कळवीत असत.

महाराजांना ते पूर्वीं पुष्कळ फिरत असल्यामुळें निरनिराळ्या ठिकाणीं भाविकांकडून बरेंच सत्कार मिळत. उपरणीं, फेटे, धोतर-जोड्या, शाली अशीं उत्तमोत्तम वस्त्रें त्यांत असत; परंतु अशा उत्सव-

प्रसंगीं ते तीं सर्व वस्त्रें यथाधिकार वाटून टाकीत. संग्रही वृत्तीच्या परिवारांतील मंडळींशीं त्यांचे याप्रसंगीं होणारे वादविवाद ऐकणें मोठें गमतीचें असे. महाराजांच्या वृत्तींतील विनोद अशा प्रसंगीं चांगलाच अनुभवास येई. मिळालेल्या सामुग्रीपैकीं पुढचा विचार करून कांहीं शिल्लक टाकलें पाहिजे, हा विचार महाराजांच्या वृत्तीला कधींच शिवला नाहीं. आजचें भागलें उद्यांची चिंता हरीला, असाच त्यांचा स्वभाव असे. करावयास पाहिजेतच अशा व्यावहारिक गोष्टी त्यांनीं अवश्य केल्या. कारण एक उपरा प्रपंच त्यांनीं आपल्या अंगावर घेतला होता आणि तो नेटका करण्याची जबाबदारीहि पतकरली होती. पण हें सर्व करीत असतांना प्रापंचिक आसक्तीचा त्यांच्यावर कधीं परिणाम झाला आहे वा त्यांना कधीं चिंता लागली आहे, असें दिसलें नाहीं.

आम्हां भावंडांवर त्यांनीं खरोखरीच कोणताहि आजोबा आपल्या नातवंडांवर करूं शकणार नाहीं, इतकें अलौकिक प्रेम केलें. माझ्या दुखण्यामध्यें तर त्यांनीं रात्रीच्या रात्री जागून काढल्या आहेत. विष्णुसहस्रनामाचे पाठ म्हणत, माझ्या अंगावरून हात फिरवीत ते अंथरुणाजवळ बसलेले असावयाचे. जिवावरचीं अनेक दुखणीं मीं काढलीं; परंतु त्याचा फक्त शारीरिक त्रासच मला झाला. मानसिक त्रासाची व संतापाची व्यथा माझ्या दुखण्यांत कधींहि उत्पन्न झाली नाहीं. याचें कारण ती. दादांचा पवित्र वत्सल स्पर्शच यांत शंका नाहीं. माझी धाकटी बहीण गंगू ही पुण्यास श्री. मेहेंदळे यांच्याकडे दिली होती. ती १९४४ च्या मे महिन्यामध्यें दीर्घकालीन आजारानें वारली. त्या वेळीं गंगादशहराचा उत्सव आमच्याकडे होता. ती. दादा लोणावळ्याहून आले आणि समाचार घेऊन परत गेले. अनेकांना असें वाटलें होतें कीं, या दुःखामुळें आतां हा दशहरा उत्सव बंद ठेवतील. कारण त्यांची लाडकी नात दिवंगत झाली आहे; पण महाराजांच्या कार्यक्रमांत कोणताहि फरक झाला नाहीं. नातीच्या परलोकवासाचें दुःख त्यांना झालेलें दिसलें; पण कार्याला बाधक अशा शोकाचें

स्वरूप मात्र त्याला मुळींच आलें नाहीं. पूर्वीप्रमाणेंच उत्सव यथासांग पार पडला.

महाराजांच्या आंतरिक अनासक्तीचा प्रत्यय मीं असा अनेक वेळां घेतलेला आहे. स्वतःच्या दुखण्याच्या बाबतींतहि ते अत्यंत हळवे व घाबरे असतात. वेळोवेळीं डॉक्टरांना हांक मारतील. अनेक तज्ज्ञांना विचारतील. औषध घेण्यासंबंधींचा कटाक्ष पाळतील. आजूबाजूच्या लोकांना विश्रांति म्हणून लाभूं देणार नाहींत; पण या हळवेपणालाहि विचाराचें एक अधिष्ठान आहे. ‘ शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् ’ यापेक्षांहि ‘ कथेची सामग्री देह अवसानावरी ’ हा तात्त्विक हेतुच त्यांच्या आजारांतील हळवेपणाच्या मुळाशीं असे.

## २३. योग्याची भेट :

श्रीदासगणू महाराजांच्या पत्नी सौ. सरस्वतीबाई शके १८४१ च्या वैशाखांत दिवंगत झाल्या. त्यांची उत्तरक्रिया महाराज नांदेड येथें गोदावरीच्या कांठीं करीत होते. दिवस वैशाखाचे. नांदेडचा उन्हाळा फार भयंकर. संध्याकाळीं सहा वाजतांसुद्धां उष्णतेनें बाहेर तोंड काढण्याची सोय नसे. दुपारीं तर विचारावयासच नको. महाराजांच्यावर दोघांतिघांनीं छत्र्या धरल्या होत्या आणि क्रियाकर्म चालू होतें. त्यावेळीं भर उन्हांत एक साधूसा दिसणारा पुरुष खडकावर बसला होता. अंगावर एका लंगोटीशिवाय कांहींहि वस्त्र नव्हतें. शरीर अत्यंत कृश, पण त्वचा नितळ व कांति तेजस्वी होती. जवळ वस्त्रपात्र कांहीं नव्हतें. त्याचें तें उन्हांत बसणें, महाराजांना मोठें कौतुकाचें वाटलें. आपलें काम आटोपल्यावर ते त्या साधूच्याजवळ गेले; पण महाराज समोर येतांच साधूनें त्यांचेकडे पाठ फिरविली. समोर गेले तर पुन्हा तोच प्रकार. महाराजांनीं त्याच्याशीं बोलण्याचा प्रयत्न केला; पण त्यानें एक अक्षरहि उच्चारलें नाहीं. शेवटीं कंटाळून उन्हांत अधिक वेळ न थांबविल्यामुळें श्रीदासगणू परत आले. घरीं येऊन त्यांनीं श्री. दिगंबरराव

नांदेडकरांस सांगितलें, " दिगंबर, नदींत खडकावर एक साधु बसला आहे. मुका, बहिरा आहे कीं वेडा आहे कोणास ठाऊक ! त्याला कांहीं अन्न पोंचतें कर. तूंच जाशील तर चांगलें." त्याप्रमाणें श्री. दिगंबर-नाना स्वतः अन्न घेऊन गेले. त्यांना पाहतांच साधूनें आपली ओंजळ पुढें केली आणि त्या ओंजळीमध्यें ज्या क्रमानें पदार्थ पडतील त्या क्रमानेंच तो ते खात गेला. आमटी तर आमटी, भाजी तर भाजी, भाकरी तर भाकरी अशा पद्धतीचें तें चवढव न करतां घेतलेलें जेवण पाहून श्री. नानांना फार आश्चर्य वाटलें. त्यांनीं तो प्रकार महाराजांना सांगितला. महाराजांच्याहि मनावर त्याचा परिणाम झाला. ' रसोप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ' या गीतेंतील वचनाची त्यांना एकदम आठवण झाली.

दुसरे दिवशींहि त्या साधूला भेटण्याचा पुन्हा प्रयत्न केला; पण त्यानें पाठच फिरविली. एक शब्दहि तो बोलला नाहीं. असें तीन चार दिवस झालें. अशौचांतून मुक्त झाल्यावर शुद्धिश्राद्ध आटोपल्यावर त्या साधूकडे महाराज पुन्हा गेले. त्या दिवशीं त्यानें पाठ फिरविली नाहीं; पण बोलला मात्र कांहींच नाहीं. महाराजांनीं मग रात्रीं साधूची भेट घेण्याचें ठरविलें. दिवसां तेथें थांबणें शक्यच नव्हतें. रात्रीच्या प्रशांत वेळीं चांदण्यांत महाराज साधूच्या भेटीस गेले. नमस्कार करून ते नम्रपणें म्हणाले,

" मी इतका पातकी आहे काय कीं, आपल्यासारख्यांनीं माझें तोंड पाहूं नये ? एक शब्दासहि मी पारखा व्हावा ! "

साधुमहाराज हंसले आणि कांहीं वेळानंतर म्हणाले,

" तूं विष्णुसहस्रनामाचे बारा पाठ रोज करतोस ना ? तुला अद्याप पहिला विष्णुर्विष्णुच कळला नाहीं. वषट्कार तर दूरच राहिला. "

" मी याचा अर्थ समजलों नाहीं महाराज. "

" याचा अर्थ उघड आहे. ईश्वर सर्वव्यापक आहे. ईश्वराची ही व्यापकता लक्षांत आली कीं, माणसाचा अहंकार गळला पाहिजे. तुझा अहंकार कोठें गेला आहे ? "

" माझा अहंकार तो कसा? "

" तुझ्याकडे मीं पाठ फिरविली, तेव्हां हा कोणी तरी वेडा आहे असें तुला नाहीं वाटलं? स्वतःच्या शहाणपणाचा अभिमान असल्या-शिवाय दुसऱ्याला कोण वेडा म्हणेल? हा अहंकार नाहीं का? "

" पण महाराज, अपरिचित मनुष्य समोर येतांच त्याचेकडे एकदम पाठ फिरविणें, हें विचित्रच नाहीं काय? आपला माझा कांहीं दावा असता, तर गोष्ट निराळी. "

" हेंच तर मी म्हणतों तें. आपल्याला सगळं कळतं असं तुला वाटतंय. तुला अशौच होतें आणि अशा अवस्थेंतील व्यक्तीची दृष्टि योग्यानें टाळावी. नाहीं तर त्याच्या साधनेंत थोडा व्यत्यय येतो. आपल्या धर्मामध्यें अशौच्यासंबंधींचे नियम अशासाठीं कडक केले आहेत. "

" पण असा कांहीं परिणाम होतो, हें आमच्या लक्षांतच येत नाहीं. केवळ परंपरा म्हणून आम्ही स्पर्शास्पर्श पाळतों; परंतु अमुक मनुष्य सुतकी आहे हें त्यानें सांगितलें तरच आम्हांस समजतें. आपणांस तें न सांगतां कळलें. हें माझ्या लक्षांत कसें यावें? "

" हें बघ पांढऱ्या स्वच्छ वस्त्राला थोडासा जरी मळ लागला, तरी चटकन् दिसतो. सोधण्याला लागलेली घाण कशी लक्षांत येईल? "

" समजलों महाराज. "

" बरें, हें न समजतां झालें. ज्या गोष्टी समजल्या त्यांत तरी तुझा अहंकार कोठें गेला आहे? तूं काय म्हणालास, मी होतों म्हणून या माणसाला अन्न मिळालें. चार दिवस अन्न पाठविलेंस तर एवढें वाटलें तुला. कीर्तन करतोस ना तूं? "

श्रीदासगणू जरा चपापले आणि म्हणाले,

" महाराज, अशा तऱ्हेचा अभिमान नसेल तर सामान्याच्या हातून कामच होणार नाहीं. अमुक एक गोष्ट मी करीन, असा अभिमान नसेल तर कार्याला प्रेरणा कोणती? "

" व्यवहारी दृष्टीनें तुझें म्हणणें ठीक आहे. पण तूं परमेश्वराचा भक्त ना? लोकांना उपदेश करतोस. लोक तुला मानतात. तुझ्या ठिकाणीं अशी भावना कशी चालेल? 'जें जगा धाकुटें व्हावें। तें जवळीक माझी' ही ज्ञानोबारायांची ओवी तुला माहित नाहीं का? तूं असें कां म्हणाला नाहींस कीं, पहा ईश्वराची सत्ता केवढी अगाध आहे. त्यानें आपल्या एका जीवाकरितां मला बिनपैशाचा सैंपाकी केलें. काम झालं असतं आणि अहंकाराचा डागहि लागला नसता. आजच तूं रोहिदासाचें चरित्र लिहीत होतास ना? त्यांत काय लिहिलंस ?"

**पद** " हत्तीही असे चर्माचा, चर्माचा भूप त्यावरी।
नौबत तीहि चर्माची, चर्माच्या उंटावरी।

**चाल** जो पुढें पळे हलकारा, तोहि साजिरा, चामाचा खरा।
प्रणव आणि भेरी, चर्मैच बनविलीं खरी।
चर्मानें तुझ्या देहाला तरि कुठें सांग सोडिलें।
हें दृश्य विश्व बघ सारें, चर्मैच आकारा आलें।

**चाल** चर्माचे शुद्धीचेसाठीं, चामसंपुटीं, प्रभु किरीटीं।
ठेवून पूजीला गणुदास नमी त्याजला।"

**साकी** "चामाबिगर तो नजर न आवे एकहि वस्तु जगमो।
अविनाश शुद्ध सद्वस्तु बैठी ये चमडेके तनमो।
इसका ख्याल करो। अभिमाने ना नाहक मरो॥"

परमेश्वराच्या पूजनाचे वेळीं किंवा नामस्मरणाचे वेळीं अशी भावना असते का? नसेल तर काय उपयोग रे? ठिकच्या ठिकाणीं राहशील."

साधूच्या या भाषणाचा श्रीदासगणूमहाराजांच्या मनावर खोल परिणाम झाला. स्वतः रचलेलें व एकदांहि म्हणून न दाखविलेलें रोहिदासाच्या आख्यानांतील नुकतेंच रचलेलें पद या सत्पुरुषानें जसेंच्या तसें म्हणून दाखविलें, याचें महाराजांना फार आश्चर्य वाटलें. त्यांनीं साधूला हें कसें घडूं शकतें, याचें स्पष्टीकरणहि विचारलें. त्यावेळीं साधुमहाराज म्हणाले,

" यांत कांहीं विशेष नाहीं. तुझ्या शब्दांचा लय वायूमध्यें झाला आणि मीं प्राणायाम केला, तोहि या वायुमंडलांतच. प्राणायाम उत्तम साधला असेल, तर मी इच्छा करीन त्या शब्दांचें ज्ञान मला झालें पाहिजे. "

या उत्तरानें श्रीदासगणू विशेषच आश्चर्यचकित झाले. रोज रात्रीं नेमानें ते साधूच्या भेटीस जात. रात्रींच्या दहा वाजल्यापासून दीडदोन वाजेपर्यंत दोघे बोलत बसत. एकदां त्यांनीं साधूला विचारलें, " बाहेर इतका कडक उन्हाळा असतांना, आपण शांतपणें या खडकावर कसे बसूं शकतां ? आपली कातडीहि उन्हानें करपल्यासारखी दिसत नाहीं. " साधुमहाराज म्हणाले, " ज्या सृष्टींत उन्हाळा येतो, तेथेंच हिंवाळाहि येतो. प्रत्येक ऋतूचा सृष्टीला फायदाच होतो. माझें शरीर जर निसर्ग-नियमांना धरून असेल तर कोणत्याहि ऋतूचा मला त्रास होतां कामा नये. हेंच योगामुळें साधतें. मी माझें शरीर ऋतूला अनुकूल ठेवूं शकतों. "

या म्हणण्याचें प्रत्यंतर पाहावें, या दृष्टीनें महाराज दुसरे दिवशीं एक मोठी कैरी घेऊन गेले आणि साधूंना म्हणाले,

" ही कैरी निसर्गक्रमानें आठ दहा दिवसांत पिकून आंबा तयार होणार आहे. आपण जर आपल्या शरीरामध्यें निरनिराळें ऋतुमान निर्माण करूं शकतां, तर ही कैरी पिकविणें आपणांस शक्य होईल. "

" हो. त्यांत काय ? "

साधुमहाराजांनीं तें फळ आपल्या दृष्टीसमोर धरावयास सांगितलें आणि त्याकडे ते एकाग्रतेनें पाहूं लागले. दहा बारा मिनिटांतच कैरीचें रूप पालटलें आणि केशरी रंगाचा मधुर आंबा तयार झाला.

योगाचें तें अलौकिक सामर्थ्य पाहून श्रीदासगणू महाराज थक्क झाले आणि आपणांस योग शिकविण्यासाठीं त्यांनीं साधूंना विनंति केली. त्यावर योगिराज म्हणाले, " तुला आतां या वयांत योगी होतां येणें शक्य नाहीं. योगी होण्यासाठीं अगदीं लहानपणापासून साधनें करावीं लागतात. ज्या वयामध्यें कोणत्याहि तऱ्हेच्या बाह्य वासना-विकारांचा

स्पर्श मनास झालेला नसतो, अशा सहा-सात वर्षांच्या कोवळ्या वया-मध्येंच उत्तम मार्गदर्शनाखालीं योगाभ्यासास आरंभ केला पाहिजे. घरचें वळण अत्यंत सात्त्विक असेल वा प्रारब्ध अनुकूल असेल तर चौदा, पंधरा वर्षें वयापर्यंतहि योगाभ्यासासाठीं अनुकूल मनोभूमि असूं शकते. तुला आतां या वयांत योगमार्गानें आपलें ध्येय प्राप्त करून घेतां येणार नाहीं. तूं पतकरलेला भक्तिमार्गच तुझ्या फायद्याचा आहे. सामान्य जनांना तर त्यावांचून दुसरी गतिच नहीं. म्हणूनच श्रीतुकोबारायांनीं 'मोडूनियां वाटा सूक्ष्म दुस्तर। केला राज्यभार चाले ऐसा' असें म्हटलें आहे. योगाच्या अगदीं आरंभिक क्रिया मनाच्या स्थिरतेकरतां आणि आरोग्याकरितां उपयोगी पडतात, त्या फार तर तुला साधतील. त्या शिकलास तर फायदाहि होईल."

श्रीदासगणू महाराज हे रोज रात्रीं कोठें तरी जातात, हें सहा-सात दिवसांत नांदेडच्या परिचित मंडळींना कळलें. त्यांपैकीं कांहीं योगी-वरांच्या दर्शनालाहि जाऊन आले. भेटीला येणाऱ्यांची संख्या वाढूं लागली. त्यांतील कांहीं पुढारी मंडळींनीं त्यांचें जाहीर व्याख्यान करावें, असा घाट घातला; परंतु दुसऱ्या दिवशीं ते योगीराज अचानक कोठें नाहींसे झाले. त्यांचा पुन्हा पत्ता लागला नाहीं.

या पंधरा वीस दिवसांत श्रीदासगणू महाराजांचा त्या योगी पुरुषाशीं जो परिचय झाला, त्याचा त्यांच्यावर पुष्कळच परिणाम झाला असावा. योगमार्गासंबंधीं बरीच माहिती या काळांत त्यांनीं मिळविली असावी. कांहीं क्रियाहि समजून घेतल्या असाव्या. कारण शेख महंमदाच्या चरित्रामध्यें योगासंबंधीं जाणत्यांनाच उमगावी, अशी बरीच माहिती त्यांनीं पद्यांतून गुंफली आहे. कोल्हापुरास एका कीर्तनांत शेख महंमदाचें आख्यान ऐकल्यानंतर एक स्वामी श्रीदासगणू महाराजांना मुद्दाम भेटावयास आले आणि त्यांनीं योगाभ्यासांतील आपल्या अडचणी महाराजांच्या पुढें मांडल्या. महाराजांना योगासंबंधीं चांगली सखोल

स्वानुभवाची माहिती असावी, अशी कीर्तनांतील वर्णनें ऐकून त्यांची कल्पना झाली होती.

बरेच दिवसपर्यंत श्रीदासगणू महाराज योगांतील निरनिराळीं आसनें, प्राणायाम, भसरा, नवली, धोती, नेती, बस्ती इत्यादि क्रिया करीत असत. चाळीस हात लांबीचें चार पांच बोटें रुंदीचें फडकें ते सहज गिळीत आणि कोठ्याची शुद्धि करीत. शके १८६२ पर्यंत हा आसनादिकांचा कार्यक्रम अव्याहत सुरू होता. पुढें शरीर बरेंच थकल्यानंतर हळूहळू या क्रिया त्यांनीं सोडल्या. पहाटे लौकर उठून एका उंच आरशापुढें बसून ते कांहीं ध्यान धारणा थोडे दिवस करीत होते. आरशाला मधें एक बारीक छिद्र पाडलेलें होतें आणि त्याच्यामागें निरांजन तेवत ठेवलेलें असे. निरांजनाची ज्योत तेवढी त्या छिद्रांतून दिसावी. आपलें प्रतिबिंब मात्र आरशांत पडलेलें दिसूं नये, अशी एकाग्रता साधण्यासाठीं तो एक प्रयोग असावा असें वाटतें. या सर्व कार्यक्रमाला नांदेडांत गंगेवर घडलेला योग्याचा सहवासच कारण असावा. योगमार्गाविषयीं महाराजांना आदर आहे. मला केलेल्या छात्रबोध या उपदेशांत "योगमार्ग योग्याचा। तो न गृहस्थाश्रमी लोकांचा। परी तो टवाळीचा। विषय कधींहि करूं नये॥" असें मुद्दाम लिहिलें आहे. महाराजांनीं लिहिलेल्या 'गुरुचरित्रसारामृत' या गुरु-चरित्राच्या संक्षिप्त केलेल्या ग्रंथांतील दहाव्या अध्यायांत दैनिक आचार सांगत असतांना मूळ गुरुचरित्रांत नसलेलें यौगिक क्रियांचें हें प्रकरण समाविष्ट केलेलें आहे. त्या सर्वच ओव्या येथें उद्धृत करतों. कारण त्यांत वर्णिलेल्या क्रिया महाराजांच्या चरित्राचा एक भाग आहे.

"प्रातःकालीं प्रत्यहीं। उठोनियां अरुणोदयीं। शय्येवरी बसून पाहीं। जप करावा उपास्याचा॥ ऋषी राजे पुण्यश्लोक। तैसी पतिव्रता देख। अंजनीचा बालक। चिरंजीवा आठवावें॥ नंतर शौचविधी करावे। अरण्यासी जाऊन बरवें। दंतधावन साधावें। कडूनिंबाच्या काडीनें॥ गुळण्या करून द्वादश। प्रक्षाळावें मुखास। पाहून स्वच्छ जागेस।

पूर्वाभिमुख बसावें ॥ जागा नसावी वर खालीं । आसन घालून कांबळी । कृष्णाजिन त्याच्याखालीं । घातलें पाहिजे अवधारा ॥ ऐशा आसनीं बसावें । पाय दोन्ही पसरावे । उदर चालन करावें । त्याची रीत ऐसी असे ॥ पोट न्यावें खपाटी । श्वास सोडूं नये उठी । पुन्हा ते उठाउठी । पोकळ सोडून साफ करा ॥ वीस वेळ उदरचालन । मग करावें दोलासन । दोन्ही कर महीस ठेवून । शरीर तें उचलावें ॥ मग करावी भ्रामरी । तोंड मिटून साजिरी । वायुआवाज कंठांतरीं । ऱ्हावा हा धर्म तिचा ॥ धौती त्राटक कपालभाती । जलधौती वासधौती । नवली आणि नैती । ऐसे कांहीं प्रकार ॥ प्रतिपदा, अष्टमी, पौर्णिमा । तैशा वद्य पक्षाच्या उत्तमा । धौतीच्या चालविण्या नियमा । अमावास्या वर्ज असे ॥ एकेक तिथीस एकेक धौती । करणें अवश्य सविधी ती । महिन्यामाजी पांच होती । ज्या देती आरोग्या ॥ धौती म्हणजे धुणें । आपल्या शरीराकारणें । बाह्यांग तें जलानें । आंतील धौतीनें शुद्ध होय ॥ ''

यानंतर धौतीच्या प्रकाराचें स्वतः करीत त्या प्रकाराचें विस्तृत वर्णन महाराजांनीं केलें आहे. प्राणायामादि या क्रिया गुरूजवळच शिकाव्या असें सांगतांना ते म्हणतात, “ हा प्राणायाम प्रकार सकळ। परी हा शिकणें गुरूपाशीं ॥ उगीच पुस्तका पाहून । करूं नये आरंभ जाण । फायद्याऐवजीं नुकसान ।होईल कीं शरीराचें ॥”

या सर्व प्रकरणासंबंधीं अध्यायाच्या शेवटीं ते म्हणतात,

“हा गुरुचरित्र ग्रंथाचा । छत्तीस सदतीस अध्यायाचा । सारभाग असे साचा । हें न माझ्या कल्पनेचें ॥ योगभाग या माझारीं । आसनविधी निर्धारीं । तो मात्र ग्रंथांतरीं । मूळच्या नाहीं ॥ परी समयानुरोधें करून । मी तो येथें केला कथन। जेणें आरोग्यरक्षण। होऊन चित्त स्थिर होई ॥ ''

## २४. योगामुळें आरोग्य :

या सर्व आसनादि क्रियांचा उपयोग महाराजांच्या प्रकृतीस निश्चित-पणें लाभदायक झाला आहे. आज वयाच्या ८७ व्या वर्षींहि त्यांचीं ज्ञानेंद्रियें त्या मानानें चांगलींच कार्यक्षम आहेत. स्मृति तर तरुणालाहि

लाजवील अशी तल्लख आहे. मुंबईच्या परिचित मंडळींचे पत्ते आम्हांला नोंदवहीमध्यें पाहावे लागतात; पण ती. दादा मात्र रस्ता, इमारतीचें नांव, मजला, खोलीचा क्रमांक इतकें सर्व झट्दिशीं सांगू शकतात. वयाच्या मानानें त्यांचें आरोग्य अजूनहि चांगलें आहे. पाठीमागें असलेल्या लोडाचा वा तक्क्याचा थोडाहि आधार न घेतां पांच सहा तास सहज टिकणारी त्यांची ताठच्या ताठ बैठक पाहिली कीं, नवल वाटतें. उतार वयामुळें कांहीं दुखण्यांचा त्रास त्यांना झाला. वीस पंचवीस वर्षें पोटदुखीची व्यथाहि त्यांना सहन करावी लागली होती. प्रकृति कफाची असल्यामुळें कफाचाही त्रास त्यांना फार होई. त्यांतच पूर्वीं त्यांना धूम्रपानाची अत्यंत संवय होती. वयाच्या बारा तेराव्या वर्षीं उनाड मित्रांच्या संगतींत लागलेलें हें व्यसन वयाच्या ७५ व्या वर्षां-पर्यंत अखंड टिकून होतें. ग्रंथलेखनाला त्यामुळें स्फूर्ति येते, असें ते लोकांना सांगत. गुरुचरित्राचें सारांशरूपानें लेखन चालू असतांना नरसोबाच्या वाडीच्या पुजारी मंडळींनीं नम्रपणें विनविलें कीं, 'गुरु-चरित्राची पोथी सांगत असतांना तरी धूम्रपान न करावें.' महाराज हंसून म्हणाले, 'मग पोथी लिहूंच नको म्हणा कीं. आपल्याला त्यावांचून सांगणें सुचणार नाहीं."

बेळगांवकडचा कोणी एक शास्त्री श्रीदासगणूंनीं लिहिलेलें संतचरित्र वाचून त्यांचें दर्शन घेण्यासाठीं मोठ्या आदरानें पंढरपुरास महाराजांच्या घरीं आला. महाराज त्या वेळीं श्रीविश्वनाथ बोवांच्या घरीं त्यांच्या आवडीच्या झोंपाळ्यावर बसून शांतपणें विडी पीत होते. हे शास्त्रीबोवा ओसरीवर आले आणि त्यांनीं महाराजांनाच विचारलें कीं, "दासगणू महाराज येथेंच राहतात ना? कोठें आहेत ते? मी त्यांच्या दर्शनासाठीं मुद्दाम आलों आहें." महाराज म्हणाले, "मलाच दासगणू म्हणतात. काय काम आहे आपलें?" शास्त्रीबोवा एकदम रागावून म्हणाले, "थट्टा करतां माझी? ज्यांनीं संतकथामृतासारखा ग्रंथ लिहिला त्यांची भेट मला घ्यावयाची आहे. विडी पीत बसणाराची नाहीं." महाराजांना

हंसू आलें. त्यांनीं शास्त्रीबोवांची समजूत घालण्याचा प्रयत्न केला, पण शास्त्रीबोवा ते ऐकेनात. एवढ्यांत आणिक कोणी तरी दर्शनास आले. त्यांनीं महाराजांच्या गळ्यांत हार घालून नारळ पुढें ठेवून नमस्कार केला. तेव्हां हेच दासगणू हें शास्त्रीबोवांना पटलें; तरी पण धूम्रपान पाहून ते नाराज झालेच.

या धूम्रपानाच्या व्यसनामुळें महाराजांच्या मूळच्या कफाच्या त्रासांत फार भर पडे. सर्व छाती कफानें नुसती डबडबलेली असे. तरी दिवसाकांठीं पन्नास पन्नास विड्या त्यांना लागत. वैद्य डॉक्टरांनीं पुष्कळ सांगून पाहिलें; पण महाराजांनीं मानिलें नाहीं. सुप्रसिद्ध डॉ. रामकृष्ण हरि भडकमकर यांचा व महाराजांचा चांगला स्नेह होता. महाराजांची प्रकृति ते वर्षांतून एक दोनदां तरी तपाशीत. त्यांनींहि धूम्रपान सोडण्याविषयीं आग्रहानें सांगितलें होतें; परंतु हें व्यसन सुटलें नाहीं.

पुढें एकदां कांहीं कारणानें बोलतां बोलतां मी सहज म्हणालों, "दादा, तुम्ही संन्यास घेणार म्हणतां, त्या वेळेला धूम्रपानाचें काय करणार? महाराज बिडी ओढतात, तेंहि लोकांना कसेंसेंच वाटतें. स्वामीमहाराजहि तसेंच करतील, तर फारच चमत्कारिक."

"संन्यास घेतल्यावर मी विडी ओढणार नाहीं."

"तें कसें शक्य आहे? कफाचा तुम्हांला इतका त्रास होतो. डॉ. भडकमकरांसारखे धन्वंतरी नको म्हणून सांगतात, तरी ऐकलें नाहीं तुम्ही."

"पहाशील. मनांत आणीन तर सोडून देईन."

"शक्य नाहीं. सुटेल तर तें व्यसन कसचें?"

पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं, श्रीदासगणू महाराजांनीं धूम्रपान पुढें कांहीं दिवसांत अजिबात सोडून दिलें. आज तेरा चौदा वर्षें झालीं, त्यांनीं तंबाखूस स्पर्श केलेला नाहीं.

धूम्रपानाशिवाय काव्यस्फूर्ति नाहीं, हें त्यांनीं दुसऱ्याला दिलेलें केवळ विनोदाचें उत्तर होय; कारण शंकराचार्यांच्या चरित्रासारखा

महाराजांच्या काव्यग्रंथांतील एक उत्तम ग्रंथ या बिडी सोडलेल्या काळांतच निर्माण झालेला आहे. त्या वेळींहि त्यांची अस्खलित वाणी काव्यमय स्वरूपांत किती द्रुतगतीनें वाहात असे, तें मी स्वतः अनुभविलें आहे. ओव्या तर इतक्या झरझर सांगत कीं, लिहून घेणाराची अक्षरशः तिरपीट उडत असे. या ग्रंथाचा आरंभ पुण्यासच झाला. त्याचे पहिले तीन अध्याय मीच लिहिले असल्यानें मला तें अनुभवानें माहीत आहे. ग्रंथाच्या योग्यतेबद्दल शंकाच नाहीं. अनेक विद्वानांनीं त्याची प्रशंसा केली आहे. कांहीं तर महाराजांच्या प्रतिभेचा तो सर्वोत्तम विलास मानतात. यावरून धूम्रपानावांचून काव्य स्फुरत नाहीं, हें थट्टेचें बोलणें होतें हें सिद्ध होतें.

या व्यसनाचाहि महाराजांच्या प्रकृतीवर तसा गंभीर परिणाम झाला आहे, असें म्हणतां येणार नाहीं. कफाचा त्रास मधूनमधून थोडा होत असला तरी त्यांचीं फुप्फुसें चांगलींच कार्यक्षम आहेत. हृदयाचें कार्य आजहि अगदीं व्यवस्थित होत आहे. या आरोग्याला आसनादींचा हा अभ्यासच कारण असला पाहिजे. कोणतेंहि औषध त्यांना चटकन् लागूं पडतें. औषधाचा सुपरिणाम शरीरावर लगेच दिसून येतो, असें मी अनेक वेळां पाहिलें आहे. वैद्यकामध्यें देहाचें 'सर्वौषधक्षमत्व' हें रोगाच्या सुखसाध्यतेचें लक्षण सांगितलें आहे. शरीराच्या अंतरबाह्य निर्मळपणामुळेंच हें संभवतें. शरिरांतील सर्व स्रोतसे मोकळीं असतील तर औषधें सहज कार्यकारी व्हावीं हें स्वाभाविक आहे. नैतीधौतीच्या अभ्यासामुळेंच हा निर्मळपणा महाराजांच्या शरीराला प्राप्त झाला असावा.

आसनामुळें प्राप्त झालेल्या चपळपणामुळें मोठमोठे डॉक्टरहि आश्चर्य-चकित होत. १९४८ सालची गोष्ट. श्री. सौ. लीलावतीबाई वेलिणकर या महाराजांची प्रकृति पाहण्यासाठीं मुंबईचे प्रख्यात डॉक्टर कोहियार यांना घेऊन आल्या. महाराजांना आडवे झोपावयास सांगून डॉक्टर कोहियारांनीं त्यांची पोट, छाती तपासली. रक्ताचा दाब मोजला आणि आतां उठा म्हणून सांगितलें. तें ऐकतांच ८० वर्षे ओलांडलेले हे गृहस्थ

पाय एकदां उचलून त्याच्या झटक्यांत चटकन् उठून बसले. डॉक्टर चकित झाले आणि इंग्रजींत म्हणाले, "हे फार तरुण दिसतात. वृद्ध कोण म्हणेल यांना ?"

हें आरोग्य किंवा हा उत्साह इतक्या उतार वयांतहि टिकविण्यांत महाराजांच्या सात्त्विक सदाचरणाबरोबरच त्यांच्या दिनचर्येपैकीं या आसनादिकांच्या अभ्यासाचा बराच मोठा भाग असावा, असें म्हणावेंसें वाटतें.

## २५. साक्षात्कार :

श्रीदासगणू महाराजांना ईश्वराचा साक्षात्कार झाला आहे कीं, नाहीं, असा प्रश्न कांहीं लोकांच्या मनांत आहे. त्यांतील कांहीं खरोखरीच भाविक आहेत आणि कांहींना आपल्या नास्तिकतेला कोठला तरी पुरावा उपलब्ध व्हावा, या हेतूनेंच हा प्रश्न विचारावासा वाटतो. जन्मापासून आज ३३–३४ वर्षे महाराजांच्या अखंड सहवासांत असूनहि या शंकेचें समाधान मी करूं शकणार नाहीं. श्रीदासगणू महाराजांनीं स्वतः जितक्या वेळां हा प्रश्न त्यांना विचारला गेला, तितक्या वेळां त्याचें उत्तर माझ्या माहितीप्रमाणें नकारात्मकच दिलें आहे.

माझें स्वतःचें मत मात्र या गोष्टी कोणी कोणाला फारशा विचारूं नयेत असें आहे. असा प्रश्न विचारण्यासहि अधिकार लागतो. त्या योग्यतेचा एकादाच विवेकानंद आणि त्यांना उत्तर देणारा एकादाच रामकृष्ण असतो. या प्रश्नाच्या उत्तरामध्यें विचारणाराच्या वैयक्तिक अधिकाराचें महत्त्व विशेष लक्षणीय असतें, हें नेहमीं ध्यानांत ठेविलें पाहिजे. नाहीं तर एकाद्या शालीन पतिव्रतेला पतीचें सुख काय असतें, असा प्रश्न अल्लड बालिकेनें विचारण्यापैकींच हा प्रकार व्हावयाचा.

महाराजांची चरित्रविषयक माहिती गोळा करीत असतांना मला विश्वासार्ह व्यक्तींकडून समजलेल्या कांहीं गोष्टी मात्र मी या प्रकरणांत

वाचकांच्या समोर ठेवूं इच्छितों. सूज्ञांनीं त्याचा अर्थ स्वतःला इष्ट वाटेल तसा लावावा. मी केवळ घटना सांगणार आहें.

महाराजांच्याविषयीं माहिती विचारीत असतांना, इंदूरचे श्री. बाळासाहेब रेगे यांनीं मला पुढील वृत्त सांगितलें.

“ १९१६–१७ मधील गोष्ट असेल. आम्ही सर्व त्यावेळीं खांडव्यास राहात होतों. महाराजांचीं कीर्तनें गांवामध्यें रोज नियमानें होत असत. हजारोंनीं समाज जमे आणि कथेच्या अपूर्व आनंदांत अगदीं समरस होई. त्या सुमारास एकदां रात्रीं दोन अडीच वाजतां मी जागा झालों. पाहतों तों महाराज अस्वस्थ झाल्यासारखे गच्चीवर फेऱ्या घालीत होते. मधूनच सुस्कारे टाकीत आहेत. एखादा हुंदकाही मुखावाटें बाहेर पडत आहे. कांहीं हातवारे चालू आहेत. हालचालींत पराकाष्ठेची विसंगति व वेदना दिसत आहेत. तीन चार दिवस मी हा प्रकार पाहिला. शेवटीं एक दिवस न राहवून विचारिलें, ‘ महाराज, मी किती तरी वेळां पाहिलें आहे कीं, रात्रीं आपण फार अस्वस्थ होतां. प्रकृति बरी नाहीं का ? तसें म्हणावें तर आपल्या वागण्यामध्यें दिवसभरांत कांहींच वेगळेपणा वाटत नाहीं; पण रात्रीं इतके अस्वस्थ दिसतां कीं, कांहीं थोर चिंता मागें लागली असावी, असा भास होतो. मला सांगण्यासारखें नाहीं का ? ’

तेव्हां माझ्या खांद्यावर हात ठेवून श्रीदासगणू महाराज गहिंवरलेल्या स्वरानें म्हणाले, ‘ तुम्हांला न सांगण्यासारखें काय आहे बाळासाहेब ? मी कीर्तनांतून मार ऐटीनें लोकांना उपदेश करतों. परमेश्वराच्या प्राप्तीचें महत्त्व सांगतों. देवाच्या भेटींत किती अलौकिक आनंद भरला आहे, तें संतचरित्रांच्या आधारें रंगवितों; पण मला स्वतःला यांतील काय प्राप्त झालें आहे ? लोकांनीं हरिभक्तपरायण म्हणावें आणि बोवांची परायणता हरिभक्तीवांचून इतरत्र गुंतलेली असावी, ही केवढी दुःखाचा आणि विचित्र गोष्ट आहे. माझ्या बाबतींत प्रचितीचें बोलणें कधीं घडणार आहे कीं, नाहीं कोणास ठाऊक ! ही एकच तळमळ मला लागते कधीं कधीं. ’

या तऱ्हेचें चिंतेचें कारण ऐकून मला नवल वाटलें. पुढें एक दोन

वर्षें या तऱ्हेची अस्वस्थता महाराजांच्या ठिकाणीं मी पाहिली. पण त्यानंतर मात्र असा अस्वस्थपणा मला कधीं दिसला नाहीं. उलट एक तऱ्हेची तृप्ति, कांहीं सात्त्विक समाधान वा अपूर्व प्रसन्नताच त्यांच्या नेहमींच्या विशेषतः कीर्तनानंतरच्या वागण्यांत प्रत्ययास येऊं लागली; परंतु या बदलाचें कारण मी त्यांना विचारलें नाहीं."

दुसरी आठवण नगरच्या श्री. चिंतामणराव वाळिंबे मास्तरांची. हे वाळिंबे मास्तर श्रीदासगणू पोलिसांत नोकरीस असतांना शाळेंत शिक्षक होते. कित्येक वर्षे त्यांचें राहणें एकाच गांवीं होतें. श्रीदासगणू हे आपलें लावण्या, पोवाडे इत्यादि काव्य, काव्याविषयींची आवड असलेल्या श्री. वाळिंबे मास्तरांना दाखवीत. मास्तर मोठ्या आवडीनें त्याचें रसग्रहण करीत. दोघांचा स्नेहहि चांगला होता. श्रीदासगणूंनीं पुढें नोकरी सोडली आणि ते भक्तिमार्गाकडे वळले. त्यानंतर बरेच दिवसांत वाळिंबे मास्तर व श्रीदासगणू यांची परस्पर भेट झाली नव्हती. पुढें कांहीं वर्षांनीं १९२० सालीं वाळिंबे मास्तर पंढरपुरास गेले होते. पूर्वपरिचयामुळें मुक्काम श्रीदासगणू यांजकडे होता. श्रीदासगणू महाराज यावेळीं श्री. विश्वनाथ गोपाळ बडवे यांच्या घरीं राहात असत.

त्या दिवशीं दसरा होता. श्रीसाईबाबांच्या पुण्यतिथीचा उत्सव मोठ्या थाटानें केला जात होता. सकाळीं अकरा ब्राह्मणांकडून षोडशोपचार पूजेचा कार्यक्रम झाला. दुपारीं अन्नसंतर्पणहि खूपच मोठ्या प्रमाणांत झालें. संध्याकाळपर्यंत माणसें जेवत होतीं. अनेक मोठमोठे लोक येत आहेत. मुंबईसारख्या ठिकाणची सुशिक्षित मंडळी आदरानें नमस्कार करीत आहेत. लोक मोठ्या भक्तीनें भोंवतीं बसून वाचून दाखविलें जाणारें आख्यान व श्रीदासगणू त्यावर करीत असलेलें भाष्य श्रद्धेनें ऐकत आहेत. वाळिंबे मास्तर म्हणाले,

"हें सर्व दृश्य पाहून मला मोठा चमत्कार वाटला. तमाशांतल्या लावण्या रचणारा गणपतराव ज्याला आम्ही भलतेच समजत होतों, नव्हे तो तसाच आहे अशी खात्री बाळगीत होतों, तोच का हा?

हा दंभ तर नाहीं ? मनाच्या अशा आंदोलित अवस्थेमध्यें मी पांडुरंगाच्या दर्शनासाठीं देवळांत गेलों. दर्शन घेत असतांना सहज मूर्तीच्या मुखाकडे पाहिलें, तों मूर्ति रागावून माझ्याकडे पाहात आहे असें वाटलें. या जाणिवेनें मी थोडा अस्वस्थ झालों. माझ्या तात्त्विक मनाला या प्रसंगाचेंच मुळीं आश्चर्य वाटलें. एक तर मूर्तीच्या चेहऱ्यावर कोणताच भाव दिसावयास नको. दिसलाच तर प्रसन्नतेचा तरी असावा. मला ही दृष्टि क्रुद्ध वाटली. त्यामुळें माझी अस्वस्थता फार वाढली. खिन्न होऊन मी परत आलों. दुसरे दिवशीं सकाळीं दर्शनास गेलों, त्यावेळींहि तोच प्रकार. अधिकच उदास होऊन मी परत आलों. त्यावेळीं श्रीदासगणू हे झोपाळ्यावर बसलेले होते. पुढें फळांचे अनेक करंडे भरलेले होते. मोसंबीं, सफरचंदें, उत्तम जातीचीं डाळिंबें अशीं फळें त्यांमध्यें होतीं. दहा बारा माणसें पिशव्या वा टोपल्या घेऊन समोर बसलीं होतीं. कोणास किती फळें द्यावयाचीं ते आंकडे श्रीदासगणू नांवनिशीवार सांगत होते. एकजण टिपून घेत होता. पंढरपुरांतील सर्व मठांतून हीं फळें वाटलीं जावयाचीं होतीं.

काल माझ्या मनामध्यें ‘ तुझ्या बहुत शोधिले अधनिधी पदांच्या रजें ’ असा जो मोरोपंतांच्या केकावलींतील चरण सारखा घोळत होता, तो यथार्थ नाहीं असें आज मला वाटूं लागलें. श्री. गणपतरावांना ओळखण्यांत मागें आपली चूक झाली असली पाहिजे. माझ्या मनांत आलें कीं, इतकीं फळें लोक यांना पाठवितात कां ? आणि आलेल्या फळांचा उपयोग स्वतः न करतां ते तीं गांवभर वांटून कां टाकीत आहेत ? यांत कांहीं तरी वेगळा अर्थ असला पाहिजे. शेंकडों लोक श्रीदासगणूंच्या सहवासांत थोडा तरी वेळ घालवावयास मिळावा म्हणून प्रयत्न करतात, याला तसेंच महत्त्वाचें कारण असलें पाहिजे. आपली पूर्वीची कल्पना निश्चयानें चुकीची असली पाहिजे. असा विचार माझ्या मनांत येत आहे, तोंच माझ्याकडे पाहून श्रीदासगणू म्हणाले,

" या मास्तर, देवळांत गेला होता का? देवदर्शन झालें ना? आतां पुन्हां एकदां जाऊन या. म्हणजे बरें वाटेल."

मी कांहीं न बोलतां हंसून नमस्कार केला व तेथेंच जवळ कांहीं वेळ बसलों. समोर बसलेल्या मंडळींपैकीं कोणी एक गृहस्थ 'मी देवाला जातों महाराज' असें म्हणून नमस्कार करून निघाला. त्यावर श्रीदासगणू त्याला म्हणाले,

" अहो, या आमच्या मास्तरांना घेऊन जा. त्यांना देवदर्शन नीट झालें नाहीं. जा मास्तर. देवाला जाऊन या." माझ्याकडे पाहून ते म्हणाले.

वस्तुतः मी नुकताच देवदर्शनाला जाऊन आलों होतों. पुन्हा जाण्याची कल्पनाहि माझ्या मनांत नव्हती; पण उद्योग कांहींच नव्हता. जा म्हणतात तर जाऊन यावें, म्हणून मी पुन्हा देवदर्शनास गेलों. चरणांवर डोकें ठेवून नमस्कार केला आणि वर पाहिलें तों श्रीविठ्ठलाची मूर्ति अत्यंत प्रसन्नतेनें मजकडे पाहात मधुर स्मित करते आहे, असें दिसलें. भक्तिभावानें वंदन करून मी आनंदांत परतलों. श्रीदासगणू महाराज पूर्वींप्रमाणेंच झोंपाळ्यावर बसलेले होते. हातामध्यें विष्णुसहस्रनामाची पोथी होती व ते ती वाचीत होते. मी पुढें होऊन नम्रपणें नमस्कार केला. ते माझ्याकडे पाहात समाधान झाल्यासारखें हंसले. पाठ होत असल्यामुळें बोलणें अर्थातच झालें नाहीं. माझी रजा संपल्यानें मी संध्याकाळीं परत निघालों.

माझ्या दोन्ही वेळांतील अनुभवांच्या फरकांचा मी ज्या ज्या वेळीं विचार करतों, त्या त्या वेळीं श्रीदासगणूंच्याविषयीं आदर वाटल्यावांचून राहात नाहीं."

श्री. वाळिंबे मास्तरांनीं ही गोष्ट ज्यावेळीं मला सांगितली, त्यावेळीं त्यांचें मन व आवाज एक तऱ्हेच्या श्रद्धेनें भारावल्यासारखा वाटला. या प्रसंगाला उद्देशून श्री. वाळिंबे मास्तर नंतर पुष्कळच बोलत होते.

आणखी एक प्रसंग यासंबंधांत उल्लेखण्यासारखा आहे.

श्रीदासगणू महाराजांनीं नृसिंहावर एक फार सुंदर पद रचिलेलें आहे. तें असें—

" राहेर क्षेत्र अति पवित्र गोदातिरीं । नांदतो तेथ हा सदैव नरकेसरी ॥ कडकडां स्तंभ मोडला प्रभू प्रगटला । प्रल्हादवरद हा दिवौकसीं गाइला ॥ चमकतो पितांबर जरी कटीं पीवळा । लागली रुळाया जीभ हृदयीं लळलळा ॥ खटखटा वाजती दंत मुगुट तो शिरीं । प्रभु पापमतीचें पोट विदारण करी ॥ चमकतीं कानीं कुंडलें वन्ही लोचनीं । करि सहज लिलेनें गुरगुर ऐसा ध्वनी ॥ भीतसे पुढें जावया कमललोचनीं । इंदिरा म्हणे हें तेज नं सौदामिनी ॥ यापरी कधिं न देखिला प्रभू आजवरी । उधळली सुरांनीं सुमनें राहुन दुरी ॥ प्रह्लाद पाय वंदितां शांत जाहला । तो नारसिंह म्यां सिंहासनिं पाहिला ॥ "

श्रीदासगणू महाराजांना नृसिंह किंवा नरहरी या नांवाविषयीं विशेष प्रेम असल्याचें माझ्या प्रत्ययास आलें आहे. देवाचीं पांच सात नांवें एकाद्या पद्यांत यावयाचीं झालीं तर नरहरी हें नांव त्यांत बहुधा असावयाचें. मला नरहरी नांव फार आवडतें, असें एकदां स्वत: ती. दादा माझ्याजवळ म्हणाले होते. त्यांचें हें वरील पद विशेषत: त्यांतील ' तो नारसिंह मी सिंहासनीं पाहिला ' ही ओळ थोडी गूढ वाटे; परंतु एकदां याचा उलगडा माझ्या मनास अकल्पितपणें झाला. तो प्रसंग असा—

गोळेगांवकर सावकारांच्या आग्रहावरून मी १९४६ सालच्या कार्तिकांत गोरट्याहून गोळेगांवास गेलों होतों. दोन तीन दिवस तेथें राहणें झालें. तेथून राहेर हें सुप्रसिद्ध नरहरीचें स्थान जवळच दोनतीन कोसांवर आहे. इतक्याजवळ आलों आहों तर नरसिंहाचें दर्शन घेऊन यावें, अशा इच्छेनें गोरटेकर श्री. बाबासाहेब देशमुख, मी व आणखी दोघेजण असे घोड्यावरून राहेरास गेलों. स्नान करून दर्शन घेऊन पटकन् परत यावें असें वाटत होतें; परंतु तेथें मला कोणी तरी ओळखलें आणि राहेरचे देशपांडे यांना घेऊन मी मंदिरांत असतांना ते गृहस्थ, माझ्याकडे आले. श्री. देशपांडे यांजकडे मला अल्पोपहारास जावें लागलें. त्यावेळीं सहज बोलणें निघालें असतांना त्यांनीं जी हकीगत सांगितली त्यांतलि या प्रकरणाच्या दृष्टीनें आवश्यक तेवढा भाग पुढें देत आहे.

" पंचवीस एक वर्षांपूर्वी श्रीदासगणू महाराज येथें राहावयास आले होते. त्यांचेबरोबर श्री. दामूअण्णाहि होते. दोन तीन कीर्तनेंहि येथें मंदिरांत झालीं. श्रीमहाराजांच्या महापूजा करण्याच्या इच्छेप्रमाणें आम्ही सर्वजण देवाच्या गाभाऱ्यांत उभे होतों. अभिषेक होऊन पूजा जवळ-जवळ समाप्त झाली होती. इतक्यांत आम्हांस एकाएकीं भीति वाटूं लागली. कारण कांहींच सांगतां येत नाहीं; पण आम्ही चार पांचजण भय वाटून गाभाऱ्याच्या बाहेर आलों हें खरें. तुमचे वडील श्री. दामूअण्णा हेहि आमच्याबरोबर बाहेर आले होते. श्रीदासगणू महाराज मात्र गाभाऱ्यांत विष्णुसहस्रनामाचा पाठ म्हणत बसले होते. अर्धी एक घटका ते आंत असतील. नंतर मोठ्या प्रसन्न मुद्रेनें ते बाहेर आले आणि श्री. दामू-अण्णांस हाक मारून म्हणाले, " दामू, चल कागद घे. लिही सांगतों तें. 'राहेर क्षेत्र अति पवित्र गोदा तिरीं। नांदतो तेथ हा सदैव नरकेसरी' असें पद त्यांनीं बसल्या बैठकीला एकटाकी पुरें केलें. "

श्री. देशपांडे यांनीं सांगितलेली ही आठवण ऐकतांच ' तो नारसिंह म्यां सिंहासनीं पाहिला ' या चरणाचा अभिप्राय जो आतांपर्यंत मला गूढ वाटत होता, तो एकदम उलगडल्यासारखा झाला. याविषयींची चर्चा मी कोठेंहि केली नाहीं. फक्त ती. दादांच्याजवळ ' राहेरची अशी अशी आठवण ऐकिली परवां. ' एवढेंच बोललों. ते फक्त हंसले आणि म्हणाले, ' नादिष्ट आहेस झालं. ' मीहि तो विषय पुढें वाढविला नाहीं.

या तिन्ही गोष्टी एकमेकांच्या जवळच्या काळांत घडल्या आहेत. योग्याच्या भेटीची घटनाहि याच सुमारास पण थोडी आधीं घडली आहे. या तिन्ही चारी घटना एकत्र विचारांत घेतल्या म्हणजे त्यांचा कांहीं विशेष अर्थ स्फुरतो, असें मला वाटतें. त्याचें विवेचन करणें मी येथें अनवश्यक मानतों. वाचकांनीं आपापल्या भावनांनुसार यासंबंधीं कल्पना कराव्या.

श्रीदासगणू महाराजांविषयीं उल्लेखितां येतील, अशा सर्वसामान्य

चमत्कारांच्या गोष्टी कांहीं थोड्या नाहींत. तशा आठवणी सांगणारे लोक पुष्कळच आहेत; परंतु तें सर्व या ग्रंथांत उल्लेखावें असें मला वाटत नाहीं. असल्या चमत्कारांविषयीं स्वतः श्रीदासगणू महाराजांना काय वाटतें, तें मी मागें लिहिलें आहेच. सिद्धि प्राप्त झालेल्या पुरुषानें केलेल्या अलौकिक वाटणाऱ्या गोष्टींवर माझा विश्वास असला तरी चमत्कारासंबंधींच्या माझ्या कल्पना कांहीं वेगळ्या आहेत. एकदां मलाहि याचा फार चांगला अनुभव आला आहे. १९५० सालची गोष्ट. त्या वर्षी आषाढ अधिक होता. या अधिकमासाचा उत्सव सर्वच्या सर्व माझ्या हातून व्हावा, अशी माझी इच्छा होती. ती पूर्ण झाली. मी स्वतः हा एक चमत्कार समजतों. मी तें सर्व एका प्रकरणामध्यें कविताबद्ध केलेलें आहे. वाचकांना तें जसेंच्या तसें सादर करतों; म्हणजे आपापल्या कल्पना त्यांना पडताळून पाहतां येतील. प्रकरण विस्तृत आहे. पण माझा हेतु लक्षांत घेऊन या विस्ताराची क्षमा होईल, अशी निश्चिति वाटते.

**श्रीशंकर**

## २६. श्री अधिकमास महोत्सववर्णन :

दयाळा रुक्मिणीकांता, माधवा भक्तवत्सला । परेशा सच्चिदानंदा, वाहतों वंदनें तुला ॥ तेज तूं सूर्यबिंबाचें, तूंच गांभीर्य सागरीं । आल्हाद तूंच चंद्राचा, प्रसन्नत्व फुलावरीं ॥ तुझ्या सुगंधें शोभावा, वाळा चंदन कस्तुरी । सुधा साखर आंब्याची, अच्युता तूंच माधुरी ॥ सत्ता तूं वस्तुमात्रांची, प्राण्यांचें तूंच जीवन । कल्पनांच्या भराऱ्यांना, स्थान नाहीं तुझेविण ॥ उत्पत्ति स्थिति संहारा, मानिता तूंच त्या प्रती । हेतु आहेस गोविंदा, सामर्थ्या तव ना मिती ॥ तुझ्याविना रिता ऐसा, ठाव विश्वांत या नसे । जें जें ये प्रत्यया कांहीं, तुझा वास तिथें असे ॥ व्यापिलें आंत बाहेरी, पदार्थासि तुवां हरी । तुझ्या सत्तेवरी सारें, नांदतें भुवनांतरीं ॥ सर्वव्यापक देवा तूं, असा सर्वत्र सर्वदा । तरी बुद्धिमनासी ना, कळतोस विभो कदा ॥ कुंठली गति शास्त्राची, नेति नेति म्हणे श्रुति । योग याग

तपोयुक्ता, ना कळेचि तुझी स्थिती ॥ नाना पंथ मतें नाना, नाना धर्म तसे विधी । शोधितां थकले तूंतें, तेथ मी कोण मंदधी ॥ १० ॥ सर्वेशा तुज जाणाया, जवळीं पात्रता नसे । येत संशय बुद्धीसी, मन चंचल होतसे ॥ एक ना धड चिंध्या त्या, भाराभर कृती अशी । चिकाटी जवळी ना मो, अव्यवस्थित आळशी ॥ तरीहि संतसंगानें, सद्गुरूच्या कृपेमुळें । हृदयीं फुलती कांहीं, थोडेसे भाव चांगले ॥ त्यामुळेंच असे आला, विश्वास मजसी पुरा । घेतां धांव तुझे पायीं, उपेक्षिसि न त्या जरा ॥ दीनवत्सल देवा तूं, कल्पवृक्ष आम्हांप्रती । थोरवी तव गायासी, वाणी इच्छित संप्रती ॥ अशीच एकदां आली, कल्पना मानसी नव । व्हावा हातूनियां माझ्या, मलमास–महोत्सव ॥ श्रीमत्सद्गुरु दादांची, पद्धती जी सुमंगला । गेल्या चाळीस वर्षांसी, जींत ना पडला खळ ॥ सरुद्र पवमानाचा, अभिषेक हरीवरी । सनाम पाठ अर्पावा, तुळशी बेल नंतरी ॥ मध्याह्नीस यथाशक्ति, होई ब्राह्मण-भोजन । श्रीमद्भागवताचें तें, दुपारीं हो निरूपण ॥ पुण्यपावन संतांचीं चरित्रें प्रेमपूर्वक । गांवीं कीं कीर्तनीं सांजें, रसाळ अतिभाविक ॥ २० ॥ जोंवरी होत होतें तों, तीसच्या तीस कीर्तनें । करीत होते श्रीदादा, स्वयें प्रेमळ वाणिनें ॥ थाट त्या कीर्तनाचा मी, वानावा काय पामरें । देहभान नुरे कोणा, लोचनीं प्रेम पाझरें ॥ नागासम डुले श्रोता, मंत्रमुग्ध असे जसा । तर्कटी नास्तिकाचाहि, भावानें दाटतो घसा ॥ प्रसादमय वाणी ती, वाल्मिकीची गिरा जशी । गोडवा फार शब्दांना, प्रेमाच्या ओतिलें मुशीं ॥ निष्काम प्रेम दादांच्या, होतसे मूर्त कीर्तनीं । भक्तिप्रेमरसामाजीं, जाती संपूर्ण रंगुनी ॥ कीर्तनीं ठाकतां दादा, प्रगटे रंगदेवता । सोहळा दिव्य तो काई, पाहण्यास मिळे अतां ॥ वयोमानानुसारानें, थकले सद्गुरू पुढें । गाती मग कुणी कांहीं, कीर्तनीं वेडवाकुडें ॥ कीर्तनानंतरी रात्रीं, होई भजन सुस्वर । कार्यक्रम असा राही भरगच्च निरंतर ॥ मासाच्या शेवटीं यज्ञें, सांगता होत उत्सवा । लाभावी मज ही सेवा, लागली ओढणी जिवा ॥ ईशा मी अभिषेकावें, करावीं मीच कीर्तनें । शेवटीं

होमही व्हावा, मंत्रें मंगल पावनें ॥ ३० ॥ गेले दादा जरी आतां, नांदेडीं गोरख्यास वा । तरी जातां नये मातें, तेथें सर्वांहि उत्सवा ॥ मध्यें अधिक-मासाच्या, परीक्षा नेमिली मम । ती टाळून कसें जावें जीवाला जाहले श्रम ॥ त्यांतुनी प्रकृति नाहीं, दादांची पूर्ण चांगली । विश्रांति पाहिजे त्या जी ती न लाभेल ते स्थळीं ॥ आतांपर्यंत दादांचे, अधिकोत्सव सर्वहि । मोंगलाईमधें झाले, पुण्यासी नच एकहि ॥ हा तरी येथची व्हावा, तीव्र इच्छा मनांत ये । घडावें हें परी कैसे, बावरे मन संशयें ॥ भय कंपित नावाडी, जसा भीषण वादळीं । प्रवासी व्याकुळें जेवीं, निशीं निर्जन जंगलीं ॥ जलाचा ठाव ना ऐशा, वाळवंटांत तापल्या । कासावीस मृगा जैशी, तशा मद्वृत्ति जाहल्या ॥ कल्पना जेवढी सोपी, करणें नच त्या परी । किती अडचणी होत्या, मार्गामाजिं जशा दरी ॥ पुण्यामध्यें वसायाची, दादांची सिद्धता न ही । ओढ नांदेडची त्यांना, बरें कोपरगांवही ॥ तीर पावन गोदेचें, पुण्यकर्मास चांगलें । येणार ना पुण्याला मी, जरी कांहींहि जाहलें ॥ ४० ॥ मूळे कुठार हा माझ्या, इच्छेच्या वरती पडे । उदास जाहले मातें, वाटे कोसळतें रडें ॥ परी आग्रह मी माझा, थोडाही नच सोडिला । भक्तांच्या पुढतीं काहो, देवाचा हट्ट चालला ॥ या कामीं पूर्ण पाठिंबा, सज्जनांचा मला मिळे । सदिच्छेस सहाय्याची, वाण हें नाहीं जाहलें ॥ गोखले पनवेलीचे, दत्तात्रेय सदाशिव । साधे भाविक मेधावी, अहंता ज्या नसे लव ॥ सात्त्विका-संगती ज्यांची, वेळेचें भान लोपवी । मर्मज्ञता जयांची कीं, बुद्धीची उंचि दाखवी ॥ रावसाहेब ते होते, पाठीशीं पूर्ण माझिया । आधार आणखी होता, मजसी धीर यावया ॥ वकील ख्यातकीर्तीचे, गर्देकुलविभूषण । नारायण असे ज्यातें, दिसतें नाम शोभुन ॥ आदर्श जो गृहस्थाचा, मनाचा फार मोकळा । खाऊं यथेच्छ घालावें, हाच ज्या नाद लागला ॥ सद्भावना वसे ज्यांच्या, हृदयीं माझियाविशीं ॥ प्रेमानें राहिले तेहि, द्यावया धीर पाठिशीं ॥ या बळें मी प्रयत्नासी, विश्वासें पूर्ण लागलों । बोरावके बापुराव, यांना प्रथम भेटलों ॥ ५० विनंती करूनी त्यांना, त्यांचा आग्रह वारिला । हा उत्सव पुण्या-

सीची, व्हावा हें इष्ट त्याजला॥ हट्ट पाहोनियां माझा, द्रवले सद्गुरु मनीं। आनंदित मला केलें, त्यांनीं संमति दावुनी॥ विषादाची छटा आली, परी हर्षामधेंच या। उत्सवा योग्य शोधावी, जागा कोठें वसावया॥ सोयीची मोकळी जागा, पाहुण्यासह राहण्या। आहे का पुसतांना हें, दातांच्या जाहल्या कण्या॥ कीर्तनास पुरावेंसें, प्रशस्तस्थळ तें जिथें। आहे कळेल मी जावें, शोधासी धावुनी तिथें॥ कार्यालयें मंदिरेंहि, जुने वाडेहि पाहिले। 'नाहीं' स्पष्ट म्हणे तों मी, खेटे संतत घातिले॥ जो जो 'ना' पदरीं येई, तों तों उत्साह वाढला। कोपरा कोपरा साऱ्या पुण्याचा पार शोधिला॥ दहा वर्षांतहि जे मी, नव्हते भाग पाहिले। दिनीं आठचि ते रस्ते, बोळ वा पाठ जाहले॥ भेटावें मी कुणासींहि, नसो ओळख पाळख। मिळेल काय हो जागा, विचारी आर्जवी मुख॥ हो देतो न म्हणे कोणी, प्रकार जरि वेगळा। कोणी स्वच्छ वदे 'नाहीं' कोणा मार्ग न राहिला॥ ६०॥ एके ठायीं तरी श्रोते पराकाष्ठाचि जाहली। एका मंदिरविश्वस्ता, मोठ्यांची भीड घातिली॥ होती त्या दिवशीं देखा, ज्येष्ठ वद्य त्रयोदशी। विलंबा वेळ ना तेणें, आलों मी फार घाइशीं॥ गर्दे आले स्वयें, संगें, घेउनी मित्र दस्तुरे। स्वाक्षरीनें दिलें त्यांनीं, विनंतीपत्रहि त्वरें॥ उत्सवास्तव आम्हांसी, जागा द्यावी असें ठरे। राहण्या कीर्तनासाठीं, प्रत्यवाय कुठें नुरे॥ गेलों लोणावळ्यासी मी, प्रभातीं तीन वाजतां। निवेदिलें सद्गुरुसी, जाहली सर्व सिद्धता॥ यावें सांजे पुण्यामाजीं, आहे आज चतुर्दशी। उद्यांच तेवढा मध्यें, आरंभ परवां-दिशीं॥ निश्चयें ठरलें सारें, तातडी पाहिलें पुणें। जागेचा घ्यावया ताबा, गेलों हर्षास ना उणें॥ अवसेस नव्या जागीं, जाणें ना ठीकें यामुळें। आतां येतांच दादांना, पाहिजे येथ आणिलें॥ म्हणोनी मागण्या किल्ली, गेलों कारकुनाकडे। तो म्हणे चिठ्ठी आणावी, म्हणजे ठीक तें पडे॥ होता गृहस्थ हा तेथें, ठरलें सर्व जेधवां। चिठ्ठी आणा म्हणे तोची, शंका ये मज तेधवां॥ ७०॥ तरीहि व्यवहाराच्या, दृष्टी तें ठीक मानिलें। त्यावेळीं भेटल्या दारीं, सौ. शांताबाई गोखले॥ आल्या होत्या

मला द्याया, कीर्तनाचें निमंत्रण। "झांशीच्या पूज्य राणीचा, आहे पुण्यतिथीदिन ॥ त्यानिमित्त करावें कीं, तुम्ही कीर्तन" यापरी। बोलतां त्या मला, सेवा स्वीकारी मीहि आदरीं॥ "बिदागी तुमची काय? देऊं आम्ही असेल ती"। म्हणालों मी "न कांहींहि! त्याची ना करणें क्षिती॥ नाहीं कीर्तन हा धंदा, सेवा त्यांतून ही असे। थोरशा देश-भक्तांची, यांत सर्वहि सारसे"॥ म्हणाल्या सहजी तेव्हां, सौ. शांताबाई यापरी। बरें झालें मिळे जागा, येथें तुम्हांस ना तरी॥ दिधली असती मीहि, सदनीं राहण्याप्रती। मोठेंपण फुकाचें हें, घेऊं कोण न पाहती॥ तुकडे पडले माझ्या, पायाचे स्थल शोधितां। एकहि भेटला नाहीं, जो म्हणे होय तत्त्वतां॥ मिळाल्यावरती जागा, मी देतों कोण ना म्हणे। कोण देई कोण जाई, फुकाचें सभ्य बोलणें॥ कोते विचार हे माझे, रुचले नच ईश्वरा। खरी माणुसकी त्यानें, दाविली मज पामरा॥ ८० ॥ होती जी ठरली जागा, नकार उमटे तिथें। घातिले हेलपाट्यांना, इकडे तिकडे पथें॥ जागा ना द्यावयाची हा, अंतीं निश्चय जाहला। हेतू जो कथिला त्याचा, अचंबा मज वाटला॥ संभाविताच्या शब्दांना, मान पूर्वीं किती असे। विश्वासें एकमेकांच्या सुखी जीवन जातसे॥ देणें घेणें घडे सारें, तोंडानें सांगण्यावरी। चिठ्ठी ना साक्ष ना जाई, कोण न्यायालयांतरीं॥ नसे ठाउकहि कोणा, कुलुपें घालणें घरा। प्रवासी पूर्वकालींचे, गाती ठेवुन आदरा॥ प्रामाणिकपणा तेवीं, सचोटी पूर्ण नांदली। ज्या भारतीं तिथेची का, प्रभो ही वेळ पातली॥ गोष्टीचा आज साध्याहि, नसे भरवंसा कुणा। अधःपात किती झाला, आमुचा हा दयाघना॥ विश्वस्त वदले आम्हां, सांगावा नेम कोणता। कोण वागेल कैसा तें, आज येत न सांगतां॥ प्रवेश एकदां झाल्या, उद्यां नाकारिलें जरी बाहेर निघणें तुम्ही, करावें काय हो तरी॥ सध्यां झालेत भारीची, चमत्कारिक कायदे। व्हावें सावध आधींची, दोघांहि यांत फायदे ॥९०॥ जाहलों थक्क मी चित्तीं, खिन्नता बहु वाटली। काय विक्षिप्त शंका ही, खराची घोर हा कली॥ आतां काय करायाचें, दादांना आणणें कुठें।

तोंड दावूं कसें त्यांना, मनाचा बांधची फुटे ॥ सुचे न मजसी कांहीं, वेळ थोडाच राहिला । भोंवतीं माझिया तेव्हां, जणों अंधार दाटला ॥ बोलले तेधवां गर्द, आणावे माझिया घरीं । करितां नच संकोचा, महाराजास आदरीं ॥ गायआळींत रामाचें, आहे मंदीर कीर्तना । होकार तेवढाची जो, मिळाला प्रथम क्षणा ॥ करावीं कीर्तनें तेथें, रहावें आमुचें घरीं । होवो कांहींहि येथेंची, करणें उत्सवा परी ॥ विचार तोच माझाहि टाकिलें पद एकदां । ज्या पथावरती तें ना, पुनः उचलणें कदा ॥ जरी मंदीर दादांना, चालाया लांब वाटलें । वाहनाची करूं सोय, प्रत्यहीं ठरलें भले ॥ शांताबाई गोखल्यांचे, स्मरले बोल तों मला । हा खडा टाकुनी पाहूं, ना तो आधींच निश्चिला ॥ गेलों भेटावया त्यांना, त्या तदां नव्हत्या घरीं । कन्यका भेटली त्यांची, जी का शंकित अंतरीं ॥ १०० ॥ ती वदे आमुची आई, हो म्हणे केविं ना कळे । खोल्या दोनचि, एकीसी, पोत्यांचे ढीग लागले ॥ दुर्जासी वर्ग हिंदीचा, भरे येथहि मंडळ । आहे कीं कार्यकर्त्यांविं, तें का संमति देईल ॥ गृहीत धरला होता, नकार पहिलाच कीं । प्रस्तावना तयाची ही, ऐकिली शांत मस्तकीं ॥ ठरलें राहणें आम्ही, बापुमामांचिया घरीं । गायआळींत ठोकावीं, कीर्तनें राममंदिरीं ॥ स्थानकावरती गेलों, दादांना आणण्याप्रती । सुरळीत घडायाची, ते दिनीं नव्हती तिथी ॥ सामानास्तव भाड्यानें, छकडा एक नेमिला । शिवाजीनगरा नेला, उशीर परि गाडिला ॥ साडे सातास जी यावी, वाजले तिजसी दहा । गाडीवाला म्हणे भाडें, करावें चुकतें पहा ॥ खोळंबा जाहला माझा, द्या भाडें पुरतेपणीं । खरें होतें तयाचें तें, ना म्हणूं त्यास कोठुनी ॥ गांठूं न शकलों गाडी, शिवाजीनगरावरी । गाठिलें मी दुचाकीनें, पुणें स्थानक सत्वरीं ॥ वाहनें ठरलीं होतीं, दादा आरूढ त्यावरी । बाबा बापूराव तेवीं, महाजन बरोबरी ॥ ११० ॥ दादांना न्यावयासाठीं, जे का तत्पर सर्वथा । भिडेनें माझियाची जे, बसले स्वस्थ अन्यथा ॥ मी जरी वदतों तेथें, आनंदाश्रम ना मिळे । पथ्यावरी तयांच्या तें पडलें असतें भले ॥ असे तापट दादांचा, स्वभाव मज ठावुका ।

जातील गोरट्यासी ते, राहिलों म्हणुनी मुका ॥ स्थानकावरती सारे, दूत होतेच संगतीं । नेण्या उत्सुक दादांना, इष्टापत्ति तयास ती ॥ सामान बांधलेलें तें, गाडीहि जावया असे । पुणें नावडतें होतें, वेळा दुर्धर येतसे ॥ उच्चारिलें तदा नाहीं, एक अक्षरहि मुखें । दादांनीं पुसिलें नाहीं, पुरा वाहन ये सुखें ॥ मी राहिलोंच बाहेरीं मौनें सर्वार्थ साधकें । म्हटलें कीं निवूं द्यावें, वातावरण थोडकें ॥ घरीं जो जाहला होता, वानूं गोंधळ तो किती । हिमालयापरी होती, शांत मी वरिली स्थिती ॥ थोरांच्या वर्तनामाजीं, राहतीं गूढ कारणें । मोजूं ना कल्पनें येतीं, त्यांचीं उन्नतशीं मनें ॥ प्रेम माझ्यावरी आहे, दादांचें जें अलौकिक । उपमा न जयालागीं, शोधितां भुवनत्रिक ॥ १२० ॥ अखंड वर्षला माझ्या, शिरीं ज्यांचा कृपाघन । वैराण वाळवंटींहि, ज्यामुळें फुललें वन ॥ जयीं पुरविले माझे, हट्ट सारेच तत्क्षणीं । दुखणीं काढिलीं माझीं, ज्या प्रेमें नित्य जागुनी ॥ पाठ नाम सहस्रांचे, विष्णूच्या जे निरंतर । करिती जवळीं माझे, शिरीं फिरविता कर ॥ प्रेमाचा दिव्य त्या होता, मला विश्वास अंतरीं । शंकलों म्हणुनी ना मी, उग्रता पाहुनी वरी ॥ तों आल्या तत्परा तेथें, सौ. शांताबाई गोखले । वदल्या “ तुमच्यासाठीं, राहण्या स्थल मोकळें ॥ सुखेनैव तिथें यावें, संकोच न करा मनीं । पक्का निश्चय हा माझा, या तुम्ही सोय पाहुनी ॥” वाटले बोल ते मातें, ईश्वराच्या वरापरी । कोण त्यावांचुनी सांगा, संकटीं कर दे तरी ॥ तिथि प्रतिपदे जागा, पोतीं काढून मोकळीं । पोत्यांचिया धन्यासंगे, थोडी कुर्बूर जाहली ॥ तयासी कल्पना नाहीं, आम्ही आलों नि घाइशीं । टेकोजी कोण हे आले, वाटलें त्यास मानसीं ॥ शेवटीं मोकळी झाली जागा आनंद वाटला । सामान रचिलें सारें देव्हारीं देव मांडिला ॥१३०॥ नांवाला दिधल्या होत्या, खोल्या दोन आम्हांप्रती । साऱ्या घरांतची आम्ही, नांदलों मोकळ्या रितीं ॥ कुटुंब विरळा ऐसें, आनंदी मन मोकळें । सर्वेहि सुस्वभावी ते, सर्वांचें चित्त सोवळें ॥ गंगा विवाहिता ज्येष्ठा, मध्यमा बेबि नामका । रजनी धाकुटी, पद्मा, नात दे गोडसा मुका ॥ सुशील विनयी कन्या, आज्ञा-

धारक तीन या। नव्या युगांतहि नाहीं, ठावी थिल्लरता जया॥ जावई शोभले अण्णा, अबोल मितभाषणी। बुद्धिमत्ता दिसे ज्यांची चष्म्यांतूनहि लोचनीं ॥ धनी प्रेमळ गेहाचे, श्री. सखाराम गोखले। मामा टोपण नांवानें, जया संबोधिती भले॥ शांत सात्त्विक धीराचे, चित्तीं नांदे उदारता। सांगावें मी किती त्यांचे, वानावे येथ तत्त्वतां॥ ज्यांची पूर्वीं कधीं कांहीं, ओळखी नव्हती जरा। त्यांनींच होउनी आम्हां, दिला गेहांत आसरा॥ सख्खे भाऊहि जे काळीं पुसती न परस्परां। करी अनोळखी तेथें, सहाय्या पुढती करा॥ जन्मजन्मांतरींचा हा स्नेह होतांच जोडिला। तो केवळ निमित्तें या, जणों प्रगट जाहला ॥ १४० ॥ त्यांविणें का असा येई, जिव्हाळा प्रगटोनियां। साक्षा-त्कारासची आली, ईश्वराची गमे दया॥ शांताबाई वधू त्यांच्या, साध्या गर्व न थोडका। कार्यकर्त्या स्त्रियांमाजीं, रीतीला न परी धका॥ वरोनी भासती जैशा, तशा नाहींत अंतरीं। फणसास जशी राही, अंतरंगांत माधुरी॥ आनंदें पार जो झाला, मलमास महोत्सव। त्याचें सारें कुटुंबा या, श्रेय ना मजसी लव॥ आरंभापासुनी नाहीं, परकेपण वाटलें। आनंदाश्रम लाभे ना, झालें तें फार चांगलें॥ खाक्या संस्थानचा तेथें, मोकळेंपण कोठलें। कोण काय म्हणे याचा, वारिला धाक विठ्ठलें॥ जें कांहीं होत तें होतें, बऱ्यासाठींच बोलती । सूज्ञ जे नित्य ये त्याची, प्रचीती मज या रितीं॥ विप्र होता हवा आतां पवमान म्हणावया। येईल जेवणासी जो प्रत्यहीं करुनी दया। विश्वास मजसी ज्याचा, लक्ष्मणें त्या न मानिलें। वदे तो कोण या रीतीं, घेई बांधोनियां भले॥ यामधें होतसे तोटा, शोधिलेस किती जरी। ऐसा ब्राह्मण या वेळीं, लाभेल न पुण्यांतरीं ॥ १५० ॥ दादांच्याच समोरीं हें स्वच्छ तो वाक्य बोलला। सत्यासत्य असो कांहीं, रुचलें नच तें मला॥ एक सांगत पूजेसी, जेवाया येत दूसरा। आमुच्या भावनेलागीं, तें वाटें न बरें जरा॥ ईश्वराच्या कृपेचा ये, पुन्हां प्रत्यय कीं मज। पूजना भोजना लाभे, दशग्रंथी असा द्विज॥ करंबेळकरोपाह्व भालचंद्राख्य

वैदिक । शांत सात्त्विक संतोषी, यथालाभांत भाविक ॥ आसन्नप्रसवा होती, भार्या त्यांची सुलक्षणा । जननाशौच येण्याची, भीती वाटतसे मना ॥ विघ्नाविणें परी गेलें, शेवटा घेतलें व्रत । मानवाच्या प्रयत्ना हें, श्रेय नाहींच निश्चित ॥ तिसरे दिवशीं आले, नांदेडीचे द्विजोत्तम । शैशवापासुनी ज्यांनीं, लोभ केला बहू मम ॥ वाणीसी गोडवा भारी, असे प्रेमळ अंतरीं । व्यवस्थितपणा कर्मी, टापटीप कितीतरी ॥ शेंडीसी मोकळ्या माझ्या, कौतुकें गांठ मारिती । कां कीं धार्मिक कार्यासी, शिखा सग्रंथि लागती ॥ पूजास्थानास आणावी, शोभा त्यांनींच सुंदर । मांडणी पाहुनी व्हावें, सुप्रसन्न मदंतर ॥ १६० ॥ रांगोळ्या काढिती वेल, तुळशी निवडोनियां । फुलांच्या गुंफिता हारा, ठावा आळस ना जया ॥ श्री. राजेश्वरपंता ते नामदेव सहाय्यक । जयांच्या संगतीमाजीं, सर्वांसी जाहलें सुख ॥ आणिती गोखले मामा, प्रत्यहीं बेल सुंदर । एक मास असा त्यांनीं, आर्चिला परमेश्वर ॥ बेलाचें झाड कांटेरी, काढी ओरखडे किती । कधीं ओतत पर्जन्य, केली नाहीं परी क्षिती ॥ हाल सोसूनहि ऐसे, नेला नेम तडीप्रत । जन थोर न केव्हांहि, टाकिती घेतलें व्रत ॥ सूर्योदयासवें होई, आरंभ देवतार्चना । श्रीमद्भागवताच्या कीं, करी पंडित वाचना ॥ पूजा सकाम ना व्हावी, आज्ञा श्रीगुरुची अशी । "देवासी काळजी सारी, मागावें काय त्याजसी ॥ बाळाची भूक मातेसी, लागते संत बोलती । सर्वज्ञा काय सांगावें, कृपाळू रुक्मिणीपती ॥ मागावें प्रेम देवाचें, म्हणावें हृदयीं धरी । स्फुरावेत सदा देवा, सद्विचार मदंतरीं ॥ ना तरी स्वकुटुंबाच्या, आयुरारोग्यवर्धना । संपत्संततिलाभार्थ, करितां देवतार्चना ॥ १७० ॥ मानिता यामध्यें तुम्ही, लाचखाऊ हरीप्रती । तुमच्या क्षुद्र पूजेसी, हावरा न रमापती ॥ दादांनीं कथिला विप्रा, तदा संकल्प यापरी । प्रीत्यर्थ पांडुरंगाच्या, पूजार्चन घडो करीं ॥ पूजेचा वेळ तो जाई, अत्यानंदांत पावन । फुलावें मन हर्षानें, वसंतांत जसें वन ॥ जन्माचा आळशी ख्याती सूर्यवंशी अशी मम । सांगतों सत्य ना झाले, यावेळीं मजसी श्रम ॥

विद्यालयांतलीं कामें, चिकित्सालय त्यावरी। अभ्यासही परीक्षेचा, त्या-मधेंच बसे शिरीं ॥ म्हणोनी सांगती दादा, तूं पूजेस बसूं नको। झेपेल ताण ना तूंतें, व्यर्थ हट्ट धरूं नको ॥ परी मीं मानिलें नाहीं, भरे उत्साह अंतरीं। पूजनीं शांत सौख्याच्या, लहरी, उठती उरीं। पवित्र श्रुतिमंत्राचे, स्वर गंभीर कोमल। तरंगा निर्मिती वाटे, शांत सागरिचें जल ॥ अश्विनी पूर्ण चंद्राची, प्रभा निर्मळ अंबरीं। प्रसन्नता तशी तेव्हां, वाटावी हृद्यांतरीं॥ आकाशीं उंच ठाकावे, शिखरीं पर्वताचिया। प्रसन्नशा उषःकालीं, विंझणा पालवी जया ॥ १८० ॥ नाहीं गोंधळ ना धूळ, दाटी कुंद्पणा न वा। शांतवी श्रांत चित्तासी, सुखदायक गारवा॥ शैलशृंगी अशा वाटे, उदात्तपण जें मना। तसें वाटतसें मातें, करितां ईशपूजना॥ पुरता होत जों जों ये, मलमास महोत्सव। प्रशांतपण तों तों मी, हृदयीं भोगिले नव ॥ श्रीदादांच्या कृपायोगें, सारी मीं भोगिलीं सुखें। नव्हाळी सात्विका ही ना, परी ये वर्णण्या मुखें॥ वाहावा पूजनाअंतीं, तुळशी बेल आदरें। पार्वतीपरमेशांचीं, नामें उच्चारुनी बरें॥ अन्नदान यथाशक्ति, माध्यान्हीं नित्य होतसे। सर्वही श्रेय याचें तें अत्याबाईप्रती असे॥ एक मास चुली-पाशीं, केलें पंचाग्निसाधन। घातिलें नित्य सर्वांना, त्यांनीं सुग्रास भोजन॥ असे तापट तो प्रायः अंगीं कर्तृत्व ज्याचिया। कामें होतीं पहा तेणें, मऊसा न कुठें रया॥ धाकानेंच जगामाजीं, कामासी लागती जन। कष्टवावी तनू वाटे, कोणा आपण होउन ॥ अत्याबाईंचिया भेणें, झालीं कामें व्यवस्थित। झाली प्रसन्नता तेणें, जेवणारास संतत ॥ १९० ॥ दुपारीं वाजतां तीन, पंता व्याख्यान सांगती। श्रीमद्भागवताधारें जिव्हाळा त्यामधें अती॥ वेग वाणी प्रती नाहीं, पुनरुक्तीहि होतसे। परंतू प्रेमभावानें, व्याख्याना रंग येतसे॥ गुणानुवाद गातांना, श्रीहरीचें हवें मन। कोवळें शुद्ध भक्तीचें, दुज्याचें काय कारण॥ गायनें वादनें नृत्यें, हावभावें विडंबनें। विद्वत्तेनें विनोदानें, कीर्तना रंग आणणें ॥ तों तों कृत्रिम जाणावा, फासुनी रंग ज्यापरी। नाटकी आणिती सोंगा, खरी ना त्यांत माधुरी ॥ पोटांतून जया नाहीं, उमाळा

प्रेम भावना । व्याख्यानें सर्वही त्याचीं, जाणा दांभिक चर्वणा ॥ पंताच्या अंतरंगासी, होती कोमलता खरी । म्हणोनी येत साध्याहि, बोलण्याप्रति माधुरी ॥ ठाकावें कीर्तनासी मीं, सांजेसी वाजतां सहा । नेम मासांतहि कांहीं, फारसा चुकला न हा ॥ पट्टाभिषिक्त रामाचें, होतें मंदिर थोर तें । गायआळीमधें झाली, सेवाही प्रभुची तिथें ॥ प्रत्यहीं बहुधा एका, संताचे गुण गाइले । जे श्रीसद्गुरुदादांच्या, गोड काव्यांत गोविले ॥२००॥ संतांचीं चरितें आधीं, पुण्यपावन मंगल । प्रसादयुक्त काव्याचा, चढे त्या साज उज्ज्वल ॥ यावा सुगंध सोन्याला, सुगंधास रुची जशी । रुची मंजुळ लागावी, दादांची कविता तशी ॥ मुळांत जल गोदेचें, न्हाणिलें विठ्ठला तयें । वेदसूक्तें पवित्रत्व, तसें या कवितांत ये ॥ आहेच दूध गाईचें, गोड पौष्टिक पावन । केलें पायस त्याचेची, तसें दे काव्य जीवन ॥ कोंदणांत बसे रत्न, चंद्राला पौर्णिमा मिळे । सागरा भरती आली, वनश्री शरदीं फुलें ॥ मांगल्यास प्रभातींच्या, सूर्याचे कोवळे कर । केशरी कनके जेवीं, करीती फार सुंदर ॥ संतांचीं चरितें तेवीं, दादांच्या कवितेमुळें । पावली दिव्य शोभेतें, पैलू पाचूस पाडिले ॥ ऐकितां या चरित्रासी, चित्तासी न उरे मळ । संसारामधलीं दुःखें, करिती मा न चंचल ॥ लाभ होतात सारेही, काव्यगंगावगाहनें । श्रवण स्नान हें व्हावें, मात्र भाविकशा मनें ॥ आयुरोग्यदायी हें, आहे संतकथा-मृत । संशयाची परी माशी, ओकवी लाभ हा नित ॥ २१० ॥ आली याविषयीं चित्तीं, शंका अल्प जरी खुळी । नाशिते भव्य भिंताला, पिंपळाची जशी मुळी ॥ मनें सात्त्विक ठेवावीं, श्रद्धेनें ऐकणें कथा । ऐकिलें वर्तनीं आणूं, झटावें याचि सत्पथा ॥ यापरी अन्यहि ऐसें, वदलों सद्गुरुकृपें । ऐश्वर्य दावणें जेवीं, मिशा माखुनियां तुपें ॥ श्रोते तल्लीन होवोनी, ऐकिती सर्व कीर्तन । प्रत्यहीं वाढली दाटी, पथींहि ठाकती जन ॥ होते गर्जविले नाना कीर्तनीं पुण्यपत्तना । समाज तरिही माझ्या, कीर्तना नव्हता उणा ॥ आकर्षण असें सर्वां, आख्यानाचें विलक्षण । सांगणारावरी कांहीं, तें नसे अवलंबून ॥ द्रोणामध्येंहि

पानांच्या, दूध गोडी न सोडितें। तेवीं मुखांत माझ्याहि, काव्य हें गोड लागतें॥ कृपेनें जगदीशाचे, सद्गुरूंच्या बळामुळें। सर्वहि दिन मासाचे, कीर्तनीं पूर्ण जाहले॥ चारपांच कथा होता, माझा पूर्वी बसे घसा। मासामधेंहि या त्यानें, दिला त्रास न फारसा॥ वाटे शक्य मला हें ना, ईश्वराच्या कृपेविण। सेवाहि घेतली देवें, आपुलालीच आपण॥ २२॥ आषाढ शुद्ध पक्षाची, तिथि प्रतिपदा यदा। मासांतीं पातली झाला, होमाचा निश्चयो तदा॥ मामांनीं घातिला वेगें, योग्य मंडप अंगणीं। यज्ञाचें कुंड पंतांनीं, बांधिलें फार कष्टुनी॥ बांधिली मंडपा होती, अंब्याचीं शुभ तोरणें। करीती स्वागता दारीं, केळीचीं स्तंभ भूषणें॥ सूर्योदयाचिया आधीं, उषःकालीं प्रसन्नता। येतां नभा स्थापियेल्या, ब्रह्मादि ग्रहदेवता॥ रुद्राच्या पवमानाच्या, ऋचांनीं हवि दीधले। घृताक्ततिल या कामीं स्वाहापूर्वक योजिले। प्रदीप्त जाहला अग्नी जणों येत्या प्रसन्नता। वायुमंडलहि झाले तेणें पावन तत्त्वतां॥ कांहीं अपूर्व आनंदें तुडुंब भरलीं मनें। ध्वनि मंगल तें पुण्य, हविर्गंध हि कारणें॥ केलीं कर्में यथासांग द्विजांनीं आपुलेपणें। यज्ञाच्या पुण्य संस्कारें, सर्वांचीं तोषलीं मनें॥ दुपारीं कीर्तनामाजी, काल्याची लाहि वाटिली। या रीती मलमासाची, सांगता पूर्ण जाहली॥ पुण्योत्सव निमित्तें या, आनंद लुटला पुरा। सर्वांनीं, येथ चित्तासी, आला शांतपणा खरा॥ २३०॥ दयाळूपण ईशाचें, मिया प्रत्यक्ष भोगिलें। योग्यता नसतां कांहीं हेत सिद्धीस पावले॥ चित्ताचे सर्वहि माझ्या, पूर्ण झाले मनोरथ। झालों पार परीक्षेचा, विनायास महापथ॥ सद्गुरूपरमेशांची, कृपा थोर असे शिरीं। उल्लंघूं शकलों तेणें, पहा दुर्लंघ्य हे गिरी॥ सुखें पाठीस लागावीं, त्या परी जाहली स्थिती। प्रसादावीण ईशाच्या, नच हें होत निश्चितीं॥ योग्यता कोणती माझी, मिळालें यश केवढें॥ स्वबळें गरुडाऐसे, उडतें काय कोंबडें॥ सद्गुरूच्या कृपेचें हें, आहे, सामर्थ्य निश्चयें। दगडामधुनी मूर्ती, सुंदरा काढली जयें॥ करूं मी शकतों कां मी दीन दुर्बल एकटा। अनंत हस्तें ईशानें, आशेच्या भरिले घटा॥ उत्सवा या अनेकांचें, साह्य

झालें अमोलिक। उपकार किती त्यांचे, वानूं एक मला मुख॥ बोरावके बापुराव, दांत धीर पराक्रमी। सौजन्यें त्यांचिया मांडूं शकलों उत्सवास मी॥ गोखले श्री. सखाराम, कृताआधार जे कलीं। नांदते वर्तनीं ज्यांच्या, सदा सुजनता भली॥ २४०॥ गोखले पनवेलचे, पातले घेउनी श्रम। चित्तीं थोरपणें ज्यांचें, स्नेहभाव असे मम॥ शास्त्रज्ञ असुनी साधे, राव गोविंद गोगटे। जिव्हाळ्यानें जयांच्या ना वाटलें मज एकटें॥ गर्दे वकील, तत्पत्नी, अन्नपूर्णाच केवळ। नाम गंगा मनें गंगा, चित्तीं भाव महोज्वल॥ राव शंकर गर्दे ते, जयांच्या औषधामुळें। प्रेमानें दिधल्या माझ्या, कीर्तनांत घसा खुले॥ गाडगीळ महाराज, श्रद्धावंत सुशील जे। कथे येती गोडबोले राव वामन नित्य जे॥ शांताबाई वायनासी, पाकपात्र दिलें जयीं। चंपुताई राजुताई, सोनुताई मितव्ययी॥ साठे श्री. द्वारकाबाई, आम्हीं काकू म्हणूं सदा। फार कौतुक ज्या माझें, हातामाजीं असे सुधा॥ अध्यापिका रंगुताई, ताई पंडित भाविक। ज्यांचा शांतपणा वाटे, पाहतांच अलौकिक॥ शिबाड कवळी मिस्त्री, काका पाटील गांगला। शशितल जया ऐसा, धीराचा नच पाहिला॥ विदुषी सत्त्वसंपन्ना वेलिंकर कुलोत्तमा। लीलावती नित्य घेई, अमुच्यास्तव सुश्रमा॥ टीका मार्मिक कौशल्यें, विनोदी करितात जे। भानुराव असे जोशी, यत्स्मृती हृदयीं रुजे॥ २५०॥ पुराणीक कुलांतील, अप्पासाहेब ज्याप्रती। नये दुखवितां कोणा, शांत सात्त्विक सन्मति॥ धूतपापेश कार्याचे नानासाहेब चालक। काकासाहेब तद्बंधु, मुद्रणाचे निरीक्षक॥ फडके कुलदीप श्री गोविंद कवितापति। पित्याची ज्यांत विद्वत्ता, वरी रसिकता अति॥ बाबासाहेब चित्ताचे श्रीमंत गोरटेकर। शब्दास माझिया ज्यांनीं, दिधला मान सादर॥ गप्प जे राहिले प्रेमें, येउनी माझियास्तव। पुण्यासी म्हणुनी झाला, मलमास महोत्सव॥ पत्तेवार कुली कृष्णा, आत्या मी म्हणतों जिला। वायनास वड्या गोड, जिनें पाठविल्या मला॥ नांदेडाहून जे आले, नाना नाम दिगंबर। घराण्यावरती ज्यांच्या, दादांचें प्रेम निर्भर॥ महाजन, किसनशेट, गुरुभक्तिपरायण। पोटांत

वाढत्या ज्यांच्या, भरे विठ्ठलपूजन ॥ बारटक्के छगन तो, आज्ञाधारक तत्पर । कीर्तनीं राखितो बाणी, जयाचा गोडवा स्वर ॥ २६० ॥ तबला ठोकिला ज्यांनीं, ते दत्तोपंत कस्तुरे । अवधूत असे ज्यांना, वर्तनीं नाम साजिरें ॥ नांवें सांगूं किती ऐशीं, दुर्बला रसना मम । उत्सवा पार नेण्यासी, या सर्वीं घेतले श्रम ॥ उत्सवाचा अधिष्ठाता, पुरुषोत्तम विठ्ठल । कृपाळू भक्तकैवारी जो नाशी सर्वही मल ॥ आराध्य देव संतांचा, जया वाखाणिती श्रुति । सांवळा मेघ मायेचा, वासुदेव रमापती ॥ पीतांबरधर शार्ङ्गी, गोविंद गरुडध्वज । पार्थसारथि गीतेचा, प्रणेता श्रीअधोक्षज ॥ रुक्मिणीकांत सर्वां या, उत्सवाच्या सहाय्यका । दीर्घायुषी करो देवो, सर्वही इच्छिल्या सुखा ॥ सर्वांच्या पुत्रपौत्रांसी, ऐश्वर्यासी दयाघना । सद्भावनासही रक्षी, चरणीं हीच याचना ॥ दयाळा भारतीं ज्या तूं , जन्मलास अनेकदां । दुःख दैन्य तिथें आजी, अशांती नांदते सदा ॥ स्वातंत्र्य मिळुनी कांहीं, सुख लेश न लाधला । नेते गोंधळुनी गेले, स्वार्थासी पूर लोटला ॥ भारतीय जनाची ही, उपेक्षा न बरी हरी । पूर्वीपरी पुन्हां देवा तयासी हृदयीं धरी ॥ २७० ॥ मागावें काय मी आतां, माझ्यासाठीं तुला तरी । सद्गुरूंचें कृपाछत्र, असें कीं माझिया शिरीं ॥ तेणें जें इष्ट चित्तासी, लाधलें तें न मागतां । उदंड मज तें झालें, इच्छा त्याहून ना अतां । समाधान वसे चित्तीं, बहुधा मन ना चळे । सज्जनांचा स्नेह लाभे, सद्गुरूच्या कृपेमुळें ॥ हें कृपाछत्रची राहो, शिरीं माझें अखंडित । सर्वभावें तुझ्यापायीं, हेंच मी नित्य याचित ॥ तें देई तेवढें देवा, करावी पूर्ण कामना । दास श्रीगणुदासांचा, अनंत करि वंदना ॥ २७५ ॥

ॐ तत्सत् कृष्णार्पणमस्तु

॥ शुभं भवतु ॥

थोडेंसें अनवश्यक वाटणारें हें सर्व प्रकरण इतकें लांबलचक असून जसेंच्या तसें सविस्तर दिलें. याचें कारण महाराजांच्या अधिकमासाच्या

उत्सवाची पद्धति कशी असे, कार्यक्रम कोणते असत, कीर्तनाचें स्वरूप काय असे, उत्सवाच्या धार्मिकतेचा परिणाम काय होई, किती विविध लोक त्यांत भाग घेत; तें सर्व सहजासहजीं विदीत व्हावें. माझ्यावर या उत्सवाचा फार चांगला परिणाम झाला आहे. अनेक प्रकारचें शिक्षण आणि वळण त्यामुळें माझ्या मनाला मिळालें आहे. त्यांतहि या शके १८७२ मध्यें झालेल्या अधिक महिन्याच्या उत्सवाचा माझ्यावर कांहीं विशेष परिणाम घडला आणि म्हणून त्यावर एकाद्या दैनंदिनी-सारखें वरील काव्य मीं लिहिलें.

त्या दिवशीं मी गुलबुर्ग्यास होतों. श्री. पांडुरंगराव देशमुख यांच्या-कडे असतांना संध्याकाळच्या कीर्तनाव्यतिरिक्त मला दुसरें कोणतेंच काम नव्हतें. आषाढ शुद्ध एकादशीच्या दिवशीं कविता लिहिल्या आणि त्या श्री. पांडुरंगराव देशमुख यांना वाचूनहि दाखविल्या. हें सर्व प्रकरण त्यांना अतिशय आवडलें. माझ्या सर्व विचाराशीं ते पूर्ण सहमत होते. हें सर्व काव्य प्रसिद्ध करावें, अशी त्यांची फार इच्छा होती. 'तुम्ही खर्चाची काळजी करूं नका' असें त्यांनीं आवर्जून सांगितलें. मींच त्या वेळीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. आज या ग्रंथाच्या निमित्तानें हें काव्य प्रकाशित होत आहे; परंतु खेदाची गोष्ट अशी कीं, तें पाहण्यास श्री. पांडुरंगराव देशमुख मात्र राहिलेले नाहींत. महाराजां-वर निस्सीम श्रद्धा ठेवणाऱ्या मंडळींच्यापैकीं श्री. पांडुरंगराव हे एक होते. हा ग्रंथ प्रसिद्ध होत आहे, याचाहि त्यांना फार आनंद झाला असता. ईश्वरी इच्छेपुढें उपाय नाहीं हेंच खरें.

## २७. श्रीशंकराचार्यचरित्र :

अमृतानुभवाच्या लेखनाप्रमाणेंच श्रीशंकराचार्यांच्या चरित्राच्या निर्मितीचाहि एक इतिहास आहे.

मध्वाचार्यांचे संप्रदायी एकनिष्ठ वैष्णव शेषाचार्य अनवणे हे बीड येथें राहणारे गृहस्थ महाराजांविषयीं आदर बाळगणारे आहेत. पंढरपुरास

आले कीं ते महाराजांच्या भेटीस अवश्य येत असत. मध्वाचार्यांचें चरित्र मराठींत काव्यरूपांत असावें, हा त्यांच्या मनांतील फार दिवसांचा हेतु होता. एकदां त्यांनीं महाराजांनाच तें चरित्र लिहिण्याची विनंति केली. ही मध्वाचार्यांची सेवाच आपल्या हातून घडते आहे, या भावनेनें महाराजांनीं तें काम आनंदानें पतकरलें. कांहीं वैष्णव मंडळीच्या आग्रहीपणामुळें मात्र महाराजांना थोडा ताप झाला. नमनामध्यें अमुक एक उल्लेख करूं नका, असें ते म्हणाले. महाराज तें मानीनात. तेव्हां अनुक्रम तरी निदान आम्ही सांगतों तसा ठेवा, हें त्यांचें म्हणणें मानून काव्यलेखनास आरंभ झाला. पुढें एका प्रसंगीं शंकराचार्य हे मणिमान् नांवाच्या दैत्याचा अवतार आहेत व त्यांनीं मोहशास्त्रें निर्मिलीं असा उल्लेख मध्वचरित्रामध्यें आला. संस्कृतांतील मध्वचरित्र एका पंडितानें वाचून त्याचा अर्थ सांगावा. तदनुरोधानें महाराजांनीं ओव्या रचाव्या व कोणी तरी त्या लिहून घ्याव्या अशी ग्रंथलेखनाची रीत होती; परंतु हें मणिमान् दैत्याचें प्रकरण महाराज लिहिण्यास तयार होईनात. ते म्हणाले,

" मी शंकराचार्यांचा अनुयायी आहें. तुम्ही काय वाटेल तें म्हणूं शकतां; पण मी माझ्या तोंडांतून तसा उच्चार करणार नाहीं. "

" आपणांस नुसता अनुवाद करणें आहे. त्यांत अडचण कसली ? "

" अहो, अनुवादांत तरी माझ्या आईला दिलेल्या शिव्या मीं उच्चाराव्या काय ? "

शेवटीं या उल्लेखावांचूनच महाराजांनीं सर्व ग्रंथ पुरा केला, पण त्याच वेळीं श्रीशंकराचार्यांचें चरित्र आपण लिहावें आणि त्यांची योग्यता किती थोर होती, हें मराठी वाचकांच्या प्रत्ययास आणून द्यावें असा त्यांचा निश्चय झाला.

पुढें एकदां मध्वसांप्रदायांतील एक अधिकारी पुरुष पंढरपुरास आले होते. मध्वाचार्यांचें चरित्र महाराजांनीं लिहिलें आहे, हें कळल्यावरून भेटीची इच्छा त्यांनीं व्यक्त केली. त्याप्रमाणें महाराज भेटावयास गेले.

हार घालून नारळ पुढें ठेवून त्यांनीं नम्रतापूर्वक नमस्कार केला. ते महाराजांना म्हणाले, " फार सरस उतरलें आहे आपण लिहिलेलें मध्व-चरित्र. मध्वमतानुयायी नसून फार प्रेमानें आपण ग्रंथ लिहिलांत. आतां काय चाललें आहे ? "

" शंकराचार्यांचें चरित्र लिहिण्याच्या विचारांत आहे. "

आश्चर्यचकित झाल्यासारखे होऊन स्वामी म्हणाले, " अमृत प्याल्या-वर ही विषाची इच्छा ? "

श्रीदासगणू महाराज त्यावर चटकन् म्हणाले, " तसें नाहीं स्वामी. मध्वाचार्यांचें चरित्र मीं लिहिलें, त्या पुण्यानें आतां मला शंकराचार्यांचें चरित्र लिहिण्याची ही इच्छा झाली आहे. "

या प्रश्नोत्तरांमध्यें महाराजांच्या वृत्तींतील समन्वयशीलतेचा सुरेख प्रत्यय येतो. आपलें यत्किंचित्‌हि न सोडतां सर्वपक्ष संप्रदायाशीं कसें मिळतें घ्यावें, हें त्यांचेजवळ शिकावें. यानंतर लगेच श्रीशंकराचार्यचरित्र सर्वांगपरिपूर्ण व्हावें, या उद्योगास ते लागले. महाराज त्या वेळीं पुण्यास होते. विद्वत्तेचें माहेरघर असलेल्या या ठिकाणीं संदर्भग्रंथांची अडचण पडली नाहीं. मराठी, संस्कृत आणि कांहीं इंग्रजी ग्रंथसुद्धां त्यांनीं जमविले. सर्व पुस्तकें वाचून घेतलीं. मराठी पुस्तकांतील कांहीं भाग स्वतः वाचला. नंतर विद्यारण्यविरचित ' शांकरदिग्विजय ' हा काव्य-मय संस्कृत ग्रंथ प्रधान मानून श्रीशंकराचार्यचरित्र लिहिण्यास आरंभ झाला. महाराजांचें राहणें या वेळीं आनंदाश्रमासमोरील श्री. महाजनींच्या वाड्यांत श्री. लक्ष्मीबाई जोगळेकर यांचे बिऱ्हाडीं होतें. विद्यारण्यांच्या शांकरदिग्विजयाचा अर्थ पुष्कळसा मी सांगितलेला आहे. आरंभींचे तीन अध्यायहि लिहिण्याचें भाग्य मला लाभलें होतें.

हें काम करीत असतांना आम्ही भोंवतालचे लोक खरोखरीच दमून जात असूं. मधून मधून आम्हांस कंटाळा येई. पण ८० च्या घरांतील श्रीदासगणू महाराजांच्या उत्साहांत कधीं न्यून पडलें नाहीं. सकाळ-पासून निरनिराळे ग्रंथ पाहणें, समोर असेल त्या मनुष्याकडून वाचून

घेणें, संस्कृत किंवा इंग्रजीसारख्या भाषेंतील लिखाणांचा अर्थ जाणत्या-कडून समजून घेणें, जैन, बौद्ध, रामानुज, निंबार्क, शाक्त, सांख्य इत्यादींच्या तत्त्वज्ञानांचा उल्लेख करतांना त्या त्या मतसंस्थापकांच्या चरित्रविषयक वा तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांचा परिचय करून घेणें, निरनिराळ्या विरोधी मतांचा ऊहापोह करणें इत्यादि अभ्यास सतत चालू असे. विष्णुसहस्रनामाचे बारा पाठ, आल्यागेल्याशीं बोलणें, कोणी आलें तर आख्यानांचें वाचन हे कार्यक्रम तर नेहमीं चालूच असत, पण या सर्वांहूनहि वेळ काढून श्रीशंकराचार्यचरित्राचें काव्यमय लेखन अखंड चालू होतें. स्फूर्तीची वाट बघत त्यांना कधीं थांबावें लागलें नाहीं. ती त्यांच्यापुढें जणूं हात जोडून उभी असे.

हें सर्व पाहिलें कीं, जिव्हाळ्याची प्रीति किती कार्यक्षमता उत्पन्न करूं शकते, तें प्रत्ययास येई. या आचार्यचरित्रासंबंधीं ह. भ. प. सोनोपंत दांडेकर आपल्या प्रस्तावनेंत म्हणतात. “... या अशा अलौकिक पुरुषाचें चारित्र श्रीदासगणूंनीं मोठ्या परिश्रमपूर्वक लिहिलें आहे. नुकतीच त्यांनीं लिहिलेलीं मध्वाचार्य, शेगांवकर श्रीगजानन-महाराज यांचीं चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत. या सर्व चरित्रांवरून असें दिसून येतें कीं, चरित्र लिहिण्यापूर्वीं चरित्रनायकासंबंधीं शक्य तितकी माहिती मिळविण्याची खटपट ह. भ. प. श्रीदासगणू महाराज करतात. चरित्रनायकाचे ग्रंथ वाचतात. अवश्य अशा मुख्य ठिकाणीं जाऊन येतात. मगच चरित्र लिहितात. या चरित्राकरितांहि कांहीं संस्कृत चरित्रें, मता-मतांचे ग्रंथ वाचले. मठांचे इतिहास वाचले. प्रवास केला. मगच हें चरित्र लिहिलें. उतार वयांतहि श्रीदासगणूंच्या ठिकाणीं चरित्रलेखनाकरितां अभ्यास करण्याची ही जी प्रवृत्ति दिसून येते, ती तरुणांनीं अनुकरण करण्याजोगी नाहीं असें कोण म्हणेल? त्यांनीं आचार्यमान्य अशा अद्वैताचा पुरस्कार केला, पण अद्वैताच्या नांवावर चाललेला गोंधळ त्यांना नको होता. अद्वैताबरोबर कर्म, उपासना, ज्ञान अशा सर्वांची अधिकारपरत्वें आवश्यकता आहे, असें त्यांचें मत आहे.” असो.

श्री. ह. भ. प. दांडेकर महाराजांनीं श्रीशंकराचार्य चरित्राकरितां जें लिहिलें तें त्यांच्या इतर ग्रंथांच्या बाबतींतहि खरें आहे. या श्रीशंकराचार्यचरित्राच्या प्रकाशनाच्या बाबतींतहि विशेष गोष्ट घडली आहे. ग्रंथ पाहून एका तत्त्वज्ञानप्रेमी श्रीमंत गृहस्थानें मी हा छापीन, म्हणून सांगितलें. त्याप्रमाणें मुद्रणास आरंभ झाला. एक दोन अध्याय छापूनहि निघाले तोंच ज्यांनीं आश्वासन दिलें होतें, त्यांनीं पत्र पाठविलें कीं, व्यापाराच्या अडचणीमुळें मला सध्यां तरी कांहीं मदत करतां येणार नाहीं. मोठी पंचायतीची वेळ आली होती, परंतु एकदां पुढें टाकलेलें पाऊल मागें घेणें महाराजांच्या स्वभावांतच नाहीं. श्रीशंकराचार्यचरित्र प्रसिद्ध झालेंच पाहिजे, असें त्यांनीं ठरविलें. कारण ते म्हणतात. " या सद्गुरू चरित्राचें । श्रवण अवघ्यास व्हावें साचें । हेंच ग्रंथरचनेचें । आहे मूळ प्रयोजन ॥ " पुढें ते म्हणतात, " चरित्र अवघें तयार झालें । छापण्याचें कोडें पडलें । दारिद्र्याच्या सदनीं आले । पाहुणे सम्राट भूपती ॥ हें जगद्गुरूचें चरित्र भलें । ज्यासाठीं लेखन केलें । तें मनोगत राहिलें । माझे मनींच्या मनांत ॥ तो हेतु हाच होता । ज्यांनीं वाहिली समाजचिंता । ज्यांनीं स्थापिलें अद्वैत मता । करण्या जगाचें कल्याण ॥ त्या जगद्गुरूचें चरित्र । अवघ्या कळावें इत्थंभूत । आणि जगद्गुरूच्या चरणीं सत्य । अतुल श्रद्धा वाढावी ॥ जी श्रद्धा वाढल्यावरी । कल्याण होय सर्वतोंपरी ।—"

अर्थात् काय वाटेल तें झालें तरी ग्रंथ प्रकाशित करावयाचाच, या निश्चयानें त्यांनीं आपल्या परिचितांपैकीं कांहीं मंडळींना ग्रंथाच्या छपाईकरितां साहाय्य करण्याविषयीं पत्रें धाडलीं. त्याप्रमाणें अनेकांनीं मोठ्या आनंदानें रुपये पाठवून ग्रंथ प्रसिद्ध केला.

## २८. निर्वाहः प्रतिपन्नवस्तुषु :

एकदां केलेली गोष्ट तडीस नेण्याचा श्रीदासगणूंचा हा स्वभाव अनेक ठिकाणीं अनेक रीतींनें प्रगट झाला आहे. त्यांतील एक

अगदीं वेगळ्या रीतीची पण महाराजांच्या आग्रही मताची उत्तम कल्पना देणारी एक घटना सांगण्यासारखी आहे. श्रीमंत तुकोजीराव होळकर यांच्या आग्रहावरून महाराज शके १८४७ मध्यें कांहीं दिवस इंदुरास राहिले होते. राजवाड्यांत खास श्रीमंतांसाठीं कीर्तनें होत. याच वेळीं मुसलमानांचा मोहरम सण आला. मोहरमच्या सणाच्या दिवशीं होळकर सरकारांची सर्व लवाजम्यासह मोठी मिरवणूक निघाली. स्वतः महाराज सरकार आणि त्यांचा परिवार मोठ्या वैभवानें मिरवणुकींत सामील झाला होता. स्वारीचें तें ऐश्वर्य आणि स्वारीच्या मागचा उद्देश लक्षांत येतांच महाराजांचें कविमन अगदीं भारावून गेलें. निजामच्या राज्यामध्यें होणारा हिंदूंचा छळ त्यांनीं प्रत्यक्ष पाहिला होता. हिंदूंना त्यांच्या सणाकरितां सरकारी मदत तर राहोच, पण आपले कार्यक्रम पार पाडण्यासाठीं अनेक तापदायक आणि अपमानकारक अटी स्वीकाराव्या लागत; हेंहि त्यांनीं पाहिलें होतें. अर्थात्‌च एक हिंदू राजा आपल्या विधर्मी प्रजेच्या उत्सवामध्यें एवढ्या वैभवानिशीं भाग घेतो, ही गोष्ट त्यांना विशेष कौतुकाची वाटली. पोवाड्याच्या शेवटीं त्यांनीं आपल्या या हेतूचा स्पष्ट शब्दांत उल्लेख केला आहे.

**“ शोधुन पाहतां अढळुन येतें उच्च ध्येय या स्वारीचें ।**<br>
**राजे हिंदू असून पुरविती कोडकौतुक यवनांचें ।**<br>
**ही नच स्वारी धडाच केवळ इतर नृपाशीं घातियला ।**<br>
**धर्मभेद तो मनीं न आणतां असें वागवा रयतेला ।**<br>
**यवननृपांनीं या किस्याला झणीं आदरं वळवावें ।**<br>
**धर्मभावना यासम रक्षुन नच हिंदूंना दुखवावें ।**<br>
**राष्ट्रबगीचा नाना जाती हीच तेथलीं फुलझाडें ।**<br>
**महीपरी महिपाल असावा वक्र न पहावें कुणाकडे ।”**

**निजधर्म न त्यजतां इतर समाजाप्रती ।**<br>
**पाहतीं प्रेमदृष्टीनें लक्ष ठेविती ।**<br>
**या राजनितीला जे राजे सेविती ।**<br>
**ते इहपरलोकीं सौख्याला भोगिती ।**

इतक्यापुरते तरी विठोबा वागत राजे महीवर ।
जसे वागले मोहरमच्या सणीं राव तुकोजी होळकर ॥ ”

या रमणीय आणि वर्णनात्मक पोवाड्याचा आरंभ—

“ सुभेदार श्रीमंत सवाई राव तुकोजी होळकर ।
मायमातुःश्री अहिल्याबाईचे सुखद छत्र ज्या शिरावर ॥ ”

असा आहे. पोवाडा तयार होतांच अनेकांनीं तो ऐकला व त्याची प्रशंसा केली. अर्थात्‌च ही बातमी श्रीमंतांच्याहि कानावर गेली आणि आपणांसहि तो ऐकावयाचा आहे, अशी त्यांनीं इच्छा व्यक्त केली. त्यावेळीं तेथील एक अधिकारी श्री. एन्. आर. जोशी हे महाराजांकडे आले आणि विनवणीच्या स्वरूपांत म्हणाले, “ महाराज, खुद्द सरकार स्वारी आपला हा पोवाडा ऐकणार आहेत. तरी आरंभींचे ‘ सुभेदार ’ हें पद काढून टाका. सरकारांना ‘ राजराजेश्वर ’ अशी पदवी आहे. त्या पदवीनेंच त्यांच्या नांवाचा उल्लेख झाला पाहिजे, असा निर्बंध आहे. ‘ सुभेदार ’ हें विशेषण अगदीं साधारण आहे. त्याचा उपयोग केलात तर तो श्रीमंतांचा अपमान केल्यासारखा होईल. ते मानी आहेत. त्यांचा राग होईल. मागें एक असें प्रकरण झालें आहे. आपल्यावर कदाचित् खटला होण्याची भीति आहे. तेव्हां कृपा करून शब्द बदला. ”

महाराज म्हणाले, “ हें बघा, सुभेदार ही पदवी स्वराज्यांतील आहे. पारतंत्र्याच्या काळांत इंग्रजांनीं दिलेल्या कोणत्याहि किताबापेक्षां तिचें मोल अधिक आहे. होळकर या जुन्या आडनांवाचा राग येत नाहीं. होळ गांवीं श्रीमंतांचे पूर्वज मेंढ्यांच्या मागें फिरत होते. हे आतां राजे झाले, तरी स्वतःचें आडनांव होळकरच लावतात. इंदूरकर म्हणवून घेत नाहींत. तर सुभेदार या विशेषणाचेंहि तसेंच कां वाटू नये? श्रीमंत दिलदार आणि रसिक आहेत. त्यांना राग येणार नाहीं. श्रीमंतांचा अपमान करण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. माझा हेतु शुद्ध आहे. परंतु मीं वापरलेले शब्द आतां बदलावे, असें मला वाटत नाहीं. काय परिणाम व्हावयाचा असेल तो होईल. ईश्वराची इच्छा कोण टाळणार? ”

अनेक प्रकारांनीं समजावूनहि महाराज ऐकेनात. जोशीबुवांचा निरुपाय झाला. प्रसंगाला ताबडतोब इंदूर सोडतां यावें, यासाठीं सर्व सामानसुमानाची बांधाबांध करून वाहनें तयार ठेवूनच श्रीदासगणू महाराज दरबारांत पोवाडा ऐकविण्यास गेले. साथीदारांकरवीं सर्व पोवाडा त्यांनीं ऐकविला. श्रीमंतांसह सर्व दरबारी मंडळी अगदीं खूष झाली. अंतःपुरांतील राजस्त्रिया पडदानशीन असल्यामुळें दूर बसलेल्या होत्या. त्यांना तो पोवाडा पुन्हा ऐकावासा वाटला. त्यामुळें इतर सरदार मानकरी वगैरेंना निरोप दिला गेला व आंतील मंडळी बाहेर येऊन बसली. त्यांच्यासाठीं पुन्हा पोवाडा म्हणावा लागला. परत आल्यावर श्रीदासगणू महाराज श्री. जोशीबुवांना हंसत हंसत म्हणाले, “ जोशीबुवा, तुमचे सरकार रागावलेच नाहींत. मग खटला कशाचा भरतात ? उलट खटल्या-सुद्धां पोवाडा ऐकण्यास बाहेर आले. अहो, ‘ गुणी गुणं वेत्ति’. ”

श्रीमंत तुकोजीराव होळकर यांना महाराजांच्याविषयीं विशेष आदर आहे. त्यांच्या अनेक ग्रंथांच्या प्रकाशनास त्यांनीं उदारपणें साहाय्य केलेलें आहे. जतच्या मासाहेब श्रीमंत पुतळाराजे, फलटणच्या श्रीमंत राणीसाहेब ही राजघराण्यांतील मंडळी महाराजांच्याकडे मधूनमधून येणारी आहेत. मिरजेचे दिवंगत राजे श्रीमंत बाळासाहेब पटवर्धन ह्यांचा आणि महाराजांचा फारच लोभ असे. वर्षांतून दोन तीनदां तरी त्यांची भेट व्हावयाचीच. महाराजांच्याकडे राजेसाहेबांचें एकदां तरी जेवण व्हावयाचेंच. राजेसाहेब विनोदानें म्हणत, “ अहो, तुम्ही यजमान आमचे. आम्हांला जेवावयाला बोलाविलेंच पाहिजे. ” श्रीमंत राजे तात्यासाहेब पटवर्धन हे श्रीदासगणू महाराजांना फार मानतात. तुलसी-रामायणाच्या धर्तीवर श्रीकृष्णचरित्र लिहिण्यास श्रीमंत मिरजकरांनीं श्रीदासगणूंना आग्रह केला होता. श्रीदासगणू महाराजांकडून अनेकांनीं आपल्याला इष्ट अशीं काव्यें लिहवून घेतलीं आहेत. नुकतेंच प्रसिद्ध झालेलें ‘ मंगीशमाहात्म्य ’ हें त्याचें उदाहरण म्हणून सांगतां येईल. श्री. माधव विठ्ठल गांगला या सद्गृहस्थांनीं तें महाराजांकडून लिहून घेतलें आहे. असो.

अशा रीतीनें श्रीदासगणू महाराजांनीं आपलें सर्व जीवन परमेश्वराच्या सेवेंत व त्या सेवेचा एक भाग म्हणून सरस्वतीच्या उपासनेंत व्यतीत केलें आहे. अद्यापिहि त्यांची लेखणी थांबली नाहीं. इतक्या उतार वयांतहि ‘ विचारसागरा ’ सारख्या किचकट रुक्ष ग्रंथावर सुबोध मराठींत रसमय ओव्या रचण्याचें त्यांचें कार्य चालूच आहे. शंकराचार्यांच्या ‘ ब्रह्मसूत्र ’ भाष्यावर भावबोधिनी टीका लिहिण्याची इच्छा आजहि त्यांच्या हृदयांत मूळ धरून आहे. खरोखरीच महाराजांची वाङ्मयसेवा हा निष्काम कर्मयोग आहे आणि तो अखंडपणें ते आचरीत आहेत. कोणत्याहि रीतीच्या द्रव्याची वा लौकिकाची हांव न धरतां त्यांनीं आपलें हें व्रत निष्ठेनें चालविलें आहे. आपल्या ग्रंथांचे साधें प्रकाशन समारंभहि त्यांनीं कधीं केले नाहींत. इवलालीं चोपडीं समारंभानें प्रकाशित केलीं जातात आणि वर्तमानपत्रांतून त्याचा केवढा तरी गाजावाजा होतो, पण सरस्वतीच्या मंदिरांत ज्यांना मानाचें आसन दिलें पाहिजे; अशा श्रीदासगणू महाराजांच्या ग्रंथाची साधी माहितीहिं लोकांस असत नाहीं. इतकी प्रसिद्धिपराङ्मुखता श्रीमहाराजांच्या जवळ आहे.

## २९. सामाजिक दृष्टि :

महाराज हे पंढरपुरच्या विठ्ठलाचे भक्त आणि एकमार्गी वारकरी असले तरी समाजाच्या हिताला कोणकोणत्या गोष्टींची आवश्यकता आहे, याची त्यांना पूर्ण कल्पना आहे. समाजसेवेच्या कार्यास त्यांनीं आपल्याकडून अनेकांना प्रवृत्त केलें आहे. या दृष्टीनें मुंबईच्या सुप्रसिद्ध ‘ श्रद्धानंद महिलाश्रम ’ या समाजोपयोगी संस्थेच्या वीस वर्षें मुख्य व्यवस्थापिका असलेल्या श्री. लक्ष्मीबाई ( काशीबाई ) कोल्हटकर यांचा उल्लेख करण्यासारखा आहे. महाराजांच्या प्रेरणेनें व आज्ञेनें हें काम त्यांनीं पतकरलें. तें किती कौशल्यानें त्यांनीं पार पाडलें, तें श्रद्धानंद महिलाश्रमाचें आजचें विशाल स्वरूप पाहून सहज प्रत्ययास येतें. श्री. लक्ष्मीबाई

कोल्हटकर यांनीं महाराजांना लिहिलेल्या एका पत्रांतील उतारा देतों. म्हणजे हे संबंध कसे जिव्हाळयाचे होते, तें सहज लक्षांत येईल.

*श्र. अ. महिलाश्रम, माटुंगा, दि. २६–१–४८.*

*ह. भ. प. संत दासगणू महाराज ऊर्फ दादा यांस—*

*आदरपूर्वक नमस्कार. वि. वि.*

*आपला तिळगुळप्रसाद पोंचला. चालू परिस्थितीस बोधप्रद असाच तो मननीय आहे. स्वातंत्र्य मिळालें खरें, परंतु क्रांतीची वेळ अत्यंत विस्कळीत अशी आली आहे. स्वराज्याचें सुराज्य कधीं होणार, तें कळत नाहीं. अनेक पक्षांच्या मतभेदानें व परधर्मीयांच्या आसुरी कृत्यानें आज जनतेला त्राही भगवान केलें आहे. त्याच्या इच्छेप्रमाणें व योजनेप्रमाणें सर्व घडत आहे. येईल तो प्रसंग सहन करणें भाग आहे.........फेब्रुवारीअखेर जमलें तर मला प्रवासाइतकी शक्ति वाटली तर आपण तेथें असेपर्यंत चार दिवस तरी येऊन आपला सहवास व पांडुरंगदर्शन घ्यावें, अशी इच्छा आहे. मी घरांतच कामापुरती हिंडतें. ईश्वरानें जगवली आहे. त्याच्या उद्देशाप्रमाणें संस्थेची सेवा तन्मयतेनें शक्यतों करीत राहतें. याच ईश्वरी पूजेंत वेळ अपुरा वाटतो. आपल्या पूर्ण कृपाप्रसादानें मला हा ईशसेवा साधण्याचा लाभ घडला व जन्म सार्थकीं लागला. महिना चार हजार खर्च आहे. आतांपर्यंत चार साडेचार हजार बायकामुलें आलीं. सतत संख्या अडीचशें तरी असतेच. साडेतीनशेंच्या वर मुलींचीं लग्नें झालीं. पंधरा दिवसांपूर्वी अंदाजें एक महिन्याची मुलगी सांपडली. तिचें नांव मी शकुंतला ठेविलें आहे. चार दिवसांपूर्वी एक महिन्याचें मूल पोलिसांनीं रस्त्यांत सांपडलेलें आणून दिलें. रात्रीं प्रार्थनेच्या वेळीं आला. मी त्याचें नांव वासुदेव ठेविलें आहे. त्याची जोपासना करण्यांत फारच आनंद वाटतो. आपल्या आशीर्वादाचें हें फळ आहे......सदैव आशीर्वाद असावा, ही विनंति.*

*आपली कन्या*

**काशीबाई.**

श्रीदासगणूंच्यावर केलेल्या कांहीं पदांमध्यें श्री.लक्ष्मीबाईनीं केलेले उल्लेख पाहण्यासारखे आहेत. श्रद्धानंद महिलाश्रमांत त्यांनीं नारायणाच्या मूर्तीची स्थापना केली. त्या प्रसंगीं स्वतः रचलेल्या कवितांत त्या म्हणतात,

**" संत दासगणू दुःखिता माउली कृपेची साउली झाली मज**
**बीज पेरियेलें सेवामंत्र दिला आजी प्रगटला नारायण "**

दुसऱ्या एका कवितेंत त्या म्हणतात—

**" दुःख विसराया आलें पंढरीभुवना।**
**सत दासगणूकरवीं दिधलें जीवना।**
**सेवाधर्म दाखविला व्हाया समाधाना।**
**गणगोत असंख्यात स्वकीय भावना।"**

हे उल्लेख पाहिले म्हणजे श्री. काशीबाई ऊर्फ लक्ष्मीबाई कोल्हटकर यांना श्रीदासगणू महाराजांची सल्लामसलत कशी कार्यप्रेरक झाली होती व पुढेंहि वेळोवेळीं त्या महाराजांना आश्रमांतील बारीकसारीक गोष्टीहि कशा कळवीत व त्यांचा आशीर्वाद मागत, तें समजतें.

कर्मठ सनातनी ज्या पद्धतीच्या कार्याविषयीं तिरस्कार बाळगतात, अशा आश्रमासारख्या कार्याविषयीं महाराज कशी आस्था बाळगीत तें पाहिलें म्हणजे त्यांच्या समतोल सामाजिक दृष्टीचें सुधारकांनाहि नवल वाटेल. परिस्थिति उत्पन्न झाल्यानंतर श्रद्धानंद माहिलाश्रमासारख्या संस्थांची आवश्यकता आहे व तें कार्य करणें हीहि ईश्वरी सेवाच आहे, असें महाराज मानतात; पण यासारखी परिस्थिति निर्माण होणें हें मात्र त्यांना गर्हणीय वाटतें. हा समाजाचा नैतिक अधःपात आहे, असें त्यांचें ठाम मत आहे. म्हणूनच या अनीतीवर त्यांनीं आपल्या काव्यांतून यथेच्छ टीकाहि केलेली आहे. हा विवेक विचारणीय नाहीं, असें कोण म्हणेल ?

## ३०. कार्यक्रम :

येथपर्यंत महाराजांच्या व्यक्तित्वाचा परिचय करून देण्याच्या दृष्टीनें आवश्यक असलेल्या घटना विषयानुरोधानें शक्य तो सलग

सांगितल्या. त्यांच्या वाङ्मयाचा परिचय करून घेण्याच्या दृष्टीनें व्यक्तीची ओळख होणें आवश्यक आहे. यानंतर पुढील विभागांत मी त्यांच्या सर्व ग्रंथांचा परिचय करून देऊन काव्याचें स्वरूप कसें आहे, तें स्पष्ट करण्याचा प्रयत्न करणार आहे.

तत्पूर्वी ज्या पद्धतींनीं त्यांनीं आपलें सर्व आयुष्य घालविलें आहे, त्यांतील दिनचर्या व वार्षिक कार्यक्रम, या व्यक्तिपरिचयाच्या शेवटच्या प्रकरणामध्यें उल्लेखिणें अवश्य आहेत. आतांपर्यंत त्यांच्या आंतरिक जीवनाशींच विशेषतः संबंध असलेल्या गोष्टी सांगितल्या गेल्या आहेत. त्यांचा दैनिक आचार व वर्षांतील नित्य नैमित्तिक कर्में यांचीहि माहिती करून देणें उचित ठरेल.

श्रीदासगणू महाराजांच्या नित्य नैमित्तिक कार्यक्रमाबद्दल सामान्यतः एक गोष्ट वैशिष्ट्यानें सांगतां येईल कीं, अमुक एका गोष्टीबद्दल दुराग्रह असा त्यांनीं कधीं बाळगला नाहीं. आपलें शक्यतों न सोडणें, हा त्यांचा स्वभाव खरा; परंतु या वृत्तीला दुराग्रहाचें हेकट स्वरूप कधींच येत नाहीं. सकाळीं ते सामान्यतः उशिराच उठतात. रात्रीं होणारें जागरण याला कारण आहे. गेल्या पांच सहा वर्षांत त्यांची प्रकृति विशेष थकली. यावेळची गोष्ट सोडून द्यावी, पण तत्पूर्वी रात्रींच्या दीड-दोन वाजेपर्यंत त्यांच्या भोंवतालच्या मंडळींचा पाळा उठत नसे. कांहीं लोक तर अकराचे पुढेंच त्यांना भेटावयास यावयाचे आणि मग पुढें दीडदोन तास त्यांच्या गप्पा चालावयाच्या. महाराजांच्या आवाजांत अस्पष्टता आली नव्हती, तोंपर्यंत त्यांच्याभोंवतींची ही गर्दी कमी झाली नव्हती. अमुक वेळेला महाराज भेटत नाहींत, असा निर्बंध कधींच नसे. विष्णुसहस्रनामाचे पाठ सुरू झालेले असतील तर मात्र गोष्ट निराळी. मग भेटावयास आलेल्या मनुष्याला अर्धा तास स्वस्थ बसणें भाग होई. पण एरवीं आलेल्या माणसाला परतून जाण्याचा प्रसंग कधींच यावयाचा नाहीं. सकाळपासून संध्याकाळपर्यंत बैठकींतील ही गर्दी कधीं हटली नाहीं. त्यांत नाना थरांतील नाना प्रकारचे लोक असावयाचे. कै. भारताचार्य

चिंतामणराव वैद्य, प्रसिद्ध वक्ते कै. शिवरामपंत परांजपे, कै. प्राध्यापक श्री. नी. चापेकर, इंदूरचे कै. डॉ. तळवलकर यांसारखे विद्वान् रसिक, श्री. बापूराव राघोजी बोरावके यासारखे बागाइतदार, श्री. गोविंद रामचंद्र गोगटे यासारखे भौतिकशास्त्रांतील पदवीधर, पुण्यांतील प्रसिद्ध वकील कै. ल. र. गोखले, कै. बॅ. गाडगीळ, श्री. गर्दे वकील यांसारखे कायदेतज्ज्ञ, कै. रा. दत्तोपंत डोंगरे, श्री. रा. विठ्ठलराव कोठाळकर, श्री. द. स. गोखले, श्री. बाळासाहेब रेगे यांसारखे अधिकारी, श्री. सौ. लीलावतीबाई वेलिंगकर यासारख्या विदुषी, कै. श्री. विठ्ठल लक्ष्मण सुबंध, श्री. मा. वि. गांगल यासारखे गृहस्थ, कोणी डॉक्टर, कोणी व्यापारी, कोणी सरकारी नोकर अशी किती तरी विविध व्यवसायांतील मंडळी त्यांच्या नित्याच्या बैठकींत असत. त्या सर्वांशीं त्यांचे होणारे वादविवाद व संभाषणें जर कोणीं नोंदलीं असतीं तर तें एक मनोरंजक व बोधप्रद असें पुस्तक झालें असतें. अनेक विषयांतील महाराजांचे मार्मिक विचार लोकांना वाचावयास मिळाले असते व कदाचित् त्यामुळें मार्गदर्शन लाभलें असतें.

कै. श्री. चिंतामणराव वैद्य यांच्याशीं महाराजांचे इतिहासविषयक वाद नेहमीं व्हावयाचे. दोन ज्ञानेश्वरांचा वाद त्यावेळीं ऐन जोमांत होता. त्या विषयानुरोधानें महाराज एकदां कै. श्री. चिंतामणराव वैद्यांना म्हणाले, “ हे पाहा चिंतामणराव, ज्ञानेश्वरीच्या प्रत्येक ओवीगणिक निराळा ज्ञानेश्वर होता, असें तुम्ही लोकांनीं सांगितलेंत तरी आमचें कांहीं बिघडत नाहीं. पारमार्थिक दृष्टि ही दिक्कालाद्यनवच्छिन्न आहे. तुम्ही स्थलकालाला महत्त्व द्या. आम्ही हेतूकडे पाहणार. ” त्यावेळीं कै. श्री. चिंतामणराव वैद्यांना महाराजांचें बोलणें पटल्यासारखें दिसलें. महाराज म्हणत, “ भाषेची मांडणी निराळी आहे. कागद अमुक वेळचा आहे. शाई अमुक वेळची आहे. हें इतिहासाचें महत्त्वाचें साधन असलें तरी तेवढ्यानेंच इतिहास मर्यादित करणें हें योग्य नाहीं. अनेक तऱ्हांनीं या रीतीच्या संशोधनामध्यें हेत्वाभास असण्याची शक्यता असते. ”

कै. श्री. चिंतामणराव म्हणाले, " खरं आहे तुमचें म्हणणें. आणखी शंभर वर्षांनीं बोवा तुमच्याविषयींच मतभेद व्हावयाचे. लावण्या लिहिणारा दासगणू निराळा आणि संतचरित्रें व अमृतानुभव लिहिणारा दासगणू निराळा. पहिला नगरच्या पोलिसांत नोकर होता. दुसरा मराठवाड्यांतील गोदातीरच्या नांदेडचा. तो कीर्तनें करीत असे, असें लोक म्हणतील. तेव्हां आपल्या हातानें हें स्पष्ट लिहून टाका." मला वाटतें महाराजांनीं भक्तिलीलामृतामध्यें स्वतःविषयीं पूर्वकालच्या ग्रंथांच्या मानानें बऱ्याच विस्तारानें लिहून ठेविलें आहे, तें यामुळेंच असावें.

या स्वरूपाच्या संवादात्मक आठवणी कै. श्री. नी. चापेकर मोठ्या गमतीनें सांगत असत.

सकाळीं उठल्यानंतर अर्धापाऊण तास त्यांचा तोंड धुण्याचा कार्यक्रम चालतो. सावकाश दांत घाशीत, चुळा भरीत समोर एक मोठें तस्त घेऊन ते तोंड धूत असतात. ही वेळ त्यांच्याशीं निवांत बोलण्यास चांगली असते. अगदीं नवीन वा अल्पपरिचयाचीं माणसें या वेळेस येण्यास स्वभावतःच संकोचत. त्यामुळें नेमके या वेळेलाच येणारे परिचित लोक असत. असे कोणी आले म्हणजे हा कार्यक्रम नऊसाडेनऊ वाजेपर्यंत संपत नाहीं. त्यानंतर महाराज थोडें दूध घेतात. अकराच्या सुमारास त्यांचें स्नान होतें. उघड्या हवेवर स्नान करणें सोसत नाहीं. लगेच थंडीची बाधा होते. यासाठीं बंद जागेंतच स्नान करावें लागतें. स्नानानंतर दीड तासपर्यंत त्यांचें संध्यावंदनादिक आन्हिक चालतें. यावेळीं ते सहसा कोणाशीं भेटत बोलत नाहींत, पण ह. भ. प. श्री. सोनोपंत दांडेकर यांच्यासारखे साधुशील पुरुष भेटावयास आले तर आपलें आन्हिक बाजूस सारून ते निवांतपणें त्यांचेशीं बोलत बसत आणि विचारलें तर म्हणत " देव सारावे परते संत पूजावे आरते " अशी श्रीतुकोबारायांची आज्ञा आहे. पंढरपुरास नसतील त्या वेळीं या आन्हिकास अर्धाअधिक तास जास्तच लागावयाचा. कारण मग त्यावेळीं पंढरपुरची नगरप्रदक्षिणा ते मानसिक रीत्या करतात. नांदेडास असतांना श्री. विश्वनाथ गोपाळ

बडवे हे पंढरपुरास दिवंगत झाल्याचें वृत्त अशा मानसिक प्रदक्षिणेच्या वेळींच पाहून सांगितलें. साडेबारानंतर मुगाच्या डाळीचें वरण, ज्वारीची भाकरी आणि दुध्या भोपळा, तांदुळजा यांपैकीं कोणती तरी भाजी असें जेवण ते घेतात. त्यानंतर त्यांच्या विष्णुसहस्रनामाच्या पाठास आरंभ होतो. कोणी बोलावयास आलेलें नसेल तर सतत विष्णुसहस्रनाम म्हणणें असा नियम आहे.

महाराजांच्या नित्य कार्यक्रमामध्यें त्यांच्या पत्रव्यवहाराचा भाग खूपच मोठा असतो. येणारीं आणि जाणारीं पत्रें यांची संख्या वर्षाकाठीं प्रत्येकीं कांहीं शेंकड्यांनीं मोजावी लागेल. विशेष प्रसंगीं ते कांहीं विशिष्ट लोकांना ओवीबद्ध पत्रेंहि पाठवीत. श्री. केशवराव महाराज देशमुख, ह. भ. प. सोनोपंत दांडेकर, साहित्यसम्राट् न. चिं. केळकर इत्यादींना त्यांनीं अशा स्वरूपाचीं बरींच पत्रें पाठविलीं आहेत. आपली विष्णुसहस्रनामबोधिनी श्री. केशवराव महाराजांकडे पाठविली, त्यावेळीं त्यांना लिहिलेल्या पत्रामध्यें पुढील ओव्या आलेल्या आहेत. " पहा पहा त्र्यंबकेश्वरीं । आकाशांतून पडे वारी । परी ते सर्व गोदावरी । न होय कीं केशवराजा ॥ जें औदुंबर वृक्षाखालुन । येई गायमुखांतुन । त्यालाच मिळे अभिधान । तीर्थराज गोदावरी ॥ तैसे हे प्राकृतीचे बोल । काव्यांबरीचें सलील । यासी न कदां येई मोल । तुम्हांवांचून महाराजा ॥ तुम्ही ज्ञानभूमीवर । उगवला कर्मरूपी तरुवर । हरिभक्ति हीच साचार । कोमल पर्णें आलीं तुम्हां ॥ येथें गायमुख सुरेख । प्रत्यक्ष आहे तुमचें मुख । त्यांतुनही वेळ एक । आल्या अक्षरें बोधिनीचीं ॥ तेणें तयांचा जाईल दोष । मान्य होतील विठ्ठलास । म्हणून प्रार्थितों आपणांस । एक वेळ वाचा ही ॥ तुमचें मुख हेंच परीस । लोहरूपी अक्षरास । लागल्या हेमत्व येईल त्यास । बोले निश्चयें दासगणू ॥ "

मकरसंक्रांतीचा तिळगूळ पाठविल्यानंतर श्री. केशवराव महाराजांकडून उलट तिळगूळ आला व एक पत्रहि आलें. त्यास उद्देशून महाराज एका पत्रांत लिहितात. " तिळगूळ सत्पुरुषाचा । वैद्याहातीं आला साचा ।

तेणें या भवरोगाचा। नायनाट होईल॥........आपण जीं जीं विशेषणें। पत्रीं दिलीं मजकारणें। तीं वात्सल्यप्रेमानें। दिलीं असतीं हेंच खरें॥ परी आपल्या कृपेनें। जीं जीं दिलीं मजकारणें। महाराज आपण विशेषणें। तीं तीं खरीं होवोत॥ पाहून हीं विशेषणें। उमेद आली मजकारणें।........"

श्रीशंकराचार्य चरित्राला प्रस्तावना लिहिण्याच्या कामीं विनंति करण्यासाठीं श्री. सोनोपंत दांडेकरांना जें ओवीबद्ध पत्र लिहिलें आहे, त्यांत पुढीलप्रमाणें ओव्या आल्या आहेत. "हे हरिभक्तपरायणा। दांडेकर कुलभूषणा। सोनोपंता सज्जना। ऐका माझी विनवणी॥ भाविक नैष्ठिक ब्रह्मचारी। सांप्रत तुम्हीच भूमीवरी। अध्यात्माचे मंदिरीं। राहिवास तुमचा झाला असे॥ तुम्ही पांडुरंगाचे भक्त थोर। संतवाङ्मयीं प्रेम फार। अभक्तीनें अंतर। तुमचें नाहीं विटाळलें॥ परिचय आंग्ल विद्येचा। जरी झाला पूर्ण साचा। तरी अभिमान हिंदुत्वाचा। सोडिला न तुम्ही अंशही॥ आंग्लविद्येशीं अभ्यासिलें। गीर्वाण आत्मसात् केलें। तत्त्वज्ञाना साठविलें। आपल्या हृदयमंदिरीं॥ ऐशा सर्व गुणांनीं। युक्त तुम्हीच एक अवनीं। म्हणून तुम्हां विनवणी। आदरें करणें भाग आलें॥ श्रीआद्यशंकराचार्यचरित। जें भाविकांना अमृत। त्यावरी मी रचिला ग्रंथ। ओवीबद्ध प्राकृतीं॥ त्या ग्रंथाचा पुरस्कार। लिहावयासी साचार। तुम्हीच एक भूमीवर। सांप्रत कालीं दिसतसां॥ सर्वांगसुंदर अद्वैत। जें आचार्यें केलें स्थापित। त्याचे आजपर्यंत। चहाते विद्वान झाले बहु॥ त्या जगद्गुरु आचार्यांलागुनी। संतसम्राट ज्ञानेशांनीं। वाट पुसिली आदरांनीं। आध्यात्मपेठेस जावया॥ जे शंकराचार्य गुरुवर। ज्ञानांबरींचे दिनकर। यांचे वैदिकधर्मावर। उपकार अनंत जाहले॥ बहुत झाले भाष्यकार। आजवरी पृथ्वीवर। परी शंकराचार्यांची सर। आली नसे एकाही॥ जगद्गुरु गीर्वाणांत। ज्ञानराजा प्राकृतांत। त्या दोघांच्या रहस्याप्रत। तुम्हीच जाणतां सोनोपंता॥ म्हणून

जगद्गुरूचे चरित्राला। आपणहि पाहिजे लिहिला। पुरस्कार या विनंतीला। फेटाळून लावूं नका॥"

श्री. तात्यासाहेब केळकरांना लिहिलेल्या पत्राचें त्यांच्याकडून जें उत्तर आलें, त्यामध्यें केळकरांनीं लिहिलेलें एक वाक्य श्रीदासगणू महाराजांचें वैशिष्ट्य दर्शविणारें आहे. श्री. केळकर लिहितात, "हरिभक्तपरायण लोकहि समाजांतील लौकिक स्वरूपाच्या सार्वजनिक कार्याकडे दृष्टि ठेवून त्यांतील गुणदोष चिकित्सा करीत असतात; हें पाहून समाधान वाटलें."

दुपारीं ते कधींहि झोंपत नाहींत. त्यांना एकूण झोंप फार थोडी पुरते. चोवीस तासांत फक्त रात्रीची तीन चार तास झोंपच त्यांना मिळत असेल. उत्सवाच्या वेळीं तर याहींपेक्षां कमी झोंप मिळे, पण त्याचा शिणोटा त्यांना कधीं आला नाहीं. इतर पुष्कळ दुखणीं झालीं, पण डोकें दुखण्याची तक्रार त्यांनीं कधींहि सांगितलेली नाहीं.

संध्याकाळीं पंढरपुरास मुक्काम असेल त्यावेळीं पूर्वी ते नगरप्रदक्षिणेस जात. श्री. दत्तोपंत खैर नियमानें सवें असत. गुडघे दुखूं लागल्यामुळें आतां फार चालवत नाहीं. तरी पंढरपुरास दत्ताच्या देवळापर्यंत जाऊन दर्शन घेऊन ते येतातच. पुण्यास असतांना ते तुळशीबागेपर्यंत जाऊन येतात. लोणावळ्यास असतील त्यावेळीं राममंदिराच्या आवाराभोंवतीं एक प्रदक्षिणा घालून येतात. या सर्व वेळीं आपण पंढरपुरची नगर-प्रदक्षिणाच करतों आहों, अशी त्यांची भावना असते. देहदंड देऊन शरिराला उगीच कष्टविणें व मागून कातविणें श्रीदासगणू महाराजांना पसंत नाहीं. शरिराचे फाजील लाड करूं नयेत पण त्याच्यावर अत्याचारहि करूं नयेत, असें ते म्हणतात. रात्रीं आठ नऊचे सुमारास देवापुढें बसून ते भजन करीत व आरती करून मंत्रपुष्प म्हणत. अलीकडे चार पांच वर्षांत मोठ्यानें म्हणवत नसल्यामुळें ते स्वतः भजन म्हणत नाहींत. श्री. छगन बारटक्के हा महाराजांचा निष्ठावंत भक्त भजन म्हणतो व महाराज फक्त श्रवण करितात.

भजनानंतर ते पूर्वीं फराळ करीत असत, पण अलीकडे केवळ दूधच घेतात. रात्रीं ते थोड्या उशिरांच झोंपतात. कोणी तरी अंग दाबल्यावांचून त्यांना झोंप येत नाहीं. पूर्वीं फार फिरत असत, त्यावेळीं महाराज आपली कांहीं तरी सेवा घडूं द्या, म्हणून लोक हातपाय दाबीत. हीच संवय पुढें जवळ जवळ व्यसन होऊन बसली. मी मी म्हणणारा सशक्त मनुष्यहि अंग रगडतांना दमून घामाघूम होई, पण महाराज त्याला कधीं पुरे म्हणत नसत. अंग रगडण्यास कोणी नसेल तर त्यांना चैन पडत नाहीं. ते विनोदानें म्हणतात, "माझा महाराजपणा नडला मला. लोकांनीं संवय लावून ठेविली व आतां पंचाईत होत आहे." महाराजांची ही या तऱ्हेची सेवा पूर्वीं कळन्नुरींचे श्री. दत्तोपंत कस्तुरे यांनीं निष्ठेनें केली आहे. आज चि. छगन बारटक्के हा त्यांच्या सतत सेवेमध्यें असतो. निरपेक्ष बुद्धीनें महाराजांची सेवा छगन मनापासून करीत असतो.

पहाटे तीन चारचे सुमारास उठून महाराज कांहीं प्रातःस्मरण नियमानें करतात. पठण, ध्यान, चिंतन यांत सुमारें एक तास यावेळीं जातो, पण त्याचें स्वरूप नेमकें काय असतें, तें माहीत नाहीं. त्यांनीं स्वतःच निरनिराळ्या संतांवर मिळून रचलेलें एक अष्टकमात्र यावेळीं त्यांचें म्हणण्यांत येतें. तें पुढें वेच्यांमध्यें दिलें आहे.

असा हा अगदीं साधा दिनक्रम महाराजांचा असतो. इतरांच्यापेक्षां आपण कोणी निराळे आहों, असें दाखविण्याचा प्रयत्न त्यांनीं कधींहि केलेला नाहीं. आलेले लोक महाराजांच्याविषयीं पूज्यबुद्धि व्यक्त करण्यास येत, पण महाराज कित्येक वेळां त्यांतील कांहीं व्यक्तींचाच इतका आदरसत्कार करीत कीं, आपणच कोणी मोठे आहों असें त्यास सहज वाटावें.

कांहीं तरी नवीन काव्यरचना चालू असेल त्यावेळीं मुखमार्जनानंतर दीडदोन तास सकाळीं, दुपारीं विष्णुसहस्रनामाचे थोडेसे पाठ झाल्यानंतर दोन तास व रात्रीं अल्पोपाहारानंतर समोर बसलेला लेखक कंटाळे-

पर्यंत असें त्यांचें लिखाण चालत असे. लेखनाच्या स्फूर्तीची वाट बघत, ते कधीं थांबलेले नाहींत. अनेक मोठमोठीं आख्यानें त्यांनीं एकदोन दिवसांत तयार केलीं आहेत, पण त्यावेळीं स्फूर्ति आलेली होती म्हणून नव्हे तर विशिष्ट कार्यक्रमासाठीं एक दोन दिवसांत आख्यान तयार करणें भाग झाल्यानें तीं अशा त्वरेनें रचिलीं गेलीं. प्रतिपाद्य विषय त्यांच्या आवडीचा असेल तर केव्हांहि लिहावयास बसले तरी त्यांच्या लेखनांत सहजता व प्रसाद सारखाच उतरलेला आढळतो. याचें कारण क्षणिक टिकणाऱ्या स्फूर्तीच्या उद्रेकावर त्यांचीं काव्यें अवलंबून नसून सतत चिंतन, मनन, निदिध्यासन यांमुळें ईश्वरनिष्ठ बनलेल्या वृत्तींतून तीं निर्माण झालीं आहेत. भावभक्ति हें त्यांचें अधिष्ठान आहे.

### ३१. प्रतिवार्षिक कार्यक्रम :

शिरडीस श्रीसाईबाबा असल्या वेळेपासून रामनवमीच्या उत्सवाची माळ दासगणूंच्या गळयांत पडलेली आहे. गेल्या दोन तीन वर्षांतच प्रकृतीच्या अस्वाथ्यामुळें ते शिरडीस रामनवमीकरितां गेले नाहींत, पण तोंपर्यंत शिरडीची वारी त्यांनीं कधीं चुकविली नाहीं. मध्यंतरीं शिरडी संस्थानच्या कांहीं मंडळींशीं त्यांचे तीव्र स्वरूपाचे मतभेद झाले. त्यांतील कांहींनीं तुम्ही शिरडीसहि येऊं नका, अशीं पत्रें लिहिण्या-पर्यंत वेळ आणली. त्या वर्षीं महाराज शिरडीपासून एक मैलावर असलेल्या बोरावक्यांच्या वस्तीवर जाऊन उतरले. तेथें त्यांनीं रामजन्म केला, परंतु हे मतभेद पुढें टिकले नाहींत. महाराजहि मध्यंतरीं झालेला त्रास विसरून गेले. पुढें ज्या वेळीं श्री. नागेश आत्माराम सावंत व श्री. श्रीपाद बाळकृष्ण देव हे कार्यकारी मंडळावर आले, त्यावेळीं त्यांनीं सौजन्यानें वागून सर्व मतभेद मिटवून टाकले. आतां श्रमविभागणीच्या तत्त्वावर रामनवमीच्या उत्सवाचा कार्यक्रम श्रीदासगणू महाराजांच्या पद्धतीप्रमाणें व्यवस्थित पार पडत आहे.

पूर्वीं १९३७ पर्यंत महाराज रामनवमीनंतर दोन सव्वा दोन

महिनेपर्यंत शिरडीसच राहात व तेथून ज्ञानेश्वरांच्या पालखीच्या दर्शनासाठीं पुण्यास येत. १९३७ सालीं ते वातकफज्वरानें (न्यूमोनियानें) बरेच आजारी होते. डॉ. भडकमकरांनीं चांगल्या हवेवर जाण्याचा सल्ला दिला होता. त्याप्रमाणें नागपूरच्या श्री. कृ. वा. जोशी बुवांच्या आग्रहावरून ते १९३७ सालीं प्रथम लोणावळयास आले. उन्हाळयांतील तेथील हवा महाराजांच्या प्रकृतीस चांगली मानवली. भांगरवाडींतील राममंदिरांत तीन खोल्या घेऊन महाराज राहिले होते. त्यावेळीं पनवेलचे श्री. जाईल, लोणावळा येथील इनामदार श्री. हरिभाऊ भोंडे या राममंदिराच्या विश्वस्तांनीं महाराजांनीं प्रतिवर्षीं उन्हाळयांत लोणावळयासच यावें, अशी विनंति केली. राममंदिराच्या आवारांतील जागा महाराजांना उतरण्यासाठीं प्रतिवर्षीं कोणतेंहि भाडें न आकारतां द्यावी, असा कार्यकारी मंडळानें ठराव केला. मंदिराचे विश्वस्त व राममंदिराचे पुजारी श्री. विश्वनाथ त्रिकमजी जोशी हे गृहस्थ महाराजांचे अनुग्रहितच बनले. या ऋणानुबंधामुळें व चांगल्या हवेमुळें महाराज मग प्रतिवर्षीं लोणावळयास येऊं लागले. परशुराम-जयंती, शंकराचार्य पुण्यतिथि, नृसिंहजयंती हे उत्सव मग लोणावळयासच होऊं लागले. दशहराच्या उत्सवाला लोणावळा येथें राहण्यानें विशेषच मोठें स्वरूप प्राप्त झालें. आज या उत्सवानिमित्त दहा दिवसपर्यंत रोज सकाळीं रुद्राभिषेक व संध्याकाळीं गंगामाहात्म्याचें वाचन, गंगालहरीवर प्रवचन व बसून कीर्तन असा कार्यक्रम असतो. ज्येष्ठ शुद्ध दशमीच्या दिवशीं गोदेच्या समाराधनेनिमित्त दीड दोनशें पानहि होतें.

लोणावळयाहून ज्ञानेश्वरांच्या पालखीच्या दर्शनासाठीं महाराज पुण्यास येतात. श्रीदासगणू महाराजांच्या गुरूंची श्रीसद्गुरु वामनशास्त्री यांची पुण्यतिथि ज्येष्ठ वद्य एकादशीस असते. हा उत्सव दशमी, एकादशी, द्वादशी असा तीन दिवसांचा असतो. तिन्ही दिवस कीर्तन असतें. शेवटचें कीर्तन काल्याचें होतें. १९४८ सालपर्यंत महाराज

पुण्याच्या मुक्कामांत श्री. वहिनीबाई जोगळेकर यांच्या बिऱ्हाडीं राहत असत. त्यावेळीं या पुण्यतिथि उत्सवाचीं कीर्तनें मंडईजवळ साखरे महाराजांच्या मठांत होत असत. आतां माझ्या रहाण्याच्या ठिकाणापासून गायआळींतील श्री. रहाळकरांचें राममंदिर अगदीं जवळ असल्यानें हीं कीर्तनें तेथें होतात. द्वादशीच्या दिवशीं समाप्तीस शें-सव्वाशें पान होतें. पुण्याचा महाराजांचा मुक्काम श्रावणी होतांच बहुधा हलतो. मधें थोडे दिवस एकाद्या वर्षीं नगरास श्री. नानासाहेब बागडे यांच्याकडे राहून तेथून महाराज नांदेडास जात. श्री. धोंडोपंत बाबासाहेब नांदेडकर वकील होते, तोंपर्यंत महाराज नांदेडास फार दिवस राहात असत. नांदेडास कधीं जाईन, अशी ओढ त्यांना लागलेली असे. श्री. बाबासाहेबांविषयीं महाराजांना अत्यंत जिव्हाळा होता. पोटउकलीचें तें ठिकाण होतें. श्री. बाबासाहेबांनाहि महाराजांचें बोलणें म्हणजे वेदवाक्य असे. अनेक जन्मींचा हा ऋणानुबंध असावा, असें वाटण्याइतकी दृढता त्यांच्या स्नेहामध्यें होती. यांना उद्देशून महाराज श्रीगुरुचरित्रसारामृताच्या शेवटीं म्हणतात, " नांदेड ग्रामाभीतरी। धोंडोपंत वकिला घरीं। ग्रंथ पुरा झाला हा॥ हा धोंडोपंत सज्जन। देशस्थ अश्वलायन। धर्मावरी श्रद्धा पूर्ण। दंभाचारी मुळीं नसे॥ हा मम जन्मांतरींचा। कोणीतरी आप्त साचा। असावा म्हणून आमुचा। स्नेह जाहला या जन्मीं॥" श्री. बाबासाहेब १९४१ सालीं कैलासवासी झाले. मग श्री. बाबासाहेब नसलेल्या नांदेडास जाण्यास महाराजांचें मन घेईना. तरी श्री. बाबासाहेबांचे जेष्ठ चिरंजीव श्री. दिगंबरनाना होते तोंपर्यंत त्यांच्या प्रेमासाठीं महाराज क्वचित् नांदेडास जात. सध्यां मोंगलाईतील त्यांचें राहणें उमरी स्टेशनहून कोसभर दूर असलेल्या गोरटें या गांवीं असतें. तेथील जमीनदार श्री. बाबासाहेब देशमुख यांच्या प्रेरणेनें एक लहानसें घर मोंगलाईतील मंडळींनीं महाराजांच्याकरितां बांधलें आहे. श्री. देशमुखांच्या प्रेमाखातर महाराज अलीकडे

तेथेंच असतात व पुढें संन्यास घेऊन गोरट्यासच वास्तव्य करावें, अशी महाराजांची मनीषा आहे.

दसऱ्याचे वेळीं महाराज पंढरपुरास येतात. अस्पृश्यांच्या मंदिर-प्रवेशापर्यंत नवरात्रामध्यें रात्रीं श्रीरुक्मिणी मातेपुढें प्रतिवर्षीं त्यांचीं दहा कीर्तनें होत असत. दसऱ्याच्या दिवशीं श्रीसाईबाबांची पुण्यतिथि येते. त्यानिमित्त सकाळीं सात आठ ब्राह्मणांच्या द्वारां पवमान रुद्राचा अभिषेक देवावर होऊन शिवविष्णूंच्या सहस्रनामांच्या उच्चारासह हजार बेल व हजार तुळशी वाहिल्या जातात. दुपारीं समाराधना होते. १९४२ सालपर्यंत सातआठशें पान या दिवशीं होत असे. पुढें अन्न-धान्यावर नियंत्रण आल्यामुळें हें प्रमाण फारच कमी झालें होतें. आतां पुन्हां वाढूं लागलें आहे. दसऱ्यापासून मकरसंक्रांतीपर्यंत सुमारें चार महिने महाराज पंढरपुरासच असतात. कार्तिक वद्यांत येणारा श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या पुण्यतिथीचा उत्सव महाराज मोठ्या प्रेमानें साजरा करतात. रोज सकाळीं अभिषेक व निरनिराळ्या धार्मिक ग्रंथांचें वाचन असा कार्यक्रम असतो. संध्याकाळीं कीर्तन होतें. पांचव्या दिवशीं काला होतो. कार्तिक वद्य त्रयोदशी या पुण्यतिथीच्या मुख्य दिवशीं सकाळीं पांच ब्राह्मणांकरवीं पवमान रुद्राचा अभिषेक होतो. दुपारीं श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या प्रसादास शेंदीडशें लोक जेवतात.

वार्षिक कार्यक्रमामध्यें आपल्या परिवारांतील मंडळींना मकर-संक्रांतीच्या निमित्तानें काव्यमय संदेश पाठविणें, हें एक मोठें काम आहे. पांच सहाशें लोकांना तरी हीं पत्रें पाठविलीं जातात. त्यामुळें तीं छापूनच घ्यावीं लागत. एकाच गांवांत राहणाऱ्या व एकमेकांशीं परिचित असणाऱ्या माणसांना क्वचित् एकत्रहि या पत्रिका पाठविण्यांत येतात. नमुना म्हणून त्यांतील दोन तीन पद्यें खालीं दिलीं आहेत.

**"हा धाडिलेला तिळगूळ घ्यावा। परस्परीं लोभ विशेष ठेवा। एकी असे जी बहु सौख्यकारी। राखा तिला यत्न करून भारी॥ होवो संक्रम आपुलाहि रविसा, जावो लया भीरुता। येवो शौर्य भुजांत धैर्य**

हृदयीं, बुद्धींत तेजस्विता। राहो प्रेम अपार संस्कृतिवरी, हो बंधुता अंतरीं। स्वातंत्र्यें भगवा सदैव फडको, तेणें हिमाद्रीवरी॥ स्वधर्म स्वजनावरी अमित प्रेम तें ठेवणें। स्वराष्ट्र हित साधण्या सतत सज्ज कीं राहणें। असे श्रुतिज आपुला जगतिं धर्म त्या मानणें। तयांत भलतीं खुळें धरुन हट्ट ना काढणें॥ पक्षोपपक्ष न करा धरुनी सुनीती। बाराखड्यापरिस त्या अपुल्यांत जाती। त्या ना करा कधिंच कारण भांडणाला। झालें स्वराज्य अपुलें टिकवा तयाला॥"

संक्रांतीनंतर सामान्यतः पंढरपुराहून महाराजांचा मुक्काम हलतो. त्यानंतर १९३७ सालापर्यंत म्हणजे न्युमोनियाच्या मोठ्या दुखण्यानें आजारी पडेपर्यंत प्रतिवर्षी महाराज मोडालिंबजवळील अरणास श्रीसंत सांवतामहाराजांच्या दर्शनासाठीं येत. एक दिवस तेथें राहून अभिषेक नैवद्यादि कृत्यें करून दुसरे दिवशीं बैलगाडीनें लहुळच्या हद्दींतील, पण पडसाळी स्टेशनाजवळ असलेल्या कूर्मदासाच्या समाधीच्या दर्शनास जात. ही जागा पूर्वीं इतकी मलिन, पडकी, धूळ आणि काट्याकुट्यांनीं भरलेली असे कीं, स्वयंपाकापुरती जागा साफसूफ करून घेण्यास दोन तीन तास लागत. वारा सुटला कीं फार धूळ उडे. जेवण नकोसें वाटे. जवळ एक विहीर आहे, पण तिचें पाणी कालासारखें गार असे. नेहमीं गार पाण्याची संवय असणाऱ्यांनाहि तेथील पाण्यामुळें अंगावर कांटा उभा राही. कूर्मदासाच्या समाधीचें औरंगजेबाच्या कारकीर्दींत मशिदींत आणि तुर्बतींत रूपांतर झालेलें आहे. अशा या ठिकाणीं दासगणू महाराज प्रतिवर्षी नेमानें येत. सकाळीं पूजा, अभिषेक करून कीर्तन करीत. स्वयंपाक करून नैवेद्य दाखवीत. जेवण करून पोथी वाचीत आणि संध्याकाळीं पुढें पडसाळी स्टेशनवरून कुर्डुवाडीस जाण्यासाठीं निघत. कांहीं मंडळींच्या खटपटीनें या स्थानास आज पुष्कळच नीटनेटकें स्वरूप प्राप्त झालेलें आहे, पण १९३४–३५ पर्यंत तरी एकाद्या ओसाड जागेप्रमाणें हें समाधि स्थळ भयाण आणि अस्वच्छ होतें. या अत्यंत प्रतिकूल वातावरणाचाहि महाराजांच्या व्रतनियमांवर परिणाम झाला नाहीं.

ते संतप्रेमानें कूर्मदासाच्या दर्शनासाठीं जात. कांहीं वेळ घालविण्याच्या विश्रांतीचें स्थल म्हणून नव्हे. तीर्थयात्रा करणारांनीं ही वृत्ति लक्षांत घेण्यासारखी आहे. कूर्मदासाच्या समाधीपुढील कीर्तनांत श्रवणासाठीं एकहि श्रोता खरोखरीच नसे. गांवापासून पुष्कळच दूर असलेल्या त्या ठिकाणीं तसे कोणी ऐकावयास येण्याची शक्यताहि नसे; परंतु श्रीमहाराजांच्या कीर्तनरंगांत यत्किंचित्‌हि उणीव येत नसे. हा विशेष कीर्तनकारांनीं ध्यानांत ठेविला पाहिजे.

कुर्डुवाडीस आल्यानंतर महाराज कै. हरि विनायक वैशंपायन यांच्याकडे राहात. पुढें श्री. वैशंपायनांची कुर्डुवाडीहून बदली झाल्यानंतर श्री. बापूराव जोशी ऑडिटर यांच्याकडे राहात. हा मुक्काम पुढें श्रीकल्याणस्वामींच्या डोंबगांवास जाण्याच्या तयारीसाठीं असे. बैलगाडीनें परांड्याहून डोंबगांवास जाण्याचा रस्ता आहे. कुर्डुवाडी ते डोंबगांव हें अंतर साधारणपणें १० कोसांचें आहे. रस्ता अत्यंत खडकाळ आणि रुक्ष असा आहे. बैलगाडीच्या प्रवासांत अंग ठेचकाळून अक्षरशः खिळखिळें होई, पण तरीहि महाराजांना त्याचा शीण वाटत नसे. वयाच्या ७२ व्या वर्षापर्यंत ही यात्रा त्यांनीं निष्ठेनें केली. डोंबगांवचा दर्शन, अभिषेक, नैवेद्य असा कार्यक्रम पार पाडून महाराज दुसरे दिवशीं परांड्यास परत येत. येथें श्री. विनायकराव वकील यांच्याकडे महाराजांचा मुक्काम असे. परांड्यास हंसराज स्वामींच्या दर्शनास ते येत. तेथेंहि पूजा अभिषेकादि कार्यक्रम करून एकाद दुसरा दिवस राहून ठरविलेल्या बैलगाडीनें कुर्डुवाडीस परतत. तेथून पुढें मोंगलाईत जात. कारण माघ वद्य नवमीचा श्रीरामदासस्वामींच्या पुण्यतिथीचा उत्सव तिकडेच व्हावयाचा असे.

माघ वद्यांतील श्रीदासनवमीचा उत्सव आतांपर्यंत निरनिराळ्या ठिकाणीं झालेला आहे. गव्हाण, अतनूर, मुखेड, कळंनुरी, उमरी इत्यादि निरनिराळ्या गांवीं तेथील मंडळींच्या आग्रहावरून महाराज जात असत व तेथेंच हा उत्सव होई. कार्यक्रम इतर उत्सवाप्रमाणेंच असे. फाल्गुन वद्यांतील तुकारामबोवांची बीज व नाथषष्ठी हा संयुक्त उत्सव पूर्वीं

मोठ्या थाटानें बऱ्याच मोठ्या प्रमाणावर नार्नाळीस होत असे. अलीकडे गोरट्यासच होतो. श्रीतुकारामबोवांच्या बीजेच्या दिवशीं गोरट्यास एक अभिनव प्रथा महाराजांच्या प्रेरणेनें सुरू झाली आहे. दहा बारा गांवांहून गाड्या भरून भाकरी येतात. गोरट्यास आमटी तयार केली जाते व त्यांचा भंडारा होतो. दोनअडीच हजार लोक या दिवशीं जेवून जातात. लांबलांबूनहि प्रसादाची भाकरी मिळण्यासाठीं लोक गोरट्यास येतात. या उत्सवांत कीर्तनादि कार्यक्रम नेहमींप्रमाणें होतातच. महाराजांच्या या सर्वजनसुलभ अशा धार्मिक कार्यक्रमांमुळें अनेकांना सदाचाराचें वळण लागलें आहे. अनेकांनीं मानसिक समाधान अनुभविलें आहे. अनेक लोक आपल्या जीवनांत स्थिर झाले आहेत. ईश्वरी कृपाप्रसाद हा इहलोकींहि मनःशांतीच्या दृष्टीनें लाभदायक होतो, याचा प्रत्यय अनेकांनीं घेतला आहे. त्यामुळें या उत्सवांत भाग घेण्याची संधि मिळावी व त्या निमित्तानें महाराजांच्या सहवासाचा लाभ मिळावा, अशी इच्छा अनेक ठिकाणच्या लोकांची असते. त्यामुळें हे निरनिराळे उत्सव असतील त्याच्या आधीं महिनाभर महाराजांकडे येणाऱ्या पत्रांची संख्या अनेक पटींनीं वाढते.

ज्या वर्षी अधिकाचा उत्सव असेल त्या वर्षी तर चार चार महिने आधीं हा पत्रव्यवहार सुरू होतो. उत्सव तीस दिवसांचा व रोज कीर्तन यामुळें आपल्या गांवींच हा उत्सव व्हावा, अशी अहमहमिका सुरू होते. त्यामुळें महाराजांचे अधिकाचे उत्सव निरनिराळ्या ठिकाणीं झाले आहेत. श्री. बाबासाहेब नांदेडकर होते, तोंपर्यंत मात्र बहुतेक सर्व अधिक मास नांदेडासच होत. इतर मंडळींना त्यावेळीं महाराजांच्या ऐवजीं ‘ या वेळीं उत्सव आमचे गांवीं होऊं देण्याची कृपा करावी ’ अशी विनवणी श्री. बाबासाहेबांसच करावी लागे आणि कांहीं वेळां तरी श्री. बाबासाहेबांना होय म्हणावें लागे.

शके १८३७ चा अधिक वैशाख असतांना गोदातीरावरील रामेश्वर या ठिकाणीं घडलेली या उत्सवांतील हकीगत मनोरंजक आणि बोधप्रद

आहे. उत्सवाकरितां फार लांबलांबून लोक येऊं लागले. त्यांची ती प्रमाणाबाहेर वाढणारी संख्या पाहून महाराज जरा विचारांत पडले. भोंवतालच्या सावकार मंडळींनीं सांगितलें कीं, 'आपण कांहीं चिंता करूं नका. कितीहि लोक येऊं द्या. आम्ही सर्व मिळून त्यांची सर्व व्यवस्था ठेवूं. उत्सव आनंदांत होऊं दे.' उत्सवाकरितां आलेल्या दोन चार मंडळींना महाराजांनीं मुद्दाम विचारलें, 'या उत्सवासाठीं इतक्या दूर अंतरावरून येण्याचें प्रयोजन काय ?' त्यांनीं सांगितलें, 'महिनाभर आपल्या उत्सवास जा, असें मला स्वप्न पडलें' या बोलण्यामध्यें लबाडी आहे, हें महाराज तेव्हांच समजून गेले. त्यांनीं श्री. पर्वतराव गोसावी यांना हांक मारून सांगितलें कीं, "पर्वता, सगळ्या सावकार लोकांना सांग कीं, उद्यांपासून सर्व प्रकारचीं जेवणें बंद. कडुनिंबाच्या पाल्याचा रस खाऊन अधिक मास करावा, असें स्वप्न मला काल पडलें आहे." झालें. ही आज्ञा कटाक्षानें अंमलांत आली. श्री. पर्वतराव गोसावी हे महाराजांचे निग्रही भक्त. हटयोगाचा यांचा व्यासंग चांगला. महाराजांच्यावर निष्ठा अतिशय. महाराज यांच्याशीं बोलतांना नेहमीं थट्टेचें आणि उपहासाचेंच बोलतात, पण त्याचा यत्किंचित्‌हि राग न धरतां ते आपले सेवातत्पर असतातच. या बोवांचे डोळे इतके तेजस्वी आहेत कीं, पाहणाराला त्यांची भीतिच वाटावी. भर उन्हाळ्यामध्यें महाराजांच्या आज्ञेवरून यांनीं एका माळावर बसून पाणपोई चालविली होती. उन्हानें करपून अंग लोखंडासारखें राकट झालें होतें, पण त्यांनीं आपलें काम सोडलें नाहीं. या निग्रही स्वभावामुळें कडुनिंबाच्या पाल्याच्या आज्ञेमध्यें त्यांना कांहीं विशेष वाटलें नाहीं. त्यांनीं भराभर पाला काढून आणला, वाटला व गोदावरीचें स्वच्छ शीतल पाणी घालून त्याचें हिरवेंगार पेय बनविलें. पांच पंचवीस लोटे भरले. येणाराजाणाराला हा प्रसाद मिळूं लागला. आतां तेथें कोण राहणार ? स्वतः महाराज कडुनिंबाचा दोन लोटे रस प्याले. पर्वतरावांनीं तसेंच केलें. श्री. दामुअण्णांच्या बरोबर महाराजांची साथ करणारे

श्री. किसनराव आबाजी कासार यांनींहि तो रस घेतला. अर्थात् बाकीच्यांना त्यांत भाग घ्यावाच लागला, पण दोन चार चमचे रस कांहीं त्यांच्या घशाखालीं उतरला नाहीं. जेवणाला अजिबात फाटा आणि लिंबाच्या रसाचें प्राशन. दोन दिवसांत रामेश्वर जवळ जवळ निर्मनुष्य झालें! जणुं परत घरीं जाण्याचीं स्वप्नें सर्वांना पडलीं! दोन दिवस महाराजांनीं ही परीक्षा चालू ठेविली होती. ते स्वतः आणि त्यांचे दोन शिष्य यांच्या निग्रहामुळें इतरांना निमुटपणें गाशा गुंडाळावा लागला. बहुतेक सगळे निघून गेले. बाकीच्या थोड्यांनीं आसपासच्या गांवांतून आपली सोय पाहिली. तेव्हां महाराज म्हणाले, "उत्सवाला येण्याचीं स्वप्नें पाहिलींत काय जातांचीं आहेत तीं! 'शितें तवरतो भुतें भोंवतीं' असें रामजोशीबोवा म्हणतात तें उगीच नाहीं." महाराज परीक्षा किती कडकपणें घेत, हें यावरून प्रत्ययास येतें. यंदाचा (१८७७) महाराजांचा अधिक मास उमरी येथील श्रीविठ्ठल मंदिरांत थाटानें होत आहे. हें विठ्ठलमंदिर महाराजांच्या आज्ञेमुळेंच उमरीकर मंडळींनीं उत्तम प्रकारें बांधलें आहे. त्यामुळें महाराजांनीं त्या मंदिरांत कांहीं दिवस वास करावा, अशी उमरीकरांची इच्छा असणें स्वाभाविक आहे. महाराज अधिकासाठीं उमरीला येणार आहेत, हें कळतांच तेथील मंडळींना आतिशय आनंद झाला, हें त्यांचीं नुकतींच आलेलीं पत्रें पाहतांच प्रत्ययास येतें. श्री. संगमनाथ अप्पा सोमावार, श्री. बाबूराव तळेगांवकर, श्री. बंकटलाल सारडा, श्री बाबासाहेब गोरटेकर, श्री. लक्ष्मण धनपलवार, श्री. किसन महाजन, श्री. भागवत नवबलवार इत्यादि उमरीच्या प्रमुख सद्गृहस्थांचीं अत्यंत हर्ष झाल्याचीं पत्रें महाराजांकडे आलेलीं आहेत.

निरनिराळ्या ठिकाणच्या भाविक मंडळींच्या आग्रहावरून महाराज आपल्या कार्यक्रमाव्यतिरिक्त सवड असेल, त्याप्रमाणें इतर ठिकाणींहि कांहीं दिवस जाऊन राहात आले आहेत. हें राहणें बहुधा पुण्याचा मुक्काम हलल्यानंतर आणि पंढरपुरचा मुक्काम हलल्यानंतर मधील काळांत होतें. नुकतेच ते गेल्या वर्षीं श्री. गोविंद दत्तात्रेय गोखले यांचे आग्रहा-

वरून मुंबईस गेले होते. तेथून पुढें श्री. सुखदेव पाटील यांच्या लोभासाठीं शेगांवासहि गेले होते. दोन्ही ठिकाणीं या खेपेस भेटावयास येणाऱ्या मंडळींची संख्या इतकी झाली कीं, शेवटीं त्रासून महाराजांनीं तेथून पळ काढला, असें म्हटलें तरी चालेल. शेगांवास तर महाराजांना आपल्या स्नानसंध्यादि कार्यक्रमासहि फुरसत मिळेना. दर्शनासाठीं व भेटीसाठीं येणाऱ्या लोकांच्या अक्षरशः बाऱ्या बसवाव्या लागत. प्रसिद्धीचा हव्यास नसलेल्या श्रीदासगणू महाराजांना या गर्दीचा त्रास झाला असेल, यांत नवल नाहीं.

## ३२. समारोप :

आतांपर्यंत श्रीदासगणू महाराज यांच्या व्यक्तित्वाची ओळख घडविण्याच्या दृष्टीनें त्यांच्या जीवनचरित्रांतील मला माहीत असलेल्या कांहीं घटना शक्य तों सलगपणें सांगण्याचा मीं प्रयत्न केला आहे. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला अनेक उज्ज्वल पैलू आहेत. उत्कृष्ट हरिदास, सदाचरणी पुरुष, आतिथ्यशील सद्गृहस्थ, समाजाच्या सर्वांगीण अभ्युदयाची तळमळ बाळगणारा संत, प्रतिभासंपन्न महाकवि, तत्त्वज्ञ, विवेकशील गुरु, जिवलग स्नेही आणि प्रेमळ वत्सल पालक अशीं विविध निर्मल अंगें त्यांच्या तेजस्वी व्यक्तिमत्त्वाचीं आहेत. त्यांच्या सहवासांत जन्मापासूनचीं ३३–३४ वर्षें सतत घालविलेल्या माझ्यासारख्यासहि त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचें ज्ञान संपूर्ण झालें आहे, असें मी म्हणूं शकत नाहीं. इतकी गंभीरता त्यांच्या खेळकर वाटणाऱ्या जीवनांतहि आहे. त्यांच्या मुद्रेवर दिसणारी कारुण्याची नाजुक छटा असलेलें गांभीर्य जें छायाचित्रांतूनहि प्रत्ययास येतें, त्यावरून त्यांच्या अंतःकरणाची थोडीशी कल्पना येऊं शकते. करीत असलेली प्रत्येक गोष्ट त्यांनीं आपल्यापुरता पूर्ण विचार करून ठामपणें ठरविलेली असते आणि त्यामुळें विवेकशील श्रद्धेबरोबरच निग्रही भाविकताहि त्यांच्या वागण्यामध्यें आढळून येते.

चटकन् निर्णय घेऊन मोठमोठे वादविवादहि कसे थांबवावेत, हें खरोखरीच श्रीदासगणू महाराजांच्याजवळच शिकावें असें मी म्हणेन. मला स्वतःलाच त्याचा अनेक वेळीं अनुभव आला आहे. त्यांतील एक प्रसंग सांगतों.

वऱ्हाडांतील शेगांवचे राहणारे श्री. नामदेव बापूजी काळे हे गृहस्थ निष्ठावंत वारकरी व फार अभ्यासू असे आहेत. संतवाङ्मयाचा त्यांचा व्यासंग फार दांडगा आहे. त्यांच्या या अभ्यासामुळें त्यांना महाराज श्रीनामदेव शास्त्री असें म्हणतात. या गृहस्थांशीं ज्ञानोत्तर भक्ति, पंचम पुरुषार्थाची भक्ति, या विषयांवर माझा मोठा वादविवाद झाला. पुढें पत्रव्यवहारांतूनहि जवळ जवळ एक वर्षपर्यंत आम्ही कडाडून वाग्युद्ध करीत होतों. आम्हांपैकीं कोणीहि आपला आग्रह सोडीना आणि निर्णयास येईना. नागझरीमहात्म्याच्या प्रस्तावनेंतून श्री. काळे यांनीं आणि भक्तिरसायन भावप्रकाशिकेच्या प्रस्तावनेंतून मी अशीं आपापलीं मतें आग्रहीपणानें प्रसिद्धहि केलीं. त्यानंतर ती. दादा ( दासगणू महाराज ) मला एकदां म्हणाले, “तुझ्या मताप्रमाणेंच तूं श्री. काळयांशीं वाद करूं शकत नाहींस. श्री. काळे मात्र तुझ्याशीं करूं शकतात. तुला त्यांचें म्हणणें गप्प बसून शांतपणानेंच ऐकलें पाहिजे. ‘श्रीसंतांना जगाचें कल्याण साधण्यासाठीं भक्तीची ख्याति रूढवावयाची होती, पार पावलेल्यानें नाव जाळूं नये वा वैद्याअंगीं रोग नसला तरी त्यानें जगावर उपकार करण्यासाठीं औषधी संग्रहीं ठेवाव्या, या न्यायानें संतांनीं उपकारापुरते उरून स्थार्थनिरपेक्ष भक्तीचा डांगोरा पिटला. त्या भरांत कांहीं आग्रही वचनें साधकाची श्रद्धा दृढ होण्यासाठीं उच्चारिलीं,’ असें तूं मानतोस ना ? मग साधकाची श्रद्धा दृढ होण्याच्या दृष्टीनें भक्तीची श्रेष्ठता ही निरपवाद आहे, हें आग्रहानें सिद्ध करणाऱ्या श्री. काळयांशीं तुझा वाद कां ? श्रद्धा दृढ होण्यासाठींच आग्रही बोलण्याचें प्रयोजन आहे, हें मान्य केल्यानंतर आणि तें तसें आवश्यकहि आहे असा निश्चय असल्यानंतर त्यांच्या आग्रही

बोलण्यांतील विसंगति तर्कदृष्ट्या प्रगट करण्याच्या प्रयत्नांत तूं साधकाची भक्तिविषयक श्रद्धाच डळमळविणार आणि संतांच्या जीवन हेतूशीं विरोध पतकरणार. तें करावयाचें नसलें, संतांच्यावर श्रद्धा असली तर तुझें म्हणणें खरें असूनहि तुला गप्प बसलें पाहिजे." हें ऐकून मी निरुत्तर झालों आणि श्री. काळे यांनीं ज्ञानोत्तर प्रेमलक्षणा भक्तीविषयीं एक मोठा ग्रंथ प्रसिद्ध केल्यानंतरहि त्यावर कोणतीहि टीका न करतां शांत राहिलों.

पंढरपुरास आले असतांना एक दिवस भारताचार्य चिं. वि. वैद्य तेथील बडवे आणि क्षेत्रोपाध्ये यांच्या वर्तनाचा उबग येऊन श्रीमहाराजांना म्हणाले, "बोवा, इतरांचें ठीक आहे, पण तुमच्यासारख्याला हें सगळें वातावरण कसें सहन होतें ? काय वागणें या लोकांचें !"

"हें पहा चिंतामणराव, पांडुरंग हा सगळ्या जगताची आई आहे. तुमच्यासारखीं चांगलीं मुलें त्यानें स्वतंत्रपणें वावरण्यास मोकळीं ठेविलीं. बडव्यांसारखीं नाठाळ मुलें तेवढीं आपल्याजवळ ठेवून घेतलीं. जवळ येणाऱ्याच्या श्रद्धेची परीक्षा पाहण्याची ही कसोटी का समजत नाहीं ? आपल्या संस्कृतींत पिंडाला काकस्पर्श झाल्यावांचून सद्गति नाहीं, असें मानतात. हे सगळे कावळे अनायासें आपल्या या पिंडाला शिवताहेत. बरें झालें ! त्यांचा राग करून काय उपयोग ?"

श्री. चिंतामणराव हंसून म्हणाले, "खरें आहे."

मनुष्य पाहून त्याला पटेल, विपरीत कल्पना नष्ट होतील आणि हितकर साधनावरील श्रद्धा वाढेल असें बोलणें महाराजांचें नेहमींच असे. त्यांच्या समन्वयवादी तत्त्वज्ञानाचा त्यांचें भाषण हा स्वाभाविक परि-पाक आहे. त्यांच्या वागण्यांतहि प्रत्येक वेळीं हें प्रत्ययास येतें. श्रीतुकोबांच्या पुण्यतिथीच्या दिवशीं ते एकाद्या मराठा वारकऱ्याची पूजा करतात. ज्ञानेश्वर महाराजांच्या उत्सवांत यजुर्वेदी ब्राह्मणाचा सत्कार केला जातो. सावतेबोवा व नामदेव यांच्या स्मरणदिनीं एकाद्या माळ्याचा आणि शिंप्याचा सन्मान होतो आणि हें सर्व मनापासून

निष्ठेनें व सारख्याच आदरानें होतें. स्वतःच्या गुरूच्या पुण्यतिथीच्या दिवशीं ज्या आदरानें ते एकाद्या विद्वान् शास्त्रीबोवाची पूजा करितात तीच भावना प्रत्येक वेळीं त्यांच्या ठिकाणीं असते. हें वैशिष्ट्य खरो-खरीच अनुकरणीय आहे. जाति असाव्या, जातिसंकर होऊं नये; असें ठाम मत असूनहि द्वेषरहित वर्तन कसें असूं शकतें व होऊं शकतें तें महाराजांच्या जीवनामध्यें उत्तम प्रकारें अनुभवास येतें आणि म्हणूनच सर्व प्रकारच्या जातींतील व्यक्तींच्या अंतःकरणांतहि महाराजांच्या-विषयीं एकमात्र आदराचीच भावना आहे. त्यांच्या आख्यानांतून वा काव्यांतून आलेल्या वर्णनामुळें पुष्कळ वेळां ते टीकात्मक असूनहि कोणालाहि तसा राग आलेला नाहीं. उलट पुष्कळ प्रसंगीं आपल्या मनांतील भावनाच महाराज प्रगट करीत आहेत, असें लोकांना वाटे. निरपेक्ष आणि निर्मत्सर अंतःकरणाची ही कसोटीच मानली पाहिजे.

आजकाल राष्ट्राराष्ट्रांतील संबंधाच्या बाबतींत पंचशीलाचा मोठा गौरव केला जात आहे. तें आजच्या कालाच्या दृष्टीनें अपूर्व वाटत असलें तरी भारतीय संस्कृतीच्या अभ्यासकास त्यांत खरोखर नवीन असें कांहीं नाहीं. या संस्कृतीची घडणच मुळीं पंचशील तत्त्वज्ञानानें झालेली आहे. ‘नांदा आणि नांदूं द्या,’ ‘जगा आणि जगूं द्या,’ ‘माना आणि मानूं द्या’ हे सहजीवनाचे नियम हिंदू तत्त्वज्ञान्यांनीं कधींच आत्मसात् केलेले आहेत. त्यांचा आचार सुटला असेल, पण तो व्यक्तींचा दोष आहे. तो नाहींसा करण्यासाठींच संत अवतीर्ण होतात आणि स्वतःच्या आचरणानें समाजाला परमार्थतः हितकर होणारें जीवन कसें जगावें, तें लोकांना शिकवितात. म्हणून केवळ परलोकाच्या दृष्टीनेंच नव्हे, अध्यात्माकरितांच नव्हे तर व्यवहारासाठींहि संतांचें फार महत्त्व आहे.

श्रीदासगणू महाराजहि आपलें जीवन याच पद्धतीनें आणि याच हेतूनें घालवीत आहेत. त्याचा परिचय मीं आपणांस माझ्या अल्प शक्तीप्रमाणें करून दिला आहे.

असें त्यागमय भक्तिपूर्ण प्रेमळ जीवन समाजकल्याणास्तव लोकांच्या पुढें आदर्श म्हणून सतत असावें यासाठीं परमेश्वर पांडुरंगानें श्रीसद्गुरु दासगणू महाराजांना दीर्घायुरारोग्य द्यावें. ' शतायुर्वै पुरुषः ' हें वेदवाक्य सत्य ठरावें एवढीच त्याचे चरणीं विनम्र प्रार्थना आहे.

श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या मंगल शब्दांनीं या प्रकरणाची पूर्तता करतों. श्रीदासगणू महाराजांच्या जीवनचरित्राच्या दृष्टीनें तें समुचित असेंच होईल.

" आतां विश्वात्मके देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें । तोषून मज द्यावें । पसायदान हें ॥ जें खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मीं रति वाढो । भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ॥ दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो । जें जें वांच्छील तें तें लाहो । प्राणिजात ॥ वर्षत सकळ मंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी । अनवरत भूतळीं । भेटो तयां भूतां ॥ चला कल्पतरूंचें आरव । चेतनाचिंतामणीचें गांव । बोलते जे आर्णव । पीयूषाचें ॥ चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन । ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥ किंबहुना सर्व सुखी । पूर्ण होऊन तिहीं लोकीं । भजिजो आदिपुरखीं । अखंडित ॥ "

— ॐ स्वस्ति —

## श्रीदासगणू महाराजांची संभाव्य कुंडली

जन्म :—पौष शु. एकादशी शके १७८९ सकाळीं

ता. ६ जानेवारी १८६८

नक्षत्र कृत्तिका ३ रा चरण राशि वृषभ




ही कुंडली उपलब्ध माहितीवरून पनवेल येथील

श्री. दत्तात्रेय सदाशिव गोखले

यांनीं एका ज्योतिषाकडून मुद्दाम करवून घेतली आहे.

◆ ◆ ◆

# संतकवि श्रीदासगणूमहाराज

## व्यक्ति आणि वाङ्मय

## विभाग दुसरा

## वाङ्मयपरिचय



### १. भूमिका :

संतकवि श्रीदासगणूमहाराज यांच्या काव्याचा परिचय करून देणें ही एक अवघड गोष्ट आहे, असें मला वाटतें. याचीं कारणें मुख्यत: दोन आहेत. एक तर त्यांच्या काव्याचा विस्तार खरोखरीच एकाद्या सागराप्रमाणें विशाल आहे आणि गांभीर्याचा विचार करितां समुद्राचीच उपमा शोभावी, असेंच तें खोलहि आहे. त्याचा थांग लावून आंतील विचारमौक्तिकें वर आणणें, हें अतिशय श्रमाचें आहे. दुसरें महत्त्वाचें कारण असें आहे कीं, कवित्वाच्या ज्या परंपरेचा उत्तराधिकार श्रीदासगणूमहाराजांच्याकडे आला आहे, ती आज जनतेमध्यें लोकप्रिय असलेल्या परंपरेपेक्षां सर्वथैव वेगळी आहे. आजच्या कवींच्या सांप्रदायामध्यें एक वेगळेंच नाविन्य रूढ झालेलें आहे. विलक्षणता हीच जणूं आधुनिक कवितेची कसोटी बनलेली आहे. प्रा. रा. श्री. जोग यांनीं केशवसुतासंबंधीं लिहिलेल्या ग्रंथामध्यें केशवसुतांच्या सांप्रदायांचें म्हणून जें वर्णन केलें आहे, तेंच वळण जवळ जवळ सर्व आधुनिक कवितांचें आहे. आधुनिक सुशिक्षित जगतावर इंग्रजी संस्काराचे परिणाम अत्यंत खोल झालेले असल्यामुळें कवितेचा अद्यतनीय आविष्कार जरी मराठी वा भारतीय वेषभूषेंत झालेला असला तरी त्यांतील अंतरंग सर्वथैव परकी आहे. त्यांचें ध्येयहि परकीयांप्रमाणें केवळ ऐहिक वासनातृप्तींत आहे. ध्येयामधील हा फरक संस्कृतीचा आहे. या

परकीय विचारसरणीचा पगडा सुबुद्ध समाजावर पडलेला असल्यामुळें या परंपरेव्यतिरिक्त रचिल्या गेलेल्या साहित्याचें रसग्रहण करणें, दुर्घट होऊन बसतें. श्री. दासगणू महाराजांच्या काव्याचें परीक्षण करणें अवघड आहे, असें मीं म्हटलें त्याचें हें दुसरें पण महत्त्वाचें कारण होय.

श्री. दासगणूमहाराज संपूर्ण अर्थानें संतकवि आहेत. ते ज्या परंपरेचे उत्तराधिकारी आहेत, तिची गंगोत्री श्रीज्ञानेश्वरांच्या प्रतिभेंत आहे आणि नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास अशा एकाच क्षेत्रामध्यें उगम पावलेल्या, सारखेंच मधुर व पवित्र जल असणाऱ्या अनेक प्रवाहांना समाविष्ट करून घेत, ही काव्यगंगा जनांचे पापताप फेडीत तीरावरील तृषार्त पादपांना पोशीत जनकल्याणासाठीं प्रसन्नपणें अविरत वहाते आहे. आत्महित आणि जनहित साध्य करणें, समाजाचें अंतर्बाह्य स्वास्थ्य टिकविण्यासाठीं नैतिक मूल्यांचा पुरस्कार करणें, जीवनासाठीं कलेला राबाविणें आणि त्यांतच कलेचें सौंदर्य मानणें, हें या परंपरेचें साहित्यशास्त्र आहे. सौंदर्याचा आविष्कार हें येथें साधन आहे. त्यामुळें सौंदर्यानें पाहिजे तर आपण होऊन आपला मान राखून घ्यावा. सासरच्या वडीलधाऱ्या मंडळीसमोर वावरतांना शालीनतेचा पदर सांवरून वागणाऱ्या प्राचीन काळच्या नववधूप्रमाणें सुंदरतेनें या वाङ्मयांत वावरावें, पण डोक्यावरील पदर ढळूं देऊं नये, अशी या परंपरेची शिस्त आहे. शब्दांतून प्रकट होणारा ध्वनि आणि त्या ध्वनीला पोषक होणारीं रूपकें हीं मूळ अर्थाशीं सर्व दृष्टीनें संबद्ध असलीं पाहिजेत, असा या परंपरेचा भाषाशास्त्रविषयक दंडक आहे. हरिभक्तीचीं लेणीं मिरविणें, हें या परंपरेचें भूषण आहे. दंभ, लोभ, मत्सर, अन् वासना यांना फटकारे मारून नियंत्रित ठेवणें ही या परंपरेची दंडनीति आहे आणि प्राचीन वेदान्तमताप्रमाणें मोक्ष किंवा संतांच्या समाजोन्मुख तत्त्वज्ञानाच्या मांडणीप्रमाणें सगुण श्रीहरीची प्राप्ति हें या परंपरेचें परमधाम ध्येय, उद्दिष्ट, हेतु इत्यादि सर्व कांहीं आहे. त्यासाठींच ती उगम पावते, वहाते आणि तेथेंच तिचा लयहि होतो.

वैषयिक सुखाच्या मागें लागून कोणत्याहि समाजाचें कधींहि भलें होणार नाहीं. समाजांतील संघर्ष कधीं थांबणार नाहीं. सदा वर्गविग्रहच राहील. वर्ग होऊंच नयेत म्हटलें, तर ज्या अर्थानें आपण सुधारणा, प्रगति हे शब्द वापरतों, तो अर्थ कधींच प्रत्ययास येणार नाहीं. या कारणानें कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपांत वर्ग हे पडावयाचेच आणि स्वार्थलोलुपतेमुळें त्यांच्यांत वैमनस्य हें रहावयाचेंच...मग जीवनाला स्वास्थ्य म्हणून लाभणारच नाहीं. तें लाभावें यासाठीं संयम, सदाचार, नीति, सामोपचार, वैराग्य, वासनोपशम इत्यादि सद्गुणांचा पुरस्कार करणें, हें संतांना आवश्यक वाटलें. यासाठींच त्यांनीं आपल्या सर्व सुखावर पाणी सोडून आयुष्यभर अविरत कष्ट केले. क्वचित् समाजाकडून हेटाळणीहि पत्करली, पण समाजाच्या कल्याणासाठीं स्वीकारिलेलें हरिभक्तीचें व्रत सोडलें नाहीं. त्यांच्या उदार, विशाल हृदयाला लागलेली हरिभक्तीची ओढहि क्वचित् आत्मनिष्ठ वाटली, परमेश्वरदर्शनासाठीं होणारी त्यांच्या जीवाची तडफड आणि मनाची तळमळ ही वैयक्तिक भासली, तरी तिचें खरें उद्दिष्ट सर्वजन-कल्याण हेंच होतें. तुलसीदास जरी "स्वांतःसुखाय तुलसी रघुराज–गाथा–भाषानिबद्धमतिमंजुलमातनोति"— असें म्हणत असले, तरी त्यांच्या स्वांतःसुखाचा अर्थ फार व्यापक घेतला पाहिजे. श्रीतुकाराम महाराजांनीं आपल्या जीवनाच्या उद्दिष्टाचें स्पष्टीकरण एका अभंगांत प्रकटपणें केलें आहे—

"आम्ही वैकुंठवासी। आलों याच कारणासी।
बोलले जे ऋषी। साच भावें वर्ताया ॥
अर्थ लोपलीं पुराणें। नाश केला शब्दज्ञानें।
विषयलोभीं मनें। साधनें बुडविलीं ॥
झाडूं संताचे मार्ग। आडरानीं भरलें जग।
उच्छिष्टाचा भाग। चांग उरला तो सेवूं... ॥
पिटूं भक्तीचा डांगोरा। कळिकाळासी दरारा।
तुका म्हणे करा। जयजयकार आनंदें... ॥"

संतांच्या जीवनाचें ध्येय या अभंगामध्यें स्पष्ट शब्दांत मार्मिकपणें सांगितलें गेलें आहे. त्यांच्या जीवनामध्यें स्वार्थ असा शिल्लक नसेच. त्यांचें अस्तित्व केवळ परोपकारासाठीं असावयाचें.

"तुका म्हणे आतां। उरलों उपकारापुरता" हें वचन त्यांच्या साहित्याच्या दृष्टीनेंहि सर्वथैव सत्य आहे. यामुळें संतवाङ्मयाचे हेतु व संतांच्या साहित्याचे नियम रूढ साहित्यशास्त्राच्या सांच्यांत जसेच्या तसे बसविणें अशक्य आहे.

प्राचीन साहित्यशास्त्रकारांनीं काव्याच्या हेतूविषयीं व स्वरूपा-विषयीं लिहितांना पुढील नियम सांगितला आहे—

काव्यं यशसेऽर्थकृते व्यवहारविदे शिवेतरक्षतये ।
सद्यःपरनिर्वृतये कांतासंमिततयोपदेश युजे ॥

याचा अर्थ असा:—काव्य हें जें रचलें जातें, तें हा उत्तम कवि आहे, प्रतिभावन्त आहे, भाषाप्रभु आहे, याची निरीक्षणशक्ति सूक्ष्म आहे, याचा कल्पनाविलास भावमधुर व बुद्धीला चकित करणारा आहे, याच्या अनुभूतींत विविधता, विशालता व गंभीरता आहे, हा श्रेष्ठ प्रतीचा साहित्यिक आहे, अशी स्वतःची कीर्ति जगतितलावर व्हावी, म्हणून रचिलें जातें; किंवा ऐहिक सुखास साधनीभूत होणारें द्रव्य भरपूर लाभावें, हाहि वाङ्मयनिर्मितीचा हेतु असूं शकतो. लोकांच्या वागणुकीसंबंधींचे नियम बांधून गोडीगुलाबीनें समाजाला शिक्षण द्यावें, यासाठींहि साहित्याची रचना केली जाते, अमंगळ नाहींसें होऊन सर्व संकटाचा परिहार व्हावा, यासाठीं देवतांना प्रसन्न करण्यास, स्तुतिपर कविताहि गाइल्या जातात; किंवा अंतःकरणाला आत्यंतिक शांतता मिळून चित्ताचें समाधान कधींच ढळूं नये, मनोवृत्ति नेहमीं शाश्वत आनंदांत मग्न रहाव्यात, अशी अलौकिक रसनिर्मिति करणें, हेंहि सारस्वताचें प्रयोजन असूं शकतें. काव्याच्या निवेदनाची पद्धति मात्र आज्ञा करून सांगणारी वा वादविवाद करून पटवून देणारी नसावी. प्रिय पत्नी ज्याप्रमाणें आपल्या पतीकडून एकादी गोष्ट प्राप्त करून

घेण्यासाठीं लाडीगोडीनें लडिवाळ माधुर्यानें वा क्वचित् रुसवाफुगवा धरल्याचा आव आणून प्रिय पतीशीं बोलते व आपलें काम साधून घेते तीच रीति साहित्याचीहि असावी. आज्ञा करणारा प्रभुसंमितोपदेश वा स्वतःच्या वजनानें तर्कबुद्धीला एखादी गोष्ट पटवून देणारा सुहृत्संमितोपदेश काव्यामध्यें नसावा. हा संस्कृत साहित्यांतील काव्यासंबंधींचा नियम झाला. आधुनिक काव्यहि या नियमास फारसें सोडून नाहीं. त्याचें उद्दिष्ट पहिल्या दोन, फार तर पहिल्या तीन प्रकारांत कुठेंतरी बसतें; आणि निवेदनाचें स्वरूपहि कांतासंमितोपदेशाचेंच आहे. ही कांता पूर्वकालच्या कुलस्त्रीइतकी शालीन नसली, लज्जाविनयादि गुण आधुनिक शिक्षणाच्या संस्कारानें वा स्त्रीपुरुषांच्या समानाधिकाराच्या जाणिवेनें जरी थोडे उणावले असले, तरी संभाषणपद्धति कांतेचीच आहे. प्राचीन साहित्यशास्त्रकारांनीं सांगितलेल्या नियमाचें उल्लंघन अत्यंत पुरोगामी म्हणून गणिल्या गेलेल्या आधुनिकांतील आधुनिक कवीकडूनहि होऊं शकलें नाहीं. कविता मुक्तच्छंदांत रचली गेली, नागरभाषेचा वेष आणि अलंकारशास्त्राचे नियम बाजूस सारले गेले; शब्द ग्राम्य बनले, उपमा, रूपकें यांनीं पूर्वींच्या चंद्रप्रकाशांतील प्रसन्नता टाकून गांवकुसावर सांचलेल्या उकीरड्याच्या ढिगाचें बीभत्स रूप धारण केलें, तरीहि बंडखोरी करणारी ही अल्लड अवखळ नवकविता साहित्यशास्त्राची लक्ष्मणरेषा ओलांडूं शकली नाहीं.

संतांच्या कवितेला मात्र या प्राचीन साहित्यशास्त्राच्या नियमांत जसेंच्या तसें बसविणें बरेंचसें कठिण आहे. थोडें फार सादृश्य दाखवितां आलें तरी तिचें वळण पुष्कळसें स्वतंत्र आहे. अर्थात् ही स्वतंत्रता बंडखोर वृत्तींतून जन्माला आलेली नसून काव्यहेतूशीं संवाद राखतांना स्वाभाविकपणेंच उत्पन्न झालेली आहे आणि त्याचें कारणहि उघड आहे. प्राचीन साहित्यशास्त्रकारांच्यासमोर सामान्यतः कालिदास, भवभूति, बाण, माघ, इत्यादि ललितकविच होते. आपापल्या काव्यप्रकाश, ध्वन्यालोक, साहित्यदर्पण, कुवलयानंद इत्यादि ग्रंथांतून त्यांनीं

उद्धृत केलेलीं उदाहरणें पाहिलीं म्हणजे माझें वरील विधान सहज पटेल. व्यास, वाल्मीकि इत्यादींच्या अव्याजमनोहर काव्यांतील उदाहरणें तेथें अभावानेंच तळपतात. याचा अर्थच वाल्मीकि व्यासादि साहित्य-सम्राटांचें लिखाण त्यांच्या डोळ्यांसमोर नव्हतें, असा आहे. अन्यथा काव्याचे हेतु सांगतांना व त्याचें स्वरूप विशद करतांना सांगितलेल्या नियमास थोडा वेगळेपणा निश्चयानें आला असता.

साहित्यशास्त्रकारांनीं सांगितलेलें कीर्तीसाठीं आणि द्रव्यलाभासाठीं काव्य रचिलें जातें, हे पहिले दोन हेतु संतांच्या वाङ्मयाशीं मुळींच संबद्ध नाहींत. स्वतःचें असलेलें धनहि त्यांनीं दोन्ही दोन्ही हातांनीं उधळून टाकून कडकडीत वैराग्याला शोभेल असें निष्कांचन व्रत स्वीकारिलें. स्तुतीची यत्किंचितहि अपेक्षा त्यांनीं केली नाहीं. उलट निंदा झाली तर बरीच, असें मानून 'निंदकाचें घर असावें शेजारीं।' असें म्हटलें. पुढचे तीन हेतु व्यवहारबोध, अमंगलनाश आणि परनिर्वृति यांचा मात्र चढत्या क्रमानें स्वीकार केला. अर्थातच या पद्धतीच्या वाङ्मयाचें स्वरूप कांतासंमितोपदेशाचें राहणें शक्यच नाहीं. येथेंच प्राचीन साहित्यशास्त्र आणि संतांचें वाङ्मय यांत मुख्यतः फरक आहे. अर्थात् हेंहि काव्यच असल्यानें उपदेशाच्या पहिल्या दोन प्रकारांत तें पडत नाहीं. प्रभुसंमितोपदेश सत्तेचा, तर सुहृत्संमितोपदेश बरोबरीच्या नात्यानें केलेला बराचसा रूक्ष व म्हणून क्वचित् उपेक्षणीय भासणारा. या पद्धतीच्या लिखाणाला काव्यांतील रस कसा प्राप्त होणार? ही उपदेशात्मक रचना पद्यमय असूं शकेल, पण तें 'काव्य' नव्हे! संतांचें बहुतेक वाङ्मय निश्चितपणें 'काव्य' या सदरांत समाविष्ट होणारें आहे. तें पद्यमय तर आहेच, प्रसादगुण त्याचा आत्मा आहे, पण प्रतिभाविलासहि त्यांत ठायींठायीं आढळतो. त्यांतील उपमारूपकां-तून हें सहज स्पष्ट होईल. भावनेचा ओलावा, हें काव्याचें जीवन मानलें तर संतसंप्रदायाची कविता ही भावानें थबथबलेली आहे, पण येवढें असूनहि या काव्याला कांतासंमितोपदेश म्हणण्यास मी तयार नाहीं.

संतांच्या कवितेला उपमा द्यावयाचीच झाली, तर ती मोठ्या एकत्र कुटुंबांतील सर्व प्रकारची जबाबदारी आपल्या शिरावर घेणाऱ्या प्रौढ पुरंध्रीची देतां येईल. लेकीसुनानातवंडांबरोबर संसारांत राहणाऱ्या या माऊलीचे सर्व स्वार्थ अगदीं संपलेले असतात. खाण्यालेण्याची कोणतीहि हांव तिच्या ठायीं उरलेली नसते. सर्वांचें बरें व्हावें, सगळ्यांना सुख लागावें, कुणालाहि कमी पडूं नये, म्हणून ती कष्टत राहते; मुलांमाणसांच्या दुखण्यांत जीवापलीकडे खस्ता खाते, लेकीसुनांना संसारांतील वागणुकीचें वळण लावते; मुलांबाळांना कधीं खाऊचें आमिष दाखवून तर कधीं डोळ्याच्या धाकानें सुशिक्षण देते. सर्वांच्या कल्याणासाठीं अहोरात्र देवघरांत बसून परमेश्वराची करुणा भाकते. नमस्कारास आलेल्या मुलाबाळांना त्यांच्या अडचणींचा परिहार व्हावा, म्हणून आशीर्वाद देते. प्रसंगोपात्त कधीं करारी तर कधीं तापट, कधीं हंसून तर कधीं उपहासून, कधीं प्रेमळपणानें तर कधीं रागानें, कधीं कडक शिस्तीनें तर कधीं लडिवाळपणानें सर्वांना वागवीत, सर्वांच्या हिताची काळजी वहात, सर्वांच्यासाठीं कष्ट उपशीत प्रसन्नपणानें निःस्वार्थ जीवन जगणाऱ्या या वत्सल मातेचीच उपमा संतकवितेच्या स्वरूपाची ओळख करून देईल.

आई जी पवित्र आदरणीय आणि खऱ्या अर्थानें सेव्य म्हणजे सेवा करण्यास योग्य वाटते, ती तिचा वर्ण किती उज्ज्वल आहे, नाकडोळे किती रेखीव आहेत, यामुळें नाहीं. उजळ वर्ण आणि नीटस नाकडोळे यांचा मातृत्वाशीं जवळ जवळ कांहींहि संबंध नाहीं. हृदयाची श्रीमंती, बुद्धीची उदारता, भावनेंतील वात्सल्य आणि वृत्तींतील त्यागमयता हेंच आईविषयींच्या आदराचें मुख्य कारण आहे. बाह्य सौंदर्य वा वेषभूषा येथें गौण आहे. संतांच्या वाङ्मयाकडे पाहण्याचा दृष्टिकोन असाच असला पाहिजे. त्या ठिकाणीं बाह्यांगावर भर देऊन चालणार नाहीं. आधुनिक टीकाकारांना या प्रकारची जाणीव अगदींच नाहीं, असें नाहीं. त्यांना इष्ट वाटणाऱ्या नवसाहित्यिकांचें समर्थन करितांना

त्यांनीं या तऱ्हेची जाणीव असल्याचें निश्चितपणें दाखविलें आहे. नवसंप्रदायाचे मूळ पुरुष या नात्यानें ज्याची ओळख करून दिली जाते, त्या श्री. केशवसुतांच्या काव्याविषयीं टीकाकारांनीं ही आपुलकी खचितच दाखविली आहे. केशवसुतांचें काव्य भाषेच्या लालित्याच्या दृष्टीनें फारसें मधुर नाहीं, कवितेच्या तंत्राच्या दृष्टीनें विशेषसें रेखीव नाहीं वा उपमारूपकांच्या दृष्टीनें तसें संपन्नहि नाहीं, हें सर्वांनाच मान्य होण्यासारखें आहे. केशवसुतांच्या कवितेंतून प्रकट होणारा भाव, चमकणारें तेज, आढळून येणारा विचाराचा बंडखोरपणा, यामुळें व विषयाच्या नाविन्यामुळें त्यांचें काव्य आकर्षक झालें आहे, असेंच सर्व मानतात आणि म्हणून नवकवींच्या गणनेंत केशवसुतांना मानाचें पहिलें पद मिळालें.

याच तऱ्हेची वृत्ति संतवाङ्मयाबद्दलहि दाखविली पाहिजे असें मला वाटतें. संतवाङ्मयामध्यें केवळ काव्याच्या दृष्टीनें विचार करतांनाहि सौंदर्य, माधुर्य, लालित्य आढळतेंच. श्रीज्ञानेश्वरमहाराजांसारखे कांहीं वाङ्मयप्रभु तर या प्रकरणीं कोणत्याहि अर्वाचीन, प्राचीन कवींना हार जाणार नाहींत. उलट निरपवादपणें श्रेष्ठ ठरतील, यांत शंका नाहीं; परंतु इतकें असूनहि ज्ञानेश्वरींत काव्य शोधणें, केवळ काव्य शोधणें, हें पिकलेल्या उत्तम कलमी आंब्याच्या नुसत्या रंगाच्या वर्णनांत वेळ वाया घालविण्यासारखें आहे, असें मी समजतों. संतांच्या वाङ्मयांत कला असली, तरी केवळ कलानंदासाठीं तें कधींच रचलें गेलें नाहीं. जीवनाचें शाश्वत हित साधणें, हाच त्याच्या निर्मितीचा हेतु आहे. अर्थात् ‘ कलेकरितां कला ’ का ‘ जीवनाकरितां कला ’ हा वाद येथें निरर्थक आहे. जीवनाकरितां कला म्हणण्यांतहि कलेला एक प्रकारची अपरिहार्यता येते. तितकेंहि महत्त्व संतवाङ्मयामध्यें कलेला देतां येणार नाहीं. संतांच्या कवितेंत कला आढळते. साहित्यशास्त्रकारांनीं निर्माण केलेलीं कांहीं भूषणें तिनेंहि आपल्या अंगावर धारण केलीं आहेत, परंतु प्रौढ सुवासिनीनें नथ घालण्याप्रमाणें त्या भूषणांचें

प्रयोजन समजलें पाहिजे. सुवासिनीच्या अलंकारांमध्यें नथेचें स्थान सौंदर्यप्रसाधनासाठीं नसून एक सौभाग्यचिन्ह म्हणूनच ती वापरली जाते; परंतु नथ नसेल, तर सौभाग्यवतीच्या सुवासिनीपणाला जसा कोणताच बाध येत नाहीं, तसेंच संतांच्या वाङ्मयामध्यें कलेच्या बाबतींत समजावें. 'कलेकरितां कला' हा वन्ध्य सौंदर्यवाद नर्तकीनें स्वीकार्य मानला तरी कुलस्त्रीला त्याचा उपयोग नसावा, हेंच योग्य आहे.

श्रीदासगणू महाराजांच्या काव्याकडे पाहतांना दृष्टिकोन कोणता असावा, हें स्पष्ट करण्यासाठींच मीं वरील प्रतिपादन केलें आहे.

श्रीदासगणू महाराज हें संतांच्या वाङ्मयपरंपरेचे आज तरी एकुलते एक उत्तराधिकारी आहेत. जो हेतु, जें प्रयोजन संतांनीं आपल्या डोळ्यांसमोर ठेवलें होतें, तोच हेतु श्रीमहाराजांच्याहि समोर आहे. त्यांच्या प्रसिद्ध झालेल्या वाङ्मयावर त्यांचा उल्लेख 'संतकवि दासगणू' असा सविशेषण केला जातो. एकानें खोंचून विचारलें, 'तुम्ही आपल्याला संतकवि म्हणवून घेतां, हें अभिमानाचें द्योतक नाहीं काय?' यावर महाराज लगेच म्हणाले, "यांत अभिमानाचा काय संबंध? राजाचा कवि तो जसा राजकवि, तसा संतांचा कवि तो मी संतकवि! यांत अभिमान कसला?" 'संतकुळीचा भाट तुझा हा दासगणू आला' असें त्यांच्या-संबंधीं श्री. देवांनीं म्हटलें आहे, तें योग्य आहे. आयुष्यभर त्यांनीं संतांच्या कीर्तीचे पोवाडे गाण्यापलीकडे दुसरें कांहींच केलें नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. संतांच्या दरबारामध्यें आपलें स्थान फक्त वैतालि-काचें, स्तुतिपाठकाचें आहे; असेंच श्रीदासगणू महाराज मानतात.

मी मात्र "संतश्चासौ कविश्च संतकविः।" 'संत असा कवि' असाच अर्थ संतकवि या शब्दाचा करतों. संतकवि म्हणण्यामध्यें दासगणू महाराजांच्या काव्याची ओळख सर्व तऱ्हेनें पटवून देण्याचें सामर्थ्य आहे, असें मला वाटतें. संतकविपदाला शोभेल, असेंच त्यांचें वर्तन व वाङ्मय आहे. मुख्य हेतु बाजूला टाकून केवळ कवित्वाच्या दृष्टीनें पाहिलें, तरी आधुनिकांना रंजविण्याचें सामर्थ्य त्यांच्या कवितेंत आहे,

असें मला प्रामाणिकपणें म्हणावयाचें आहे. म्हणूनच आधुनिक सुशिक्षित, विद्वान्, रसिक अशा वाङ्मयप्रेमी जनांच्या पुढें दासगणूमहाराजासंबंधींचा हा ग्रंथ लिहून ठेवण्यास मी प्रवृत्त झालों आहें. एकाद्या संतकवीचें धार्मिक वाङ्मय म्हणून त्याकडे उपेक्षाबुद्धीनें पाहिलें जाऊं नये, असें मला वाटतें. एकाद्या ललितकलामंदिराभोंवतींची पुष्पवाटिका ही जितकी रमणीय असूं शकते, तितकीच मनोहरता देवमंदिराभोंवतींच्या उद्यानास कां असूं शकणार नाहीं ? देवाच्या मंदिराभोंवतीं येतांच त्याचें सौंदर्य उणावेल असें थोडेंच आहे ? दक्षिणेकडील देवतांच्या दर्शनासाठीं एकादा भाविक यात्रेकरू गेला तर तो तेथील मंदिरांत भरून असणाऱ्या रमणीय शिल्पाचें सौंदर्य अनुभवूं शकत नाहीं का ? तितकी भाविकता नसलेला एकादा चोखंदळ प्रवासी तें भव्य, मनोहर शिल्प देवतांची सेवा करीत उभें राहिलें आहे, म्हणून दर्शनीय नाहीं असेंहि मानीत नाहीं. वैषयिक प्रेमाची समाधि असलेला ताजमहालच तेवढा सुंदर असावा, वेरूळचें कैलास लेणें रमणीय असूं नये असें म्हणणें खऱ्या रसिकास शोभणारें नाहीं. श्रीदासगणू महाराजांच्या काव्याविषयींहि असेंच म्हणतां येईल. भाविकाला त्यांच्या वाङ्मयाचें आलोचन करणें, हें एकाद्या सुगरणीनें दिलेल्या पंचपक्वान्नाच्या मेजवानीप्रमाणेंच आहे यांत शंका नाहीं; परंतु विचक्षण रसिकालाहि तें सत्यनारायणाच्या शास्त्रोक्त पद्धतीप्रमाणें तयार केलेल्या मधुर प्रसादाप्रमाणें ग्राह्य वाटेल.

श्रीदासगणू महाराजांचें वाङ्मय हें एकांगी नाहीं. हृदयाच्या विशाल अनुभूतीमुळें त्यांच्या काव्याला आकर्षक अशी विविधता प्राप्त झाली आहे. त्यांचें वाङ्मय सागराप्रमाणें विशाल आहे; एकाद्या कमलाकराप्रमाणें उपमा उत्प्रेक्षादि अलंकारांनीं नटलेलें असल्यामुळें रमणीय आहे. प्रसादगुण तर त्यांत काबुली द्राक्षामध्यें भरून राहिलेल्या रसाप्रमाणें वास करतो आहे. परवशता त्यांना एकाद्या शल्याप्रमाणें बोचते आहे. निष्ठावन्त देशभक्ताइतकीच स्वातंत्र्याची ओढ त्यांच्याहि जीवाला लागली आहे. समाजांतील अनेक प्रकारच्या दंभाची त्यांना चीड आली आहे.

आपसांतील भांडण त्यांच्या जिव्हारीं लागलें आहे. दलितवर्गाविषयीं त्यांना कनवळा आहे. समाजाच्या उद्धारासाठीं द्रष्टेपणानें त्यांनीं अनेक उपायहि सांगितले आहेत. समाजांतील चालीरीतींचें आणि विचार-प्रवाहाचें सूक्ष्म निरीक्षण करून त्यावर योग्य ती टीकाहि त्यांनीं केली आहे. क्षेत्रांतील पंडेगिरी, एकाद्या सुधारकाप्रमाणें त्यांनाहि तिरस्करणीय वाटते. बुवाबाजीचे तर त्यांनीं आपल्या वाङ्मयांत अक्षरशः वाभाडे काढले आहेत.

या सर्व अंगोपांगामुळें त्यांच्या वाङ्मयांतील संतजनसुलभ भक्तीच्या जिव्हाळ्याला एक तऱ्हेची साधारण जनालाहि चाखतां येईल अशी आस्वाद्यता आली आहे. केवळ परतत्त्वस्पर्शच असता, तर त्यांच्या वाङ्मयाचा आस्वाद घेणें हें श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा अमृतानुभव समजून घेण्याप्रमाणेंच अवघड कार्य होऊन बसलं असतें. हिमालयाच्या उत्तुंग शिखरावर चढणें, हें जसें सगळ्यांनाच शक्य नाहीं आणि तेथील केवळ शुभ्र हिमाच्छादित शिखरांचें चकाकणारें सौंदर्यहि सर्वांनाच आकर्षक वाटणार नाहीं, त्याप्रमाणें केवळ परतत्त्वस्पर्श हा दुर्ज्ञेय आणि दुर्विविच्यहि आहे. त्या परतत्त्वाभोंवतीं रसिकत्व आणि रसिकत्वाभोंवतीं कवित्वाचें कोंदण असलें कीं तें कोणालाहि हवेंसें वाटतें आणि प्राप्यहि असतें.

संतकवि श्रीदासगणूमहाराजांचें काव्यहि या सर्व गुणांनीं युक्त असल्याचा मला विश्वास असल्यानें रसिकांच्या पुढें मी तें माझ्या शब्दांत मांडणार आहें. पायसाची गोडी पहा. तें द्रोणांत भरून देण्यांत औचित्य आहे कीं नाहीं तें कृपया विचारूं नका, येवढेंच मी वाचकांना नम्रपणें विनवीत आहें.

## २. श्रीदासगणू महाराजांचीं महाकाव्यें :

संतकवि श्रीदासगणू महाराजांच्या काव्यसंभाराची ओळख करून घेण्यापूर्वीं त्यांचें एक वैशिष्ट्य समजून घेणें आवश्यक आहे.

आजकाल मराठीमध्यें महाकाव्यें होत नाहींत, अशी एक तक्रार टीकाकार करीत असतांना आढळतात. त्यांत पुष्कळसें तथ्य असलें तरी अपवाद अगदींच नाहींत असें नाहीं. महाराजांनीं एकच नव्हे तर 'भक्तिलीलामृत', 'संतकथामृत', 'भक्तिसारामृत', 'श्रीगजानन-विजय', 'मध्वविजय' 'शंकराचार्यचरित्र' अशीं एकूण सहा महाकाव्यें लिहिलीं आहेत. त्यांतील पुढचीं तीन, शेगांवचे श्री. गजानन-महाराज, पूर्णप्रज्ञ श्रीमध्वाचार्य, जगद्गुरु श्रीआद्यशंकराचार्य यांच्या जीवनवृत्तान्ताचें सांगोपांग वर्णन करणारीं असल्यामुळें त्यांच्या महाकाव्यत्वाविषयीं कोणी विशेषसा आक्षेप घेणार नाहीं, परंतु भक्ति-लीलामृतादि तीन ग्रंथ निरनिराळया संतांच्या वर्णनानें रचिलेले असल्यामुळें त्यांना प्रत्येकीं एक स्वतंत्र महाकाव्य म्हणावें कीं नाहीं, अशी शंका घेतली जाण्याची शक्यता आहे. त्या दृष्टीनें प्राचीन साहित्य-शास्त्रकारांनीं महाकाव्य कशाला म्हणावें, यासंबंधीं सांगितलेले नियम पाहिले पाहिजेत म्हणजे आपोआपच शंकानिरसन होईल.

कविराज विश्वनाथ या पंडितानें रचिलेल्या 'साहित्यदर्पण' नांवाच्या काव्यशास्त्रविषयक ग्रंथांत पुढीलप्रमाणें नियम सांगितलेले आहेत

"सर्गबंधो महाकाव्यं तत्रैको नायकः सुरः ।
सद्वंशः क्षत्रियो वाऽपि धीरोदात्तगुणान्वितः ॥
एकवंशभवाः भूपाः कुलजा बहवोऽपि वा ।
शृंगारवीरशांतानामेकोऽङ्गी रस इष्यते ॥
अंगानि सर्वेऽपि रसाः सर्वे नाटकसंधयः ।
इतिहासोद्भवं वृत्तं अन्यद् वा सज्जनाश्रयम ॥
चत्वारः तस्य सर्गाः स्युः तेष्वेकं च फलं लभेत ।
आदौ नमस्क्रियाशीर्वा वस्तुनिर्देश एव वा ॥
क्वचिन्निंदा खलादीनां सतां च गुणकीर्तनम ।
एकवृत्तमयैः पद्यैः अवसानेऽन्यवृत्तकैः ॥
नातिस्वल्पा नातिदीर्घाः सर्गा अष्टाधिका इह ।
नानावृत्तमयः क्वापि सर्गः कश्चन दृश्यते ॥

संध्यासूर्येन्दुरजनीप्रदोषध्वान्तवासराः ।
प्रातर्मध्याह्नमृगयाशैलर्तुवनसागराः ।
वर्णनीया यथायोगं सांगोपांगा अमी इह ॥

याचा सारांश असा— महाकाव्यामध्यें निरनिराळे सर्ग म्हणजे लहान लहान प्रकरणें असावींत. त्यांतील नायक देवकोटींतील असावा. धीरोदात्त गुणांनीं युक्त असा चांगल्या वंशांत जन्मलेला असा एकादा क्षत्रियहि चालेल, किंवा एकाच थोर कुळांत जन्मलेल्या अनेक राजांचें वर्णनहि करतां येईल. शृंगार, वीर वा शांत यांपैकीं कोणता तरी एक रस महाकाव्यामध्यें प्रमुख असावा, इतर रस हे अनुषंगानें वापरावेत. काव्याचें कथानक हें ऐतिहासिक वा एकाद्या सत्पुरुषाचें जीवनवृत्त सांगणारें असावें. धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चार पुरुषार्थांपैकीं कोणत्या तरी एकाची प्राप्ति हें महाकाव्याचें प्रयोजन असावें. महाकाव्याचा आरंभ देवता नमस्कारपूर्वक व्हावा. महाकाव्यामध्यें मधूनमधून दुर्जनाची निंदा व सज्जनाची स्तुति वर्णिलेली असावी. सर्गामध्यें एकच वृत्त वापरावें. शेवट निराळ्या वृत्तानें करावा. सर्ग फार लहान वा मोठे नसावेत. त्यांची संख्या आठापेक्षां अधिक असावी. सकाळ, संध्याकाळ, रात्र, जलाशय, वन इत्यादींचीं सुरस वर्णनें महाकाव्यामध्यें समयानुसार करावींत, असे महाकाव्यासंबंधींचे नियम आहेत. श्रीदासगणूमहाराजांनीं रचिलेल्या वरील सहा ग्रंथांकडे या नियमांना अनुसरून पाहिलें असतां त्या ग्रंथांना महाकाव्य म्हणून मानावयास अडचण नाहीं. पहिले तीन ग्रंथ जरी विविध संतांच्या वर्णनांनीं युक्त असले, तरी ‘ कुलजा बहवोऽपि वा ’ या नियमाप्रमाणें त्यांचा समावेश महाकाव्यांत करतां येईल. कारण या सर्व व्यक्ति जरी निरनिराळ्या प्रांतांत, निरनिराळ्या जातींत, निरनिराळ्या परिस्थितींत, निरनिराळ्या काळीं जन्म पावलेल्या असल्या तरी त्या सर्व एकाच संतकुळींतील आहेत. या तिन्ही ग्रंथांतील काव्यसंख्या व प्रकरणसंख्याहि महाकाव्याला साजेल अशीच विशाल

आहे. त्यांतील सर्व व्यक्ति प्रत्यक्ष होऊन गेलेल्या म्हणजे ऐतिहासिक आहेत. गांवोगांव जाऊनच श्रीदासगणूमहाराजांनीं त्यांची शक्यतों साधार माहिती मिळवलेली आहे. या कथा सज्जनाश्रित तर आहेतच. वर्णन करीत असतांना ओघाओघानें सज्जनस्तुति व दुर्जननिंदाहि अध्यायाअध्यायांतून मार्मिकपणें गोविलेली आहे. चारांपैकीं धर्म आणि मोक्ष या दोन पुरुषार्थांचा अवलंब करून त्यांना अनुकूल होतील, असे अर्थकामासंबंधींचे नियम सांगून हे ग्रंथ रचिले आहेत. महाकाव्यांतील नियमाप्रमाणें निरनिराळीं वर्णनेंहि त्यांत भरपूर आलीं आहेत. दीर्घ-महाकाव्याला शोभेल, असा एकटा ओवी छंदच व्यासवाल्मिकींच्या अनुष्टुभाप्रमाणें सुटसुटीत म्हणून या ग्रंथांतून वापरला आहे. इतर वृत्तें फारशीं आलीं नाहींत. साहित्यशास्त्राचे नियम काटेकोरपणें पाहिले नसल्यामुळें वा त्यांची कल्पनाहि नसल्यामुळें बहुधा असें झालें असावें. ज्या श्रीधर, माहिपति, मुक्तेश्वरांचा आदर्श महाराजांच्या डोळ्यांपुढें होता, त्यांनींहि एकच एक ओवी छंद हाताळलेला आहे. त्यामुळें महाकाव्याच्या नियमाला हा एक फार लहान आणि म्हणूनच दुर्लक्षणीय असा अपवाद दासगणूमहाराजांच्या महाकाव्यरूप ग्रंथांत आढळतो. प्रत्येक ग्रंथाचा आरंभ विस्तृत नमनानें झाला आहेच, पण प्रत्येक अध्यायाच्या आरंभींहि मोठीं भावपूर्ण नमनें या ग्रंथांतून आढळतात.

तेव्हां महाकाव्य या दृष्टीनें या ग्रंथांचें विहंगमावलोकन आरंभींच करणें उचित ठरेल.

महाराजांनीं लिहिलेल्या संतचरित्रात्मक ग्रंथांची वर्णनपद्धति सामान्यतः पुढीलप्रमाणें आहे. ज्या संताचें चरित्र वर्णन करायचें असेल, त्याचें स्थळ, काळ, आईबाप, बाळपण, घरची परिस्थिति, परमार्थाकडे असलेली ओढ, त्याला घडलेलें सद्गुरुदर्शन, त्यानें केलेली सद्गुरुसेवा, सद्गुरूकडून मिळालेला कृपाप्रसाद, त्यामुळें प्राप्त झालेली पूर्णावस्था इत्यादींची माहिती ऐतिहासिकदृष्ट्या प्रथम देऊन नंतर

सिद्धावस्थेमध्यें त्यांच्या हातून घडलेले चमत्कार हें सांगावयाचे. ते सांगत असतांना ज्या ज्या व्यक्तींचा त्या सत्पुरुषांशीं संबंध आला असेल, त्या त्या व्यक्तीस त्या संताचे मुखांतून समयानुरोधानें अध्यात्मविचार, सगुणभक्ति, धर्म, नीति, सामाजिक नीतिनियम, दंभाचाराचा त्याग, भूतदया, संयम, समन्वयाची बुद्धि इत्यादींचें ज्ञान देऊन त्यास सन्मार्गी लावावयाचें. या गोष्टींचें प्रतिपादन करीत असतांना त्यांत रसाळपणा आणण्यासाठीं पर्वत, नद्या, ऋतु, दिनरजनी, वनें, नगरें इत्यादि निसर्गदृश्यांचीं वर्णनें मधूनमधून करावयाची. मनोरंजक होतील, असे लोकव्यवहार व व्यक्तिस्वभाव यासंबंधींचे चटकदार चुटके द्यावयाचे. म्हणींची व सुभाषितांची पखरण करावयाची. भक्ति, करुण, वत्सल इत्यादींपैकीं प्रकरणाला अनुकूल अशा एकाद्या रसाचा आविष्कार करून त्यास रसमयता आणावयाची. शेवटीं सत्पुरुषाच्या समाधीचें वर्णन करून त्याच्या शिष्यप्रशिष्यांची, संप्रदायपरंपरेची माहिती देऊन चरित्र पुरें करावयाचें; ही सर्व माहिती काल्पनिक नाहीं. श्रीदासगणू महाराजांनीं स्वतः ठिकठिकाणीं जाऊन, पूर्ण चौकशी करून त्या त्या ठिकाणीं मिळणारे ग्रंथ व कागदपत्र पाहून विश्वसनीय व्यक्तींशीं चर्चा करून, ही माहिती गोळा केलेली आहे. अनेक ठिकाणीं ही माहिती देणारांचीं व ग्रंथांचीं नांवेंहि त्यांनीं उल्लेखलीं आहेत. यामुळेंच हैदराबाद येथील विद्वान् प्राध्यापक कै. चिंतामण नीलकंठ जोशी यांनीं "हीं चरित्रें केवळ चमत्कार पुराणें झालीं नसून त्यांस ऐतिहासिक मूल्यहि आलें आहे. म्हणूनच संतवाङ्मय असूनहि तीं वाचनीय झालीं आहेत." असें महाराजांच्या काव्याचें समालोचन करितांना म्हटलें आहे.

येथून पुढें महाराजांच्या एकेका ग्रंथाचा सामान्य परिचय करून घ्यावयाचा आहे.

'भक्तिलीलामृत' हा त्यांचा पहिला ओवीबद्ध ग्रंथ. याचे पंचेचाळीस (४५) अध्याय असून ओवीसंख्या ५६१५ आहे. हा ग्रंथ शके

१८२८ मध्यें जगद्धितेच्छु छापखान्यांत छापला गेला. तुलसीदास दळवी या लेखकानें हा लिहिला असून तो सीता बेदरी या स्त्रीला महाराजांनीं सांगितलेला आहे. या ग्रंथांत महिपतिबुवा ताहाराबादकर, तेरढोकींचे हरि नारायण देशपांडे, वऱ्हाडांतील अंजनगांवाजवळील सुरजीचे देवनाथ, गोदावरीच्या उत्तर तीरीं असलेल्या बाभुळगांवचे राजाराम हरीसिंग परदेशी, प्रवरेच्या तीरावरील साधु श्री चंडीराम केशव जोशी, कोकणांतील करंबवणें नांवाच्या गांवीं जन्मलेले व पुढें कवाडास येऊन राहिलेले सखाराममहाराज केतकर, सखाराममहाराज अम्मळनेरकर, बाळानंद, हुमाणाबादचे माणिकप्रभु, फैजपूरचे खुशालबाबा रंगारी, गोविंदमहाराज उतराणकर, तळोद्याचे श्री. खंड महाराज, तोताराम, श्री. यशवंतराव देव मामलेदार, अकोटचे श्री. नरसिंगजीमहाराज गंगागीर, आळंदीचे श्री. नरसिंह सरस्वति, श्री. साईबाबा, गंगूकाका, नानावली, श्री. विठ्ठलबुवा एकबोटे, बाळकृष्णबुवा आप्पासाहेब, नगरचे जयरामनाना, विठ्ठलबुवा श्रीगोंदेकर, नानामहाराज काष्टीकर, अजनुजचे दामोदर महाराज, फलटणचे हरिमहाराज, श्री. कडूमहाराज, श्री. बहिणाबाई, श्री. आनंदीस्वामी अशा ३६ सत्पुरुषांचें वर्णन करून, ४४ व्या अध्यायांत शेवटीं १०–१५ सत्पुरुषांचीं नांवेंगांवें उल्लेखिलीं आहेत. या ग्रंथासंबंधीं ते म्हणतात—

"सीते भक्तिलीलामृत । भवसिंधूचें तारू सत्य । तें लोटून भवाब्धींत । जाऊं पैलतटाला ॥"

'संतकथामृत' हा त्यांचा दुसरा ग्रंथ. याचे ६१ अध्याय असून ओवीसंख्या ६३४३ आहे. हा ग्रंथ शके १८३० त पूर्ण झाला असून, तो वामन बळवंत देशमुख, लीलाधर भाई इत्यादि परभणीच्या मंडळींना सांगितला असावा, असें आरंभींच्या चित्रावरून व उल्लेखावरून वाटतें. पुण्याच्या जगद्धितेच्छु छापखान्यांत तो छापला आहे. या ग्रंथांत शिखांचे गुरु गोविंदसिंग, उंबरखेडचे एनाथमहाराज, साधुमहाराज

खंदारकर, लव्हराळ्याचे माधवाचार्य, संताचार्य, रुक्मांगद, देशी-केंद्रनाथ, अप्पा मनोहर, सखाराम, श्रीधरमहाराज, सखारामबुवा, उतराणकर, चिन्मयानंद, बालात्मज, नागेन्द्र भारती, गैबीबुवा, सखाराममहाराज लोणीकर, गोचरस्वामी, शेवाळेकर महाराज, तुकाराम-महाराज येळेगांवकर, गुंडामहाराज देगलूरकर, नामदेवमहाराज, जनाबाई, माणिकप्रभु, ठाकुरबुवा, गुंडभटनाना, गंगाजी पाटील, नारायणस्वामी, लिंबोजी, महादजी, गोविंदजी, नरसिंगजी महाराज, सीताराम महाराज मंगळवेढेकर, लक्ष्मणबुवा वाखरीकर, बाबऱ्याचे बाळकृष्णबुवा, दादा दीक्षित, शहासाहेब, दाजीमहाराज टाकळीकर, साईबाबा, रामकृष्ण परमहंस, गंगाधर दामोदर देव, श्री. वासुदेवानंद सरस्वती, अशा ५० संतांचीं चरित्रें या ग्रंथांत वर्णन केलीं आहेत. समारोप करतांना शेवटीं महाराज म्हणतात—

“ हे बलवन्तात्मज वामना । हे लीलाधर सज्जना । हे जोशी रामकृष्णा । धन्य धन्य जगतीं तुम्ही ॥ संतकथेचें महत्त्व । किती सांगूं तुम्हांप्रत । संत साक्षात भगवंत । मोक्षपंठेचे अधिकारी । हा ग्रंथ केवळ भागीरथी । संतकथा यमुना निश्चिती । शब्दरचना सरस्वति । ऐसे महाप्रयाग हें ॥ ”

“ वा हा ग्रंथ शंकर । संतकथानक रमावर । शब्दांचे जे अलंकार । ते चतुरानन जाणावे ॥ ऐसा हा दत्तरूप । हरण करिल त्रिताप । पठण कर्त्याचे साक्षेप । मात्र असावा शुद्ध भाव ॥ ”

शेवटीं कवि प्रार्थना करतात कीं—

“ या अवघ्या संताप्रती । नमन माझें निश्चितीं । बापहो, या पोराप्रती । विसरूं नका कदापि ॥ तुम्ही माझे यजमान । तुम्हीच मातें नारायण । मातापिता मजलागून । तुम्हीच आहां अवघें ॥ माझ्या मनींची वासना । पुरविणारे तुम्हीच जाणा । ‘ दासगणू ’च्या दुर्गुणा । पाहूं नका संतहो ॥ पाप, ताप आणि दैन्य । माझें करा अवघें हरण । वैकुंठपति नारायण । मजलागीं भेटवावा ॥ मी तुमचे पवाडे । भाट होऊन चोहींकडे । गाइले वेडेवाकुडे । याचा अभिमान धरावा ॥ स्वस्ति श्री ‘संतकथामृत । कांचनाचें मंदिर सत्य । हा अध्याय रत्नजडित । कळस बैसवी ‘दासगणू’ ॥”

ही संतकथामृतमाला प्रिय तीर्थजननी गोदावरीस अर्पण केली आहे व "संतकथामृत होवो जगता सुखकारी" असें मागणें मागितलें आहे.

'भक्तिसारामृत' हा दासगणूमहाराजांचा तिसरा ग्रंथ. त्यांच्या काव्यग्रंथामध्यें गौरीशंकराप्रमाणें शोभून दिसणारा हा अलौकिक ग्रंथ आहे. या ग्रंथाचा विस्तार १२५३७ ओव्यांचा असून अध्यायसंख्या ६३ आहे. श्रीदासगणू महाराजांच्या वाङ्मयाचें सर्व वैशिष्ट्य या ग्रंथामध्यें आपल्या पूर्ण गुणानें तळपत आहे. हा एकच ग्रंथ जरी श्रीदासगणूमहाराज लिहिते, तरी त्यांची श्रेष्ठ संतकवि अशी कीर्ति झाली असती. या ग्रंथाची भाषा अत्यंत सरळ, सोपी व प्रसादपूर्ण आहे. श्रीदासगणू महाराज हे आतां परिणतप्रज्ञ झाले आहेत, असें या ग्रंथ-वाचनाच्या प्रसंगीं पदोपदीं प्रत्ययास येतें. श्रीदासगणू महाराजांची ओवी ही बरोबर ४ चरणी आहे. श्रीज्ञानदेवांची ओवी साडेतीन चरणाची तर एकनाथांच्या ओवीचे ४॥ चरण भरतात. श्रीदासगणू महाराजांच्या चार चरणी ओव्यांमुळें एक वेगळीच तालबद्धता त्यांच्या काव्याला आली आहे. त्यांतहि या भक्तिसारामृतांतील ओव्यांची रचना विशेष डौलदार असल्यामुळें त्यांतील लय अधिकच मोहक झाली आहे. महाराजांच्या समन्वयवादी तत्त्वज्ञानाचाहि प्रकर्ष या ग्रंथांत आढळून येतो. सामाजिक नीतिबोधांतील वैशिष्ट्य आणि राष्ट्रीय विचारांतील समतोलपणा या ग्रंथांत फारच चांगल्या रीतीनें व्यक्त झाला आहे. श्रीदासगणू महाराजांच्या उपमारूपकांनींसुद्धां—"कीं प्रथमवयसा काळीं लावण्याची रसनव्हाळी प्रकटे जैशी आगळी" या संत ज्ञानेश्वराच्या काव्यमय उक्तीप्रमाणें 'आगळीच रसनव्हाळी' या ग्रंथांत प्रकट केली आहे. मनोहर निसर्गवर्णनें, चटकदार शब्दचित्रें, मार्मिक सुभाषितें, मनोरंजक म्हणी, अर्थबोधक वाक्प्रचार इत्यादि काव्याला पोषक होणाऱ्या गोष्टींची यांत अगदीं रेलचेल आहे. त्यामुळें श्रीदासगणू महाराजांच्या काव्यमालेंतील हा ग्रंथ म्हणजे जणूं कौस्तुभ आहे.

या ग्रंथांतील ६३ अध्यायांतून कोंकणांतील मालवणाजवळील परुळ

गांवचे श्री. गोपाळनाथ विठ्ठल, पारनेर येथें शिंपी समाजांत जन्मलेले श्री. हरिबुवा, कोंकणांतील आजगांवचे श्री. रुद्राजी बाळकृष्ण वा चिदानंदमहाराज, औरंगाबाद प्रांतांतील आवण्याचे श्री. दादा-महाराज, श्री. देवनाथमहाराज, सावंतवाडी प्रांतांतील बांदे परगण्यांत झालेले श्री. सोहिरोबा कुलकर्णी, सावंतवाडी प्रांतांतील शिरवड्याचे बापू किणी, गुंडामहाराज देगलूरकर, देवगिरीचे रमावल्लभदास, तंजावर प्रांतांतील अडणूरचे पर्या नंद, गोदावरीच्या उत्तरतीरावरील मानवताजवळील कासारबोरीचे श्री. कृष्णामहाराज खिस्ते, मूळचे मद्रास प्रांतांतील परकोट्याचे पण पुढें सोलापुरांत स्थायिक झालेले सुब्रावबुवा, इगतपुरीजवळील पिंपरीचे सदानंद सद्रोद्दिन, श्री. चिदानंदांचे पुत्र गोपाळबुवा वा विमलानंद, सातारा प्रांतांतील विस्याचे बहिरव अवधूत वा ज्ञानसागरेंद्र, गोपाळमहाराज सेलूकर, पारडीचे नगार्जा, मूळचे खानदेश जिल्ह्यांतील डोंगराळचे पण पुढें धुळें येथें समाधिस्थ झालेले टीकाराम, परंड्याचे हंसराज, कऱ्हाडजवळील कोळेगांवचे विठोबा घाडगे, गोव्याशेजारील केरीगांवचे पूर्णदास, श्री. बाबा उपसकर, वेरागचे संतनाथ, गंगाखेडचे सखारामभट, कानपूरचे मणिलाल वा श्री. भास्करानंद सरस्वति, पाटोदे गांवचे श्री. गोविंदपंत कुलकर्णी, विजयनगराजवळील होळीचे तैलंगधर, रावेरास समाधिस्थ झालेले माहूरचे श्री. दत्तनाथमहाराज, बंगालप्रांतांतील दुर्गाचरण श्री. नागमहाशय, नगरप्रांतांतील यशवंतराव जालनापूरकर, सांगोले तालुक्यांतील हिडतचे श्री. संतनाथदादा, बंगाल्यांतील श्री. बाबा भारती, रामकृष्ण परमहंस, उज्जैनीचे श्री. शीलनाथ महाराज, आजेगांवचे केशवमूर्ति, सातारा-प्रांतांतील पीरवाडीचे संभाजी महाराज, कोंकणांतील ताम्हणमळ्याचे श्री. यदुबाबा, साईबाबा, पंजाबांतील स्वामी रामतीर्थ, रावजी कोल्हटकर, काका पुराणिक, नाशिकचे रघुनाथमहाराज, नारायणमहाराज जालवणकर, रत्नागिरी जिल्ह्यांतील विश्वनाथमहाराज पाटणकर, केळवें माहीम तालुक्यांतील डोंगरे गांवचे केशवनाथ कीर्तने उर्फ

अनिरुद्ध सरस्वति, वऱ्हाड प्रांतांतील आरणगांवचे बळीराम, वाखरीचे श्री. तपकिरी महाराज, कल्याणचे राममारुति, गोंदवलेकर, श्री. गुलाबरावमहाराज, हुबळीचे सिद्धारूढ, नागपूरचे ताजुद्दिनबाबा, सुंदराबाई, तळेगांव जवळचे श्रीपादबाबा, अशीं ५४ संतांचीं चरित्रें वर्णिलीं आहेत. शेवटीं अनेक सिद्धसाधकांची व भक्तांची नांवनिशीहि विस्तारानें दिली आहे. तिची व्यापकता पाहिली कीं, कवीच्या बहुश्रुतपणाचा अचंबा वाटतो. शेवटीं कवि परमेश्वराची प्रार्थना करतात कीं,—

"असो आतां हे विठ्ठला। मायबापा जगत्पाला। दासगणूच्या त्रितापाला। हरण करणें दीनबंधो॥ तैसाचि या ग्रंथावर। तुझा लोभ असो निरन्तर। हेंच मी पसरून पदर। मागतों गा विठ्ठला॥ या ग्रंथाचा पाठ जेथ। आपण असावें सदा तेथ। श्रोता वक्ता आनंदांत। तुझ्या कृपेनें असो कीं॥ देवा आजपर्यंत। ग्रंथलेखन केलें बहुत। तुझ्या प्राप्तीचा मनांत। हेतु धरून नारायणा॥ परी मजविषयींची कठोरता। कां न सोडिली पंढरीनाथा। आतां तरी अनंता। भेट येऊन मजलागीं॥ कठोर म्हणणें तुजप्रत। नाहीं नाहीं मला उचित॥ कां कीं आजपर्यंत। सांभाळ माझा केला त्वां॥ मी दुर्गुणांचें आगर। अनीतीचें भांडार। छंदिष्टपणाचा सागर। दुष्टपणाचा केवळ तरु॥ ऐसा जरी मी होतों देवा। तरी रक्षण केलंत माधवा। म्हणूनी तुजला केशवा। कठोर तरी कैसें म्हणूं?॥ आईबापांनीं उपेक्षिलें। आप्तइष्टांनीं निंदिलें। नीच नोकरी करून भरिलें। पोट देवा पोलिसाची॥ त्याचें कथनें पुनः पुनः। कशास करूं नारायणा। माझ्या न पाहतां दुर्गुणा। दयाच केलीस पांडुरंगें॥ विद्या माझी अल्प रामा। लिहिण्यावाचण्याच्या कामा। यावी तिच पुरुषोत्तमा। कौतुक जगीं केलें त्वां॥ ऐशी आमरण-पर्यंत बरवी। काव्यरूपी सेवा घ्यावी। भेटी मजला प्रत्यक्ष यावी। हीच आस नारायणा॥ स्वप्नीं ध्यानीं बहुत वेळां। आलास तूं जगत्पाला। आतां प्रत्यक्षाचा सोहाळा। राहिला तो होऊं दे। द्वेषरहित असो मन। चित्तीं ठसो अध्यात्मज्ञान। त्रास माझ्यापासून। होवो न देवा कोणाही॥ कोणा याचना करण्याचा। प्रसंग मशीं न आणी साचा। अभिमान

दासगणूचा। तूंच वाही पांडुरंगे॥ परावरी उपकार। मम करें होवो निरंतर। प्रीति नामस्मरणावर। राहो अखंड तुझिया॥ प्रतिवर्षीं पंढरीची। वारी घडो सांग साची। प्रचीति ज्ञानोत्तर भक्तीची। तुझ्या कृपेनें येवो मज॥ चतुर्थाश्रम दीक्षेंत। होवो देहाचा प्राणान्त। तीर्थ जननीच्या तटीं सत्य। गौतमी गंगा गोदेच्या॥ मरण आयासावांचून। दैन्य न होतां जीवन। अंतकालीं मुखांतुन। स्मृति राहून येवो हरी॥ हीच माझी याचना। तुजलागीं मनमोहना। उपजो मनीं सद्वासना। अघवीं माझ्या पांडुरंगे॥ मीं ज्या ज्या संताचें। वर्णन करनीं केलें सांचे। त्यांनीं त्यांनीं सत्कृपेचें। दान करून मजलागी॥ भीड घालणें हरीस। माझी अवघी पुरविण्या आस। कां कीं तुम्ही सान्निध्यास। आहां म्हणून प्रार्थितों॥ असो हे पांडुरंगा रुक्मिणीपति। वंदन करून तुजप्रती। शांति शांति त्रिवार शांति। वदून ग्रंथ संपवितों॥"

हा ग्रंथ शके १८४७ मध्यें कार्तिक वद्य दशमीला समाप्त झाला असून तो मनोरंजन प्रेसमध्यें छापलेला आहे.

'गुरुचरित्रसारामृत' हा त्यांचा संतचरित्रवर्णनपर असलेल्या ग्रंथांपैकीं कालानुक्रमानें चौथा ग्रंथ. हा ग्रंथ स्वतंत्र नाहीं. सरस्वति गंगाधर यांनीं रचलेलें ५२ अध्यायांचें जें सुप्रसिद्ध 'गुरुचरित्र' त्याचा हा १६ अध्यायांत आणिलेला सारांश आहे. याची ओवीसंख्या २७३४ आहे. श्रीबाबासाहेब लक्ष्मणराव पाटील, मामलेदार यांनीं महाराजांस विठ्ठलाच्या उत्सवासाठीं नरसोबाच्या वाडीस बोलावून घेऊन त्यांना तेथें या स्वरूपाचा ग्रंथ रचण्याची आग्रहानें विनंति केली. ग्रंथाच्या रचनेस तेथेंच आरंभ झाला व शके १८५६ च्या परशुरामजयंतीस नांदेडास या ग्रंथाची समाप्ति झाली. उत्कृष्ट सारांश कसा असावा, याचा हा ग्रंथ एक चांगला नमुना आहे. मुळाशीं ताडून पाहतां याचें प्रत्यंतर येईल. नांदेडचे महाराजांचे स्नेही शंकरराव मुळावेकर, राजेसाहेब सरदेशपांडे, भगवानराव गंगाखेडकर, कविवर्य देवीदास लक्ष्मण महाजन, इत्यादिकांनीं तो मुळाशीं ताडून पाहिल्याचा उल्लेख ग्रंथांतच शेवटीं केला आहे. ग्रंथाचे शेवटीं महाराज प्रार्थना करतात—

" असो हे दत्तात्रेया । श्रीपादवल्लभा परमसदया ।
नृसिंहसरस्वति स्वामिराया । कृपा करा मजवरी ॥
आतां हेचि विनंती । तुजलागीं गुरुमूर्ति ।
भेटवा मला रुक्मिणीपति । बाप माझा पांडुरंग ॥
ईश्वरचिंतनीं राहो मन । मुखें होवो ईश्वरभजन ।
त्रास पराकारण । न होवो माझ्यापासुनी ॥
सत्पथानें मला न्यावें । भूतमात्रीं प्रेम असावें ।
साधुसंतांचें सदा व्हावें । दर्शन देवा वरच्यावरी ॥
मी पदरज अवघ्या संतांचा । शिष्य वामनशास्त्रींचा ।
रामदासीपंथ साचा । असून झालों वारकरी ॥
दत्त पांडुरंग शंकर । हे एकरूप साचार ।
ऐसें माझें निरंतर । मन मानो निश्चयानें ॥ "

'सुमध्वविजयसारामृत' हा महाराजांचा पांचवा ग्रंथ. वैष्णवमताचे संस्थापक पूर्णप्रज्ञ श्रीमध्वाचार्य यांच्या जीवनचरित्रपर हा आहे. या ग्रंथाचे ११ अध्याय असून ओवीसंख्या १९२४ आहे. तो शके १८६० त पंढरपुरांत पूर्ण झाला. महाराजांकडे वरचेवर येणारे व त्यांच्या कीर्तनादिकांची गोडी असलेले बीडचे श्री. शेषाचार्य अनवणे यांच्या आग्रहानें महाराजांनीं हा ग्रंथ रचिला. श्री. शामाचार्य कालगांवकर हे संस्कृतांतील मूळ मध्वविजयाचा अर्थ सांगत व महाराज ओवीरूपानें त्यांतील सार मराठींत उतरवीत. मात्र या ग्रंथांत महाराजांचा जीव दिसत नाहीं. ओव्यांची रचनाहि तितकी सफाईदार नाहीं. प्रसादगुणहि जरा उणाच आहे. काव्य वाचीत असतांना ही वर्णनशैली दासगणूमहाराजांची नसावी असें वाटत असतें. याला बहुधा वैष्णवांचा सांप्रदायिक आग्रह कारण असावा. नमनामध्यें तुकारामाचें नांव नसावें, शंकराचा उल्लेख करूं नये, येथपासून त्यांनीं हट्ट धरिला होता. अर्थात् ही गोष्ट मान्य करणें महाराजांना शक्यच नव्हतें. कारण तो त्यांच्या निष्ठेचा प्रश्न होता. शेवटीं नमनांतील उल्लेखाचा अनुक्रम बदलावा, या मुद्द्यावर तडजोड होऊन ग्रंथलेखन पुढें चालू झालें. मध्यंतरीं एका

प्रसंगांत शंकराचार्य हे मणिमान् नांवाच्या दैत्याचे अवतार असून चार्वाकांना वेदविन्मुख करण्यासाठीं त्यांनीं मुद्दाम वेदबाह्य मतें प्रस्थापित केलीं, अशा अर्थाचें वर्णन मूळ संस्कृत ग्रंथांत आलें. आग्रह धरूनहि महाराज त्याचा अनुवाद करीनात. ते म्हणाले, " माझ्या आईला मी माझ्या तोंडानें शिव्या देणार नाहीं. " या अशा प्रकारामुळें नेहमींप्रमाणें श्रीदासगणूमहाराज या ग्रंथांतील वर्ण्य विषयाशीं समरस होऊन लेखन करूं शकले नाहींत, हें स्वाभाविक आहे. यामुळेंच या ग्रंथांतील काव्यरचना ही हठाकृष्ट वाटते. या ग्रंथाच्या शेवटीं ते लिहितात—

" मध्वसिद्धांत भक्तीशीं । पोषक आहे सर्वांशीं ।
सेव्यसेवक भावासी । जागृत ठेवणें हाच विधि ॥
मी अद्वैतमताचा । जरी अनुयायी आहे साचा ।
स्वामी शंकराचार्यांचा । असे पहा पदरज ॥
परी हें मध्वमत । भक्तीस उपयोगी अत्यंत ।
म्हणून मीही झालों भक्त । श्रीमध्वाचार्यस्वामींचा ॥ "

' श्रीगजाननविजय ' हा संतचरित्रात्मक सहावा ग्रंथ. हा वऱ्हाडांतील शेगांव येथील प्रसिद्ध सत्पुरुष श्रीगजाननमहाराज यांच्या चरित्राचें वर्णन करणारा आहे. या ग्रंथाचे २१ अध्याय असून ओवीसंख्या ३६६८ आहे. यांतील प्रत्येक अध्याय गजाननमहाराजांच्या हातून घडलेल्या निरनिराळ्या चमत्कारांचें वर्णन करणारा आहे. शेगांव येथील मठांतील कांहीं कागदपत्रें पाहून व गजाननमहाराजांच्या सहवासानें पावन झालेल्या कांहीं वृद्ध पुरुषांनीं प्रत्यक्ष सांगितलेली माहिती ऐकून महाराजांनीं त्या त्या घटना आपल्या रसाळ वाणीनें भक्तिपूर्ण रंगविल्या आहेत. या ग्रंथावर अभिप्राय देत असतांना महाराजांच्या वर्णनशैलीस उद्देशून श्री. बाबासाहेब खापर्डे हे लिहितात, " श्रीदासगणू महाराजांची रसाळ वाणी आणि श्रीगजाननमहाराजांचें अद्भुत चरित्र यांचा एकत्र संयोग झाल्याकारणानें ' रत्नं समागच्छतु काञ्चनेन ' ही कालिदासाची काव्योक्ति या ग्रंथास अक्षरशः लागू पडते. " श्री. भाऊशास्त्री वझे

यांनीं, " ज्यांनीं श्रीगजाननमहाराजांचें दर्शन घेतलें नाहीं, त्यांच्याहि डोळ्यांसमोर श्रीगजाननमहाराजांची मूर्ति प्रत्यक्ष उभी राहते, इतकें हें स्वभावोक्तिपूर्ण चरित्र लिहिलें गेलें आहे. " असा अभिप्राय दिला आहे. उदयचे संपादक श्री. ना. रा. बामणगांवकर हे तर "हा दासगणूविरचित गजाननविजय ग्रंथ खरोखर मेघासारखा असून मयूररूप श्रोत्यांना नीर देऊन आनंदानें नाचावयास लावणारा आहे. " असें या ग्रंथास उद्देशून म्हणतात. या ग्रंथामध्यें संतांचा महिमा गातांना श्रीदासगणूमहाराज म्हणतात—

" संत हेच भूमीवर । चालते बोलते परमेश्वर ।
वैराग्याचे सागर । दाते मोक्षपदाचे ॥
संत हे सन्नीतीची । मूर्ति होय प्रत्यक्ष साची ।
संत भव्य कल्याणाची । पेठ आहे विबुधहो ॥
त्या संतचरित्रास । श्रवण करा सावकाश ।
आजवरी ना कवणास । संतांनीं या दगा दिला ॥
ईश्वरी तत्त्वाचे वाटाडे । संत हेची रोकडे ।
हे अमोघ ज्ञानाचे ते गाडे । भरले असती प्रत्यक्ष ॥
संतचरणीं ज्यांचा हेत । त्यांचा ऋणी रुक्मिणीकान्त ।
आतां मलरहित करा चित्त । गजाननचरित ऐकावया ॥ "

शेवटीं वाचकांस उद्देशून ते म्हणतात—

" हा एकवीस अध्यायांचा । गजानन विजय नांवाचा ।
नैवेद्य एकवीस मोदकांचा । गजाननासी अर्पा हो ॥
वा हे अध्याय साचार । माना एकवीस दूर्वाङ्कुर ।
पारायणरूपें निरन्तर । वाहाव्या गजाननासी ॥
सद्भाव जो मानवाचा । तोच दिवस चतुर्थीचा ।
प्रेमरूपी चंद्राचा । उदय झाला पाहिजे ॥
मग या ग्रंथाचें अक्षर । एकेक दूर्वाङ्कुर ।
अर्थ शब्दांचा साचार । मोदक समजा विबुध हो ॥
तो अर्पून गजानना । पारायणरूपी पारणा ।
साधून घ्यावी करा ना । वेळ आतां थोडाही ॥ "

हा ग्रंथ शके १८६१ च्या चैत्र शु॥ प्रतिपदेस शेगांव येथें पूर्ण झाला आहे.

'श्रीमद् आद्य शंकराचार्यचरित्र' हा सातवा ग्रंथ महाराजांच्या संतचरित्रमालेचा जणू मेरुमणि आहे. या ग्रंथाचे ३९ अध्याय असून त्याची ओंवीसंख्या ५९०१ आहे. हा ग्रंथ लिहितेवेळीं महाराजांनीं फारच श्रम घेतले आहेत. या चरित्रास उद्देशून प्रस्तावनेंत सोनोपंत दांडेकर लिहितात, "शंकराचार्यांच्या चरित्रास ह. भ. प. श्रीदासगणू-महाराजांसारखा प्रतिभावान्, वर्णाश्रमधर्मावर निष्ठा असलेला, पण परि-स्थिति न विसरणारा, भक्तीनें अंतःकरण सतत पाझरत असलेला, सहृदय लेखक मिळावा, हा मोठा सुयोगच समजला पाहिजे. 'मणिना वलयं वलयेन मणिः' या न्यायानें दासगणूंची काव्यस्फूर्ति व आचार्यां-सारख्यांचें चरित्र हीं एकमेकांना सुशोभित करण्यासारखींच आहेत, यांत शंका नाहीं ! प्रस्तुतचें चरित्र मोठें सुंदर वठलें आहे. वाचतांना वाचकांस तें संपविल्याशिवाय खालीं ठेवूं नये, असेंच वाटेल."

मीं 'भक्तिसारामृत' या ग्रंथाचा परिचय करून देत असतांना त्या ग्रंथाला उद्देशून जें वर्णन केलें, तें या शंकराचार्यचरित्रासहि जवळजवळ जसेंच्या तसेंच लागूं पडेल, यांत शंका नाहीं. वर्ण्य विषयाच्या भव्यतेला पेलणारी सामर्थ्यशाली प्रतिभा आणि प्रसादमय वर्णनशैली यांचा मनोहर संगम या ग्रंथांत झालेला आहे. यांतील कित्येक प्रकरणें लक्षपूर्वक अभ्यासण्यासारखीं आहेत. महाराजांच्या तत्त्वज्ञानाचें वैशिष्ट्य व त्यांच्या हृदयांत वास करणारी समाजहिताची तळमळ या महा-काव्यांतून फार चांगल्या रीतीनें प्रकट झाली आहे. कर्म, भक्ति व ज्ञान यांचा अतिशय योग्य समन्वय या ग्रंथांत महाराजांनीं साधला आहे. मनोहर रूपकांच्या द्वारें त्यांनीं हा संबंध प्रकट केला आहे. "वैदिकपंथ जोंधळा। कर्ममार्ग हें बाटुक त्याला। उपासनामार्गाला। कणिस म्हणणें भागसें॥ दाणे हेंच आलें ज्ञान। त्या कणिसालागुन। ऐसा वेदमार्ग संरक्षण। करणें ज्ञानी पुरुषांनीं॥"

चारी आचार्यांच्या मतांचा समन्वयहि या ग्रंथांत चांगला साधला आहे. शेवटीं ते म्हणतात.—

"या चारी आचार्यांनीं। परिस्थितीला पाहुनी।
आपुलीं मतें स्थापुनी। उपासनेसी जिवविलें॥"

या मताचा समन्वय ते एका रूपकाच्या द्वारें करतांना म्हणतात— ( ३७ व्या अध्यायाच्या आरंभीं )

"या अद्वैताचें सेवन। होणें आहे अति कठिण।
जेवीं कां तें राजेपण। एखाद्याचेच्च वांट्याला॥
अद्वैतासिद्धांत मेघवारी। द्वैतासिद्धांत प्रवाहापरी।
सगुणरूप जो कां गिरी। तेथून उत्पन्न होतसे॥
जेवीं पर्वत ते अपार। तेवीं सगुणोपासना साचार।
मत हाच निर्झर। शैलीं उत्पन्न झालेला॥"

हा ग्रंथ शके १८६३ त मार्गशीर्ष वा. द्वादशीला पंढरपुरांत पूर्ण झाला आहे. शेवटीं आचार्यांना कवि विनंति करतात—

"लेकुराचें दुबळेंपण। जाचक मातेलागुन।
हरा राष्ट्राचें अवघें दैन्य। सत्कृपेनें आपुल्या॥"

'नागझरीमाहात्म्य' हें वऱ्हाडांतील गजाननमहाराजांच्या शेगांवाजवळील 'नागझरी' या ठिकाणीं होऊन गेलेल्या 'श्रीगोमाजीमहाराज' यांच्या चरित्रपर व तेथील स्थानमाहात्म्यपर रचलेलें एक लहानसें प्रकरण आहे. याचे ५ अध्याय असून ओव्या ६९५ आहेत. हा ग्रंथ शके १८६८ मध्यें नागझरी येथें पुरा झाला आहे. नागझरी येथील संस्थांचे व्यवस्थापक श्री. सुखदेव नारायण पाटील यांनी हा ग्रंथ महाराजांना विनंति करून मुद्दाम लिहविला आहे. श्रीदासगणू महाराजांनीं तो त्यांना स्वतःला त्या क्षेत्रांत झालेला स्वप्नदृष्टान्त, परंपरेनें आलेल्या कथा आणि थोडीं कागदपत्रें, यांच्या आधारें नेहमींच्याच सुरस भाषेंत लिहिलेला आहे.

'ज्ञानेश्वरचरित्र' हें ज्ञानेश्वरचरित्रविषयक २५१ ओव्यांचें एक

छोटेंसें प्रकरण, महाराजांनीं लिहिलेल्या चांगदेवपासष्टीवरील ओवीबद्ध टीकेच्या–पासष्टीभावदीपिकेच्या उपोद्घातरूपानें आलेलें आहे. त्यांत ज्ञानेश्वरांचें चरित्र थोडक्यांत दिलेलें असून चांगदेवाचा आणि त्यांचा संबंध कसा घडला तें सांगितलें आहे. आरंभीं महाराज म्हणतात—

> " आतां श्रोते सावधान । कथा ऐका ही पावन ।
> जगदुद्धारा भगवान । श्रीगोदातीरीं अवतरले ॥
> चरित्र रसाळ जयांचें । बहुतांनीं गाइलें साचें ।
> सार काढून तयाचें । मीही थोडें वर्णितों ॥ "

' आऊबाईचरित्र ' हें जतच्या ' डफळे ' घराण्यांतील एका साध्वीचें एक ऐतिहासिक चरित्र आहे. अहिल्याबाईप्रमाणें या बाईहि राज-घराण्यांतील असून अत्यंत साध्वी होत्या. त्यांचें वर्णन करणारें हें प्रकरण अगदीं छोटें म्हणजे १९८ ओव्यांचें आहे. यांत महाराज म्हणतात—

> " पूर्वकालीं मीरा मुक्ता । सखूबाई कान्होपात्रा ।
> कबीराची सुशील कांता । नाथकांता गिरिजापति ॥
> तुकाकन्या भागूबाई । वा होळकरीण अहिल्याबाई ।
> तैशाच जतेचिया ठाणीं । आऊबाई जाहल्या ॥
> ती संत होती म्हणून । मीं हें केलें वर्णन ।
> नाहीं दुसरें प्रयोजन । हें वर्णन करण्याचें ॥
> हे साध्वी आऊबाई । आतां मागणें हेंच पाही ।
> महाराष्ट्रीं राजकुलाठायीं । स्त्रिया होवोत तुझ्यासम ॥
> तूं पाहिलें शिवचरण । मला भेटीव रुक्मिणीरमण ।
> हेंच पदर पसरून । आहे जननी मागणें ॥ "

' श्री. केशवरावचरित्र '— महाराजांनीं १६० ओव्यांत श्री. केशवराव-महाराज देशमुख यांच्याविषयीं आपल्याला वाटणारा आदर व्यक्त केला आहे. चरित्र थोडक्यांत सांगून झाल्यावर महाराज म्हणतात—

> " असो वर्तन वारकऱ्याचें । असावें कोणत्या प्रकारचें ।
> हें आचरून दाविलें साचें । केशवरावें पुण्यामाजीं ॥

पहा केशवरावापरी । जो का वागेल वारकरी ।
त्याच्या हांकेस श्रीहरी । 'ओ' देईल निःसंशय ॥
त्या देशमुखा कारण । माझें असो अनन्य नमन ।
तुमच्यापरी माझें मन । हरिभक्तींत करा हो ॥"

महाराजांनीं लिहिलेला संतचरित्रात्मक ग्रंथांचा व प्रकरणांचा परिचय आतांपर्यंत आपण करून घेतला. यापुढें त्यांच्या पौराणिक-कथापर ग्रंथांचा परिचय आपल्याला करून घ्यावयाचा आहे.

'गोदामाहात्म्य' हा त्यांतील १ ला ग्रंथ. याचे ३१ अध्याय असून ओवीसंख्या २६३३ आहे. हा ग्रंथ गोदाप्रदक्षिणेच्या वेळीं महाराजांनीं ब्रह्मपुराणांतर्गत 'गोदामाहात्म्या'चें आधारें लिहिला आहे. पौराणिक कथा सांगत असतांनाहि भोंवतींची परिस्थिति ते विसरले नाहींत, हें या ग्रंथांत पदोपदीं प्रत्ययाला येतें. इतिहासाचा मागोवा घेत त्यांची कल्पकता कशी भराऱ्या मारते, तें या ग्रंथांतील एकाच प्रसंगावरून उत्तम प्रकारें प्रत्ययास येतें. 'राघोबादादा पेशव्यांचें चरित्र' मराठ्यांच्या इतिहासांत कसें काळ्या रंगानें रंगलेलें आहे, हें सर्वश्रुतच आहे. त्या प्रसंगास उद्देशून महाराजांनीं एक कल्पना केली आहे—'शुक्रतीर्थ पूर्वी गोदेच्या उत्तरतीरावर होतें तें हल्लीं दक्षिणतीरावर झालें आहे. कारण कोपरगांवाजवळ हा गंगेचा ओघ पालटून तो पलीकडून वाहूं लागला. पेशव्यांच्या कारकीर्दीपर्यंत ओघ पालटलेला नव्हता. रघुनाथरावदादांनीं त्या ठिकाणीं उत्तम घाटहि बांधले होते. महाराज या संदर्भात लिहितात—

" शुक्रतीर्थ उत्तरतीरीं । होतें तें दक्षिणतीरीं ।
झालें कां कीं गोदावरी । वाहूं लागली पलीकडून ॥
पूर्वीच्या गंगेप्रती । जुनी गंगा लोक म्हणती ।
ही गोदेची पालटाया गती । कारण ऐसें जाहलें— ॥
श्रीमंत रघुनाथराव दादांनीं । घाट बांधिले त्या ठिकाणीं ।
घाटीं व मंदीर उभारोनी । स्थापना केली विष्णूची ॥
हें श्रीमंतांचें कृत्य । गमे न पटलें गोदेप्रत ।
गोदावरी दुःखित । जाहली तत्कृत्यानें ॥ "

गोदावरी गुप्त झाली. सर्वत्र हाहाःकार माजला. शेवटीं भगवंतांनीं विष्णूस विनवणी केल्यावरून त्यांनीं गोदेस गुप्त होण्याचें कारण विचारलें, त्यावेळीं गोदावरी म्हणाली—

**" परशुरामानंतर । यांनीं गाजविली तरवार ।**
**असून ब्राह्मणांचे कुमार । संरक्षाया निजधर्मा ॥**
**यवना पादाक्रांत केलें । भगवंता आपुल्या बाहुबलें ।**
**सम्राट शाहूचें वाढविलें । वैभव दिल्लीपर्यंत... ॥**
**त्या धनुर्धर बाजीच्या पोटीं । हा रघुनाथ जन्मला गारगोटी ॥ "**
**" हा ज्ञानी असून स्त्रैण झाला । पुतण्या नारायण मारविला ।**
**फिरंगी घरांत आणला । तुडवावया जात पायांतळीं ॥**
**ब्राह्मणकरींची राजसत्ता । बुडविण्याचा पाया आतां ।**
**राघ्यानें घालून सर्वथा । घाट बांधाया आला येथें ॥**
**मंदिरें, घाट बांधणारी । लाडकी माझी अहिल्या खरी ।**
**हा रघुनाथ तिच्या समोरीं । माकड देवा, निस्संशय... ॥**
**तिनें जरी या स्थला । घाट असतां बांधिला ।**
**तरी माधवा, माझ्या जला । भरतें येतें निस्संशय ॥**
**या रघुनाथानें खचित । हा विटाळ केला मजप्रत. "**

असें म्हणून गोदावरी पृथ्वीवरून गुप्त होऊन स्वर्गीं जावयास निघाली, तेव्हां भगवान् विष्णूंनीं तिला कोंपर धरून थांबविलें व समजूत काढून पृथ्वीतलावरच राहण्यास सांगितलें. शेवटीं राघोबा-दादाला त्याच्या अपकृत्याची जाणीव देण्यासाठीं गोदावरी, त्याचे घाट टाकून पलीकडून वाहूं लागली. इतिहासाचा ज्याचा अभ्यास आहे, त्याला राघोबाच्या वर्णनांतील हा बाराकावा चटकन् पटेल व वस्तुस्थितीवर आधारिलेल्या या कल्पनाविलासाचें कौतुक वाटेल, यांत शंका नाहीं.

२९ व्या अध्यायांतील गंगासागरसंगमाचें वर्णन अत्यंत मनोहर आहे. हा ग्रंथ शके १८४३ त नांदेड येथें पूर्ण झाला.

' मंगीशमाहात्म्य ' हा ग्रंथ १६ अध्यायांचा असून त्याच्या १६९६

ओव्या आहेत. हा ग्रंथ मुंबई येथील श्री. माधव विठ्ठल गांगला या सद्गृहस्थांनीं श्री. महाराजांच्याकडून लिहून घेतला आहे. शिखर-शिंगणापूर येथील शंभू महादेवाचें हें पौराणिक वर्णन अत्यंत रसाळ आहे. शिखरशिंगणापूर आणि महाराज यांचा संबंध पुष्कळ जुना. महाराज लहान असतांना आपल्या चुलत्याबरोबर शिंगणापुरास गेले होते. महादेव हें त्यांचें आराध्यदैवत व शिंगणापूरचें रम्य स्थान. अर्थात् त्या बालपणांतहि त्यांच्या वृत्ति उचंबळून आल्या व त्यांनीं महादेवाच्या स्तवनपर कांहीं श्लोक अनुष्टुप् वृत्तांत रचले. महाराजांचें हें पहिलें काव्य. महाराजांच्या काव्याची गंगोत्री ही अशा रीतीनें भगवान् शंकराच्या मस्तकावरून निघालेली आहे. हें 'मंगीश-माहात्म्य' लिहितांना महाराजांनीं अनेक ग्रंथांचे संदर्भ नेहमींप्रमाणेंच पाहिले आहेत. शिखर-शिंगणापुराची सरकारी गॅझेटिअरमधूनहि कांहीं ऐतिहासिक माहिती त्यांनीं गोळा केली आहे. मंगीशमाहात्म्यांत वर्णिलेल्या कांहीं पौराणिक कथा निरनिराळ्या ग्रंथांत निरनिराळ्या प्रकारानें वर्णिलेल्या आढळतात. मंगीशमाहात्म्यांतील श्लोकहि शिवपुराण, स्कंदपुराण इत्यादि पोथ्यांतून जसेच्या तसे आढळतात, त्यामुळें मनांत विचारांचें काहूर निर्माण होणें शक्य आहे व अश्रद्धा बळावण्याची शक्यता आहे; तें लक्षांत घेऊन महाराजांनीं यासंबंधीं या ग्रंथांत स्पष्टपणें म्हटलें आहे—

"असो या महात्म्याची। गुरुचरित्रापरी साची।
याला यथातथ्य इतिहासाची। संगति ना लागेल॥
शिवलीलामृतांत। तैसेंच काशीखंडांत।
वा गुरुचरित्रांत। ज्या ज्या येती शिवकथा॥
त्या अवघ्या स्कंदपुराणीं। सांपडती शोधकालागुनी॥
त्याच एक ठिकाणीं। करून हें माहात्म्य लिहिलें असे॥
इतिहासाचा पुरावा। भक्तिमार्गी नाहीं बरवा।
तेथें प्रधान लेखावा। साधकाचा भाव कीं॥"

पण असें असूनहि श्री. शिवछत्रपतींचा शिखरशिंगणापूरच्या

महादेवाशीं असलेला संबंध महाराजांनीं मोठ्या जिव्हाळ्यानें वर्णन केला आहे. शिवाजीचें नांव निघतांच त्या वेळचा तेजस्वी इतिहास महाराजांचे डोळ्यापुढें उभा राहतो व त्या वर्णनांत हा भक्तिमार्गी कविहि एकाद्या देशभक्ताला लाजवील, इतक्या समरसतेनें तल्लीन होऊन जातो. नमुन्यादाखल दोन ओळी या ठिकाणीं सांगणें योग्य ठरेल--

" हाच राजा शिवाजी । ज्यानें हिंदूंची राखिली बाजी ।
हिंमतबहाद्दर वीर गाजी । महाराष्ट्राचा केसरी जो ॥
महाराष्ट्राचें भाग्य धन्य । शिवाजीसारखें रत्न ।
शिवांशानें निर्माण । झालें जगदुद्धारास्तव ॥ "

हा ग्रंथ शके १८७२ माघ शु. द्वितीयेला पंढरपूर येथें पूर्ण झाला आहे.

'शनिप्रताप'. महाराजांच्या वृषभ राशीस शनि आला, त्यावेळीं महाराजांनीं हें स्तोत्र रचलें आहे. मूळ तात्याजी महीपतिकृत 'शनिमाहात्म्य' या स्तोत्राचें हें विस्तृतीकरण आहे. या स्तोत्राचे अध्याय ७ असून ओवीसंख्या ६९७ आहे. हें स्तोत्र रचीत असतांनाहि महाराजांच्या पुढें त्यांचें सगुण, साकार, श्रीहरीला उद्देशून असलेलें 'सर्व खल्विदं ब्रह्म' हें तत्त्वज्ञान उभेंच आहे. दुसऱ्या अध्यायाच्या नमनप्रसंगीं ते म्हणतात--

" नवग्रहासी पाहतां । तीं तुझींच रूपें भगवंता ।
पंढरीशा रुक्मिणीकांता । दीनोद्धारा जगद्गुरू ॥
सैनिक राजा दिवाण । हे राजसत्तेचे घटक पूर्ण ।
राज्यशकट चालण्या जाण । जैशी यांची आवश्यकता ॥
त्याचपरी हेंही आहे । येथें मुळीं फरक नोहे ।
कमीजास्तीची सदा राहे । जग चालण्या आवश्यकता ॥
तूंच हे भेद पाळून । करिसी जगाचें नियमन ।
जग हें तूंच होऊन । आपुला आपण नटलासी ॥
ऐशा तुझ्या अचिंत्यरूपा । शरण गा मी मायबापा ।
चिंतादैन्य दुःखपापा । वारी दासगणूच्या ॥ "

हें शनिमाहात्म्य कार्तिक शु. प्रतिपदेच्या दिवशीं शके १८६३ सालीं पंढरपूर येथें पूर्ण झालें आहे.

**३. कीर्तनाख्यानें :**

संतचरित्रविषयक ओवीबद्ध ग्रंथांचा यापूर्वीं धांवता परिचय करून दिला आहे. आतां संतचरित्रविषयक कीर्तनोपयोगी आख्यानांचा परिचय करून घ्यावयाचा आहे. हीं आख्यानें महाराजांच्या काव्याचें वैशिष्ट्य असल्यानें त्यासंबंधींचा विचार थोड्या विस्तारानें केला पाहिजे. महाराजांनीं आजपर्यंत बरींच आख्यानें लिहिलीं आहेत. आजपर्यंत म्हणावयाचें कारण असें कीं अद्यापीहि त्यांची लेखणी थांबलेली नाहीं कीं कवित्वशक्ति कुंठित झालेली नाहीं. आज वयाच्या ८७ व्या वर्षीं सुद्धां त्यांची वाङ्मयोपासना चालूच आहे. छत्रपति श्रीशिवाजीमहाराजांचें कीर्तनोपयोगी चरित्र ते सध्यां रचीत असून त्याचा पहिला भाग नुकाच पूर्ण झाला आहे. महाराजांनीं लिहिलेलीं कीर्तनोपयोगी आख्यानें कांहीं संतचरित्रात्मक व कांहीं थोडीं पौराणिक आहेत. हीं सर्व आख्यानें सर्वथैव स्वकृत आहेत. कथासूत्र कधीं पुराणांतून, पुष्कळदां संतचरित्रकार महीपति यांच्या ग्रंथांतून वा क्वचित् नाभाजीसारख्या हिंदी लेखकाच्या वाङ्मयांतून घेतलें असलें तरीहि आख्यानाचें संविधानक त्यांचें स्वतःचें असतें. त्यांच्या रचनेंत फारच कौशल्य दिसून येतें. परंपरेच्या हरिदासाप्रमाणें मोरोपंत, वामनपंडित, रघुनाथपंडित, मुक्तेश्वर वा भारत, भागवत, रामायण यांतील कविता एकत्र करून ते कीर्तनें करीत नाहींत. जगन्नाथपंडितांनीं ज्याप्रमाणें साहित्यशास्त्रावरील 'रसगंगाधर' हा ग्रंथ लिहितांना काव्यविषयक सर्व उदाहरणें आपलींच स्वतःचीं दिलीं आहेत व प्रतिभावंत कवि दुसऱ्याच्या दारीं भीक मागावयास जाणार नाहीं, अशी दर्पोक्ति काढली आहे. तसा अभिमान जरी सात्त्विक वृत्तीच्या श्रीदासगणू-महाराजांनीं कधीं चुकूनहि मिरविला नसला वा त्यांच्या कधीं तें

मनांतहि आलें नसलें, तरी त्यांनीं जगन्नाथपंडिताप्रमाणें उद्गार काढले असते, तर तें त्यांना यथार्थपणें शोभून दिसलें असतें.

या आख्यानांतून श्लोक, आर्या, दिंड्या, साकी, पदें, अभंग अशी विविध प्रकारची छंदोरचना त्यांनीं समयानुसार केली आहे. पदांतील लावणी प्रकाराशीं पूर्वायुष्यांत निकटचा संबंध असल्यानें बहुतेक पदें लावणीच्याच थाटाचीं आहेत. त्यामुळें कीर्तनांतील काव्याला एक वेगळाच ठसकेदारपणा प्राप्त झाला आहे. गायकी वळणाची व निरनिराळ्या रागांत सुस्वरपणें म्हणतां येतील, अशीं पदेंहि आख्यानांतून बरींच आहेत. मालकंस, सोहोनी, बिहाग, भैरवी, भूप, जोगी इत्यादि पंधरावीस राग तरी त्यांच्या पदांच्या साहाय्यानें सुरसपणें गातां येतील. महाराजांना गायनकलेची मुळींच आवड नाहीं. थोडा तिटकारा म्हटलें तरी चालेल. लावणीचीच गायकी त्यांच्या आवडीची, पण श्री. दामुअण्णा, किसन आबाजी कासार वा सध्यां शिरडी येथें संस्थानी नोकर असलेले विठ्ठल यशवंत मराठे यांच्यासारख्या गाण्याचें अंग चांगलें असलेल्या आपल्या साथीदारासाठीं त्यांनीं हीं निरनिराळ्या रागांत म्हणतां येतील, अशीं पद्यें रचलेलीं असावींत. महाराजांची हीं कीर्तनोपयोगी आख्यानें चांगलीं प्रशस्त आहेत. कांहीं थोडीं आख्यानें २५–३० कवितांचीं छोटीं असलीं तरी, त्यांची उणीव भरून काढणारीं कांहीं १००–१२५ कवितांचीं पण आहेत. सामान्यतः प्रत्येक आख्यान ५०–६० कवितांचें तरी आहेच. हरदासी कथेमध्यें बहुतेक सर्व वेळ पूर्वरंगांतील ‘ घटापटा ’ च्या खटपटींतच जावयाचा. कीर्तनकाराचें सर्व वक्तृत्व, विनोद, पांडित्य, येथेंच पणास लागावयाचें. आख्यान शेवटीं उगीच थोडेंसें, पांच दहा कवितांचें, कीर्तनाच्या शेवटीं खिरापत वाटतात–त्याप्रमाणें चिमूटभरच असावयाचें ! पण येथें तसें नाहीं.

दासगणूमहाराजांनीं आपल्यापुरती ही कीर्तनाची पद्धति पार बदलून टाकली आहे. महाराजांचा पूर्वरंग अगदीं थोडा पण नेटका असे. पुढील संतकथेची भूमिका तात्त्विक दृष्टीनें काय आहे, हें स्पष्ट करण्यापुरता

त्याचा उपयोग. त्यांचा सर्व भर संतकथा प्रेमळपणें गाणें यावरच. यामुळें त्यांचें आख्यान विशेष वाग्विस्तार न करितां कविता सरळपणें म्हणून केवळ संदर्भापुरतेंच बोलत कथेंत लावावयाचें म्हटलें, तरी दोन तास सहज लागतात. वक्तृत्व उत्तम असेल, वक्ता बहुश्रुत असेल, आणि गाण्याची जोड उत्कृष्ट मिळेल, तर मग कीर्तनास तीन चार तास लागणें अगदीं सहज आहे. श्रीदासगणूमहाराज ज्यावेळीं स्वतः कीर्तन करीत आणि श्री. दामुअण्णा व किसनराव मागें साथीस उभे असत, त्यावेळीं कथा ऐकलेले श्रोते चार चार तासपर्यंत श्रवणसमाधि कशी तन्मयतेनें लागत असे, याचें यथार्थ पण रसाळ वर्णन अजूनहि मोठ्या प्रेमादरानें करतात.

श्रीदासगणूमहाराजांनीं संतचरित्रात्मक अशीं पाऊणशेंहून अधिक आख्यानें रचिलीं आहेत. त्यांची यादी काव्यसंग्रहाच्या सूचीमध्यें पाहावी. आख्यानकाव्यांचा विस्तार पाहिला व त्यांतील विविधता पाहिली कीं बुद्धि थक्क व्हावी, अशी वस्तुस्थिति आहे. हीं आख्यानें केवळ भोळ्या भाविकांनाच आकर्षित करतील, अशीं नुसतींच चमत्कारात्मक नाहींत, तर विचक्षण रसिकांसहि डोलविण्याचें सामर्थ्य त्या चरित्रांत आहे. यांतील काव्यरचना अत्यंत प्रसंगानुकूल आणि सरस आहे. बोलणाऱ्या व्यक्तीच्या व्यक्तित्वास शोभून दिसेल, अशीच चाल व भाषा श्रीदासगणूमहाराज काव्यास वापरतात. मधून मधून मार्मिक उपमारूपकांचा वापर केला जातो, तें निराळेंच! पण केवळ एवढेंच या आख्यानाचें वैशिष्ट्य नाहीं. निरनिराळे धार्मिक व सामाजिक प्रश्न या आख्यानांच्या संविधानकांतून मोठ्या कौशल्यानें हाताळले गेले आहेत आणि हें वैशिष्ट्य अनन्यसाधारण आहे, असें मला वाटतें. श्रीदासगणू-महाराजांच्या आख्यानांतून भक्तिरस तुडुंब भरून वहात असतो. ही आख्यानें ऐकत असतां बुद्धिवादी माणसाचे डोळेहि पाणावल्यावांचून राहात नाहींत. प्रा. प. म. लिमये यांनीं 'एकनाथचरित्रा'स लिहिलेल्या प्रस्तावनेंत, "एका बैठकींत के. शिवराम महादेव परांजपे श्रोते म्हणून

बसले असतां करुणरसपूर्ण पद्याच्या वेळीं हुंदका देऊन अश्रु गाळतांना मीं पाहिलेले आहेत. " अशी एक आठवण दिलेली आहे. भाविकांना तर आपले अश्रु खरोखरच आवरेनासे होतात; पण श्रीदासगणूमहाराजांचें हें वैशिष्ट्य अत्यंत श्रेष्ठ असूनहि मला आतां वाचकांचें त्याकडे लक्ष वेधावयाचें नाहीं. भक्तिरसासाठीं तीं कीर्तनें प्रत्यक्ष ऐकलीं पाहिजेत.

या ठिकाणीं आख्यानांतील संविधानकौशल्य व हाताळलेल्या निरनिराळया प्रश्नांची मांडणी किती मार्मिक आहे, हेंच मला दाखवावयाचें आहे. त्यासाठीं कांहीं आख्यानांचीं अत्यंत संक्षिप्त संविधानकें आणि महत्त्वाच्या प्रश्नांची मांडणी कशी केली आहे, तें मी थोडक्यांत सांगण्याचा प्रयत्न करणार आहें.

संविधानक रचीत असतांना महाराजांनीं ऐतिहासिक घटनांना धक्का लाविला नाहीं. इतिहास शक्य तो जसाच्या तसाच सांगितला; पण कांहीं प्रसंग कल्पनेंतून उभे केले आणि त्यामुळें संतांच्या व्यक्तित्वाला आकर्षक असा उठाव मिळाला.

**आख्यानें—सेना न्हावी**

श्री. सेना न्हाव्याच्या चरित्रांत त्यांनीं एक प्रसंग असाच गोंविला आहे. सेनाला बादशहाची श्मश्रु करण्यास जाण्यासाठीं इतका उशीर कां झाला, याचें कारण सांगत असतांना एका गवळणीच्या म्हशीचें काम सेनानें पत्करिलें, असें महाराजांनीं लिहिलें आहे. या वेळचा गवळणीचा व सेनाचा संवाद मोठा मनोरंजक आहे. यानिमित्तानें समाजसेवा ही राजसेवेपेक्षांहि जास्त महत्त्वाची कशी आहे, हें मोठ्या युक्तीनें व मार्मिकतेनें सुचविलें आहे.

एकदां एकादशीचा दिवस असल्यानें कोणीच न्हावी खुंटावर नव्हता. सेना बादशहाचा न्हावी असला तरीहि त्यानें जनसेवेचें निष्काम व्रत सोडलें नव्हतें. दुसरा कोणीच न्हावी दिसत नाहीं, असें पाहून गवळण रागानें म्हणाली—“आज माझें काम निघालें तर एकजण खुंटावर नाहीं, पण—

"काम नसल्या येती मेले। ताक मागायाला घरीं"

तिचें हें रागाचें भाषण ऐकून सेना मनाशीं म्हणाला, "ही अशीच रागावलेली राहील, तर माझ्या गरीब ज्ञातिबांधवांना कोरड्यास मिळणारें ताकहि उद्यांपासून दुर्लभ होईल!" तो गवळणीस म्हणाला, "मायबाई, रागावता कां उगीच! न्हाव्यांनीं कांहीं खुंट मोकळा टाकला नाहीं. मी येथें उभा आहेना!"

"काय आहे तव काम मला सांग। नको न्हाव्यांचा वृथा करूं स राग"

यावेळीं महाराजांनीं गवळणीच्या तोंडीं एक मोठें सुरेख पद घातलें आहे.

"तूं असुन नसुन सारखा तुला मी काय काम सांगूं?
कण्या कां कुबेरास मागूं?
माझी डोबड मोरी भोरी नदीच्या वरी भादराया
गुराखी आला घेऊनियां
तूं वारिक ना आमुचा, बादशहाचा वतनदार
अम्हां पाहिजे बलोतदार
गणु म्हणे दुधाला वाटी ताका नरवंटी न्याय ठरला
चणे ना देति हलगटाला॥"

या प्रसंगींची सेनाला उद्देशून दिलेली दुधाच्या वाटीची व बलोतेदाराच्याकरितां वापरलेली ताकाच्या नरोटीची उपमा एका गवळणीच्या तोंडीं किती उचित आहे, हें जाणत्यांना सांगणें नकोच. चणे ज्याप्रमाणें हलगटाला देत नाहींत, त्याप्रमाणें बादशहाचा वतनदार न्हावी म्हशीच्या हलक्या कामाला योग्य नाहीं. थोरांना थोरच काम सांगितलें पाहिजे. तें ऐकतांच—'मी थोरांचा आहे, थोर आहे, असें तुला खरेंच वाटतें कां? तसें असेल, तर मला कोणतेंहि काम हक्कानें सांग. कारण,—

"थोरांचें जितुकें तयावरि असे सत्ता जगाची खरी।
गंगेला बुध भूप विप्र खलही येऊन पाणी भरी।
सूर्याचीं किरणें समान सकलां मेघोदरींचें जल।
केली कां महिनें कधीं निवड कीं हा सुष्ट वा हा खल?॥"

सेनानें त्याप्रमाणें नदीवर जाऊन गवळणीचें सर्व काम उरकलें. घरीं

येऊन स्नान करून तो पूजेस बसला, इतक्यांत बादशहाचा शिपाई त्याला बोलाविण्यास आला. एकादशीनिमित्त पंढरपुरला जाण्याची इच्छा बादशहानें हट्टानें धुडकावून लावलेली होती. त्यामुळें एकादशीच्या पुण्य दिवशीं शांतपणें पूजा करतां येत नाहीं, याचें सेनाला मोठें वैषम्य वाटलें. या प्रसंगीं झालेल्या सेना व त्याची पत्नी यांच्यामधील संवादांतून राजनिष्ठेच्या मर्यादा महाराजांनीं स्पष्ट केल्या आहेत. भारतीय लोकशाही ज्यावेळीं केवळ कल्पनेंतच होती, त्याकाळीं—

**" अवन्तरांचा पाड मुळींना अवघे लोकांहातीं**
**जनाहुन श्रेष्ठ नव्हे भूपति । "**

असा सिद्धान्त महाराजांनीं सहजपणें मांडला आहे. रयतेच्या हक्काची पायमल्ली करून स्वतः चैन करणाऱ्या राजाला महाराजांनीं या ठिकाणीं ' कृष्णसर्प ' म्हटलेलें आहे.

आज्ञेप्रमाणें सेना येत नाहीं, हें पाहतांच बादशहा संतापला व त्यानें सेनाचें घर जाळून टाकण्याचा हुकूम दिला; त्यावेळीं सेनाच्या घराभोंवतीं जमलेल्या बघ्यांच्या संभाषणांतून महाराजांनीं राजनीतीचें योग्य लक्षण दाखविण्याचें काम मोठ्या हळुवारपणें नि सफाईदारपणें केलें आहे. खुबीदार गोड शब्दानें व सयुक्तिक विचारानें राजानें न्याय कसा केला पाहिजे, राजसत्तेचा निषेध कोठपर्यंत व कसा करावा, हें समाजाचें शाश्वत हित लक्षांत ठेवून महाराजांनीं या ठिकाणीं दाखविलें आहे. सेनाचें घर पेटतें आहे, असें पाहून निरनिराळ्या प्रवृत्तीचे लोक काय बोलले, तें या ठिकाणीं काव्यरूपानें वर्णन केलेलें आहे. व्यक्तिस्वभावांचें हें वर्णन मार्मिक आहे. कोणी म्हणाले, ' ही आज्ञा योग्य नाहीं—वाळकाच्या चोरीस फांशी काई ? ' कांहीं म्हणाले, ' बादशहाच्या न्यायीपणास हा कलंक आहे. ' कांहींना या आज्ञेमध्यें कोणताहि दोष दिसला नाहीं—

**" नृपतिनें बरें हें केलें, मगरुरी त्याचि जिरविली ।**
**वारिक हा हलकट बेटा हुकुमाचि अवज्ञा केली ॥ "**

उलट त्यांचें असें म्हणणें पडलें कीं, जरब राहण्यासाठीं असेंच वागलें पाहिजे.

कांहीं आपल्यापुरते पाहणारे— आतां या राज्यांत राहण्यांतच अर्थ नाहीं,

**‘ हें लागलें खचित कुंपण ऊंस खाया ’**

त्या बघ्यांमध्यें कांहीं भडक ‘देशभक्तहि’ होते. त्यांना सेनापेक्षां त्याच्या स्मारकाचीच (?) चिंता अधिक ! ते म्हणाले,

**“ घरासह सेना ये ठाया, जरी जळाला तरि तें होइल स्मारक दावाया ! ”**

कांहीं मवाळ म्हणाले, ‘राजाचें जरी चुकलें तरी त्यावर पांघरूणच घातलें पाहिजे.’ तर दुसरे जहाल म्हणाले– ‘छे: ! राजाचे दोष जाहीरच केले पाहिजेत, लांगूलचालन कधींच करतां कामा नये.’ परंतु समतोल विचारांचे जे विवेकी पुरुष होते, त्यांनीं मात्र योग्य निर्णय घेतला.

**“ भूपति बघुनि एकान्ति, बुधें त्याप्रती, दोष दावावे।**
**अंगिचें तयाच्या परि न दहांत बोलावें !**
**मळूं नये कधीं केशर, किं उघड्यावर पाहिजे घर प्रसूतीसाठीं।**
**गृहाच्छिद्र कुणीं कां कळावि दोंडीनें हाटीं ! ।**
**तनु रयत प्राण जो जाणा भूपति।**
**रुधिर हें हक्क रयतेचें निश्चितीं।**
**जाहल्या हानि रुधिरास, घात दोघांस, होइल कीं खास, मनीं आणावें.**
**बघुनियां मागें पुढें म्हणत गणू चालावें !”**

हा विचारांचा समतोलपणा, ध्येय म्हणून लक्षांत घेण्यासारखा आहे. परकीय राजसत्ता असते, त्या वेळीं भडक बोलणें कितीहि योग्य भासलें, तरीहि राजसत्ता व प्रजा यांच्यामधील संबंधाचे परिस्थितिनिरपेक्ष अशा शाश्वत हिताच्या दृष्टीनें या वरील पदांत मांडलेले विचार अत्यंत महत्त्वाचे आहेत व समाजाच्या कल्याणासाठीं त्यांचाच खरा उपयोग आहे, हें सहज पटणारें आहे.

**एकनाथ**

एकनाथचरित्रामध्यें पहिल्या भागांत याचकांच्या निरनिराळ्या वर्गांचें वर्णन महाराजांनीं केलेलें आहे. त्यांत ब्राह्मण, गोसावी, जंगम व मुसलमान अशा वर्गांतील याचकांचे उद्गार आपापल्या वर्गाचे हुबेहूब द्योतक आहेत व त्यांना श्रीजनार्दनपंतांनीं दिलेल्या उत्तरांतून महाराजांनीं त्यांचीं त्यांचीं वैगुण्यें हळुवारपणें पण मार्मिकपणें दाखविलीं आहेत. एकनाथचरित्राच्या चौथ्या भागांत रंगविलेला एक प्रसंग फारच मनोरम आहे.

एकदां एकनाथांनीं आपल्या प्रवचनामध्यें सगळ्या जगतांत विशेष तत्त्व भरलें आहे; जे भेद भासतात त्यांना तात्त्विक दृष्ट्या कांहींच महत्त्व नाहीं, असें सांगितलें. या वचनाचा मुसलमानांनीं वेगळ्या अर्थानें फायदा घेण्याचें ठरविलें. मुसलमान म्हणाले—

“एक खाक़ से बने हुये हैं हिंदु-मुसलमिन दुनियामें
फिर तुम खाना क्यों नहिं खाते आके हमारे मस्जिदमें ?”

मग नाथ म्हणाले, “माझ्यासारखीच तात्त्विक भूमिका तुमचीहि असेल, तुमच्यांतून सर्व प्रकारचे भेदाभेद पार नष्ट झाले असतील, तर मग आपण सारखे झालों !” मुसलमान म्हणाले, “हो !” नाथ म्हणाले,

“यापरिचें मन तुमचें झालें असल्या अवश्य येईन ।
भोजन करण्या काजी, माना हें ना असत्य तुम्हि वचन ॥”

मुसलमान आनंदित होऊन घरीं गेले. नाथांच्या स्वागताची तयारी मशिदींत अगदीं धूमधडाक्यानें सुरू झाली ! या बातमीनें गांवामध्यें एकच खळबळ उडाली. नाथ बाटणार आणि त्या योगें हिंदु धर्माची नाचक्की होणार, त्यामुळें सर्व हिंदु समाज हा अगदीं चिन्ताक्रांत झाला. मोठमोठीं माणसें नाथांच्याकडे शिष्टाईस गेलीं. त्यांनीं विचारलें, “नाथा, वेदाचा कंटाळा आला काय ? ‘सर्वं खल्विदं ब्रह्म’ टाकून

तुम्ही 'ला इलाह इल्लिला' म्हणणार काय? तुमच्या बाटण्यानें आमचें नाक कापलें गेल्यासारखें होणार आहे." नाथ विनोदानें म्हणाले—

"आतां इलिल्ला वदला मुखें हो। त्याचयामुळें कां तुम्हि बाटला हो!"

शब्दांमुळें कधीं तत्त्वांत फरक होतो काय? तत्त्वनिष्ठ असणें हा ब्राह्मणाचा धर्म आहे. खेद करूं नका; जो ब्रह्म जाणतो, तो कधींहि बाटणार नाहीं. कारण—

"अभेद रस आंतला वरिल जी त्वचा भेद ती।
मिळून फळ जाहलें तशिच या जगाची स्थिति।
रसास उपभोगितां त्यजिति साल त्याची जशी।
तसेंच मम बोलणें, भय नका धरूं मानसी॥".

नाथांच्या बोलण्याचें मर्म त्या विद्वानांच्याहि नीटसें लक्षांत आलें नाहीं. ते खिन्न मनानें परत गेले. ठरलेल्या दिवशीं नाथास नेण्यासाठीं मुसलमान मंडळी मेणा घेऊन आली. हिंदु समाजांतील उष्ण रक्ताचे युवक हातांमध्यें काठ्या घेऊन मुसलमान समाजावर अगदीं तुटून पडण्याच्या निश्चयानें नाथांच्या वाड्याभोंवतीं गोळा झाले. नाथांनीं त्यांना शांत करून सांगितलें,

"कलह नका उगिच करूं समय ना बरा।
सत्ता ती यवन-करीं ध्यानिं हें धरा॥"

माझ्याबरोबर चला, काय होतें बघा तरी! मेण्यांत बसतांना नाथांनीं देवाची प्रार्थना केली कीं, परमेश्वरा—

"धर्मान्तर तें मुळीं नच व्हावें तत्त्व न ढळतां हरी।
तुजवर ठेवुनि पूर्ण भरंवसा निर्भय मी अंतरीं॥"

नाथांना मोठ्या समारंभानें मिरवत मशिदीपर्यंत आणलें आणि तेथें ते मेण्यांतून बाहेर येतात, तों एक डुकराचें पिलूं त्यांच्या पायांशीं आलें. त्याला त्यांनीं मोठ्या आनंदानें उचलून घेतलें आणि ते त्याला म्हणाले, "देवा तुम्हीं या रूपानें इथें आलांत, फारच छान झालें. आतां यवनाच्या वादाचें मूळच संपलें!" डुकराचें पोर पहातांच मुसलमान

लोक गडबडले. ते म्हणाले, "याला टाकून द्या. इस्लामानें याला अत्यंत निंद्य प्राणी मानला आहे." नाथ म्हणाले, "छेः! असें कसें? आमचे सर्व भेदाभेद संपले आहेत, असें तुम्हीच म्हणालांत ना? मग आतां हें चांगलें आणि वाईट कुठून आणलेंत? मी यालाहि परमेश्वराचेंच स्वरूप समजतों. याच्यासहच आपण पंगतींत जेवण करूं या.' मुसलमान तें मानीनात. त्यांनीं हिंदु धर्माची निंदा करण्यास सुरुवात केली. हिंदूंनीं त्यांचीं उणीं काढलीं. एक चार्वाक तेव्हां पुढें आला अन् म्हणाला, "नाथा, एकी होण्याची चांगली संधि आली असतांना तुम्ही मात्र ती उगाचच वायां घालविली. धर्मामध्यें नीतिनियम व रिवाज हें एक खूळ आहे. या खुळानेंच आजवर माणसामाणसांत फूट पाडली, अन् राष्ट्राचें नुकसान केलें. निसर्गसत्ता बलवत्तर आहे, त्यामुळेंच सर्व गोष्टी होतात तेथें देव कशाचा?"

"बुद्धिमान हा मनुष्यप्राणी अवघ्यांमाजी भला।
तोच अशा या धर्मखुळानें बैल पुरा बनविला॥"

त्याचें हें भाषण ऐकून नाथानें त्याला अनेक गोष्टी सुनावल्या. भेद व अभेद यांच्या मर्यादा स्पष्ट केल्या. धर्मबंधनांची आवश्यकता स्पष्ट केली व आपल्या म्हणण्याचें रूपकाच्या द्वारानें स्पष्टीकरण करण्यासाठीं ते म्हणाले—

"आकाशा न ये कोणास गादि घालितां।
घातली असें जो बोले, तें भाषण त्याचें वृथा॥
(चाल) प्रथमतः भूमि उत्तम, पुढें जाजम, असा आहे, नेम पसरण्या गादी-
हें आण मनामध्यें आधिं!

सत्कर्म हीच भू येथ पाहिजे खरी।
जाजम सगुण भक्तीचें पसरणें तियेच्या वरी।
(चाल) मग ज्ञानगादि घालून, बसे जाऊन, ईश होऊन, नको करुं चिन्ता।
घे अनुभव तो तत्त्वतां॥"

धर्माधर्माच्या मर्यादा कशा स्पष्ट केल्या आहेत, तत्त्वज्ञान व

व्यवहाराची सांगड या ठिकाणीं कशी डौलदार रीतीनें घातली गेली आहे, तें वाचकांच्या यावरून आतां प्रत्ययास येईल.

## मुकुंदराज

श्री. मुकुंदराजांच्या चरित्रामध्यें श्रीदासगणूमहाराजांनीं संतत्वाचें स्वरूप मोठ्या चांगल्या रीतीनें विशद केलें आहे. संतत्वाविषयींच्या विपरीत कल्पनांचा त्यांनीं तिखट शब्दांत उपहास केला आहे. मागें व्यक्तिपरिचयांतील 'दंभस्फोट' या प्रकरणांत यांतील कांहीं प्रकारांचा मीं उल्लेख केला आहे. पण या उपहासापेक्षांहि पुढें मुकुंदराज व राजा जयत्पाल यांच्यामधील जो संवाद महाराजांनीं निरनिराळ्या कवितांतून चर्चिला आहे, तो अधिक महत्त्वाचा आहे. संतत्वाच्या आडंबराचा उपहास करीत असतांनाहि या आडंबरालाहि एका विशिष्ट मर्यादेपर्यंत कसें मोल आहे, तें तेथें फार चांगल्या रीतीनें मांडलें गेलें आहे. पूर्णज्ञान नसलें तरी प्रेरणा निर्माण करणें, एवढा तरी शब्दज्ञानाचा उपयोग होतोच. मूळ औषधाचा रोगपरिहार करण्याचा गुण जरी जाहिरातींत नसला, तरी या प्रसिद्धीमुळेंच औषधसेवनाकडे सामान्यजनांची थोडी तरी प्रवृत्ति होते, यांत शंका नाहीं. जाहिरात कशाची आहे, तें तेवढें पाहिलें, म्हणजेच भागतें. जाहिरातच जर कोणी काढ्यांत घालील, तर तो दोष मूळ औषधाचा नव्हे! मुकुंदराज शेवटीं राजाला म्हणतात—

> "नृपा आंब्यांच्या गाठि बांधल्यास।
> तुरट आंबट लागती म्हणुन त्यास।
> काय कोणी पाहिती आवर्जून!।
> पूर्ण होतां त्या पावतील मान॥"

## चांगदेव

'चांगदेवचरित्र' महाराजांनीं दोन भागांत रचिलें आहे. यांतील पहिल्या भागांत चांगदेवाचे कांहीं अलौकिक चमत्कार व त्यांची

पंढरीनाथावरची दृढ श्रद्धा उत्कटतेनें वर्णिलेली आहे. चांगदेव द्वारकेस देवदर्शनासाठीं गेले असतांना, तेथें देवाची चतुर्भुज मूर्ति पाहून चांगदेव देवाला विचारतात—

"येथें तुम्हां चार हात, दोन कां हो पंढरींत ?।
म्हणून भीतें माझें मन तुमचें कराया वंदन।
एकविधा भक्ति आम्हां 'गणू' म्हणे पुरुषोत्तमा ॥"

या प्रश्नावर रुक्मिणीनें उत्तर दिलें. ती म्हणाली, "याला कारण तुम्ही महाराष्ट्रांतले संत. इतके दुष्ट लोक मी कुठेंच पाहिले नाहींत! देवाला तेथें दोनच हात आहेत, याचें कारण, त्याचे बाकीचे दोन हात संतांच्या घरीं सारखे राबताहेत. क्षणाची फुरसत नाहीं." या ठिकाणीं श्रीदासगणूमहाराजांनीं रुक्मिणीच्या तोंडीं घातलेलें पद त्यांच्या अनेक उत्तम पदांपैकीं एक आहे. श्री. मोने यांनीं आपल्या व्याकरणामध्यें हें पद उद्धृत केलें आहे. वाचकांसाठीं तें सर्व जसेंच्या तसें खालीं देत आहे.

"महाराष्ट्रमुलुख बहु खट, त्यांतुनि विशेष गोदेचें तट।
उमगूं न देति कधिं वाट, सुखाची कवणा।
जरि सर्वशक्ति भगवान तरी केली दैना।
कुणि दिल्या खांद्यावर कावडी। कुणि केला विनपैशाचा गडी
चोख्याची अवघ्यावर कडी–ओढविलीं ढोरें।
वैकुंठपति दाम्यानें बनविला महार।
अवदसा जनी अग, जाळी। दळण्या बैसवी तंव न माळी।
अति कठिण सांवता माळी, लावि खुरपाया।
गोरा नेत धरून हातास चिखल तुडवाया।
चांग्या, तूंहि आहेस त्यांतला, महाराष्ट्रिं निर्दया खरा।
बनवानि सुइण सावळा महीच्या काठीं।
नेलास रुक्मिणी म्हणे, दया नाहिं पोटीं!"

रुक्मिणीनें संतापानें उच्चारलेल्या या पदांत निराळ्या अर्थानें संतांचें मोठेपण कसें स्पष्ट होतें, हें सूज्ञांच्या सहज लक्षांत येईल.

चिरोलनें टिळकांना संतापाच्या भरांत "Father of the Indian Unrest!" म्हणून शिवी दिली, तीच टिळकांच्या कार्याची महति पटवून देणारी ठरली. थोड्या वेगळ्या प्रकारानें येथेंहि तसेंच घडलें आहे! संतांनीं देवाला किती छळलें, तें रुक्मिणी कठोर शब्द वापरून सांगते आहे. कर्तुमकर्तुम् असें सामर्थ्य असलेल्या जगदीश्वराला संत राबवूं शकतात आणि तो त्यांचीं कामें आनंदानें करतो, यांत केवढें संतमाहात्म्य आहे? या तऱ्हेची निंदा ऐकून चांगदेवांचा ऊर आनंदानें भरून आला. ते म्हणाले, 'आई, आमची इतकी चांगली स्तुति दुसऱ्या कुणालाहि करतां आली नसती.'

"देव आपुलें मोठेंपण। याच मुलखीं विसरे जाण।
ऐसा लौकिक तयाचा। जो कीं प्राण विठ्ठलाचा।"

पण आज मात्र कळलें कीं, माझा देश दरिद्री कां? देवानें त्याला आपल्या गळ्यांतला ताईत समजलें असलें तरी तुझा लक्ष्मीचा मात्र त्यावर राग आहे. आई असें रागावूं नको.'

'तुला उचित हें नसे, तुझींच लेकरें हीं खरीं'

चांगदेवचरित्राच्या दुसऱ्या भागामध्यें थोडा राजकीय विषय हाताळला गेला आहे असें म्हणतां येईल. बिदरच्या बादशहानें पंढरपूरचें मंदिर पाडून त्या ठिकाणीं मशिद करावी असा हुकूम सोडला. लोकांनीं या हुकुमाचा अनेक प्रकारांनीं निषेध करण्याचा प्रयत्न केला, परंतु बादशहानें दडपशाहीच्या वरवंट्याखालीं सर्वांनाच चिरडून टाकलें. सत्याग्रही पुरुषांच्या हालांचें या ठिकाणचें वास्तव वर्णन वाचनीय आहे. त्यांत शेवटीं महाराज म्हणतात—

'सत्ताधिश जें जें करित। तें तें जगीं सत्य ठरत'

शेवटीं पंढरपूरची विठोबाची मूर्ति बडव्यांनीं लपविली. त्याचा कुणालाहि पत्ता लागूं दिला नाहीं. भाविक शोकसागरांत बुडून गेले. ही बातमी चांगदेवास कळतांच देवाचा शोध घेऊन ते त्याला म्हणाले,

'देवा, रावणकुंभकर्णादि दैत्यांना मारणारा तूं, ज्यानें गोवर्धन पर्वत करंगळीवर पेलला—

"त्यानें कां लपणें असे नृपभयें देवा, अहो रे, अहा।"

या ठिकाणीं सुष्ट दुष्टांच्या प्रयोजनासंबंधींचा चांगदेव व पांडुरंग यांच्यामधील संवाद मुळांतूनच पाहिला पाहिजे. शेवटीं देव म्हणतात—

"लोकीं वाइट चांगलें सकलही, म्यां निर्मिलें चांगया।
जें कांहीं घडणार तें घडतसे इच्छेमुळें माझिया।
वाईटापरि ठायिं मी न वसतां अंशहि हे राजसा।
व्हाया कारण रात्र सूर्य असुनी, तो तोंत नाहीं जसा॥"

पुढें पांडुरंगाच्या आज्ञेनुसार श्रीचांगदेव दिंडी घेऊन पंढरपुराहून बिदर येथें जावयास निघाले. वाटेंत मल्लिकार्जुन अय्याचें पारिपत्य करून त्यास सन्मार्गी बनविलें. बिदरला येतांच त्यांनीं भजन गजर मांडिला. फारा दिवसांनीं कीर्तनाचा योग आला, म्हणून खूपच गर्दी जमली. तें पाहून मुसलमान शिपाई हरकत करूं लागले आणि म्हणाले, 'हें आमचें राज्य आहे, येथें हा बकवा बंद करा.' चांगदेव हंसत म्हणाले—

"अस्थानें करा ना मुळीं असें भाषण।
जाहलें बिदर यवनांचें सांगा हो कधींपासुन?।
निर्वैर करूनियां मनें खरें शोधणें, आम्ही पाहुणे।
कधिं न होणार, हा देश आमुचें घर।
मालकी आजपर्यंत जगाभीतरीं।
टिकलि ना सतत एकाची हें काय कथूं मी तरी?।
महिपाल एक ईश्वर आपण साचार त्याचीं लेकरें।
मनीं हें आणा—परकें न मानणें कुणा॥

मेघांच्या गडगडाटानें विजांच्या कडकडाटानें मशिदीस राग येत नाहीं, हिंदूंचा टाळ वाजतांच मात्र तिचा मस्तकशूळ उठतो, हें काय खूळ आहे? द्वेषाची अशी वाट हुडकूं नका.

"अल्लारामरहीम एक असतां, कां द्वैत हें मानितां ?।
सत्ता ती तुमच्या करीं म्हणुन कां हिंदूप्रती नाडितां !।
दिल्हा थोरपणा तुम्हांस हरिनें तो नीट सांभाळणें।
कोणाचा करितां न द्वेष समचि सर्वांप्रती देखणें॥"

आपलें न सोडतां इतर पंथीयांशीं मिळतें घेण्याची, सर्वांना सांभाळून वागविण्याची महाराजांच्या तत्त्वज्ञानाची ही भूमिका स्पृहणीय आहे.

## लाखा कोल्हाटी

'लाखा कोल्हाटी' हें महाराजांच्या उत्तम आख्यानांपैकीं वरच्या दर्जाचें आख्यान असून, यांतील संविधानक फारच बहारीचें आहे. एक उत्कृष्ट चित्रपट तयार व्हावा, अशी नाट्यमयता महाराजांनीं हें कथानक रचितांना निर्माण केली आहे, पण या आख्यानाचें महत्त्व त्यांतील रंगदार कथानकांत नसून, लाखानें विपरीत परिस्थितींतहि सदाचार कसा निष्ठेनें सांभाळला यामुळें आहे.

कोल्हाट्याच्या जातींत उत्पन्न झालेला लाखा हा परमेश्वराचा फार श्रेष्ठ भक्त होता. चिखलांत उगवलेलें कमळहि ज्याप्रमाणें देवाला वाहिलें जातें, त्याप्रमाणें लाखाची योग्यता होती. महाराज म्हणतात—

"उच्चनीच हें न ये ठरवितां जातीवरून यासाठीं।
'दासगणू' म्हणे सूज्ञ खोबरें घेउनि त्यजि नरवंटी॥"

लाखाच्या घरीं दारिद्र्य अठराविश्वें ! परंतु त्याची मुलगी अत्यंत सुंदर होती. ती ज्या वेळीं वयांत आली, त्या वेळीं लाखाला ती कशी निघेल याविषयीं मोठा धाक वाटूं लागला. तो मुलीला म्हणाला, 'हें तुझं तारुण्य म्हणजे गळ्याला लागलेली तात वाटते. किंवा तुझ्या निर्मल वासनांना हा जणुं साप चावावयास आला आहे, असें वाटतें.' लाखा देवाची प्रार्थना करी व म्हणे, 'परमेश्वरा, आम्हां गरिबांच्या घरीं इतकें सौंदर्य काय कामाचें ? तूं हा पारिजातकाचा वृक्ष उकीरड्यावर लावला आहेस.' मुलीला या बोलण्याचा राग येई. ती समुद्रावर जाऊन गात बसे. तिचा कंठहि मोठा मधुर होता. गरिबी, सौंदर्य, तारुण्य आणि

सुस्वर गायन–एकैकमप्यनर्थाय, किमु यत्र चतुष्टयम्?–अशीच ही अवस्था. नीतीपासून न ढळणें, हें अशा परिस्थितींत दुर्घटच. लाखाच्या मुलीच्या स्वरमाधुर्यानें मोहित झालेला, एक राजपुत्र तिला म्हणाला, 'तूं माझ्याशीं विवाह कर, कीं तुझें हें दारिद्र्य संपलेंच म्हणून समज.' मुलगी म्हणाली, 'तुझें माझें जमायचें कसें? आपणां दोघांच्या योग्यतेंत मोठें अंतर आहे. हंसाला मोत्यांचाच चारा हवा, त्यानें किडे खाऊं नयेत.' राजपुत्र म्हणतो, 'छे! या बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. मोठ्यांनीं कांहींहि केलें तरी तें चांगलेंच दिसतें. शंकराच्या अंगावरची राख अन् नेसूची लंगोटी यांना कोणीं नांवें ठेवलीं आहेत काय?' 'देवादिकांच्या गोष्टी कशाला कराव्या?' मुलगी म्हणाली. राजपुत्र–"शंतनु राजानें एका कोळयाच्या मुलीशीं लग्न केल्याचें तुला माहीत आहे ना? मुलगी–"मग त्याप्रमाणें माझ्या बापाची परवानगी घेतली पाहिजे. मींहि स्वतंत्र नाहीं." राजपुत्र–"अग, प्रेमविवाहांत बापाच्या परवानगीची काय जरूर? शकुंतलेनें दुष्यंताशीं विवाह केला, त्यावेळीं कुठें कण्वाला त्याचा पत्ता होता? सावित्रीनें तर बापाची सूचना धुडकावून लग्न लावलें."

या संवादांतून मतलबाकरितां पुरावे कसे गोळा केले जातात, याचें उत्तम दिग्दर्शन महाराजांनीं केलें आहे. मुलगी घरीं निघून आली. राजपुत्रानें लाखाचा खेळ पहाण्याच्या मिषानें पुन्हां संधान बांधलें. राजपुत्राच्या ऐश्वर्याला भाळून मुलगी त्याच्याबरोबर निघून गेली आणि ती निघून गेल्यामुळें लाखाचे खेळ बंद पडले अन् त्याला उपवास घडूं लागले. त्या वेळीं परमेश्वराला मोठें दुःख झालें आणि त्यानें लाखाला स्वप्नांत येऊन सांगितलें. 'तूं अयाचितवृत्ति स्वीकार.' त्यासरशीं लाखा ताडदिशीं उठून बसला अन् निग्रहानें म्हणाला, 'दुबळेपणामुळें जे स्वतःच्या पोटाचा व्यवसाय करूं शकत नाहींत, अशा लुळयापांगळयांनीं लोकांच्या दयेवर जगावें. विद्याभ्यास करण्यासाठीं ज्याला वेळ मोकळा हवा, अशा ब्रह्मचाऱ्यानें माधुकरी मागावी.

जगताचें मंगल व्हावें म्हणून धर्माचरणांत सदैव निमग्न असणारे, अग्निहोत्री व संन्याशी यांनीं अयाचित घ्यावें...पण देवा,—

"मी लुळा, खुळा, संन्यासीहि नसे।
सेवुं तें अयाचित देवा, मग कसें ? ॥
करूनियां खेळ बाजारिं, खाइन भाकरि, ती न मिळे तरी-मरेन उपवाशी ॥"
गणु म्हणे 'पटेना अविधि कृत्य संतांशीं ॥'

'स्वधर्मे निधनं श्रेयः' हें तत्त्व लाखाला कळून तें त्याच्या जीवनांत पूर्णतया मुरलेलें होतें. रुक्मिणीनें शेवटीं विचार केला कीं, लाखाची मुलगी आतां संपन्न झाली आहे. मग तिच्याकडूनच तर कांहीं मदत मिळाली, तर लाखाचें बरें चालेल. त्याप्रमाणें आतेच्या रूपांत जाऊन देवीनें मुलीची खूप कानउघाडणी केली. स्वतःच्या सुखांत रमून म्हाताऱ्या बापाची उपेक्षा केली म्हणून मुलीची खूप निर्भर्त्सना केली. मुलगी म्हणाली, "आत्या, मी बापाला विसरलें नाहीं, पण तो म्हाताराच हट्टी आहे. एका लाकडाच्या बाहुलीला जगदीश्वर मानून त्याच्यापुढें ऊर बडवीत बसतो. माझ्या घरीं आल्यावर केवढा मानसन्मान होईल त्याचा ?"

"तो येत नाहीं, तर तूंच जाना त्याच्याकडे !"

"भलतंच कांहीं तरी ! त्याच्याकडे जाण्यांत माझ्या इभ्रतीचा अपमान नाहीं का ? भिकार हलकाऱ्याकडे का राजानें जायचें ?"

मग रुक्मिणी अगदीं संतापून गेली आणि म्हणाली, "एक अक्षर बोलूं नकोस. आतां कळली तुझी किंमत. तुझी आणि लाखाची तुलना आहे काय ? कुठें लाखा, नि कुठें तूं ? संपत्तीनें का मनुष्याची योग्यता वाढते ?—

"पाच हिरे मोतीं-शौचकूपाप्रती-म्हणुन कां तो योग्य बैठकीला ?"

मुलीची अशा रीतीनें चांगली पाद्यपूजा करून रुक्मिणी निघून गेली. त्यामुळें मुलीनें आपल्या हुजऱ्याबरोबर कांहीं मोहरा व उंची वस्त्रें बापाकडे पाठविलीं, पण लाखाची धर्माधर्माची कल्पना फारच सूक्ष्म

होती. मतलबसिंधूच्या आधारें पुरावा शोधीत, परिस्थितीच्या नांवानें कांगावा करीत, स्वार्थी दुर्वर्तनावर ढोंगाचें पांघरूण घालणें, त्याला अजीबात पसंत नव्हतें. मुलीकडून पैसे आलेले पाहतांच तो म्हणाला—

**" खाऊन मुलीचा भाड कशाला जगूं या जगतांत ?**
**मला पोशील जगन्नाथ ! "**

अन् त्यानें आपल्या मुलीला कळविलें—

**" पोसावें असें वाटल्या तुझ्या मनीं आपुल्या बापाला ।**
**येइ तूं खेळ करायाला ।**
**जोंवरी तनूला मांस—तोंवरी खास असे चाळे ।**
**चालतिल जगांमधिं बाळे ॥ "**

' उत्तम वेव्हारानें धन जोडावें, ' यांतल्या उत्तमात्वाची कल्पना किती सूक्ष्म आहे, हें अशा संतांच्या वर्तनाव्यतिरिक्त इतरत्र प्रत्ययास येणेंच शक्य नाहीं. लाखाच्या या निस्पृहतेमुळें आणि निष्ठेमुळें परमेश्वर स्वतः वेष बदलून लाखाची सेवा करूं लागले.— इत्यादि वर्णन पुढें आहे.

**नरहरि सोनार**

' नरहरि सोनार चरित्र ' यामध्यें कट्टर शिवभक्त नरहरी पांडुरंगाचा भक्त कसा बनला, याचें हृदयंगम वर्णन आहे. यांतील संवाद, वर्णनें आणि कल्पिलेल्या घटना विनोदाच्या पार्श्वभूमीवर मोठ्या खुलून दिसतात. या आख्यानांत आलेले क्षेत्रोपाध्ये यात्रेकरूंवर कसा हल्ला चढवितात व आपल्याच घरीं त्यास उतरविण्यास घेऊन जाण्यासाठीं त्यास कसें हैराण करतात, याचें उपहासगर्भ वर्णन मोठें वाचनीय आहे. याव्यतिरिक्त सावकाराचें वर्णन, लक्ष्मीपार्वतीचा संवाद, शिवविष्णूंचें बोलणें, ब्राह्मण व नरहरी यांचा आपआपल्या दैवतांच्या श्रेष्ठत्वासंबंधीं झालेला वादविवाद हीं सर्व प्रकरणें विनोदी, मार्मिक, व्यवहारबोधक व कवीच्या सूक्ष्म निरीक्षणशक्तीची द्योतक आहेत. नरहरी सोनार हा शिवभक्त असल्यानें पांडुरंगासाठीं रत्नजडित करगोटा घडविण्याचें काम त्यानें नाकारलें, त्यावेळीं त्याच्या बायकोनें त्याच्याशीं केलेला बुद्धिवाद

कवीच्या कुशलतेची साक्ष पटविणारा आहे. आपणहून चालत आलेला धंदा नरहरी नाकारतो आहे आणि तेंहि शिवावरील आपल्या प्रेमामुळें हें पाहून नरहरीची पत्नी त्यास म्हणते, ‘ धंदा करणारानें आपल्या धंद्याशीं प्रामाणिक रहावें, नसती उचापत त्यास करण्याचें कारण काय ? अहो,

> “ तांबोळी विकितो पानें द्विज-यवन तया सारिखा ।
> नदिमधिल नाव मज सांगा कधितरी भेद करित कां ? ।
> धंदा हा मेदिनीपरी, सर्वतोंपरी, समज अंतरीं, धरा लौकरी ।
> हंग हे टाका-पोटीं बिब्बे घालूं नका ॥ ”

शेवटीं ‘ धंदा ’ म्हणून नरहरीनें डाग घडविला. या करगोटयामुळें मंदिरांत पुढें घडलेला चमत्कारहि महाराजांनीं मोठ्या रसाळ वाणीनें वर्णिला आहे.

ब्राह्मणानें शिवाची नानाप्रकारें निंदा केली, त्या वेळीं नरहरी त्यास म्हणाला--

> “ वेषें ओंगळ नीळकंठ भगवान् नाहीं कृतीनें परी ।
> मध्यें गोड गरे असंख्य फणसा आहेत कांटे वरी ।
> तैंवी शंकर वो शिवप्रद जगा ना त्या म्हणे जोगडा ।
> निंदोनी जिलबीप्रती निजमुखें वाखाणितोसी वडा ॥ ”

**तुकाराम**

श्रीतुकाराममहाराजांचें चरित्र महाराजांनीं तीन भागांत वर्णिलें आहे. भक्तिप्रेमाची या चरित्रांत विशेषत: पहिल्या दोन भागांतून अगदीं लयलूट आहे. या दोन भागांतून रेखाटलेलें तुकाराममहाराजांच्या कन्येचें भागूचें शब्दचित्र परोपकारशीलता, त्यागबुद्धि, सहनशीलता, ईश्वरभक्ति इत्यादींच्या मनोहर रंगांनीं फारच आकर्षक बनलें आहे. दाराशीं अनगडशहा भिक्षा मागत उभा राहिला, त्या वेळीं जिजाबाईच्या अंगाचा तिळपापड झाला. ती त्या फकिरास नाहीं नाहीं तें

बोलूं लागली; त्या वेळीं आईच्या तोंडावर आपला चिमुकला हात ठेवून भागू म्हणते—

> " नतो मतो बोलुं यापली न बाबा घलीं, घाल मुथभली, पीथ साईला।
> नतो आज भाकली देऊं मला खायाला—
> नापली पलतवी तया येऊं दे दया, मूथभलुनियां पीथ त्या घालीं।
> लाहील लाजि त्यामुलें विथू वनमाली ॥ "

स्वतः उपाशीं पोटीं राहायची तयारी दाखवून भागू भिकाऱ्याला पीठ घाल असें सांगते आहे, कारण काय तर परमेश्वर संतुष्ट होईल म्हणून! ही अलौकिक उदारता सहृदय माणसाच्या हृदयाला खरोखरीच पाझर फोडणारी आहे. पुढें एका प्रसंगीं ती आपल्या वडिलांना सांगते— " बाबा, या ब्राह्मणाला हें सारें धान्य खुशाल देऊन टाका. "

> " आम्हि सोसुं भुकेच्या बाबा, बहु सुखें सकल वेदना . . .
> बरें झालें, आज गेहासि आला बामण।
> दे धान्य तयाला सारें तेणें तुष्टेल नारायण ॥ "

अल्पवयी भागूची जर ही योग्यता, तर तुकोबारायांच्या थोरवीसंबंधीं काय सांगावें ?

छत्रपति शिवाजी महाराज तुकोबांच्या भेटीस मोठा नजराणा घेऊन आले. त्यावेळीं तुकोबा म्हणतात—

> " दाता तो असुखा भरून उरला आहे, रमेचा पति।
> देशी काय तयापुढें नृपवरा, हें ना कळे निश्चितीं।
> तो आम्ही यजमान बा करुनियां येथें सुखें राहतो।
> त्या भीमातटवासियाविण कुणां कांहीं न कीं मागतों ॥ "

आणि म्हणून—

> " नको नको हें विष आम्हांला निर्धनता ती बरी।
> ∴ कशास मजला व्यर्थ उपाधि, भूषण माझा हरी ॥ "

हें बोलणें तुकाराममहाराजांच्या निस्पृहतेचें उत्कृष्ट उदाहरण आहे. भागूसाठीं परमेश्वरानें धनधान्य निर्माण करून जिजाबाईचा राग

शांत केला. त्यावेळीं ऐहिक वैभवाचा तिटकारा असलेले तुकाराम महाराज पांडुरंगास उद्देशून म्हणतात—

**“ काय भिकारी मजला मानुनियां काढिले गहूं चोर।**
**परि हा घटोत्कचाचा भरवि न देवा उगीच बाजार॥**
**मी निधडा भक्त तुझा पदयुगुलांची तुझ्या मला आस।**
**व्याकुळ सिंह भुकेनें जरि झाला तरि न खाय गवतास॥ ”**

शेवटीं देवांनीं सांगितलें, “ तुकारामा, आतां उपाधीचें भय बाळ-गण्याचें कारण नाहीं; कारण—

**“ माझ्या तुझ्यांत नुरला मुळिं भेद आतां।**
**हें भक्तिवर्म तुकया कथणें समस्तां . . .॥ ”**

तिसऱ्या भागांत तुकाराममहाराजांनीं आपला शिष्य कोंडिबा यास तीर्थयात्रेस पाठविल्याचें वर्णन आलें आहे. तीर्थयात्रेचें मर्म जणूं श्रीदासगणूमहाराज या मिषानें स्पष्ट करीत आहेत ! संतांची सेवा निष्ठेनें करणें, हीच खरी तीर्थयात्रा. स्वतः भगवान् शंकरच त्याप्रमाणें कोंडीबास सांगतात.

**“ जा आतां करूनि गया झडकरीं इंद्रायणीचे तिरीं।**
**ना थांबें लवही कुठेंच विबुधा पंथांत मध्यंतरीं।**
**तीर्थेंही सगळीं तसेंच अवघे हे देव शास्त्रें तशीं।**
**आनंदें तुकयासमीप रमती जा जा भजे त्याजसी॥ ”**

## सांवता माळी

सांवता माळी चरित्रांत श्रीदासगणूमहाराजांनीं ज्ञानी भक्ताचें स्वरूप वर्णन करून त्याचें श्रेष्ठत्वहि प्रतिपादिलें आहे. सांवतेबुवा या योग्यतेचे भक्त होते. श्रीदासगणू लिहितात—“ त्यांनीं कधिं ओनामा नाहीं पठण केला—पण वेद वदला हो जिथें नेति नेति—असें त्यानें धरियलें ब्रह्म हातीं ! ” ‘ सर्वं खल्विदं ब्रह्म ’ हा सिद्धांत सांवतेबुवांच्या इतका रोमरोमांत भिनला होता कीं, पत्नीनें पंढरपुरास विठ्ठलाच्या दर्शनास जाऊं असें म्हणतांच ते म्हणाले—

" विठ्ठल वापी, विठ्ठल मोट, विठ्ठल नांद्या बैल ग !।
विठ्ठल पाणी, विठ्ठल हाकितां त्याविण हें काय होइल ग ?।
विठ्ठल शेत, विठ्ठल वाफा, विठ्ठल नांगर, वखर ग।
घडिघडिं विठ्ठल विठ्ठस भेटे मग कां व्हावें अधीर ग !।
दासगणु म्हणे माया-गाठण थोडी करितां सैल ग।
बघणारासह स्थावर जंगम रूप विठूचें होइल ग !। "

सांवतेबुवा जणूं कर्म उपासना ज्ञानाची हरिभक्तीच्या मुशींत ओतिलेली रमणीय मूर्तिच होती. ते पंढरपुरास जात नाहींत, म्हणून कांहीं वारकरी त्यांना अभक्त म्हणाले. त्या वेळीं सांवतेबुवा त्यांना विचारतात,

" भक्ताभक्त म्हणावया उरतो अवकाश तो कुठें सांगा।
मानूं नका निराळें जगतापासून रुक्मिणीरंगा ॥ "

पण हें ज्ञान त्या वारकऱ्यांना पटलें नाहीं. तसेंच पुढें श्रीनामदेवांनाहि पटलें नाहीं. पंढरपूरला न येणाऱ्या सांवतेबुवांना नामदेव नांवें ठेवूं लागले. त्या वेळीं देव म्हणाले--" नामदेवा अजूनहि तुला बाह्यांगाचेंच प्रेम वाटतें का रे ? नुसत्या माळा घालून वाऱ्या केल्या म्हणजे का वारकरी होतो ? गोचीड गाईच्या कांसेला चिकटलेला असतो, पण गाय हंबरते दूर असलेल्या वासरासाठीं ! तूं माझा भक्त आहेस, म्हणून तुझ्यासाठीं माझा जीव तिळतिळ तुटतो कीं, तूं मोठा कधीं होशील ? अरे,

" भक्त भक्तीचें चहातें मूल माझें तें रांगतें।
ज्ञानी माझें कर्तें पोर माझा भार त्याचेवर।
रांगणें हें पुरें झालें आतां पाहिजे चालिलें।
कधीं होशिल नाम्या, थोर ? हीच चिंता वारंवार।
दाढिमिशांचा ठेंगडा, रांगुं जातां म्हणातिल वेडा।
गणु म्हणे ऐशा रितीं देव भक्तां समजाविती ॥ "

' असें ज्ञान कुणाला आहे ' असें नामदेवांनीं विचारतांच विठ्ठलानें सांवतेबुवांचें नांव मोठ्या गौरवानें घेतलें आणि ते म्हणाले,

"सगुण निर्गुण हा भेद जया नाहीं।
ज्ञान भक्ति मिसळली एकठायीं।
दिसत जें जें तें मीच असे त्याला।
असा त्याचा मज ऐक्यभाव झाला॥"

पण असे सांवतेबुवाहि देवाची प्रार्थना करतांना देवाजवळ जें मागणें मागतात; त्यांतून महाराजांनीं भागवतधर्माचें जणूं रहस्यच प्रकट केलें आहे—

"भक्तींत अंतर तुझ्या कधिंही नसावें।
मागेंपुढें अमुचिया विठु तूं असावें।
त्वां भक्तवत्सल अशा धरिलेंस नांवा।
या दीनदास गणुला पदिं दे विसांवा॥"

या आख्यानांतील सांवतेबुवांच्या कन्येचें व त्यांच्या पत्नीचें चित्रहि भक्तिरसाच्या दृष्टीनें आकर्षकरीत्या रेखाटलें गेलें आहे.

**माणकोजी बोधले**

माणकोजी बोधल्याचें चरित्र दोन भागांत लिहिलेलें असून त्यांतहि भक्तिरसाचा परिपोष झालेला आढळतो. परमेश्वराच्या प्रीतीसाठीं दानशूर बोधलेबुवांनीं वैभवाचा पट उधळून दारिद्र्य पत्करिलें, पण भक्तीची निष्ठा मात्र सोडिली नाहीं. संपत्ति गेल्यानंतर बोधले-बोवांच्या कुटुंबाला स्वाभाविकपणेंच वाटलें कीं, पाटलांनीं आतां असें दीनवाणें वारीला जाऊं नये. चांगली गाडी करावी, आंत शेला पांघरून बसावें, बैलांच्या पाठीवर उंची झुली घालाव्या, गळ्यांत घागरमाळा बांधाव्या, बिगारीला महार बरोबर घ्यावा आणि मग थाटानें यात्रेला जावें! 'तसे वारीला गेलांत तर माझ्या गळ्याची शपथ आहे,' असें तिचें म्हणणें, त्यावर पाटील म्हणतात 'विठ्ठलाचा भक्त कधीं दीनवाणा होतो काय? आमचा थाट अगदीं कायम आहे.'

"संनिश्चयाची मम जाण गाडी। सद्भावनीं प्रेमहि बैल जोडी।
म्यां घातिली त्यां अनुहात माळा। वैराग्यरूपी मम जाण शेला॥"

आणि पाटील पंढरपुरास आले. दरिद्री माणसाला चंद्रभागेच्या वाळवंटापलीकडे मुक्कामाचें स्थान कुठलें? विठ्ठलाच्या दृष्टीस मात्र ते एकटेच पडले. गजबजलेल्या पंढरपुराचा पांडुरंगाला अगदीं उबग आला. ते रुक्मिणीस म्हणाले—

**" रमे, हे अवघे वायस । बोधला माझा राजहंस ।**
**उतरलें वाळवंटास । लेकरूं माझें थंडीमध्यें ॥ "**

पाटलांच्या करितां देव किती कष्ट करीत, ते प्रसंग श्रीदासगणू-महाराजांनीं प्रसादमय भाषेंत मोठ्या बहारीनें वर्णिले आहेत. पाटलाच्या भक्तीचें शुद्ध स्वरूप व त्यांचा सर्वात्मभाव महाराजांनीं उत्कटतेनें वर्णिला आहे. त्यांची लीनताहि संतजनसुलभ पद्धतीनें दर्शिविली आहे. एक प्रसंग घेऊन तें दाखविणें उचित होईल—" वारकऱ्यांची दिंडी शेतावरून पुढें जात असतांना बोधलेबुवा माळ्यावरून खालीं उतरले व धांवत येऊन वारकऱ्यांच्या चरणीं लोळूं लागले आणि म्हणाले—

**" नाचा, नाचा, मम तनुवरी या तुम्ही खूप नाचा ।**
**गा हो, गा हो, भजनिंहि तसा नाथ तो पंढरीचा ॥ "**

पाटलांचा तो भोळा भाव पाहून ते वारकरी म्हणाले,

**" पाटील असे कां वेडे झालांत भान सोडून ? ।**
**राऊळ नसे हें हरिचें आहे निव्वळ काळें रान ।**
**तुम्हि भक्त हरीचे कळलें, मन भजनिं रंगुन गेलें, प्रेमाश्रु नयना आले ।**
**अधिं चला जाऊं गांवांत मग लोळा आनंदांत कीर्तनीं ।**
**मुक्काम आम्ही करूं येथें भोजना शिरापुरि करणें ।**
**कोणास उपरणें-जोडी कोणास रुमाला देणें ।**
**तुष्टेल तरी भगवंत........................ ॥ "**

यावर पाटलांनीं दिलेलें उत्तर त्यांच्या हृदयांतील भक्तीच्या स्वरूपाचें स्पष्टीकरण करणारें आहे. पाटील गहिंवरून म्हणाले—" वारकरीबुवा, भलतेंच काय बोलतां ?

"हें काय न देऊळ हरिचें ? माझ्या पंढरिच्या विठ्ठलाचें ।
विश्विं भरला पुरा, बाप माझा खरा, पुसा ज्ञानेश्वरा,
वेद बोलून गेले जे वाचे ।
जेथें जेथें भाव, तेथें तेथं देव, कशास हवा गांव,
म्हणा रामकृष्णहरि वाचे ।
विठ्ठल नरहरि, हीच शिरापुरी, सेवा अत्यादरीं,
कधिं जाड्य न होईल याचें ।
नाहीं वृत्ति बरी, बोधला उड्या मारी, चित्तीं ठसला हरी,
गणुदास मी बटकुर त्याचें ॥ "

संतांची मनोभूमिका विशद करितांना श्री. दासगणूमहाराज आपल्या काव्यांतून किती उच्चतम तत्त्वज्ञानाचा अगदीं साध्या सोप्या शब्दांत सहजपणें आविष्कार करितात, तें अशा काव्यांतून दिसून येतें.

"अवघें सकटचि मी" हा सिद्धान्त, या ठिकाणीं स्पष्ट केला आहे आणि असें तत्त्वज्ञान आचरणांत आणणाऱ्या संताविषयीं श्रीदासगणू महाराजांची भावना किती नम्रतेची आहे, तें 'गणुदास मी बटकुर त्याचें' या शब्दांतून उत्तम प्रकारें दिसून येतें. प्रत्यक्ष कीर्तनांत ज्या वेळीं महाराज हें वाक्य उच्चारीत, त्या वेळीं त्यांचा कंठ आदरानें व भक्तिभावानें गहिंवरून येई, अश्रु ओघळूं लागत आणि मग श्रोत्यांच्याहि ठिकाणीं अष्टसात्त्विक भाव प्रकट होत ! कै. शिवराम महादेव परांजपे, भारताचार्य चिंतामणराव वैद्य यांच्यासारखे बुद्धिमान् पुरुष भावमग्न होत; ते अशा प्रसंगींच !

**नामदेव** ·

'नामदेवचरित्र' हें तीन भागांत रचलेलें आहे. या चरित्राविषयीं लिहितांना कै. प्रा. श्री. नी. चाफेकर यांच्या प्रस्तावनेंतील उतारा पुढें देणें समर्पक वाटतें. चाफेकर लिहितात—"हें भक्तोत्तमाचें चरित्र असल्यामुळें परमेश्वराचें भक्तवात्सल्य आणि खऱ्या भक्ताची अनेक

कसोटयांच्या प्रसंगीं दिसून येणारी अढळ निष्ठा व प्रेम, त्यांनीं केलेली ईश्वराची आर्ततायुक्त प्रार्थना वा लडिवाळपणाचे संवाद इत्यादि अनेक हृद्य प्रसंग या चरित्रांत आले आहेत. तद्वारां करुणरस, उदात्त वात्सल्य, व भक्तिरस यांचा येथें विशेष रम्य उत्कर्ष झालेला दिसून येतो. नैवेद्यभक्षणासंबंधींचे प्रसंग, नामदेवांचे व त्यांच्या मातापित्यांचे संवाद, आईबापांनीं अजाणता केलेली नामदेवांची गांजणूक, नामदेवांचा व देवांचा संवाद, त्यांतील—'लबाडीच्या आळांस मी न भीतों!' हे करुणरसोत्कट उद्गार, आपला मुलगा वेडा खुळा असल्याबद्दलचें गाऱ्हाणें गोणाबाईनें पंढरीरायाजवळ नेलें, त्यावेळचा स्त्रीस्वभावास व मातृ-हृदयास सहजोचित असा उभयतांचा प्रेमळ सलगीचा हृदयस्पर्शी संवाद, नामदेवाच्या लग्नासंबंधीं मातापितरांचें व व्याहीमुनीमांचें भाषण, श्रीसद्गुरु विसोबा खेचरांकडे जा, म्हणून सांगतांना दूधसाखर व त्यांची बनणारी खीर यांचा अत्यंत समर्पक व गोड दृष्टान्त देऊन श्रीपंढरीरायानें नामदेवास समजावून सांगितलेला भक्ति, ज्ञान, परमार्थ, संसार आणि लोकव्यवहार यांच्यामधील अन्योन्य संबंध, विशेषतः या प्रसंगींचें भगवंताचें भाषण हीं सर्व अत्यंत रम्य, हृद्य, उदात्त आहेत. तीं भाषणें 'बोलाचीच कढी बोलाचाच भात, जेवूनीयां तृप्त कोण झाला?' या तुकोबांच्या उक्तीप्रमाणें वेदान्ताचें केवळ शाब्दिक ज्ञान असणाऱ्या व्यक्तीच्या हातून लिहिलीं जाणें शक्य नसून आत्मानुभवानें खरें वेदान्तरहस्य समजलेल्या व अंगीं मुरलेल्या ज्ञानी भक्ताच्याच लेखणींतून ब्रह्मतादात्म्याच्या उज्ज्वल स्वयंस्फूर्तीनेंच आपोआप उतरलेलीं आहेत; असें मला प्रांजलपणें वाटतें. त्यावरून श्रीदासगणूंच्या आध्यात्मिक अधिकाराविषयींची आदरबुद्धि अधिकच वृद्धिंगत होते."

विसोबा खेचरांच्या तोंडून नामदेवास जो उपदेश केला आहे, त्यामध्यें लिहिली गेलेली पुढील कविता पाहिली म्हणजे चापेकरांचें विधान सत्य असल्याचा प्रत्यय वाचकांस येईल. सद्गुरु विसोबा नामदेवास म्हणतात—

“ टाकी परी न टाकी, सगुणास कदा तूं कीं ।
हें भजन जाण सगुणाचें, शर्कराद्रव्य मोलाचें ।
अद्वैत गोडपण त्याचें । ही समज मनीं धर कीं ॥

सिद्धज्ञानभिमातटानिकटही ब्रह्मांड रे पंढरी ।
जीवांचा समुदाय हाच महिच्या वीटे उभा श्रीहरी ।
तेथींचा मुनि पुंडलीक समजे सद्भाव हा राजसा ।
तेथींचा म्हणिं होय वारकरि तूं सेवीं सुभक्तीरसा । ”

**जगन्नाथपंडित**

‘ जगन्नाथपंडित ’ या आख्यानांत श्रीदासगणू महाराजांचें संविधानकौशल्य फारच चांगलें प्रत्ययास येतें. जगन्नाथ व लवंगी यांच्या संबंधांतील परंपरागत समजुतीला महाराजांनीं फार मोठा धक्का दिला आहे आणि त्यांच्यामधील प्रेम अध्यात्मिक स्वरूपाचें व विशुद्ध असल्याचें प्रतिपादिलें आहे. तसेंच जगन्नाथाचें स्वभावचित्रहि ‘ दास्यहत सुखलोलुपते ’ चें नसून व्यवहारकुशल अशा तेजस्वी देशभक्ताचें आहे. कर्नाटकांत थारा न मिळाल्यानें जगन्नाथ उत्तरेला जयपूरला येऊन स्थायिक झाले; परंतु त्या चिमुकल्या संस्थानांत त्यांच्या बुद्धीची कुचंबणा होऊं लागली. पुढें बादशाही फर्मानामुळें ते धर्मवाद करण्या-साठीं दिल्लीस गेले. तेथें काजीशीं वाद करतांना प्रत्येक गोष्टींत त्याला निरुत्तर करून निष्कर्ष काढतांना ते शेवटीं म्हणाले—

“ असे श्रुतिज धर्म हा महिवरी अनादि खरा ।
कुराण बहु मागुनी उपजलें विचारा करा ।
नदी न निधि होतसे बहुत पूर आला जरी ।
अखेर मिळणें तिला निज जलासवें सागरीं ॥ ”

पराभूत झालेल्या काजीनें बादशहाजवळ खटपट करून जगन्नाथ-पंडितांना वेगळ्याच दृष्टीनें गोत्यांत आणण्याचा घाट घातला. लवंगीकरवी त्यांना मोहित करण्याचा प्रयत्न केला. जगन्नाथ बधेनात,

तेव्हां त्यांच्याकडून बादशहानें लवंगीवर एक कवन रचविलें व त्या आधारें लवंगीचा स्वीकार करण्यास भाग पाडलें. परिस्थितिवश होऊन जगन्नाथांना त्याप्रमाणें वागावें लागलें. निदान बाह्यात्कारी तरी त्यांना तसें दाखवावें लागलें; पण जगन्नाथांनीं आपलें सत्त्व गमावलें नाहीं. तत्त्वज्ञानाचा उपदेश करून त्यांनीं लवंगीलाच अध्यात्ममार्गी बनवलें. दासगणू महाराज लिहितात. परिणाम असा झाला कीं,

**" विषयतम टिके कां ज्ञानसूर्यासमोरीं ?।**
**यवनि तरुण बाला राहिली ब्रह्मचारी।**
**मिळत सतत प्याया तोय ज्या मानसाचें।**
**पटत न कधिं त्याला आप त्या थिल्लराचें ॥ "**

औरंगझेब बळानें गादीवर येईपर्यंत जगन्नाथाचा काळ सुखाचा गेला, पण पुढें जगन्नाथांना दिल्ली सोडावी लागली. लवंगीसह ते काशींत आले. लोकांनीं तेथें स्वाभाविकतःच बहिष्कार घातला, पण जगन्नाथांनीं त्याचा कधीं विषाद मानला नाहीं.

**" खोटें खरें कळतसे जगदीश्वराला।**
**तो विश्वनाथ भविं तारिल आपणाला ॥ "**

असा त्यांना विश्वास होता! त्यामुळें अनेक प्रकारचे हाल व जननिंदा सोसूनहि जगन्नाथ शांत होते, पण एक दिवस काशींतील प्रसिद्ध विद्वान् व थोर शिवभक्त श्री. आप्पय्य दीक्षित यांनींच त्यांचा तिरस्कार केला. आप्पय्या म्हणाले,

**" सावध हो मरण समिप येत चाललें—यम पुसतां काय वदसि,**
**सोडवी मग कोण तुशी, हें न कसें निज मानसिं-कधिंच आणिलें ? "**

या प्रकारची निंदा ऐकतांच जगन्नाथ ताड्दिशीं उठून आप्पय्यांना म्हणाले—

**" हो दीक्षिता भरवंसा मज जान्हवीचा।**
**आहे न ती उरवि लेशहि पातकाचा ॥ "**

' आजपर्यंत सर्वसामान्य लोक माझ्याविषयीं वाटेल तें बोलत, पण

आज तुम्हीहि माझ्याविषयीं गैरसमजानें बोलतां, हें ऐकून खेद होतो'. आणि मग त्यानें गंगालहरी रचून भागीरथीचा धांवा केला. जगन्नाथाच्या निष्ठावंत भक्तीनें व आर्त प्रार्थनेनं भागीरथी प्रसन्न झाली व तिनें—

> " काशींत ज्येष्ठ मासीं अभिजित वेळेस शुद्ध दशमीला ।
> यवनीसह गंगेनें पंडित कविराजराज उद्धरिला ॥ "

## अहिल्याबाई

देवी अहिल्याबाई होळकर यांच्या आख्यानांत अहिल्याबाईच्या बालपणापासूनचें महाराजांनीं वर्णन केलें आहे. तात्या पंतोजींची प्रेमळ शिकवण, अहिल्याबाईची तरतरी व तिचा देवलसीपणा, अत्यंत हृदयंगम रीत्या वर्णिला आहे. महाराजांचें नगर प्रांताविषयींचें प्रेम या आख्यानांत फारच चांगल्या रीतीनें प्रकट झालें आहे. नगरच्या प्रसिद्ध दुष्काळाचें वर्णन करतांना ते म्हणतात—

> " दुष्काळि मुलुख तो आधिं, दया ती कधीं, येईल देवाला ?
> बाभळीहिवर जंगला,
> कुठें क्वचित् धनंतर विहिरी, मळ्याभीतरीं, दुकळ पाण्याचा ।
> सरितेस पूर वाळुचा
> टेकड्या माळ आणि कडे, भूषित तरवडे, फण्या निवडुंगा ।
> सर्वत्र मुभा ती बघा ।
> पिक पिकें ज्वारि बाजरी, तोही ना पुरी, 'अहा हत ! दैवा ।
> गणु म्हणे पाव माधवा । "

पण येवढें दुष्काळाचें हुबेहूब वर्णन करूनच महाराज थांबले नाहींत. नगरप्रांतावरील प्रेमानें त्याची श्रेष्ठता सांगतात—

> " हा तो जिल्हा गमत प्रतिमा साच श्रीशंकराची ।
> एकालाही जगतिं नच ये योग्यता हो तयाची ।
> दुर्भिक्षाची धवल विभुति, वीष दुष्काळ कंठा ।
> शीर्षीं गंगा शिवद सकला-नाहिं नाहीं करंटा । "

राघोबादादांच्या आग्रहावरून मल्हाररावांनीं अहिल्या आपली सून करून घेण्यास मान्यता दिली. वधूपक्षाची बाजू स्वतः पेशव्यांनीं स्वीकारली. लग्नसमारंभ मोठ्या थाटानें पुण्यास झाला. त्यांतील वरातींतील मिरवणुकींत सामील झालेल्या नांवनिशींतील बारकावा पाहून कवीच्या सूक्ष्म इतिहासावलोकनाची ओळख पटते. शाहू महाराजांजवळ मल्हारराव होळकरांनीं मागितलेल्या तेजस्वी आशीर्वादानें वीरश्रीनें बाहू स्फुरूं लागतात. अहिल्याबाईची हिंदुधर्मावरील निष्ठा पाहून व राजकारणांतील तिनें राघोबादादाशीं खेळलेला मुत्सद्दीपणा पाहून कौतुक वाटतें. भिल्लांचें बंड शमवितांना तिनें दाखविलेल्या चातुर्यानें आपण अगदीं थक्क होतों. महादजी शिंद्यांशीं बोलतांना अहिल्याबाईनें दाखविलेला बाणेदारपणा दृष्टींत भरतो, तर आपल्या भक्तांना बुडत्या नौकेंतून तारणाऱ्या तिच्या थोर विभूतिमत्वामुळें मस्तक नम्र होतें. महाराजांनीं हें आख्यान अहिल्याबाईच्या निरनिराळ्या अवस्थेंतील व्यक्तित्वाला चांगल्या प्रकारें खुलवील अशा प्रासादिक भाषेमध्यें रचिलें आहे.

### संत सखू

'संत सखूचें आख्यान भक्तिरसपूर्ण असून संसारांतील व्यावहारिक अडचणींचें व आप्तेष्टांतील हेव्यादाव्याचें मार्मिकपणें यांत वर्णन केलें आहे. बंधनांतून सोडविण्यासाठीं सखूनें केलेला परमेश्वराचा धांवा श्रोत्यांच्या डोळ्यांत अश्रु उभे करतो.

### आऊबाई

'आऊबाई' या जतच्या राजघराण्यांत होऊन गेलेल्या साध्वी स्त्रीच्या आख्यानांतील एका प्रसंगामध्यें महाराजांच्या कल्पनाशक्तीचा हृदयंगम विलास दृष्टीस पडतो. राजे सटवाजी डफळे यांनीं आपला मुलगा बाबाजी याकरितां वधूसंशोधन चालविलें होतें, परंतु वधूची निवड करण्यापूर्वीं मुलाच्या प्रवृत्ति कुणीकडे झुकल्या आहेत, तें पाहण्यासाठीं त्यांनीं एक प्रसंग घडवून आणला. बाबाजीच्या वाढदिवशीं एका दालनांत

सुशोभित अशा चार चौरंगावर लेखणी, तराजू, सारंगी आणि तरवार या वस्तु ठेवल्या व उपाध्याकरवीं त्या प्रत्येकीचें गुणदोषविवेचन करविलें. बाबाजींनें त्यांपैकीं कोणतीहि एक वस्तु स्वीकारायची होती. त्यावरून त्याचा कल कुणीकडे आहे तें समजून येणार होतें. या वेळचें महाराजांनीं काव्यमय शब्दांत प्रत्येक वस्तूचें गुणदोषदृष्ट्या केलेलें विवेचन अत्यंत मार्मिक आहे! त्यांच्या व्यवहारकुशलतेची, सूक्ष्म निरीक्षणाची, द्रष्टेपणाची या वर्णनावरून पूर्ण कल्पना येते, पण तें सर्व मुळांतूनच पाहायला हवें! नमुन्यासाठीं उतरलेल्या एकाद् दुसऱ्या कवितें-तून त्यांतील सौंदर्य नीटसें प्रत्ययाला येणार नाहीं.

**रोहिदास**

श्री. रोहिदास चांभाराच्या आख्यानामध्यें रोहिदास व एक भिक्षुक ब्राह्मण यांमधील संवादांतून खरें ब्राह्मण्य काय असतें, तें चर्चिलें गेलें आहे. रोहिदासांनीं आपल्या शरीरामध्यें खरें जानवें दाखविलें, हा अद्भुत चमत्कार सोडला, तरी त्या प्रसंगींचें रोहिदासाचें भाषण विचार करण्या-सारखें आहे. रोहिदासाच्या भाषणानें व त्यानें केलेल्या चमत्कारानें आश्चर्यचकित झालेला ब्राह्मण हा रोहिदासाच्या पुढें विनीत झाला, त्यावेळीं रोहिदास म्हणतात--

> **“ नमन मला न करावें, मनिंचा अभिमान तेवढा सोडा ।**
> **बळकटशा वृषभेंही पंकींचा ओढवे न हो गाडा ॥ ”**

पुढें दुसऱ्या एका विद्वान् पंडिताशीं रोहिदासाचा संवाद घडला. पंडित हा आपल्याकरितां एक नवा जोडा करून दे, असें मागत होता. त्यावर रोहिदास म्हणतात--

> **“ नवे जोडे तुम्हां शिवुन द्याया । नाहीं शक्ति उरली माझ्या ठायां ।**
> **जुनें तेंच द्यावें, चांगलें सांधुन घ्यावें । शास्त्रीबुवा पडतों तुमच्या पायां ।**
> **वर्गणीचा खरा नाहीं धर्म बरा । फळ येत नाहीं तया ठायां ॥ ”**

रोहिदास जाणाऱ्या येणाऱ्या यात्रेकरूचें काम फुकट करून देतात,

हें पाहून त्यांच्या व्यवहारी पत्नीनें त्यास दूषण दिलें, त्या वेळीं रोहिदास म्हणतात—

" पशू अवघे धन्य धन्य । मतलबी ना अमुचे समान ।
ज्यांनीं आपुलें कातडें पूर्ण । फुकट दिधलें जगासी ॥ "

शास्त्रीबुवांचा मतलबीपणा, राजाचा अन्यायीपणा, रोहिदासाची उदारता व निर्लोभी वृत्ति, इत्यादींचा उठाव, आख्यानांतील कवितांतून उत्तम रीतीनें झाला आहे. रोहिदासानें प्रार्थना केल्यावरून काथवटींत भागीरथी प्रकट झाली व तिनें रत्नखचित कंकण काढून दिलें, त्यावेळीं सर्व लोक भागीरथीच्या पूजनाच्या इच्छेनें तिच्याजवळ येतांच भागीरथीनें ' मजपेक्षां माझ्या शिशूचें पूजन, केल्या समाधान होय मज ! ' असें सांगून त्यांना रोहिदासाचेंच पूजन करण्यास सांगितलें. त्या वेळीं रोहिदासांनीं काढलेले उद्गार त्यांच्या संतपणाची साक्ष एकाच वाक्यांत पटवितात. रोहिदास म्हणतात—

" पूजन माझें हेंच बोला श्रीविठ्ठल वाचें ।
आयु चाललें भजन करा रे, पंढरिरायाचें ।
श्रीविठ्ठल जय विठ्ठल, हरि विठ्ठल, हे विठ्ठल ।
दासगणु म्हणे करी विठोबा रक्षण जगताचें ॥ "

## गोरा कुंभार

श्री. गोरा कुंभाराच्या आख्यानांत संतांची सत्यप्रतिज्ञा ही काय चीज आहे, हें अत्यंत उठावदारपणें मांडलें आहे. भजनानंदांत तल्लीन होऊन गोरोबा चिखल तुडवीत होते. त्यांच्या पायाखालीं त्यांचें सुकुमार रांगतें पोर चिरडलें गेलें, हें पाहतांच त्यांच्या पत्नीनें त्यांना, त्यांच्या देवाला व पुढें सर्व संतकुळीलाच शिव्यांची लाखोली वहाण्यास आरंभ केला. संतांची निंदा करून आपली बायको एक महान् पातक करते आहे; म्हणून गोरोबा थापटणें घेऊन बायकोच्या अंगावर धांवून गेले; त्या वेळीं ' माझ्या अंगास स्पर्श करशील, तर पांडुरंगाची तुला शपथ ! ' असें ती म्हणाली. तें ऐकतांच गोरोबा हंसले व थापटणें टाकून माघारीं

फिरले. तेव्हांपासून त्यांचें अंथरूण तुळशीच्या ओटयावर आलें. राग ओसरल्यावर पुढें कांहीं दिवसांनीं गोरोबांच्या पत्नीनें एके रात्रीं त्यांचें चरणसंवाहन करण्याचा प्रयत्न केला. त्या स्पर्शासरशीं गोरोबा चटकन् उठून बायकोस म्हणाले,

> "माय माझी झालीस तूं सुशीले। म्हणुनि आतां नच करी असे चाळे।
> मला प्राणाहुन प्रिय असे साची। शपथ रंभोरू सावळ्या विठ्ठची॥"

गोरोबाच्या कुटुंबानें

> "क्रोधांतिल, प्रेमांतिल जें भाषण तें खरें न समजावें।
> त्यांतुन मी अज्ञानी, अबला, दुर्बल मनांत आणावें॥"

इत्यादि बोलून समजूत घालण्याचा प्रयत्न केला, पण गोरोबांचा निग्रह ढळला नाहीं. निराश होऊन त्यांची पत्नी परत आली. घरांत असलेलीं बाळलेणीं पाहून तिच्या हृदयांतील दुःख उचंबळून येई आणि आतां पुन्हां आपल्या मांडीवर पोर खेळणार नाहीं, या भावनेनें ती अधिकच व्याकुळ होई! तिच्या उद्गारांतील कारुण्य व निराशेंतून उत्पन्न झालेला त्वेष, वाचकांच्या अंतःकरणाला जाऊन भिडेल असा आहे. ती म्हणते—

> "करूं काय, लागली हाय ग वंशासाठिं कारटें नाहीं।
> सागरीं बुडालें जहाज घराला इस्तु लागला बाई।
> नवऱ्यानें घातिली माळ, जेडिला काळ विठ्या लवलाही।
> टाळानें केलें तळपट, सुचेना त्यास विठ्याविण कांहीं।
> संसाररूप गोठ्यांत सुखाचे बैल वांसरें गाई।
> बांधिले होते माझिया, मेल्याला तेंच पहावलें नाहीं।
> वैराग्यवाघ आणिला बळें आवतणें देऊन या गेहीं।
> त्या पाहुन पळालीं ढोरें, गणु म्हणे, जीव घेउन लवलाही॥"

गोरोबाच्या पत्नीच्या या निपुत्रिकपणामुळें स्त्रियांमध्यें तिची निंदा होऊं लागली. त्यामुळें आपल्या धाकट्या बहिणीचें लग्न नवऱ्याबरोबर करून द्यावें, म्हणजे तरी वंशाला दिवा लागेल, या भावनेनें आईबापांचें

मन वळवून धाकट्या बहिणीचें लग्न गोरोबाशीं लावून दिलें. नूतन पत्नीला घेऊन परत येत असतांना सासऱ्यानें भाबडेपणानें माझ्या दोन्ही मुलींना सारखेंच वागवा बरं, असें शपथ घालून सांगितल्यामुळें--

**" दोन्ही कांता टाकुन । गोरा करी पृथक् शयन ।**
**कामविकारें ज्याचें मन । लिप्त न कदा जहालें ॥ "**

हा प्रकार पाहून धाकटी थोरलीच्या नांवानें जळफळूं लागली. पुढें दोघींनीं संगनमत करून आपला हेतु बलात्कारानें सिद्धीस नेण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें एके दिवशीं रात्रीं गोरोबा गाढ झोपेंत असतांना त्यांनीं आपल्या अंगावर गोरोबांचे हात ठेवून घेतले. त्या स्पर्शानें गोरोबा जागे झाले. आपले हात पत्न्यांच्या अंगावर आहेत, हें पाहतांच त्यांच्या भाविक हृदयाला अतिशय खेद झाला. ते कळवळून देवाला म्हणाले--

**" करूं मी तरी काय करें घडलें ? ।**
**पाप भयंकर शपथ मोडुनी तुझी विठोबा नीतिपथा त्यजिलें !**
**तोडुन टाकिन कर हे आतां, भीमातटवासिया अनंता ।**
**या दुष्टांची संगत करितां-दुष्ट जगीं मी बनेन पुरें कळलें ॥ "**

आणि त्यांनीं खरोखरीच आपले हात तोडून घेतले. सत्यप्रतिज्ञतेचा हा अगदीं कळसच झाला. पुढें नामदेवाच्या कीर्तनगजरांत गोरोबांचे हात परत मिळाले, तें पाहून गोरोबांच्या दोन्ही बायका पांडुरंगाशीं अगदीं वर्दळीवर येऊन भांडल्या. गोरोबाची बायको तर पांडुरंगाला संतापानें म्हणते--

**" काळ्या तूं बिभवीं न सार म्हणुनी लोकांप्रती सांगशी ।**
**आणी आपण नेसुनी भरजरी पीतांबरा बैसशी ।**
**कंठा गोफ कडीं कशास तुजला सांगे मुदी चौकडा ।**
**घेते सर्व हिराउनी मग सुखें वाजीव तो चौघडा ॥ "**

पण या बोलण्याचा देवाला राग तर आला नाहींच, उलट ते कौतुकानें हंसूंच लागले. श्रीज्ञानेश्वरांनीं म्हटलेंच आहे--

" तान्हियाचें लागतां झटे। अधिकची पान्हा फुटे।
रोषें प्रेम दुणवटे। पढियन्तयाचेनी॥ "

गोरोबांचें हें आख्यान एकंदरींत भक्तिरसाच्या दृष्टीनें फारच बहारीचें आहे. यांतील करुणवत्सलरसाचे प्रसंग मनोवेधक आहेत. त्या सर्वांन एक तऱ्हेच्या नर्म विनोदाचें अस्तर अगदीं हळुवारपणें लावलेलें असल्या-मुळें ऐकत असतांना रसिकांच्या चित्तवृत्ति सुखावतात.

**ज्ञानेश्वर**

श्रीज्ञानेश्वरचरित्राच्या प्रथम भागांत ज्ञानेश्वरांच्या शुद्धि-प्रकरणाचा प्रसंग त्याच्या पार्श्वभूमीसह वर्णिलेला आहे. कारुण्याच्या पार्श्वभूमीवर यांतील तत्त्वज्ञानाचें प्रतिपादन विशेषच बोधप्रद झालें आहे. मातापितर ज्यावेळीं शुद्धिकरण होत नाहीं, या वैतागानें घरादाराचा त्याग करून निघाले, त्यावेळीं चिमुकल्या मुक्तेनें पतीमागें घराबाहेर पडणाऱ्या आईचा पदर ओढून धरला अन् ती म्हणाली, " आम्हांला टाकून कुठं निघालीस ग आई ? जरा मागें तर वळून बघ. निवृत्तिदादा कसा खिन्न दिसतो आहे. ज्ञानेश्वराच्या डोळयांतून अश्रु ओघळत आहेत. सोपानभाऊ गोरामोरा झाला आहे. त्याच्या पाठीवरून जरा हात तरी फिरीव. " मुक्ताबाईचे हे लडिवाळ बोल ऐकतांच मातेचें हृदय कासावीस झाले, पण उचंबळणाऱ्या भावनांना आवरून ती साध्वी म्हणाली––

" नको ओढूं तूं व्यर्थ पदर मम आजी।
द्या सोडुन आशा माझी ... "
आजपासुनियां जननिजनक निवृत्ति। मी दिलें तुम्हां त्या हातीं॥
पति जिकडे तिकडे कांता। धावते सिंधूकडे सरिता।
त्यजि उषा प्रभातीं न सविता। राहा म्हणुन मुलांनो, राजी॥ "

शुद्धिपत्र मिळविण्याच्या खटपटीसाठीं पुढें चार भावंडें पैठणास आलीं व तेथें रेडयामुखीं वेद वदविल्याचा अलौकिक चमत्कार घडला. सर्व विद्वान् पंडित गर्वहत झाले व त्यांनीं नम्रभावानें शुद्धिपत्र दिलें.

"हे सोवळें शुचि सदोदित सर्वकाळ।
"हे ज्ञानवृद्ध न म्हणा, कधिं यास बाळ।
यद्दर्शनें दहन होतिल पापराशी।
मानूं नका मनुज या बुध चौकडीशीं॥"

दुसऱ्या भागामध्यें सच्चिदानंदबाबांच्या पुनर्जीवनाचा करुणरम्य प्रसंग आला आहे. पतीबरोबर सहगमन करण्यास निघालेली सच्चिदानंदाची साध्वी पत्नी श्रीज्ञानेश्वर जवळ आलेले पाहून त्यांना आदरपूर्वक नमस्कार करून म्हणाली,

"तूं कश्यपात्मज दुजा मज वाटतोस।
हें लाजवील तव तेज खरें रवीस।
पायां तुझ्या शरण मी गुरुराजराया।
धैर्यास दे पतिसवें सरणीं जळाया॥"

सतीच्या मागण्यामुळें श्रोत्यांचें हृदय न गहिंवरलें तरच नवल! श्रीज्ञानेश्वरांनीं सच्चिदानंदबाबास आपल्या कृपाप्रसादांनीं जिवन्त केलें व ज्ञानेश्वरीच्या लेखनास आरंभ करून मोहिनीराजाजवळ बसून ती पूर्ण केली. या अलौकिक ग्रंथाची प्रशंसा करीत असतांना श्रीदासगणू-महाराज लिहितात—

"महती ज्ञानेश्वरिची प्राकृत ग्रंथीं अनुपम साची।
रत्नें शब्दाब्धीची शोधुन रचना केलि जियेची।
उपमा उपमेयाची गर्दी ज्याला गोडी सुधेची।
आठवण करवित साची शुचिपण ज्याचें गोदावरिची।
वाणी दासगणूची कुंठित झाली गति शब्दाची॥"

ज्ञानेश्वरीचें हें वर्णन अत्यंत यथार्थ आहे, यांत शंका नाहीं. या प्रशंसेंतील प्रत्येक पदांतून महाराजांच्या काव्यमय प्रतिभेचा रमणीय साक्षात्कार घडतो. ज्ञानेश्वरीची रचना शब्दसागरांतील रत्नें वेंचून झाली आहे; तीर्थाचें पावित्र्य त्यांतील ओव्यांत भरलें आहे व उपमा व उपमेयांना अमृताची गोडी आहे, हें महाराजांनीं केलेलें वर्णन

ज्ञानदेवींच्या बाबतींत किती समर्पक व त्यामुळेंच रम्य आहे, हें स्पष्ट करण्याची आवश्यकताच नाहीं. याच भागांत पुढें विसोबा खेचर व चांगदेव यांच्या भेटीचें सरस वर्णन आलें आहे. चांगदेवाच्या मिरवणुकीसंबंधींची कविता वाचीत असतांना त्यांत कवीचें वर्णनकौशल्य दिसून येतें. कवितेचा शेवट विनोदामुळें विशेषच आकर्षक झाला आहे.

> "काय वानूं तेथिचा थाट, गर्दि अटोकाट, मिळेना वाट।
> पथानें कवणा कशि वशी मिळाली दासगणूच्या कवना॥"

**रामदास**

रामदासस्वामींच्या आख्यानामध्यें संसारलोलुप माणसाचें चित्र स्पष्टपणें रेखाटलें गेलें आहे. बाजीपंत नांवाचा एक शेकदार सातारा जिल्ह्यांतील शहापुरास राहात असे. त्याचें वर्णन करतांना महाराज लिहितात कीं—

> "लोलूप भवीं जो सदा, हरीच्या पदा, कदा ना ध्याई।
> संसार तयाची मुख्य देवता पाही।
> नित बांधि गड्या, घर, वाडे-घेतसे गाडे-करी नग स्त्रीला।
> एवंच जयानें देह भवासी विकला॥"

रामदासस्वामी भिक्षा मागत असतांना एक दिवस या बाजीपंताच्या घरीं आले आणि त्यांनीं रामनामाची गर्जना केली. ती ऐकतांच विपरीत कल्पना असलेल्या घरधनीणीला राग आला. ती म्हणाली— "माझें घर लेंकराबाळांनीं भरलेलें आहे. अशा ठिकाणीं हें ओंगळ बोलूं नको." रामदासस्वामी हंसून म्हणाले—'बाई, जें खरंच मंगल आहे, त्याला अमंगळ म्हणतेस; रामनामाच्या महतीची तुला कल्पना नाहीं.' हें सांगणें बाईला पटलें नाहीं. समर्थ जों जों रामनामाची महती गाऊं लागले, तों तों ती अधिकच संतापली आणि शेवटीं तर तिनें आपल्या हातांतील पोतेरें समर्थांच्या तोंडावर फेंकून मारलें. समर्थ सत्पुरुष. त्यांना राग आला नाहीं. बाईच्या अज्ञानाची मात्र त्यांना कींव वाटली. पोतेरें

घेऊन स्वारी नदीवर परतली आणि तें धुऊन स्वच्छ केलें. त्याचे काकडे वळून त्या सावित्रीबाईकरितां ते रामास आळवूं लागले.

> " मान्य करा हा, देवा आतां कांकडा, रामा ।
> सती सावित्रीचा जडवी निज पादिं बहु प्रेमा ।
> गोमयानें धुवोन वस्त्रा शुद्ध अर्धी केलें ।
> विरोधभक्ति-जल जें त्यानें तें मग भिजवीलें ।
> वरि वरि क्रोधें परि बहु प्रेमें मजला अर्पियलें ।
> त्याच वस्त्राचे हे म्यां मग कांकडे केले ।
> निजबोधाचा प्रसाद देउनि माया तम वारा ।
> सती सावित्रीला द्यावा निजपदिं झणिं थारा ॥ "

पुढें बाजीपंतांच्या पापाचा घडा भरला. मोंगलाई जागी झाली आणि २५–३० वर्षांनंतर तिला उजाडलें कीं, बाजीपंत गेलीं कित्येक वर्षे पैशाची अफरातफर करतो आहे. मोंगलाई अंदाधुंदींत असें होणें अगदीं शक्य आहे ! या अंदाधुंदीचें महाराजांनीं मोठें मार्मिक वर्णन केलें आहे. कडव्या शिपायांचा एक जथा येऊन बाजीपंतांस पकडून घेऊन गेला. त्या वेळीं सावित्रीबाईस अर्थातच अत्यंत दुःख झालें आणि तिला ठामपणें वाटलें कीं,

> "माझ्या येऊन भरल्या घरीं भलभलतें तो जोगडा ।
> गेला बोलुन त्याचें फळ, पडला पतिच्या पायीं खोडा ॥ "

आणि मग ती बाई भराभर नवस करूं लागली—

> " सत्वरी पाव तूं मला, प्रभो वैराळा, पतीला येऊं दे सुटून माझ्या
> खंडोबा जेजुरीच्या राजा !
> तुझा तोडिन लंगर खरा, वाहिन भंडारा, उभयता येऊं गडावरी ।
> वारि ती मागुं आदितवारीं ।
> तुझी परडी घेइन बया, येऊं दे दया, कवड्यांची माळ घालिन कंठीं ।
> भौमवासरें करिन खेटीं ।
> मुंजास नारळ फोडीन, कोंबडें वाहीन, धुळोवा वेताळ देवाला ।
> मलीदा दावलमलकाला ।

गणुदास म्हणे या रितीं, बाइ ती सती, खुळ्यासम नवस करी फार ।
टाकुनी राजा रघुवीर ॥ "

हे नवस व त्या मागची मनोवृत्ति पाहिली कीं सकाम संसारी माणसाचें चित्र हुबेहूब डोळ्यासमोर उभें राहतें. पुढें बाजीपंतास पश्चात्ताप झाला. रामरायाच्या कृपेनें त्याची सुटका झाली. रामदासस्वामींचा अधिकार केवढा आहे, हें कळल्यावर सावित्रीबाईस आपल्या वर्तनाचा अत्यंत विषाद वाटला व तिनें समर्थांचे पाय धरले. त्या वेळीं सहानुभूति व्यक्त करणारा, क्षमेचा हात त्यांच्या मस्तकावर ठेवीत समर्थ म्हणाले—

" केलें कौतुक राघवें मजवरी, आरोप ना हा करी ।
नामाची महती तुला समजली ती मात्र चित्तीं धरी ।
आहे हा नरदेह याचकरितां ध्यावें प्रभूच्या पदां
भक्तांची नित संकटें हरुनियां तो त्यां नुपेक्षी कदा ॥ "

## दादाजी

दादाजी या नांवाच्या समर्थांच्या शिष्याच्या चरित्रामध्यें छत्रपति शिवरायाच्या ओवाळणीचा एक प्रसंग मोठा बहारीचा आहे. एका मारुतीच्या देवळामध्यें एक ब्राह्मण सुवासिनी हातांत पंचारती घेऊन भाऊबिजेच्या दिवशीं दर्शनास आली होती. शिवबाहि त्याच मंदिरांत बसले होते. आपणांस ओवाळण्यास कोणी बहीण नाहीं, त्यामुळें ते खिन्न झालेले होते. ती बाई त्यांना म्हणाली, ' बाबा, मला भाऊ नाहीं, या देवळांत तूंच मला प्रथम भेटलास; तुला मी भाऊ म्हणून ओवाळलें तर चालेल ना ? ' शिवबा म्हणाले,

" मराठा मी, ब्राह्मण नसे साचा ।
वंश वेरुळच्या बाइ पाटलाचा ॥ "

त्यावर बाई म्हणाली, ' तुझ्या मुद्रेवरून व वेषावरून तूं शूरवीर दिसतोस आणि

" सैनिक जे असति कीं कुलशीलवंत ।
त्यांच्या समस्त भरल्या बहिणी जगांत ॥ "

भावाबहिणीचें नातेंच असें आहे कीं, त्यांत जातींचा प्रश्नच उद्भवत नाहीं. आणि मग तिनें शिवबाला ओवाळलें, अन् ती म्हणाली,

> " हे क्षत्रियकुलभूषणा, नरवीरा कांहीं कर ।
> नांव आपुलें देशामधें शस्त्राच्या जोरावर ॥ "

याप्रमाणें वीरश्री चेतविणारें आणि देशाच्या परिस्थितीविषयीं अत्यंत कळवळयाचे उद्गार ऐकून शिवबांचें हृदय भरून आलें. ते म्हणाले, ' बाई, मी ओवाळणी मागाहून पाठवून देतों. आतां माझ्याजवळ कांहीं नाहीं. ' त्यावर बाई लगेच म्हणाली— ' देणार असशील तर—

> " ओवाळणी नरवरा मज हीच घाली ।
> हा देश दीन अपुला करि भाग्यशाली ॥ "

शिवबांना या उद्गारांचें अत्यंत कौतुक वाटलें आणि ते म्हणाले, ' बाई, तुझ्यासारखें देशप्रेम प्रत्येक स्त्रीच्या अंतःकरणांत राहील, तर देशाचें भलें होण्यास वेळ लागणार नाहीं.'

चोखामेळयाच्या चरित्रांत भक्तासाठीं पांडुरंग किती प्रकारांनीं कष्ट करतो, व संतापुढें आपला मोठेपणा कसा विसरतो, याचें भक्तिरसपूर्ण वर्णन हृदयाला भिडणारें आहे. चोखोबाच्या हृदयांत परमेश्वराविषयीं भक्तीचा जिव्हाळा किती उत्कटतेनें होता, हें दाखविणारीं मनोहर पदें या आख्यानांत विपुलच आहेत; पण हें महाराजांच्या सर्वच आख्यानांचें वैशिष्ट्य आहे. संतांच्या हृदयांतील ईशप्रेम वर्णन करीत असतांना त्यांच्या वाणीला एक प्रकारचा अलौकिक रसाळपणा येतो, कवित्वाला स्फूरण चढतें आणि प्रतिभा शरद् ऋतूंतील सृष्टीप्रमाणें सौंदर्यानें उठून दिसते. त्यामुळें नमुन्यासाठीं वर उल्लेखलेलीं त्यांच्या सत्तर आख्यानां-पैकीं १७–१८ आख्यानें या विभागाची ओळख पटवून देण्यास पुरेशी आहेत. या प्रत्येक आख्यानाची रचना खरोखरीच मोठी नाट्यपूर्ण आहे. एखाद्या उत्कृष्ट, भावपूर्ण प्रसंगाचा केंद्रबिंदु साधून त्याभोंवतीं काव्यमय पद्यांची रचना अतिशय सरसपणें केली जाते. मधून मधून निरनिराळ्या प्रसंगांत गोंविलेले काव्यमय दंश इतके मार्मिक

असतात कीं, ऐकणाराचें हृदय आनंदानें उचंबळून यावें व बुद्धि स्तिमित व्हावी; मात्र हीं सर्व आख्यानें श्राव्य काव्यें आहेत हें लक्षांत ठेवलें पाहिजे. बहुश्रुत कीर्तनकाराच्या तोंडून सांगितलीं जाणारीं हीं आख्यानें प्रत्यक्ष ऐकत असतांना जो आनंद रसिकांस उपभोगतां येईल तो तितक्याच उत्कटतेनें वाचतांनाहि येईलच असें सांगतां येणार नाहीं. कारण प्रसंगानुकूल असलेली पद्याची चाल, व्यक्तीच्या दर्जाला शोभेल अशी त्यांतील भाषा व विषयाला उठाव देईल, असा अर्थगौरव यांचें प्रत्यक्ष ज्ञान कविता गाइल्या जात असतांना जसें होईल, तसें वाचतांना होणें कठीण आहे. सर्व आख्यानें हीं कीर्तनाकरितांच रचिलीं गेलीं असल्यानें त्या भूमिकेवरूनच त्याचें रसग्रहण केलें गेलें पाहिजे.

महाराजांशीं ज्यांचा प्रत्यक्ष संबंध आला, त्या सर्व रसिक विद्वानांनीं हें वैशिष्ट्य निरपवादपणें मान्य केलेलें आहे. साहित्यसम्राट् न. चिं. केळकर अहल्याबाईच्या आख्यानासंबंधीं लिहिलेल्या पत्रांत लिहितात, " आपल्या कवित्वासंबंधीं वेगळें लिहिण्याचें कारणच नाहीं. तें नेहमीं शीघ्र तसेंच प्रासादिकहि असतें. तसेंच या कीर्तनांतहि आहे. कटाव चांगले साधले आहेत. एखादी आर्याहि अस्सल मोरोपंती थाटाची आढळते. पुढल्या वर्षी आपण पुण्यास याल, तेव्हां हें कीर्तन समक्षच ऐकावयास मिळाल्यास हा लेखी प्रबंध वाचल्यापेक्षांहि अधिक आनंद होईल. " भारताचार्य चिंतामणराव वैद्य लिहितात, " महिपतींनीं लिहिलेलीं संतचरित्रें घेऊन प्रसिद्ध कवि दासगणू हे स्वकृत कवितांनीं गात आहेत, हा त्यांत सुवर्ण व सुगंध असा मनोहर योग आहे. भक्तिरसप्रधान नव्या तऱ्हेची कविता करणें, यांत संततुल्य दासगणू यांचा हातखंडा आहे. वृत्तमाधुर्याबरोबर शब्दमाधुर्य व त्याबरोबरच अर्थमाधुर्य असा त्रिवेणीसंगम आणखी यांत आहे. सुंदर उपमा, रूपक, दृष्टांत इत्यादि काव्यचमत्कृतींनीं विषय मनावर ठसविण्याची दासगणू यांची हातोटी या आख्यानांतहि पूर्णपणें भरलेली आहे. पण याहि

पलीकडे कांहीं ऐतिहासिक व राजकीय कल्पनाहि या आख्यानांत आलेल्या दाखविण्यासारख्या आहेत. ”

प्राध्यापक श्री. नी. चाफेकर हे तर श्रीदासगणू महाराजांच्या आख्यान-काव्याला अगदीं मोहूनच गेलेले दिसतात. त्यांनीं महाराजांच्या काव्याला लिहिलेल्या प्रस्तावना यासाठीं जिज्ञासूंनीं अवश्य पहाव्या.

एका आख्यानाच्या प्रस्तावनेंत ते लिहितात, “ श्रावण महिन्यांत लाखोलीसाठीं पारिजातकाचीं फुलें गोळा करण्यासाठीं एखादा भाविक मनुष्य एखाद्या पारिजातकाच्या वृक्षाजवळ गेला आणि त्या वृक्षाखालीं पसरलेला दाट असा मृदुमनोहर पुष्पांचा सडा पाहिला, म्हणजे कोणतीं वेचूं, किती वेचूं हें न कळून भांबावून जातो. त्याप्रमाणेंच प्रस्तावना लिहितांना माझी स्थिति झाली आहे. संत सत्कवि श्रीदासगणू महाराजां-सारख्यांच्या उज्जवल प्रतिभा सिंचनानें विकसित झालेला अध्यात्मिक सौरभयुक्त व प्रसादपूर्ण, गद्यपद्यात्मक, रम्यपुष्पसंभार पाहिला म्हणजे माझ्यासारखा भक्तिप्रधानवाङ्मयरसलोलुप भाविक भांबावून गेला आणि हें फूल हुंगूं कीं तें हुंगूं ; कीं ओंजळींत मावतील इतकीं फुलें एकदम हातीं घेऊन त्यांचेंच आघ्राण घेत राहूं, व इतरांनाहि त्यांचा यथाशक्ति सौरभपरिचय करून देऊं अशा गोड घोटाळ्यानें त्याची मनोवृत्ति गांगरून गेली, तर त्यांत नवल तें काय ? ”

“ चरित्रांतील प्रसंग कीर्तनरूपानें सर्वसामान्य लोकांना विशेष आकर्षक व उद्बोधक होण्यासाठीं श्रीदासगणू महाराज त्या कथानकां-तील महत्त्वाच्या भागांस आपल्या भक्त्युत्कट, कल्पकतेची जोड देऊन ते ते भाग कीर्तनाच्या ओघांत जास्त उठावदार, भक्तिनिष्ठ, करुणरसपरिपूर्ण, व दिव्याद्भुतरसप्लुत होतील अशी योजना करतात. मोजक्या व मार्मिक शब्दांत हुबेहूब शब्दचित्रें श्रोत्यांच्या मनःचक्षुपुढें उभीं करणें, प्रसंगा-नुसार स्थलकालादि निरनिराळ्या व्यक्तींचीं, गोष्टींचीं, यात्रामिरवणुकींचीं, साधुसंतांच्या मेळ्यांचीं, भजनकीर्तनाचीं, दुष्काळ, साथी वगैरेच्या भीषण कहराचीं, उदात्त भावनांचीं, उदार हृदयांचीं, भावपूर्ण

भाषणांचीं, स्वराज्यकालीन शूरांचीं, वीर स्त्रियांच्या तेजस्वी व स्वार्थत्यागयुक्त थोर कृत्यांचीं चटकदार व स्फूर्तिदायक वर्णनें, साधारण जनांस प्रिय होतील असे कटाव, लावण्या, श्रुतिमनोहर संगीत वगैरेंत सहज लीलेनें योजणें इत्यादि काव्यगुणांमुळें महाराजांचीं कीर्तनोपयोगी आख्यानें हीं आदर्श आहेत, असें म्हटलें पाहिजे.”

उमरावतीचे प्रा. नारायण भूमय्या जवादीवार यांनींहि महाराजांच्या काव्यकौशल्याचीं आपल्या लेखांतून खूप स्तुति केलेली आहे. सेवक सेवानंद श्री. बाळूकाका कानिटकर श्री. महाराजांचे पुण्यास होणारे एकहि कीर्तन कधीं चुकवीत नसत. विद्वान् विद्वान् लोकहि महाराजांच्या कीर्तनानें असे मोहून गेलेले आहेत. भाविक श्रोत्यांच्या बाबतींत तर बोलावयासच नको. त्या दृष्टीनें हिमालयांतील यात्रा करून आलेले, पुण्याचे नागरिक, एकनिष्ठ शिवभक्त श्री. शंकर सखाराम दाते, यांनीं आपल्या साध्यासुध्या प्राकृत ओव्यांत महाराजांच्या कीर्तनाविषयीं काढलेले उद्गार शेवटीं उद्धृत करून हें प्रकरण आटोपतें घेतों.

“व्युत्पन्न वाणी बहुश्रुत। गायक हा रसभरित। अशांचीं कीर्तनें बहुत। श्रवणपथां येती ! ॥ १ ॥ घटपटाचे पूर्वरंग। तैसेच व्युत्पत्तीचे रंग। श्रोत्यांस गिरकावी सांग। प्रवाहीं भोंवरा जैसा ॥ २ ॥ भक्तिभावावीण कीर्तन। संमत करिती महाजन। तरी तें साक्षात् विडंबन। नारद-गादीचें ॥ ३ ॥ परी दासगणूंचें कीर्तन। असतें भक्तिभावप्रधान। श्रोता सहज होतो तल्लीन। ऐकतां संतचरित्र ॥ ४ ॥ कीर्तनीं भक्ति-रसामृत। अखंड प्रवाहें संतत। प्राशन आतृप्तिपर्यंत। इच्छाभोजनीं जैसें ॥ ५ ॥ आपण रंगे हरिकीर्तनीं। श्रोत्यास रंगवी रंगुनी। निरूपणीं वा आख्यानीं। गात गात ॥ ६ ॥ कीर्तनाचें साग्र आख्यान। तैसेंचि रचिलें कवन। चोरटें वा उसनवार। न घेतां अणुमात्र ॥७॥ तेणें भावाची उत्कटता। सहज पावे प्रकटता। बीजांकुरांची स्फुटता। आपोआप जैशी ॥ ८ ॥ टाळकरी वा साथकरी। असला वा नसला जरी। शीघ्रकवी कीर्तन करी। दासगणू

उल्हासें ॥ ९ ॥ श्रोते असोत दोनचार । किंवा गर्दी लोटो अपार । कीर्तनरंगीं फेरफार । मुळींच न दिसे ॥ १० ॥ कीर्तनीं भक्तिभाव फुलतो । सर्वत्र सुगंध भरतो ।तेणें भवताप दुरी होतो श्रोतियांचा ॥ ११ ॥ कीर्तनीं रंगतो रंगतो । आपणां विसरूनी जातो । अष्टभाव उदित होतो । ठायीं दासगणांच्या ॥ १२ ॥ भक्तिरसयुक्त आख्यान । आकर्षितें श्रोत्यांचें मन । सहज करी प्रसरण । भागवत धर्माचें ॥ १३ ॥ हा अनुभव बहुता असे । पडताळिता सांचि दिसे हातकंकणा गरज नसे । दर्पणीं बघण्याची ॥ १४ ॥ "

**४. खंडकाव्यें :**

## उद्धवागमन

'उद्धवागमन' हें महाराजांचें एक अतिशय रसाळ, भक्तिरसपूर्ण खंडकाव्य आहे. राजकार्याकरितां मथुरेंत राहावें लागलें तरी गोकुळा-वरील आपलें प्रेम अबाधित आहे. लवकरच भेटीस येतो. हा श्रीकृष्णाचा निरोप गोकुळवासी जनांस सांगण्यासाठीं उद्धव येतो. तो गोपगोपींचें श्रीकृष्णावरील अलोट प्रेम पाहून चाकित व सद्गदित होऊन परत जातो. या प्रसंगावर रचिलेलें हें छोटें पण स्वतंत्र काव्य आहे. या काव्यांत भक्तिरसाचा सुंदर परिपोष झाला आहे. श्रीकृष्णाचें मन गोकुळास राहिलें आहे. अक्रूराबरोबर मथुरेस येतांना गोकुळवासी जनांजवळ तें जामीन म्हणून ठेविलें होतें ! आणि म्हणूनच गोकुळवासी लोकांनीं श्रीकृष्णास मथुरेस जाण्यास परवानगी दिली. तें परत आणण्याची कामगिरी श्रीकृष्णानें उद्धवावर सोंपविली. ही कल्पनाच नितांतरमणीय आहे. निरोप सांगत असतांना श्रीकृष्णाचा ऊर गहिंवरला आणि त्यांनीं उद्धवास नमस्कार केला. त्यावर उद्धव म्हणतो, " देवा, इतकी काकुळती कां ? "

> **" जातों, नको स्तवुस या मज पामराला ।**
> **वृंदावनाप्रति तसें व्रजगोकुलाला ।**
> **होईल दर्शन मला व्रजवासियांचें ।**
> **जेणें हरेल अवघं मम पाप सांचें ॥ "**

गोकुळास आल्यावर श्रीकृष्णाच्या बालमित्रांचा एकेक शब्द ऐकून, आपला निरोप सांगण्याचें भानहि उद्धवास राहात नाहीं. गोपांचें श्रीकृष्णविषयक प्रेम पाहून उद्धव अगदीं भारावून जातो आणि तो म्हणतो—

**" गोपांनो, तुम्हि धन्य या त्रिभुवनीं कृष्णासवें खेळलां ।**
**योग्यां ना गवसे, असा हरि तुम्ही भक्तीबळें बांधिला ।**
**पायांची करितात आंस हरिच्या योगी तपी नी मुनी ।**
**तीं पद्में तुमच्या व्रजांत फिरलीं धेनूसवें काननीं ॥ "**

या दुसऱ्या सर्गांत श्रीकृष्णाच्या बाललीलांचें वर्णन अत्यंत सुंदर झालें आहे. विशेषतः यशोदेचें वात्सल्यप्रेम तर फारच रमणीय वाटतें. यशोदा उद्धवाला विचारते— ' उद्धवा, कृष्णाचा खेळ मी येथें जपून ठेवला आहे. तो पाठवून देण्यासंबंधीं त्याचा निरोप केव्हां येतो, त्याची मी वाट पहातें आहे. त्याला मथुरेमध्यें मनासारखी साय खावयास मिळते ना ? तुम्ही त्याला राजा म्हणा-पण- ' मला शिशुच वाटतो बहु कशास त्याच्या वया । '

तिसरा सर्ग या काव्याचा मेरुमणीच मानला पाहिजे. उद्धवाचा आणि गोपींचा संवाद फारच भावपूर्ण आहे. वक्रोक्ति, व्याजोक्ति, उपहास या सर्व अस्त्रांनीं गोपींनीं उद्धवावर व श्रीकृष्णावर शब्दांचा भडिमार केला असला तरीहि—' अननस फणसाला फार कांटे वरोनी—निघति परि गरे गे गोड त्याच्या मधोनी ! '— या उद्धवाच्या विधानाप्रमाणें गोपींनीं वापरलेल्या सर्व वक्रोक्ति, व्याजोक्ति यांतून त्यांचें श्रीकृष्णविषयक नितान्त प्रेमच प्रकट होतें. उद्धव ज्यावेळीं श्रीकृष्णाच्या विरहाचें दुःख मानूं नये म्हणून वेदान्त शिकवूं लागला,— उद्धव म्हणाला,

**" नसे हरिविणें रिता मुळिंच ठाव भूमंडळीं ।**
**नसे म्हणुन मानितां मग कसा हरी गोकुळीं ? ॥ "**

यावर राधेनें ताड्दिशीं विचारलें,

**" राधा म्हणाली मग उद्धवाला।**
**हें ज्ञान का त्या जगदात्मयाला।**
**नाहीं म्हणोनी वद पाठवीला।**
**संदेश त्यानें व्रजगोकुळाला ?॥ "**

आणि म्हणून

**" वृथा या वेदान्ता वदुनि वदनातें न शिणवी।**
**तृषा तान्हेल्याची मृगजल जगीं काय शमवी ?।**
**शिऱ्यानें बोलाच्या उदर भरतें कां कधिंतरी ?**
**स्त्रियेला चित्रींच्या कधिं न धरतां ये निज करीं ॥ "**

वेदान्ताचा फोलपणा पटविणारे हे दृष्टांत किती साधे पण समर्पक आहेत! या भडीमारापुढें उद्धवाला निरुत्तर व्हावें लागलें व शेवटीं त्याला कबूल करावें लागलें कीं,

**" अध्यात्माचें मलरहितसें ज्ञान संपूर्ण व्हाया।**
**बायांनो, हा पथचि तुमचा साधका योग्य जाया ॥ "**

चौथ्या सर्गांत उद्धव गोपींचा निरोप घेऊन परत येतो, याचें वर्णनहि हृदयंगम आहे! कांहीं कल्पना समर्पक पण विनोदी आहेत. तूं गोकुळाहून गेल्यामुळें कुंभारांचा धंदा अजीबातच बसला आहे, आणि त्यामुळें तो—

**' कधिं म्हणत फोडण्या मडकिं गोकुळीं ये हरी !'**

हा निरोप विनोदाचें एक चांगलें उदाहरण आहे. भक्तिरस याहि सर्गांत भरलेला आहे.

हें सर्वच काव्य लहान असलें तरी दासगणूंच्या काव्याचें उत्कृष्ट प्रतीक आहे. भक्तिप्रेम, ईश्वरासंबंधीं अलोट श्रद्धा, वर्ण्य विषयाचा जिव्हाळा, प्रसादपूर्ण ओघवती रचना, सूक्ष्म निरीक्षण, मार्मिक दृष्टांत इत्यादि काव्यगुण त्यांच्या इतर काव्याप्रमाणें, किंबहुना अधिक उत्कटतेनें या काव्यांत वास करीत आहेत.

पदें, लावण्या, कटिबंधादि मात्रागणवृत्तांत तर त्यांचा हातखंडा आहेच पण अक्षरगणवृत्तांतहि ते सरस रचना किती लालित्यानें करितात, याचा अनुभव आपल्याला हें काव्य वाचतांना पदोपदीं येतो.

हें काव्य भाषेमुळें सहजसुंदर झालेलें व काव्यगुणांनीं नटलेलें असूनहि महाराज काव्याचे शेवटीं ज्यावेळीं—

"ना काव्यवैभव जया कविता-प्रबंधा।
साधेंसुधें मदिय काव्य असे मुकुंदा॥"

असें शालीनतेनें म्हणत, श्रीहरीच्या चरणीं नम्र होतात, त्यावेळीं 'मंदःकवियशः प्रार्थी गमिष्याम्युपहास्यताम्' असें म्हणणाऱ्या कविकुल-गुरूचीच आठवण होते.

खंडकाव्याच्या लक्षणांच्या दृष्टीनें वरील 'उद्धवागमन' हें जसें एक खंडकाव्य आहे, त्याचप्रमाणें पोवाड्यांचेंहि मानावयास अडचण नाहीं. कारण 'खंडकाव्यं भवेत् काव्यस्यैकदेशानुसारि च।" या नियमाप्रभाणें एखाद्या विशिष्ट प्रसंगाला वाहिलेला वा एखाद्या वीररसप्रधान घटनेचें विस्तारानें वर्णन करणारा पोवाडा हा सामान्यतः खंडकाव्य आहे असें म्हणण्यास अडचण नाहीं. त्या दृष्टीनें श्री. दासगणूमहाराजांनीं तानाजीचा, झांशीच्या राणीचा, होळकरांच्या स्वारीचा, रंगपंचमीचा, ऊसाचा, कुळकर्ण्याचा, सद्यःस्थितीचा, असे एकूण आठ पोवाडे रचलेले आहेत. नोकरींत असतांना त्यांनीं लोकमान्यांवर रचलेला पोवाडा उपलब्ध नाहीं. तसेंच त्यावेळचा बाजीराव मस्तानीचा पोवाडाही मिळत नांहीं. कै. काशिनाथ नारायण साने या त्यावेळच्या शिक्षणाधिकाऱ्यांनीं त्याची फार स्तुति केली होती, अशी माहिती मिळते. पोवाड्याचा विषय आणि त्यावेळची महाराजांची आवड लक्षांत घेतां हा पोवाडा चांगलाच रंगदार असला पाहिजे असा तर्क करितां येतो.

वीररसाच्या दृष्टीनें यांतील तानाजीचा पोवाडा हा सुंदर उतरला आहे. प्राचीन काळापासून अनेकांनीं या विषयावर पोवाडे रचलेले आहेत, पण श्री. दासगणू महाराजांच्या या पोवाड्याचें स्वतःचें

वैशिष्टय आहेच. थोडी खेडवळ वळणाची, ओघवती, धांवती भाषा हें जें पोवाड्याचें एक आवश्यक अंग तें या पोवाड्यामध्यें चांगलेंच प्रत्ययास येतें. हा पोवाडा पुणें येथील श्री. मारुतराव गोंधळी यांच्यासाठीं शके १८५८ च्या श्रावण महिन्यांत महाराजांनीं मुद्दाम रचिला. आज मारुतराव गोंधळी यांचे चिरंजीव श्री. रामभाऊ आपल्या साथीदारांनिशीं मोठ्या ऐटीनें खड्या आवाजांत तो म्हणतात. पुण्यामध्यें या पोवाड्यानें रामभाऊंना बरीच प्राप्ति करून दिली आहे. यांतील वर्णनें स्वाभाविक तर आहेतच, पण क्वचित् त्यांत विनोदहि डोकावतो. किल्ल्यावर चढण्याचा दोर तुटल्यामुळें तानाजीच्या सैन्यांत थोडीशी गडबड उडाली, त्यामुळें—

"उदेभानु तो जागा झाला–पुसूं लागला लोकाला।
इसी वख्त ये गडके नीचे कौन करत है कहो कल्ला?।
खंडूजी बोले जोडुनि अपुले कर।
"सरकार राहती गडाखालीं धनगर।
वाड्यामाधिं शिरला एक वाघ दुर्धर।
म्हणुनी ती हकाटी पिटती वरच्यावर।
असा हुजुर निर्धास्त आपण कीं, भीति न धरणें चित्तांत।
नाहीं कधीं येणार गनिम तो तोंड दावण्या मुळिं येथ।"

यांतील 'वाघ' शब्दाची योजना मोठी अर्थपूर्ण आहे. त्यामुळें ऐकत असतांना स्वाभाविकपणें श्रोत्यांच्या मुखावर हास्याची एक लकेर चमकून जाते. वीरश्रीच्या दृष्टीनेंहि पुढील पंक्ति वाचण्यासारख्या आहेत. उदेभानूचा मार लागून तानाजी धारातीर्थी पडला, त्यावेळीं शेलारमामा म्हणतो—

"थांब तुझें मी उसनें घेतों वेळ नसे ही रडण्याची।
तानाजीचा घेउनि पट्टा मूर्ति धावली मामाची।
उदेभानाच्या आंगावरती दांत करकरां खाऊन।
कोठें पळसी सांग मुसंड्या, अतांच घेतों तव प्राण॥

पाजळला पट्टा, चाल केलि त्यावरी ।
तों उदेभानुच्या वार लागला शिरीं ।
गेला कापित कापित पट्टा बेंबीवरी ।
रक्ताच्या उडल्या चिळकांड्या बहुपरी ।
लोळवला तो भूमीवरती प्राण धाडिला स्वर्गांत ।
तानाजी तो वैकुंठामधें; तूं बेस्या यमलोकांत ॥ ”

झांशीच्या राणीचा पोवाडाहि वीरश्रीच्या दृष्टीनें चांगला आहे. मात्र शेवट कारुण्यमय आहे. याचे २३ चौक असून तो शके १८५९ मध्यें श्रावणांत रचलेला आहे. श्री. रामचंद्र लक्ष्मण बडगे यांच्यासाठीं महाराजांनीं याची रचना केली. त्याच्या आरंभाचें ध्रुपदच वीररसपूर्ण आणि ठसकेबाज आहे.

“ जहामर्द झांशिची राणी, सगुण गुणखनी, चमकली रणीं ।
जणूं का बिजली बादलची ।
लक्ष्मी अतुल हिय्याची जी ऽऽ जी ऽऽ जी ऽऽ । ”

ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत तत्कालिक विजयानें हुरळून जाऊन आनंदोत्सव सुरू झाला. त्याचा निषेध करीत दासगणू म्हणतात.

“ लाधला विजय अपणांस असें पाहुन ।
दीधले गादीवर रावाला बसवुन ।
गोटांत होऊं लागलें ब्राह्मण भोजन ।
दचकली राणी चित्तीं तो प्रकार पाहुन ॥
“ घालितां कशाचे लाडू ? वेळ ही कडू । नका हो पडूं, भिडेला भटाभिक्षुकांच्या ! !
विनवण्या ऐकुं नका त्यांच्या, हो जी ऽ जी ऽऽ जी ऽऽ ॥ ”

पोवाड्याच्या भाषेच्या दृष्टीनें ‘ बसला स्वराज्यास घसरा, ’ ‘ ओठिच्या मिशा गमवाल ’, ‘ शिपाई आले हातघाई ’, ‘ रणनवरे घुमूं लागले ’, ‘ रयतजन हृदयाला पिटिती ’ इत्यादि वाक्प्रयोग चिंतनीय आहेत.

रंगपंचमीचा पोवाडा हा तिसरा ऐतिहासिक पोवाडा. सवाई माधवराव

रंग खेळले, त्याचें वर्णन या पोवाड्यांत आहे. त्याचे दोन भाग आहेत. एक ऐतिहासिक व दुसरा अर्वाचीन. ऐतिहासिक भाग, या विषयावरील कोणत्याहि पोवाड्यापेक्षां वर्णनाच्या दृष्टीनें अधिक सरस आहे, असें मी विश्वासानें म्हणूं शकतों. हा संपूर्ण पोवाडा पुढें 'निवडक वेंच्या' मध्यें दिलेला आहे. तो तेथें पाहून जिज्ञासूंनीं या विधानाचा पडताळा पहावा. याच्या दुसऱ्या भागांमध्यें पारतंत्र्यांतील पुणें वर्णिलें असून त्याचें वर्णन कवि करतात—

> " ज्या शहरामधिं रंग उडाला, तेथ उडे संप्रति माती।
> विप्रमराठे ज्या शहरींचे एक ही ख्याति दूरवर।
> होती तेची बसूं लागले परस्परांच्या उरावर। "

काव्याच्या उत्तरार्धांत विद्यमान चालीरीतीवर केलेली टीका कित्येकांना रुचणार नाहीं, पण तिच्यांतील मार्मिकता नाकारतां येणार नाहीं.

> " दरबाराचें नांव कशाला फुकट सभा त्या बहु होती।
> नित्य लेखण्या व्यर्थ पाजळुनि ढवळ्यावर काळें करिती॥ "

या स्वरुपाचें वर्णन न आवडणारें असलें तरी यथार्थ नाहीं, असें कोण म्हणेल ? कुटुंबसंस्थेची वाताहात झालेल्या या काळांत—

> " मी अन् माझा नवरा याविण नको कुणाचा मज वारा।
> शिक्षणफळ हें घरंदाज हा शब्द जाहला ठार खरा॥ "

हें वर्णन वास्तवाला धरून नाहीं काय ? आज आपण स्वतंत्र झालों असलों तरी ज्यावेळीं हें काव्य रचलें गेलें, त्यावेळीं पारतंत्र्याची आंच तीव्रतेनें लागत होती, त्यामुळें—

> " तरवारीच्या विळ्या जाहल्या आला काळ किति विपरीत। "

असें कवीनें म्हणणें स्वाभाविकच आहे. कवीची स्वातंत्र्यप्रीति किती उत्कट आहे, हें पुढील ओळींतून प्रत्ययास येतें—

> " हे मत्कविते तुला न आतां नृपवैभव तें वर्णाया।
> मिळेल बाई गोदातटिं तूं चाल हरीचे गुण गाया।

फंदि प्रभाकर जोशीबुवांनीं स्वराज्यरंगासी लुटिलें ।
दासगणूला परवशतेच्या बेरंगा बघणें आलें ! ॥

फार जुन्या पिढींत वाढलेल्या पोलिसांत नोकरीचीं कांहीं वर्षे घालविलेल्या व शेवटीं पूर्णपणें भक्तिमार्गी बनलेल्या कवीचें हें स्वातंत्र्यप्रेम दासगणूंच्या वैशिष्ट्याची ओळख पटवून देणारें आहे.

स्वातंत्र्यावर एक स्वतंत्र पोवाडा दासगणूमहाराजांनीं रचलेला आहे. हा अप्रसिद्ध असून १४ चौकांचा आहे. त्याची सुरुवातच—

" स्वातंत्र्य प्राण राष्ट्राचा सर्वतोपरी ।
तें नाहिं तिथें तें राष्ट्र मढ्याच्या परी ।
स्वातंत्र्यप्रिय जो तोच म्हणावा नर ।
नावडे जया तो कुलालगृहिंचा खर ! ॥ "

अशी आवेशपूर्ण आहे. भारताचें वर्णन करीत असतांना महाराज लिहितात—

" शिवगण अम्ही, आमुचा देश धूर्जटी ।
परक्यांचें करी कल्याण अम्हां लंगोटी । "

पुढें ते म्हणतात—' आमच्या दैन्याला कारण आम्हींच. निरनिराळीं खुळें काढून आम्हींच आमचा नाश करून घेतला. दोन भावांच्या भांडणांत दोघेहि भिकेस लागून तेथेंच वकिलांचे बंगले उठावे, हें स्वाभाविकच आहे. '

" वेदोक्त स्पृश्यअस्पृश्य खुळें माजलीं ।
तेणेंच हिंदुला हीन अवस्था आली ॥
परधर्मि वेद वाचती करुन तर्जुमा ।
वाचिल्या तोच शूद्रानें पटेना अम्हां ॥
इंग्रजां घरां नेऊन बैठकीवरी ।
बसविती, तेच सारिती महारां दुरी ।
कडकडा विजेचा ध्वनी मेघगर्जना ।
ऐकून मशीदीप्रती राग येइना ॥
वाजतां कुठें संबळ सनई सुर ।
येतसे मशिद तात्काळ जोरावर ॥ "

हीं अशीं खुळें टाकल्याविना आपलें कल्याण व्हावयाचें नाहीं, असें त्यांनीं बजावून सांगितलें आहे. मोठ्या कामासाठीं सगळयांना मिळवून घ्यावे लागतें. एकाच ठिकाणीं सगळया गोष्टी होत नाहींत. कारण,

**" खाणिचा धोंडा, माळाची माति, चुनखडी।**
**जंगलचें लागे लाकूड होय तें गढी॥ "**

यासाठीं

**" परक्यास पाडण्या फूट तुम्हांभीतरी।**
**सबाबि ह्या धर्म-जातिच्या कथुं किति तरी॥**
**करण्यास एकी राष्ट्राची सबाबि ह्या जरा।**
**थोडकें करून दुर्लक्ष दूर हो करा॥**
**दुर्दर्शी, चतुर, शहाणे खरे सज्जन।**
**असतील तयां या कौन्सिलांत निवडुन॥**
**उद्यान राष्ट्र हें जाति तेथिंच्या तरू।**
**वृक्षार्थ बागेचें नका वाटोळें करूं !। "**

कायद्याविषयीं लिहितांना ते म्हणतात—

**" नियमन व्हावयासाठीं पाहिजे खरा।**
**कायदा परी तुमचाच तुम्ही तो करा॥ "**

तसेंच जो कर भरतो त्याचे अधिकार सांगतांना महाराज म्हणतात—

**" सरकार दिलेल्या काय धनाचें करी !**
**हें कसुन पहा ना भीड धरा अंतरीं। "**

सुमारें ३० वर्षांपूर्वीं रचलेला हा पोवाडा आजच्या काळींहि विचार करण्यासारखा आहे. तसेंच सर्व आयुष्य सनातन आचारांत व भजन-पूजनांत घालविलेल्या व्यक्तींचे राष्ट्रीय विचार किती उदात्त आहेत, तें या पोवाड्याच्या प्रसंगानें आपल्या लक्षांत येतें.

उसाचा पोवाडा हा उसाच्या नादानें दरिद्री झालेल्या एका शेतकऱ्याची करुण कहाणी आहे. शके १८५० सालीं उसाच्या शेतकऱ्यांना फार मोठा हाबका बसला व त्यांत अनेक घरंदाज कुळें

उध्वस्त झालीं. या सर्व परिस्थितीचें अत्यंत मार्मिक चित्रण अगदीं वस्तुस्थितीला धरून या पोवाड्यांत केलें आहे. उसाच्या धंद्यांत शेतकऱ्याला दैन्य येण्यास ज्या अनेक गोष्टी कारणीभूत झाल्या, त्यांत पाटाच्या पाण्याबाबतींत असलेली अव्यवस्था हें सरकारी कारणहि बरेंच महत्त्वाचें होतें. त्यावेळीं या पोवाड्यामुळें सरकारनें त्याची दखल घेतली व पाटाच्या पाण्याबाबत शेतकऱ्यांना कांहीं सवलती मिळाल्या. नगर जिल्ह्याच्या कलेक्टरनें वैयक्तिक रीत्या महाराजांचें अभिनंदन केलें. अशी माहिती रावसाहेब बापूराव राघोजी बोरावके यांचेकडून मिळते. त्यांनींच त्यावेळीं हा पोवाडा प्रकाशित केला. या पोवाड्यांत उसासाठीं कराव्या लागणाऱ्या अफाट खर्चाचें व त्यापासून झालेल्या तुटपुंज्या प्राप्तीचें करुणोत्पादक वर्णन कवीच्या सहृदयतेची आणि निरीक्षण-शक्तीची ओळख पटविणारें आहे. या काव्यामध्यें संदर्भानुसार आलेल्या उपमारूपकांचाहि वापर शेतकऱ्यांच्या तोंडीं शोभेल, असाच साधा, पण काव्यमय आहे. शेतकऱ्याची झालेली दीनस्थिति व सरकारनें वसुली-करितां आणलेल्या जप्तींत घरांत सांपडलेल्या मालाचें वर्णन वाचून सहृदयाच्या डोळ्यांत अश्रूच उभे राहतात. हें सर्व काव्य पुढें निवडक वेच्यामध्यें दिलेलें आहे. जिज्ञासूंनीं तें तेथें समग्रच पहावें.

‘ सद्यःस्थितीचा पोवाडा ’ याचे आठ चौक झाले असून तो अपूर्ण आहे. यामध्यें गांधीजींच्या जीवनाचा आढावा घेऊन त्यांच्या वधापर्यंतचा भाग वर्णिला आहे. गांधीजींच्या सत्य-अहिंसादि गुणांचें त्यांत सादर वर्णन केलें असून त्यांना धर्मराजाची उपमा दिलेली आहे. या प्रकरणांत ते म्हणतात––

“ अतिशय उत्तम होणें हेंही मृत्युलोकिंच्या राहटिला।
सुखद यशस्कर कधीं न होतें, तुम्ही आणणें ध्यानाला।
धर्म युधिष्ठिर अजातशत्रु सर्व गुणांचा निधि झाला।
चरित्र ज्यांचें श्रीव्यासांनीं लिहिलें ‘ भारत ’ ग्रंथाला।
कपटपटु जो ‘ दुर्योधन ’ हा धर्म ‘ सुयोधन ’ त्यास म्हणे।

कौरवपतिच्या कल्याणाला इच्छित राही सदा मनें।
त्या धर्मापरि गांधि महात्मा, उणीव कोठें ना उरली।
उच्च ध्येय जें त्यावर याची विचारदृष्टि स्थित झाली॥ "

'कुळकर्ण्यांच्या पोवाड्यां'त कुळकर्ण्यांच्या दैन्याचें वर्णन आलेलें आहे. हा पोवाडा मूळचा दहा चौकांचा होता असें कळतें, पण त्याचे दोनच चौक उपलब्ध आहेत. याची सुरवात पोवाड्याच्या अंतरंगाची ओळख पटवून देण्यास पुरेशी आहे. दैन्य आणि विनोद याचें मजेदार मिश्रण यांत आहे.

" घरघर मागा भीक अथवा कुणास बाइल विका।
परि कुळकर्णी होउं नका॥
आग लागो त्या वतनदारिला हाडं निघालीं खरीं।
नित दप्तर डोक्यावरी॥
बेरिज करितां चवदा सोळा वाळुन गेलें मुख।
आठवलें वतनदारिचें सुख॥ "

'होळकरांचा पोवाडा' हा श्रीमंत सवाई तुकोजीराव होळकर महाराजा इंदूर यांच्या मोहरमानिमित्त निघालेल्या स्वारीच्या वर्णनाचा आहे. चरित्रामध्यें याचा उल्लेख आलाच आहे. यांतील वर्णनशैली, साधी पण विषय डोळ्यापुढें प्रत्यक्ष उभी करील अशी आहे. शृंगारलेल्या हत्तींचें वर्णन पाहण्यासारखें आहे.

" लक्ष्मीप्रसाद गज स्वारीचा नानाविधशा रंगांनीं।
भूषविला हो बहुविध घालुन नग सोन्याचें महातांनीं।
भरगच्चीची झुल जरतारी कृष्ण गजावरि झळकत।
वर्षाकालीं सजल घनामधिं वीज जणूं काय तळपत।
सुवर्णपंखें कर्णिं गजाच्या मोहनमाळा कंठांत।
भव्य चांदिचे तोडे घातिले हत्तीच्या चौ पायांत।
काळा पाठा युवराजांचा हत्ति सजविला त्याचपरी।
'शिरि' नांवाचा भव्य दागिना चमचम चमके शिरावरीं।
आणीक अवांतर गज दुसरे सजविले!
त्या इतरांना नग चांदीचे घातिले।

झुलि बनातिच्या त्यावर हौदे बांधिले।
थयथया खासे वारु ते नाचुं लागले।
गळ्यांत माळा कलगि शिरावर किनखापाचें खोगीर।
पुठ्ठ्यावरतिं गोंद कांचनी बहुत मजेची पाखर॥"

सज्जांत उभे राहून समोरून आलेली एक सुंदर भव्य मिरवणूक आपण प्रत्यक्ष पहात आहों असा भास होतो. इतकें हें वर्णन वास्तवपूर्ण व रम्य आहे.

एक हिंदु राजा आपल्या मुसलमान प्रजेचें त्यांच्या सणाच्या निमित्तानें कौतुक करतो, तें पाहून महाराज हा पोवाडा लिहिण्यास विशेषतः प्रवृत्त झाले. त्यांनीं पुढें—

"यवन नृपांनीं या कृत्याला झणीं आदरें वळवावें।
धर्मभावना यासम रक्षुनि नच हिंदूंना दुखवावें !॥"

असा स्पष्ट संदेश दिला आहे.

## ५. "श्लोकबद्ध अष्टकें व स्तोत्रें":

श्रीदासगणू महाराज निरनिराळ्या देवतांच्या दर्शनासाठीं तीर्थ-यात्रेला गेले असतांना, त्या त्या पुण्यस्थलांतील देवतांच्या स्तुतिपर कांहीं स्तोत्रें त्यांनीं लिहिलीं आहेत. या स्तोत्रांतून भक्तिप्रेम, शिव, विष्णु आणि विविध देवता यांच्या स्वरूपांतील अद्वैत, याचेंच वर्णन प्रामुख्यानें आहे. क्वचित् त्या त्या स्थलाचें निसर्गवर्णनहि थोडक्यांत आलेलें आहे. बहुतेक सर्व ठिकाणीं भारतवर्षाचें मंगल होवो, अशी प्रार्थना केली आहे. देवस्थानांत न शोभणाऱ्या गोष्टी जर आढळल्या तर त्यावर टीका करून परमेश्वराकडे त्याविरुद्ध तक्रार करायलाहि मागें पुढें पाहिलें नाहीं; तर कांहीं ठिकाणीं अशा अनुचित दृश्याचा जगताची रहाटी समजण्यासाठींहि उपयोग होतो, असा संभाळून घेण्याचा प्रकारहि त्यांनीं स्वीकारला आहे. रामेश्वराची प्रार्थना करतांना ते म्हणतात—देवा,

" शूला तूं धरिलें करीं अमुचिया दैन्यास दंडावया।
दीनांची मग कां न ये अजुनिही देवाधिदेवा, दया ?।
आल्याचें तुज वृत्त वा न कळलें मी दीन दारीं हरा ?।
होतो वेळ म्हणून दैन्य अमुचें नाशावया शंकरा ॥
केला कंठमणि द्विजिव्ह अपुला जो दुष्ट दुर्वर्तनी।
त्या शेषा मग आमुची वद दया येईल रे कोठुनी ?
साह्यातें विषयीं जनां करित जो आहे महापातकी।
ऐशा त्या रजनीकरा बसविलें तूं आपुल्या मस्तकीं॥
कांता प्रस्तरजा, प्रधान बघतां नंदी पशू तो असे।
भूतें भोवतिं नाचती थयथया आतां करावें कसें ?।
यासाठीं उघडा तुम्हीच अपुला डोळा कृपेचा हरा।
बोले दासगणू किती विनविणें तुम्हांस रामेश्वरा॥
आतां ध्यान पुरे; समाधि उतरा, रक्षावया या जगा।
देवा, आर्यमहीस दैन्य-वणवा जाळीतसे हा बघा।
त्यालागीं विझवावया तुजविणें कोणीं बळी ना खरा।
बोले दासगणू ' भवीं बुडत मी मां पाहि रामेश्वरा॥ "

शंकराजवळ आपली दाद लागत नाहीं, याला कारण म्हणजे त्यांचा भोंवतालचा सहानुभूतिशून्य निष्ठुर परिवार हें वर्णन कल्पनारम्य आहे. त्यांतील शब्दयोजनाही अर्थवाही आहे. नंदी ' पशु ' आणि पत्नी ' प्रस्तरजा ' अशा शब्दयोजनेंतच कवीनें त्यांच्या कठोरपणाचा परिचय करून दिला आहे.

मदुरा-मीनाक्षीचें वर्णन करतांना—

" ब्रह्मांड तूं रचियलें जननी स्वलीलें।
तें ब्रह्म निर्गुण तुवां गुणयुक्त केलें॥ "

अशी वेदान्तांतील तत्त्वज्ञानाची कल्पना असलेलें वर्णन महाराज करितात. घृष्णेश्वराची प्रार्थना करितांना ते म्हणतात——

" चंद्रभागातटीं तूंची जघनीं ठेवुनी करा।
उभा आहेस घृष्णेशा गणुला भविं उद्धरा॥ "

शिवविष्णूंचें ऐक्य मानूनहि त्यांची विठ्ठलभक्ति या ठिकाणीं स्पष्ट होते. महांकालाला तर त्यांनीं— “ भेटा भेटा तुम्हिं विठुरूपें हीच याञ्चा गणूची ” असें स्पष्टच विनविलें आहे. या महांकालाला उद्देशून त्यांनीं असें म्हटलेलें आहे.

“ दीननाथा महांकाला। अर्जी आज करितों तुला।
तुझ्या प्राकारिं गरिबांची। हुरवावडी होते साची।
घोट्याभंग्याचे बहाद्दर। करिती गरिबांना बेजार।
गणु म्हणे पैशासाठीं। त्यांच्या अनंत खटपटी।
काळे दोरे कंठांतुन। घोटे बहाद्दराची खुण।
मला वाटे पिशाचांची। दिली भूमिका या साची।
येतां गरीब दर्शन घ्याया। त्यास धावती फाडाया।
गणु म्हणे यांचा मला। करणें उचित ना कंटाळा ॥ ”

देवदर्शनाच्यापायीं होणारी येणाऱ्या गरिबांची दैना पाहून दासगणू महाराजांना अत्यंत वाईट वाटे. त्यांनीं ते अनेक प्रसंगांतून व्यक्त केलें आहे. पंड्यांच्या उर्मटपणाचाहि ते तिरस्कार करतात, पण याचा परिणाम क्षेत्रविषयक अश्रद्धेंत होत नाहीं; हें महाराजांच्या निष्काम भाविकतेचें वैशिष्ट्य आहे. त्यांचें तत्त्वग्राही मन अशा प्रत्येक प्रसंगांतून कांहीं तरी बोध शोधतें व आपला शांतपणा टिकवितें. याच महां-कालाच्या अभंगांतून ते पुढें म्हणतात. या घोटेबहाद्दरांचा कंटाळा करणें मला योग्य होणार नाहीं. कारण—

“ धूपदाणी आणि मोरी तुझ्या प्राकाराभीतरीं।
तैसे सुष्ट आणि दुष्ट। एक्या जागीं एकवट।
मोरी पाहुन कां पाडणें ? मात्र निजला ओलांडणें।
हेंच शिकवियलें मला। येथं आणुन कंठनीला।
गणू म्हणे घेतां आतां। परत अर्जी उमानाथा।

मात्र—

बऱ्याचियाजवळ फार। ठेवा बुऱ्यापासुन दूर ॥
गोड मुखीं घाला खवा। कडू बोटानें दाखवा।

म्हणजे बऱ्या वाइटाचें। ज्ञान मजला होईल साचें।
गणु म्हणे अजाणता। नाहीं बरवी पार्वतीकांता।"

डाकूरला परमेश्वराचे नानाप्रकारांनीं भोग होतात. त्या भोगांचें सुरेख वर्णन करून महाराज पुढें म्हणतात—

"ऐशा रितीं भोग नाना। सेविशी तूं नारायणा।
काय वैकुंठांत याची। तुटी आहे तुजला साची?।
भक्त बोडाण्यानें तुम्हां। आणिलें जें पुरुषोत्तमा।
ते न शिरापुरी खाया। आणलें पतीत ताराया।
स्पर्श पदा करण्याकरितां। तिकिट लागे डाकुरनाथा।
तिकिटाची फी जब्बर। चार आणे कलदार।
तुला पैशाची ना वाण। तूंच लक्ष्मीरमण।
जैसा आम्हां दीनासाटीं। उभा आहेस भिवरातटीं।
गणु म्हणे, त्याचपरी। उभे राहा हो डाकुरीं॥"

जगन्नाथाची प्रार्थना करतांना ते म्हणतात—

"बघून अथवा मला तुजसि वाटला कां दर।
अल्यास जवळीं गणू करुनियां उताणा कर।
वदेल झणिं द प्रभो, मजसि आज कांहीं तरी।
पदाविण तुझ्या परी मज नको दुजें श्रीहरी॥"

खऱ्या भक्ताच्या हृदयांतील निष्कामता या कवितेंत दिसून येईल. तसेंच देवाशीं या तऱ्हेच्या सलगीच्या बोलण्यांतून महाराजांच्या हृदयाची भावुकता किती उत्कट आहे, याचीहि प्रचीति येते.

'ईशप्रार्थना' ही प्रदीर्घ स्तोत्रात्मक कविता आर्यावृत्तांत असून त्यांमध्यें १०० पद्यें आहेत. श्रीरंगपट्टण येथें श्री. गोविंदाची मूर्ति आडवी झोपलेली आहे, त्याची प्रार्थना करतांना भारतीय संस्कृतीचा अध:पात डोळ्यासमोर ठेवून महाराज प्रार्थना करतात कीं,

"सर्वाद्या, सर्वेशा, सर्वाधारा, रमेश, गोविंदा।
परात्परा, मलरहिता, सद्गुणधामा, सुरेश, सुखकंदा।
वैकुंठाधिपते भो, नरसिंहा, माधवा वषदकारा।
गोपीगोपप्रिय हे राधाधरमधुमिलिंद दातारा।

आतां ऊठ मुकुंदा, गोविंदा घोरणें पुरें झालें ।
त्वत्प्रिय आर्यमहीला संकटकाळें समूळ ग्रासियलें ।
तूं निजलास म्हणूनी दुःशासन काळ हा कठिण आला ।
महिरूप द्रौपदीचें विभवांबर तें हरावया धजला ।
देवा, धर्म बुडाला, सत्यपणा तो समूळ मावळला ।
स्वार्थत्यागि समाजा, नेता धार्मिक कुणी नसे उरला ॥ "

रघुराज, यादववंशांतील राजे, छत्रपति श्रीशिवाजीमहाराज, पेशवे गेले. शंकराचार्यांसारखे तत्त्वज्ञ गेले, व्यासवाल्मीकांसारखे द्रष्टे गेले; ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास यांच्यासारखे संतश्रेष्ठ गेले, कालिदासभवभूतीसारखे महाकवि गेले, चरकशार्ङ्गधरासारखे वैद्यश्रेष्ठ गेले; भास्कराचार्य, विश्वकर्मा यांसारखे शास्त्रज्ञ गेले, तानाजी, बाजी, राणोजी, बापू गोखले, यांसारखे 'निधडे वीर मुकुंदा ऐसे आम्हां दुरावले आजी !' चातुर्वर्ण्यांतील एकोपा मोडला, दशरथाच्या चार पुत्राप्रमाणें सहोदर भावासारखी निर्मिलेली वर्णव्यवस्था विस्कळित झाली, त्यामुळें दैन्य हें चक्रवर्ति रावण होऊन बसलें, परिणाम असा झाला कीं, भारतवर्षामध्यें कोणत्याहि क्षेत्रांत त्याचें प्राचीन वैभव प्रत्ययास येईनासें झालें. सर्वत्र अनाचार माजला, निलाजरेपणा तर तका वाढला कीं--

" नुसत्या जनापवादास्तव तुम्ही त्यागिली सती सीता ।
आतां निंदेची ही भीति न शिवते कुणाचिया चित्तां । "

अनाचार तर फार वाढला आहे. 'भारतवर्ष' हाच काय अशी शंका वाटते !

" व्रत ब्रह्मचर्य मेलें, बालविवाहो बळावला अवनीं ।
त्यायोगें दुबळेंपण आलें देवा, निजूं नको शयनीं ।
गोविक्रय, रसविक्रय, कन्याविक्रय धनार्थ हो करिती ।
आचार, धर्म, नीति यांची कोणां न राहिली भीति ।
जी हिंदूंचें दैवत, जी पोशी शिशुसमान सर्वांशीं ।
ती गाय माय विकली जाते सांप्रत पहा कसाबाशी ।

भगिनी नेत्रीं सलते, मेहुणिचा राहु लागला मान।
सासुश्वशुरांपुढती जननीजनकां विचारितो कोण ?।
कर्मा भाव कुठें तो ? कोठें त्याचा अयोग्यसा जोर।
कोठें भक्तिस फांटा, अंधश्रद्धेप्रती कुठें पूर !
धर्माच्या नांवावर दांभिक खल दुष्ट पोसले जाती।
धर्मायोग्य असे जन श्रीमंतांच्या मनास ना येती !
विद्यार्थी, कार्यार्थी, रोगी, पंगु, निराश्रिता अबला।
यांना नकार मिळतो, उठ अतांतरि झणीं जगत्पाला !
पेंडी सुटतां ताटें जेंवीं ती चार चहुंकडे जाती।
तैशी स्थिती अम्हांला आली हो झोप सार ही परती !
देवा, आर्य-महीचें गतवैभव आणण्यास तें परत।
उठलेंच पाहिजे तूं नातरि होतील यत्न ते व्यर्थ।
आतां हीच विनंति कर्णांतिल तुलसिपत्र काढावें।
या अमुच्या गाऱ्हाण्यां वेगें अवधान माधवा द्यावें॥ "

परमेश्वराची भक्ति ही कशी समाजोन्मुख असूं शकते, याचें हें स्तोत्र म्हणजे चांगला नमुना आहे. कवीची विशाल अनुभूति व बहुश्रुतता या काव्यांत ठायीं ठायीं प्रत्ययास येते. दलितांच्या दैन्याचें वर्णन करितांना महाराज म्हणतात—

" सदनीं पोट भरेना म्हणुनी खाद्यास धांवती उष्टें।
तेंही पोटभरसें नच मिळतें माधवा बहु कष्टें।
म्हणुनी धर्मांतर ते करिती कित्येक राघवा, रामा।
आतां गती बरी ना जागा हो सुजननिबुध-विश्रामा॥ "

तुळजापुरवासिनीची प्रार्थना करतांना ते म्हणतात, " आई, आम्ही तुझीं लेकरें; दैन्य भोगीत असतांना ' बुवा भारती ' बरोबर सारीपाट खेळण्याचें तुला सुचतें तरी कसें ?

" पुरे जननि खेळ तो समय आणणें हा मनीं –
प्रसीद परमेश्वरी मजसि नित्य कात्यायनी। "

' विठ्ठलप्रार्थना ' हें चामरवृत्तांतील २१ कवितांचें भक्तिपूर्ण असें स्तोत्र

आहे. यांत तत्त्वज्ञान, भक्ति, संतांचा इतिहास, परमेश्वराच्या सगुण रूपाचें वर्णन, भाविकता, इत्यादि सर्व गुण आहेत. महाराज म्हणतात–

"मूळ एक पादपास तूं जगास त्यापरी।
खोड, फांदि, फूल, पत्र विश्व हें तथापरी।"

सगुण रूपाचें मनोरम सौंदर्य वर्णन करतांना ते म्हणतात–

"हात ते कटीस ठेवुनी विटेस तूं उभा।
मन्मथास लाजवील साच कीं मुखप्रभा।
वत्सलांछनेंकरून वक्ष फार शोभले।
रत्नयुक्त शोभतात कर्णि हेमकुंडलें।"

शेवटीं प्रार्थना करतात कीं, देवा–

"राष्ट्रदैन्य वार, तार भाविकांप्रती सदा।
ब्राह्मणांचिया निवार दुःख, दैन्य, आपदा।
क्षत्रियांस देइ शौर्य, भीरुता निवारुनि।
वैश्य, शूद्र ठेव सुखी संपदेस देऊनि।
स्थान वर्णसंकरास मात्र येतुलें न दे।
जाति शुद्ध राखुनीच एकि शीघ्र होउं दे।"

पुढें स्वतःकरितां महाराज एकच मागणें मागतात–

"पांडुरंग, पंढरीश, पापहारि, पावना,
भक्तिसौख्य दे गणूस हीच एक याचना।"

'संतांच्या अष्टका'मध्यें अकरा श्लोक असून त्यांत निरनिराळ्या ११ संतांचीं वर्णनें आलीं आहेत. हे सर्व श्लोक, वर्णनाच्या दृष्टीनें छानच आहेत. एकेका श्लोकांत त्या त्या संताचें वैशिष्ट्य पाठकांच्या डोळ्यांसमोर उभें करण्याचें कौशल आहे. उदाहरणार्थ–श्री. तुकाराम-महाराजांवरील एक श्लोक येथें उद्धृत करतों.

"जया भंग नाहीं अशा त्या अभंगा।
रचोनी सदा गाइलें पांडुरंगा।
जयाचि यशें या त्रिलोकी अगाध।
मना वंदणें तो 'तुकाराम' साधू॥"

### ६. " ओवीबद्ध स्तोत्रें " :

भक्तिरसाच्या दृष्टीनें महाराजांनीं रचिलेलीं निरनिराळ्या देवतांवरील हीं स्तोत्रें अतिशय हृदयंगम आहेत. भक्तिप्रेमाची तन्मयता या स्तोत्रांतून उत्कटतेनें अनुभवास येते. प्रसाद हा त्याचा प्रमुख गुण आहे. पण त्यांतहि केवळ आंधळी भाविकता नाहीं. देशकालपरिस्थितीची जाणीव महाराजांची कधीं नष्ट होत नाहीं, हें या स्तोत्रांतूनहि इतर ग्रंथाइतकेंच चांगल्या रीतीनें प्रत्ययास येतें. परमेश्वराची व्यापकता सांगतांना पांडुरंगस्तोत्रांत ते म्हणतात—

**" नाना मतें नाना पंथ । जरी जगतीं अस्तित्वांत । परी अवघ्यांचें सार सत्य । तूंच एक असशी कीं ॥ निज भक्तांच्या संरक्षणा । नाना रूपें कमलवदना । धारण करून मनकामना । पूर्ण केल्यास तयांच्या ॥ ज्यांना संमत शैवमत । ते तुज म्हणती उमानाथ । वैष्णव म्हणती लक्ष्मीकांत । यवन इलाही बोलती ॥ चष्मे जरी भिन्न भिन्न । परी प्रकाशीं न फरक जाण । तैसा तूं रुक्मिणीरमण । वंद्य सेव्य सकलांशीं ॥ आब्रह्मस्तंभपर्यंत । तूंच एक रुक्मिणीकांत । तूंच सगुण गुणातीत । मायबापा विठ्ठला ॥ घटघटाच्या ठिकाणीं । तुझें अस्तित्व चक्रपाणी । तूंच अनंत होउनि । जग आणिलें आकारा ॥ "**

मूर्तीची उपासनाहि किती व्यापक असते, हें या वर्णनावरून उत्तम प्रकारें समजूं शकतें. भागवतधर्मीय संतांच्या तत्त्वज्ञानाचा हा खरोखरीच मोठा विजय मानला पाहिजे कीं, त्यांनीं निरनिराळ्या पंथोपपंथांतील द्वेष पार नाहींसा करून टाकला व सर्वांना शाश्वत सत्याच्या मालिकेंत गोंविलें. श्रीदासगणूमहाराज या सर्व समन्वयालाच ' अद्वैत–सिद्धांत ' असें समजतात. वेदांताच्या विद्वज्जड प्रक्रियेंत व परिभाषेंत न शिरतां उच्च तत्त्वज्ञान अगदीं सोप्या भाषेंत प्रकट करण्याचें संतांचें वैशिष्ट्य त्यांनींहि आपल्या वाङ्मयांतून ठिकठिकाणीं दाखविलें आहे. देवाची करुणा भाकतांना ते म्हणतात—

**" करी करुणेची पाखर । देवाधिदेवा मजवरी ॥ माझी इच्छा पुरविणें । अशक्य नाहीं तुजकारणें । दारीं मी घेतलें धरणें । आतां परतें लोटूं नको ॥**

नरदेहासी येवोनियां । जावो न तुझा दास वायां । धावण्या धांव पंढरीराया । निष्ठुर कदा होऊं नको ॥ मी हीनदीन अज्ञानी । परी संग्रहा ठेवी चक्रपाणी । तुझ्या पदरीं बांधलों जाणीं । आतां न बरें वाईट म्हणे ॥ सज्जनांचा उद्धार । केल्या न नवल साचार । मजसारिखा पापागार । उद्धरिल्या होय कीर्ती ॥ "

या प्रार्थनेंत केवळ ' सांप्रदायिकता ' नाहीं. जिव्हाळयाची ओढ यांतील शब्दांशब्दांतून प्रगट होत आहे.

' व्यंकटेशस्तोत्रा'मध्यें व्यंकटेशाच्या सगुण मूर्तीचें अलंकारिक वर्णन करतांना महाराज म्हणतात—

"नाना ब्रह्मांडें हाच गिरी । चैतन्य जें जें तूं हरी । येथ तुझे हस्त चारी । धर्म अर्थ काम मोक्ष । चारी वेद तुझें वदन । उपनिषदें हाच प्राण । पूर्वोत्तरमीमांसा जाण । पाठोपाठ देवा, तुझे ॥ मत जें कां अद्वैत । तोच तुझा मुकुट शोभत । द्वैतसिद्धांत झळकत । वत्सलांच्छन हृदयावरी ॥ विशिष्टाद्वैत पीतांबर । वल्लभमत शेला सुंदर । जगद्रूप-देहावर । धारण केलास व्यंकटेशा ॥ "

निरनिराळया धर्मासंबंधीं सांगतांना येथेंहि पारशांपासून मुसलमाना-पर्यंतच्या सर्व धर्मांना एकाच ईश्वराचें अधिष्ठान असल्याचें विशद केलें आहे. उदा.—

"कोठें समूळ जटेचा त्याग केला । अल्ला इलाही तुम्हीच बनलां । वेदाऐवजीं निर्मिला । कुराण तेथें तुम्हींच ॥ कोठें बनून अहिंसक । झालांत जैनमताचें पोषक । कोठें नीति व्यावहारिक । बौद्ध होऊन सांगितली ॥ कोठें झगा घातिला । शांतपणाचा कळस केला । कोठें होऊन राहिला । पारशांसाठीं अग्नि तुम्ही ॥ "

या सर्वांचें एकत्व कोणत्या स्वरूपाचें आहे, याचें स्पष्टीकरण एका उपमेच्या द्वारां महाराजांनीं केलें आहे.

" जरी गोदेचे पाट फुटले । परी न तिशी पारखे झाले ।
दृष्टीकारणें अनेक दिसले । परी जलें एकची ॥ "

व्यंकटगिरीवरचें ऐश्वर्य, देवाला होणारे उपचार, दर्शनासाठीं यावे

लागणारे कर, हें सर्व दासगणूमहाराजांच्या सरल भक्तिभावाला न रुचणारें असल्यानें देवालाच उद्देशून आपुलकीच्या भावानें सलगी करीत ते म्हणतात–

" त्या श्रीरामावतारा। चैनीस फांटा दिधला खरा।
म्हणून हव्यास साजिरा। तुम्हा सुटला गिरीवरी !॥
श्रीकृष्णावतारीं गोकुळीं। पाऊलें तुमचीं सवंग झालीं।
त्याची कां काढिली। उणीव येथें भरून ?॥ "

कां पंढरपूरला आल्यापासून निरनिराळ्या भक्तांसाठीं तुम्हांला फारच कष्ट करावे लागले–कोणाचें दळण दळलें, कोणाचें शेत राखलें, कोणाच्या घरीं पाणी वाहिलें–सर्वस्वीं आपलेपणाला मुकावें लागून सेवकाचेच सेवक बनावें लागलें, यासाठीं–

" या अवघ्याच कृत्याचा। विचार येथें केला साचा।
महिमा क्षेत्रगिरीचा। केलात कांहीं निराळा॥
बरें झालें विश्रांति। तुम्ही येथं घ्या श्रीपति।
परी येथेंही तुम्हांप्रती। भक्त ते सोडतील।
येथें तूं दारें लाविसी। तैसाच रहा हृदयासी।
कां कीं संवय हृषीकेशी। कोंडून घेण्याची लागली तुज॥
तुला स्नान घालावया। बंदी आम्हांस ये ठाया।
परी प्रेमाश्रूनें प्रक्षाळाया। अधिकार आम्हां केव्हांही॥ "

यांतील शेवटच्या दोन ओव्यांतील कल्पना भक्तिभावाच्या दृष्टीनें अत्यंत श्रेष्ठ मानल्या पाहिजेत. ईश्वरविषयक निष्ठा यामध्यें उत्कृष्टपणें दिसून येते.

कोल्हापूरच्या महालक्ष्मीचें स्तोत्र गात असतांना साधकाच्या दृष्टीनें परमार्थाला अत्यंत उपयुक्त अशा भूमिकेचा आविष्कार करण्यासाठीं महाराज लिहितात–

" क्षमा दया आणि शांति। तितिक्षा आणि उपरति।
या पंचगंगा जेव्हां येती। एकवटून जगदंबे॥
तेव्हांच तुझे दिव्य चरण। लाधती साधकाकारण।
ऐसीं कळवावया खूण। वास पंचगंगातिरीं॥ "

वेदांताच्या दृष्टीनें पुढील ओव्या किती बोधप्रद आहेत व अगदीं सोप्या नि साध्या शब्दांत वेदांतांतील गूढ प्रमेयेंहि महाराज अगदीं सहजपणानें कशीं विशद करतात, तें कळून येईल–

" कांहीं नाहीं ऐशी स्थिती । या ब्रह्माची निश्चितीं । ती तूं नटविली बहुतां रितीं । काय वानूं प्रभाव तुझा ॥ जें या जगताचें दिसणेंपण ! तेंच तुझें स्वरूप पूर्ण । नांवारूपालागुन । तुझ्याविणें गति नसे ॥ सूर्य आणि प्रभेंत । फरक नाहीं यत्किंचित । परी प्रभेमुळें कळून येत । सूर्य अमका म्हणोनी ॥ तेवीं तव कर्तृत्वें भला । ईश ज्ञात्यांस कळून आला । शेवटीं ज्ञाता तोहि नुरला । समरस झाला वस्तूशीं ॥ "

स्वतंत्र ग्रंथ लिहूनहि ब्रह्ममायेच्या संबंधांचें स्पष्टीकरण अपुरेंच वाटावें, अशी जेथें वस्तुस्थिति आहे, तें तत्त्वज्ञान शंकराचार्यांच्या ' श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रंथकोटिभिः । ' या प्रतिज्ञेप्रमाणें महाराजांनीं तीन चार ओव्यांतच स्पष्ट केलें आहे, असें मी म्हटलें तर अतिशयोक्ति केल्यासारखें होईल, असें मला वाटत नाहीं. जगदंबेची मानसपूजा करीत असतांना महाराज लिहितात—

" मद्भक्तीचें सिंहासन । घे हें बसाया कारण । प्रेम माझें हेंच जीवन । तव स्नानार्थ आर्पितों ॥ सुमनें तुझ्या स्तुतीचीं । अर्पितों मी तुला साची । हीं मान्य करीं अनाथाचीं । नाहीं ऐसें म्हणू नको ॥ अहंकार हा कापुर । वासना-वाती साचार । ओवाळुनि निरंतर । अष्टभावें नमिन तुला ॥ "

शेवटीं बालकानें आईजवळ कांहीं तरी मागितलेंच पाहिजे, नाहीं तर आईलाच शेजारीपण येईल—

" म्हणून अंबे, तुजप्रत । मागतों मीं हें सत्य ।
असो मजला संगत । नित्य साधूसंतांची ।
भजनीं प्रेम सदा वाढो । लक्ष हरीच्या पायीं जडो ।
अहंकार अवघा झडो । कृष्णपक्षाच्या चंद्रापरी ॥ "

' मोहनीराजस्तोत्र ' हें महाराजांनीं नोकरींत असतांनाच रचिलेलें आहे. शके १८२५ मध्यें हें रचलें असून भक्तिस्तोत्रांतील हें पहिलें स्तोत्र

आहे. रचनेची ठाकठीक, शब्दांचा साधेपणा व भाषेचा प्रसाद या दृष्टीनें हें केवळ गर्भावस्थेंतीलच मानलें पाहिजे. पूर्वीच्या कांहीं स्तोत्रांचें अनुकरण करण्याचा प्रयत्नहि यांतील शब्दरचनेवरून स्पष्ट दिसतो, पण यांतहि महाराजांच्या एकूण मनोवृत्तीचें प्रतिबिंब अस्पष्टपणें कां होईना, पण पडलेलें आहेच. त्यामुळें त्यांच्या वृत्तीची भाविकता आरंभापासून किती उज्ज्वल होती, तें दिसून येतें.

> "जैसी ज्याची भावना। तैसा त्या तूं नारायणा।
> पूर्ण करिशी मनकामना। निजभक्तांच्या अत्यादरें।"

पूजेच्या संबंधींची आपली असमर्थता प्रकट करतांना महाराज लिहितात—

> "ब्रह्मांड ज्या पदांसी। पुरलें नाहीं हृषीकेशी।
> त्या पदां मी पुसण्याशी। वस्त्र कोठून आणावें ?।
> जें मृगनाभीहून आगळें। सुगंधमय पदकमळें।
> त्यांसीं लावावया भलें। गंध कोठून आणावें ?।
> काय ठेवूं नैवेद्यासी। विश्वही तुझ्या मुखासी।
> पुरलें नाहीं हृषीकेशी। दक्षिणा तुज काय देऊं ? ॥"

शेवटीं ते म्हणतात—

> "आतां फार बोलूं काय ? शीघ्र दावी तुझे पाय।
> तूंच माझा बापमाय। तारि तारी भगवंता ॥"

'गायत्रीस्तवाचा' परिचय मागें व्यक्तिविषयक भागांत येऊन गेलेलाच आहे.

अंबिकास्तोत्रामध्यें देवीच्या निरनिराळ्या अवतारांतील कृत्यांचें, तिच्या निरनिराळ्या रूपांचें सविस्तर वर्णन आलें आहे. कवीच्या बहुश्रुततेची साक्ष त्यामुळें पटते. एकांत अनेकत्व वा अनेकांत एकत्व पहाण्याचें दासगणूमहाराजांच्या आवडीचें संतप्रणीत तत्त्वज्ञान यांतही मांडलें गेलें आहेच. देवीचें अनुष्टुप् छंदांतील अष्टकहि यामध्यें आलें आहे. देवीच्या निरनिराळ्या रूपांचें उग्र वा मनोहर वर्णनहि

विषयानुरूप भाषेंतून या स्तोत्रामध्यें केलेलें आढळतें. महाकालीचेंच वर्णन पहा ना—

“ कोण्या स्थळीं भद्रकाळीं । नामाभिधा तूं धरिली ।
अंगकांती सांवळी । दांत दाढा भयंकर ।
असुरांतडीं घातलीं गळां । मुखामधून चालल्या ज्वाळा ।
कटीं भवतीं निंबपाला । धारण केला कालिके ।
भाळीं विराजे सिंदूर । कच मोकळे पाठीवर ।
नानाविध फणीवर । कंठीं मनगटीं रूळती तुझ्या ।
भूतें नाचतीं सभोंवार । घेऊन भळंदी डोक्यावर ।
उदो उदो हा वरचेवर । ध्वनी गंभीर करिताती ॥ ”

जगदंबेच्या पीठांचें वर्णन करीत असतांना एखाद्या गोष्टीचें वर्णन करण्यासाठीं किती विविध प्रकारची माहिती महाराजांनीं गोळा केलेली असते, तें दिसून येतें. जगदंबेचीं स्थानें सांगतांना ते लिहितात—

“ पावागड हिंगलाज कलकत्ता । गड चांदे माहूर तत्त्वतां ।
तैसेंच बालेघाट प्रांता । स्थान तुझें तुळजापुर ॥
अंबे जोगाई बोधन । गुहागर करवीरपट्टण ।
दक्षिणदेशा लागुन । पीठ मदुरा मीनाक्षी ॥
तेलंगणामाझारीं । सप्तगोदावरीं तिरीं ।
पेडगुंडा नामें पुरीं । स्थान कनकेश्वरीचें ॥
उज्जनी पंढरी अमरावती । ऐशा तुझ्या अनंत विभूति ।
त्या वर्णन करितां निश्चितीं । मति माझी कुंठित ॥ ”

हा साक्षेपीपणा अत्यंत जुन्या वळणांत वाढलेल्या श्री. दासगणू-महाराजांच्या ठिकाणींहि आढळून येतो. आधुनिक सुशिक्षित म्हणविणाऱ्यांनींहि त्यापासून धडा घ्यावा, असें त्याचें वैशिष्ट्य आहे.

संतस्तोत्रांमध्यें साधारणपणें २५० संतांचा उल्लेख आहे. संतांचें वर्णन करणें, हें तर महाराजांच्या जीवनाचें ध्येयच असल्यानें या ठिकाणीं त्यांच्या वाणीला प्रसादप्रेमाचें भरतें आल्यासारखें दिसतें. संतांचीं नांवें उल्लेखितांना त्यांत कोणत्याहि प्रकारची आवडनिवड

महाराजांनीं ठेवली नाहीं. सर्व प्रकारच्या जाति, धर्म, पंथ, संप्रदायांतील पुण्यपुरुष या ठिकाणीं महाराजांनीं नमनपूर्वक उल्लेखिलेले आहेत. शेवटीं तर ते म्हणतात—

"**आतां भरतखंडाबाहेरी। जे जाहले साक्षात्कारी।**
**तयांनाही अत्यादरीं। नमन माझें हें असो !**
**वा कालावधींकरून। जे कोणी संतजन।**
**होतील भूवरीं अवतीर्ण। नमन माझें असो त्यां !**"

स्वतःच्या काव्याविषयीं लिहितांना ते म्हणतात—

"**या स्तोत्ररूपीं देव्हाऱ्यांत। म्यां हें अवघे बसविले संत। आतां घालूं दंडवत। तयांचियां पदांसीं। मराठीरूप पांगाऱ्याचा। म्यां देव्हारा मांडिला साचा। गीर्वाणरूपी चंदनाचा। कोठून आणूं बापहो ?। परी तो मान्य करून। आपण बैसलांत येऊन। तेणें तोषलें माझें मन। दीनवत्सल साधू तुम्ही॥**"

प्रार्थना करितांना शेवटीं ते लिहितात—

"**तुम्ही माय मी लेंकरूं। तुम्ही गाय मी वासरूं।**
**मी मत्स्य तुम्ही सागरू। माझे आधार तुम्हीच।**
**बहु अनिवार माझें मन। तेवढें तुम्ही करा जतन।**
**आपुल्यापाशींच ठेवून। घ्या घ्या बापहो तयांसी॥**"

'सांईनाथस्तवनमंजिरी' हें १६३ ओव्यांचें छोटेंसें स्तोत्र प्रासादिक आणि लोकप्रिय आहे. याच्या दहा आवृत्त्या निघाल्या, यावरूनच हें स्पष्ट होतें. श्रीदासगणूमहाराजांची ज्यांच्यावर निरतिशय श्रद्धा आहे, अशा श्रीसांईनाथांचें स्तवन काव्यमय भाषेंत येथें केलेलें आहे. श्रीदासगणूमहाराजांच्या संतविषयक कल्पना या स्तोत्रांतून अगदीं स्पष्ट शब्दांत त्यांनीं मांडल्या आहेत. संतांच्यावर त्यांनीं गोदावरीचें रूपक केलें आहे. सर्वच जीव परमेश्वराचे अंश असले तरी त्यांच्यांत योग्यतेनुरूप फरक राहतो, असें श्रेष्ठ तत्त्वज्ञानाचें व्यावहारिक अंग सांगत असतांना जलाची उपमा घेऊन ते म्हणतात,

" जल मेघगर्भीचें । एकपणें एक साचें ।
अवतरणें भूवरी होतां त्याचें । भेद होती अनेक ॥
जें गोदेच्या पात्रांत । तें गोदा म्हणून वाहिलें जात ।
जें पडे कूपांत । तेथें न त्याची योग्यता ॥
संतरूप गोदावरी । तेथील तुम्हीं आहां वारि ।
आम्ही थिल्लर कूप सरोवरीं । म्हणून भेद तुम्हां आम्हां ॥ "

पुढें ' संतरूप गोदावरीचें ' उदात्त, भव्य, पण तितकेंच मनोहर रूपक रचून महाराज म्हणतात—' जगताच्या आरंभापासून गोदा वहातेच आहे, पात्राहि त्यावेळेपासून जलानें पूर्ण भरलेलें आहे; त्याचें पावित्र्यहि अखंड आहे, परंतु,

" प्रत्येक संवत्सरीं । जुनें जाऊन नवें वारि । येत पात्राभीतरी । तोच न्याय तुम्हां ठाया ॥ शतक तेंच संवत्सर । त्या शतकांतील साधुवर । हेंच जल साचार । नाना विभूति ह्या लाटा ॥ या संतरूप-गोदेसी । प्रथम संवत्सरासी । पूर आला निश्चयेंसी ॥ सनतसनक सनंदनाचा । मारुती नारद तुंबर । ध्रुव, प्रह्लाद, बलि नृपवर । शबरी, अंगद, वायुकुमार । विदुर, गोपगोपिका ॥ ऐसे बहुत आजवरी । प्रत्येक शतकामाझारीं । पूर आले वरच्यावरी । ते वर्णण्या असमर्थ मी ।। या सांप्रतच्या शतकांत । संतरूप गोदेप्रत । आपण पूर आलांत । साईनाथा निश्चयें ॥ "

महाराजांची संतविषयक कल्पना किती भव्योदात्त आहे, तें या रूपकावरून कळून येईल. इतक्या उदात्त दृष्टीनें महाराज आध्यात्मिक तत्त्वज्ञानाकडे वा संतमहंताकडे पाहात असल्यानें त्यांच्या सर्व काव्याला विलक्षण गोडवा आलेला आहे. सुशिक्षितहि या उदात्ततेमुळेंच भारावले जातात.

## श्रीगजानन प्रार्थनास्तोत्र

यांत शेगांवच्या श्रीगजाननमहाराजांचें स्तवन केलें आहे. गजानन-महाराजांविषयींचे अनेक लहान मोठे चमत्कार यांमध्यें गोविलेले आहेत. गजाननमहाराजांना ते नम्रपणें म्हणतात,

> "जें जें तुम्ही वदवाल कांहीं। तेंच लिहीन कागदीं पाही।
> स्वतंत्रता मजला नाहीं। मी 'पोसणा' तुमचा असें॥"

प्रसंगानें लोकमान्यांविषयीं लिहितांना महाराजांनीं त्यांना गीतेच सहावे भाष्यकार म्हटलेलें आहे.

> "गीतेचा अर्थ कर्मपर। लावी बाळ गंगाधर।
> त्या टिळकांचा अधिकार। वानाया मी समर्थ नसे॥
> मागील टीका समयानुसार। अवतरल्या या भूमीवर"
> तैसाच आहे प्रकार। या गीतारहस्याचा॥"

शंकराचार्यांचे परमभक्त व पंढरपूरचे निष्ठावंत उपासक असूनही लोकमान्यांच्या कर्मपर गीतारहस्याविषयीं आदर बाळगतात व प्राचीन श्रेष्ठ भाष्यकारांच्या पदवीस त्यांना नेऊन बसवितात, हें महाराजांचें वैशिष्ट्य लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

गजाननमहाराजांच्याजवळ मागणें मागतांना ते म्हणतात--

> "आपुली लीला कस्तुरी। मम वाणी मृत्तिका खरी।
> परी मान पावेल भूमीवरी। सहवासें त्या कस्तुरीच्या॥
> माझें भाग्य धन्य धन्य। म्हणून तुमचे पहिले चरण।
> आतां न यावें लोटून। परतें दासगणूला॥
> आपुल्या कृपेंकरून। सानंद राहो सदा मन।
> सर्वदा घडो हरिस्मरण। तैशीच संगत सज्जनांची॥"

'गोदास्तोत्र' हें १३ कवितांचें एक छोटेखानी पण रसाळ स्तोत्र आहे. गोदावरी हें महाराजांचें आराध्य दैवत. संतांच्या खालोखाल जर त्यांनीं कुणाचा विशेष आदर केला असेल तर गोदावरीचाच. म्हणून या स्तोत्रांस आपुलकीमुळें एक वेगळीच माधुरी आलेली आहे. गोदावरीचें श्रेष्ठत्व किती साध्या नि सोप्या पद्धतींत त्यांनीं गाइलें आहे, तें दर्शविण्यासाठीं नमुना म्हणून ही एकच कविता पहा—

> "माय माझी गोदावरी। राहे त्र्यंबकाच्या शिरीं।
> माझ्या गौतमीचें तीर। प्रतिवैकुंठ साचार॥

तिचें पाहातांच नीर । वेडा होतो शारंगधर ।
गणू म्हणे गोदामाई । तुझ्या कांठीं ठाव देई ॥ "

**७. स्फुटपदें :**

बोधपर व तत्त्वज्ञानपर अशीं सुमारें १०० स्फुट पदें महाराजांनीं लिहिलेलीं आहेत. कीर्तनसमयीं पूर्वरंगाच्या आधारासाठीं यांतीलच पदें म्हणण्याची पद्धति आहे. महाराजांच्या अनुभूतीची गंभीरता आणि विशालताहि या पदांतून प्रत्ययास येते. अनेक निरनिराळे विषय त्यांनीं या पदांतून हाताळले आहेत. परमार्थसाधनाच्या दृष्टीनें आवश्यक असलेल्या जवळ जवळ सर्व मुद्द्यांची चर्चा या पदांतून आलेली आहे. या स्फुटपदांना उद्देशून पंढरपूर येथील प्रसिद्ध वकील श्री. ना. म. अत्रे हे लिहितात कीं, " श्री. दासगणूमहाराजांचें हृदय हें भक्ताचें हृदय आहे. ते उच्चप्रतीचे कवीहि आहेत. भक्तीच्या कथा निघाल्या कीं त्यांचे ठिकाणीं अष्ट सात्त्विक भाव जागृत होतात. भगवद्भक्ति हा केवळ त्यांचे मनाचाच नव्हे तर जीवनाचाहि स्थायी भाव होऊन बसला आहे. त्यामुळें एका भक्तानें तळमळीच्या अंतःकरणानें स्नेहार्द्र दृष्टींतून आजूबाजूस पाहिल्यावर जे उद्गार उत्स्फूर्त झाले तें हें त्यांचें काव्य. या पदांवरून आपणांस असें दिसून येईल कीं श्री. दासगणू महाराज हे कांहीं अस्पष्ट ध्येयवादी वा निव्वळ हवेंत विहार करणारे कवि नव्हेत. ते समाजाशीं एकरूप झाले आहेत. समाजांतील सुखदुःखें त्यांनीं पाहिलीं आहेत. अनुभविलीं आहेत. त्यांचीं कारणें शोधून काढलीं आहेत. त्यावर उपाययोजनाहि सुचविली आहे. समाजाचा अभ्युदय धर्मावांचून होणार नाहीं, असें ते ठामपणें म्हणतात. त्याचें स्वरूप मात्र सांप्रदायिक नसून ' जें करणें असेल तें खरें करा तत्त्वतां ' असें अत्यंत व्यापक आणि पूर्ण व्यवहारी आहे. " क्षमा दया वाढते जया बळें शशिसम एकएक कळा गणु म्हणे अशाच भजनीं वळा ! " हें त्यांनीं सांगितलेलें भजनाचें स्वरूप वा ' गणु म्हणे ज्ञान

आणि कृति जेथ नांदती। तेथेंच स्थिरावें मन। घरिं चालत ये श्रीपती.' हें ईश्वरप्राप्तीचें साधन दृष्टि समाजोन्मुख असल्याविना सांगतां येणार नाहीं. दंभाला फाटा, सन्नीतीचा आचार आणि अद्वेष्टे मन असल्यावांचून हरीची भक्ति संभवतच नाहीं, असें महाराज म्हणतात तें विचार करण्यासारखें आहे. समाजांतील अनाचारानें ते व्याकूळ झालेले दिसतात. 'भाई सावध व्हा' या कटावांत त्यांनीं जागल्याची भूमिका पत्करून समाजांतील दोष हळूवारपणें पण स्पष्ट रीतीनें दाखविलेले आहेत. हे फटके हृदयाचा ठाव घेणारे आहेत. मातेनें चूक दाखवावी तसें दासगणूंनीं केलें आहे. त्यांत जिव्हाळा आहे. सहानुभूति आहे व केवळ दोषदर्शन नसून उपाययोजनाहि आहे. प्रसाद गुण तर सर्वच पदांत ओतप्रोत भरलेला आढळतो."

'अनेकांचीं तीं अनेक मतें' आणि 'काय करावें हरि बघण्या कोठें जावें' (वेचा ६१, ६२) यांत महाराजांच्या बहुश्रुतपणाचा आणि मार्मिक निरीक्षणाचा प्रत्यय येतो. आर्यसमाजी, प्रार्थनासमाजी, थिऑसफी इत्यादि मतप्रणालींतील ग्राह्यभाग व त्या पंथाच्या मर्यादा या दोन ओळींतच त्यांनीं अचूकपणें स्पष्ट केल्या आहेत. महाकवीचें लिखाण 'हें साधुसंदेशपदा सरस्वती.' या स्वरूपाचें असतें असें म्हणतात, त्याचा दाखला या ठिकाणीं मिळतो. असो.

सर्व पदांचा प्रत्येकीं साधा परिचय देणेंसुद्धां या ठिकाणीं अशक्यप्राय आहे. हीं सर्व पदें बहुतांशीं 'निवडक वेंच्यां' त प्रसिद्धिलीं आहेत. तीं वाचूनच रसिक जिज्ञासूंनीं आपलें मत स्वतंत्रपणें बनवावें.

### ७. शिष्योपदेश :

उपदेशपर प्रकरणांमध्यें 'शिष्यबोध' आणि 'छात्रबोध' हे दोन ग्रंथ महत्त्वाचे आहेत. आपल्या शिष्यांना सन्मार्गदर्शक होण्यासाठीं हीं ओवीबद्ध प्रकरणें महाराजांनीं रचिलेलीं आहेत. परमार्थाला उपयोगी पडणारें, सद्धर्माचरण व व्यवहाराला आवश्यक असा शिष्टाचार यांना

सारखेंच महत्त्व देऊन जीवनसाफल्याच्या दृष्टीनें आवश्यक तो सर्व उपदेश या ठिकाणीं आलेला आहे. वानगीदाखल पुढें कांहीं ओव्या उद्धृत केल्या आहेत.

"भौतिक जगाचे व्यवहार । सांडावे न साचार । ते निरर्थक जरी असार । तरी पाळले पाहिजेत ॥ आंबा लिंबू डाळिंबाची । साल, कवटी नारळाची । जरी निरर्थक आहे साची । परी तिचें असणें अवश्य ॥ तैसाच हा व्यवहार । परमार्थाची साल थोर । त्या सालीचा विचार । करून वागावें सर्वदा ॥ 'साल' निरर्थक ना म्हणावी । अथवा कंठींही न बांधावी । तारतम्यानें करावी । त्याची छाननी सर्वदा ॥"

कीर्तनासंबंधींचे नियम महाराजांनीं अत्यंत उच्च भूमिकेवरून सांगितलेले आहेत. कीर्तन कसें असावें, याचें स्पष्टीकरण करतांना ते सांगतात—

"लोकसंग्रहा लोकरंजन । कांहीं अंशीं अवश्य जाण । परी तें साधाया कारण । आपुली पायरी सोडूं नये ॥ नकला विनोद तमाशा । गायनाचा संगीत जलसा । आवडे लोकांच्या मानसा । परी तें पाप कीर्तनीं ॥ नेमस्त गायन करावें । विनोद सभ्य असावे । प्रौढ गंभीर बोलावें । थिल्लरता न शिवूं द्यावी ॥ संतोष संभावित सज्जनांचा । वक्तृत्वानें साधणें साचा । हलकटांच्या वहाव्वाचा । वत्सा, लोभ धरूं नको ॥ तरीच तें कीर्तन । तेणें पावें रुक्मिणीरमण । चित्तवृत्तीस समाधान । अक्षयींचें लाभतें ॥ जातिमत्सर करूं नये । परी जात्यभिमान सोडूं नये । कर्ममार्गास लावूं नये । बोट काळें केव्हांही ॥ परी कर्म पसारा । उगाच वाढवूं नये खरा । तो न प्रिय शार्ङ्गधरा । हें ध्यानांत ठेवावें ॥ योगमार्ग योग्यांचा । तो न गृहस्थाश्रमी लोकांचा । परी तो टवाळीचा । विषय केव्हांही करूं नये ॥ निन्दा द्वेषमूलक । यानें न विटाळावें मुख । सारासार विचार देख । केव्हांही न सोडावा ॥ लोकाग्रहाकारण । फारसें न करावें कीर्तन । तीच संवय जाहल्या जाण ॥ बोजवार होय पुढें ॥ नित्यनेमाचीं कीर्तनें । करावीं कीं आनंदानें । क्वचित आग्रहाकारणें । मानावें स्नेहीमंडळींच्या ॥ कीर्तनाच्या धंद्यावरी । पोट आपुलें कधीं न भरी । ती विद्या साजिरी । सोवळीच ठेवावी ॥"

विचारांचा समतोलपणा महाराज उपदेशप्रसंगीं किती कटाक्षानें पाळतात, तें या ओव्यांवरून सहजतेनें लक्षांत येतें.

## अमृतानुभव

### ८. टीकाग्रंथ :

श्री. दासगणूमहाराजांनीं आतांपर्यंत एकूण सहा टीकाग्रंथ लिहिलेले आहेत. त्यांतील 'अमृतानुभव' हा ज्ञानेश्वरांचा ग्रंथ त्यांनीं आपल्या 'भावार्थमंजिरी' टीकेनें पुष्कळच सुबोध केला आहे. ग्रंथाचा मूळ प्रतिपाद्य विषय जें जीवब्रह्माचें ऐक्य तो सामान्य वाचकांच्या दृष्टीनें मुळांतच दुर्बोध आहे. त्यांतहि ज्ञानेश्वरांच्या अत्यंत गूढ अनुभवाच्या अस्फुट व्यक्तीकरणानें, भाषेच्या जुनेपणामुळें आणि मांडणीच्या नाविन्यानें तो समजण्यास अधिकच कठिण जातो. अर्थ विशद करण्यासाठीं शिव-कल्याणापासून आजपर्यंत यावर अनेक स्पष्टीकरणात्मक टीका लिहिल्या गेल्या, पण त्या सर्वांतहि श्री. दासगणूमहाराजांच्या 'भावार्थमंजिरी'चें वैशिष्ट्य लक्षांत घेण्यासारखें आहे. त्यांच्या मूळच्याच प्रासादिक वाणीचा आणि उच्च कवित्वशक्तीचा प्रत्यय या ठिकाणींहि पदोपदीं येतो. या ग्रंथावरील अभिप्रायांत 'ज्ञानप्रकाशकार' म्हणतात— "शिवशक्तीची अभिन्नता, सद्गुरुमहिमा, आत्म्याची अवर्णनीयता, अज्ञान-खंडन, ज्ञानखंडन, जीवन्मुक्तस्थिति, इत्यादि १० प्रकरणें या ग्रंथांत आहेत. मुळांतील ओव्यांची संख्या ८०५ असून त्यांचें दासगणूंनीं आपल्या रसाळ वाणीनें ३१६९ ओव्यांत स्पष्टीकरण केलें आहे. निरूपणार्थ त्यांना ज्ञानेश्वरमहाराजांची ओवीच आधारभूत घेतली असली, तरीहि अनेक उपमा–दृष्टांतांनीं खुलविलेलें त्यांचें स्पष्टीकरण हें स्वतंत्र काव्य या दृष्टीनें मनोरम असें आहे. वेदांतासारखा गंभीर व सामान्य माणसाच्या दृष्टीनें नीरस असा विषय आपल्या शब्दसंपत्तीनें व आकर्षक भाषासरणीनें दासगणूंनीं अत्यंत मनोवेधक केला आहे. ग्रंथांतील निवडक अवतरणें देऊं म्हटल्यास फारच विस्तार होईल. दासगणूंच्या भाषेचा

ओघ किती सरस व अप्रतिहत चालतो, हें दाखविण्यासाठीं एकच उदाहरण देतों. प्रकरण ९ मध्यें आत्मज्ञान झाल्यावर मनुष्य सर्व भावविवर्जित कसा होतो, याचें वर्णन करीत असतांना दासगणू म्हणतात—

> " चंद्र चांदणें वेंचावया। जरी गेला धावोनियां। तरी तेथें वेचावया। काय आहे ?॥ चंद्र आणि चांदण्यांत। फरक नाहीं यत्किंचित। चंद्र चांदणें मूर्तिमंत। चंद्रचि आहे॥ ..." कांकीं मनोरथ ज्याचा करितें। ते ते पदार्थ मनाचे होतें। म्हणून क्रिया शून्य पडतें। मनोरथ कायम राहुनि॥ समजा मनें उपवनाचें। मनोराज्य मांडिलें साचें। तेथें गुलाब जाईमोगऱ्याचें। रोपें बनलें मनचि !॥ त्या रोपांस फुलें आलीं। तीं मनानेंच कल्पिलीं। कल्पिलीं म्हणून नाहीं घडलीं। तोडण्याची क्रिया तेथ॥ कांकीं तोडावयाकारण। काय आहे तेथ आन। अवघा बगीचाच झालें मन। मग तोडावें काय, कोणी॥ तेवीं ज्ञात्यांसी विषयभान। झालें तें फोल जाण। कांकीं स्वरूपाचें स्मरण। आहेच तेथें॥ म्हणजे भान ज्या विषयाचें। झालें असेल तया साचें। तो विषय आत्म्याचें। स्वरूप आहे। आत्मा तो हें कळतां। क्रिया ओस पडे तत्वतां। आत्मज्ञान्याचिया चित्ता। आन कांहीं दिसणें नसे॥ सर्व भाव निवर्जित। जी आत्मज्ञानाची स्थिति सत्य। तिच्यापुढें न टिकत। कोणाचीही प्रतिष्ठा॥ "

या एकाच उदाहरणावरून ग्रंथकर्त्याची मराठी भाषेवरील हुकमत किती प्रभावशाली आहे, हें वाचकांच्या ध्यानांत येणार आहे. किंबहुना या पुस्तकाचें कोणतेंहि पान उघडलें, तरीहि पुस्तककर्त्याच्या भाषाप्रभुत्वाचा व विषय सुगम करून सांगण्याच्या हातोटीचा कोणासहि अनुभव आल्यावांचून राहाणार नाहीं. दासगणूंच्या भाषेंत प्रवाहशीलता व विवेचनांत सरसता हा गुण नसता तर मूळाच्या चौपट ओव्या त्यांनीं केल्या आहेत, त्या केवळ पाल्हाळासारख्या वाटल्या असत्या; पण त्यांनीं केलेला हा विस्तार या गुणामुळें उलट रमणीयच वाटतो. सामान्य वाचकांत वेदांतविषयाबद्दल अभिरुचि उत्पन्न करण्याचें कामीं या ग्रंथाचा निःसंशयच चांगला उपयोग होण्यासारखा आहे. मूळ ग्रंथ आध्यात्मिक अनुभवाचा आहे. अर्थात् अनुभव हा अनुभवानेंच

ओळखावा लागतो. कितीहि शब्दविस्तार केला, तरी अनुभवाचें खरेंखुरें स्वरूप ध्यानांत येणें सुतराम् अशक्य आहे. असें असतांनाहि या दिव्य अनुभवाची ओळख करून देण्याचें सामर्थ्य भावार्थमंजिरींत निःसंशय आहे आणि हेंच याचें वैशिष्ट्य आहे."

या अमृतानुभवावरील टीकेस उद्देशून श्री. प्रा. चिं. नी. जोशी म्हणतात "अमृतानुभव ग्रंथ जसा थोर आहे तशीच त्यावरील ही मंजिरी टीका हो थोर आहे. अंजन डोळयांत घातलें कीं भूमिगत अर्थ-संपत्ति दिसते असें म्हणतात. दासगणूंच्या टीकांजनानें अमृतानुभवाची निगूढ अर्थसंपत्ति मात्र खरोखरीच प्रतीत होते. दुर्बोध आणि केवळ गुरुपरंपरेच्या कडीकुलपांत अडवलेलें अध्यात्मज्ञान साध्याभोळया लोकांस सरळ मिळवून देण्याचें साधन निर्माण केल्याबद्दल टीकाकारास कोणीहि झालें तरी धन्यवादच देईल."

## शांडिल्यसूत्र

श्रीशांडिल्याच्या 'भक्तिसूत्रा' वरील 'भावदीपिका' हा महाराजांचा दुसरा टीकाग्रंथ. भक्तिसूत्रांमध्यें शांडिल्याच्या 'भक्तिसूत्रा'चें स्थान फारच वरच्या दर्जाचें मानलें पाहिजे. अत्यंत उच्च अशा तात्त्विक भूमिकेवरून भक्तिविषयक सर्व प्रश्नांचा उहापोह केला असल्यामुळें व या सर्व प्रतिपादनाची भाषा सूत्रमय असल्यामुळें हीं सूत्रें पुष्कळच दुर्बोध आहेत. केवळ संस्कृत ज्ञानाच्या बळावर या सूत्रांचा अर्थ समजून घेणें, जवळ जवळ अशक्य म्हटलें तरीहि चालण्यासारखें आहे. संस्कृतामध्येंहि या ग्रंथावर स्वप्नेश्वराच्या भाष्याव्यतिरिक्त एक दोनच टीकाग्रंथ उपलब्ध आहेत. मराठीमध्यें तर या ग्रंथास कोणीच हात लावला नाहीं, असें दिसतें; परंतु या दुर्बोध सूत्राचेंहि महाराजांनीं आपल्या नेहमींच्या प्रसादमय वाणीनें केलेलें ओवीबद्ध स्पष्टीकरण या विषयांतील रसिकांना निःसंशय मनोरम वाटेल. या ग्रंथांतील भक्तींत श्रद्धेचें स्थान कोणतें, जीवशीवाचें भिन्नपण व अभिन्नपण कोणत्या

दृष्टीनें व तें कसें, सद्भक्तांचीं लक्षणें कोणतीं, इतर गौणी भक्तींची उपयुक्तता काय, मध्यम, उत्तम व कनिष्ठ भक्तांना शेवटीं अंतिम फळ एकच कसें मिळतें, एकांत सेवनाचें महत्त्व काय, इत्यादि अनेक उपयुक्त विषयांच्या प्रसंगोपात्त व्याख्यानामुळें अवधानाचा प्रवाह सतत सारखा वहात राहातो. निरनिराळया ग्रंथांतील प्रमाणभूत वचनांनीं विवेचनास एक प्रकारचा भारदस्तपणाही प्राप्त झाला आहे. यासाठींच या ग्रंथाविषयीं लिहितांना श्रीवैकुंठराय चाफेकर म्हणतात कीं, " महाराजांनीं महाराष्ट्रीय वाचकांच्या हातांत भगवत्प्रेमाचा हा खाऊ देऊन त्यांच्याकरितां आनंदाचें एक नवें दालन उघडून दिलें आहे. यासाठीं महाराष्ट्रीय जनता त्यांची सदैव ऋणी राहील. " नेहमींच्या पद्धतीप्रमाणें, या ग्रंथांतहि व्यावहारिक सुलभ दृष्टांत, वर्णनशैलींतील सुलभता, व तत्त्वप्रतिपादनांतील सोपेपणा आहेच. शब्दापेक्षां अंतरंग-हेतूचें महत्त्व अधिक मानलें पाहिजे, हें स्पष्ट करीत असतांना महाराज किती समर्पक उपमा वापरतात, पहा—

**" मर मेल्या म्हणे जननी । आपल्या बालकालागोनी ।**
**परी अंतर पाहातां शोधूनी । भाव मातेचा निराळा ॥ "**

भक्तीमध्यें साधनाला महत्त्व नाहीं, हें सांगतांना महाराज लिहितात—

**" मिरा घाली मोतीचूर । जनी कांदाभाकर ।**
**परी दोघींनाही शार्ङ्गधर । पावला आहे सारखा ॥**
**या दोघींच्या उपचाराला । देव नाहीं भाळला ।**
**या दोघींच्या अनन्यतेला । झाला आहे ईश्वर वश ॥ "**

## नारद भक्तिसूत्र

' नारदभक्तिसूत्रबोधिनी ' हा त्यांचा तिसरा टीकाग्रंथ. वरील ग्रंथां-प्रमाणेंच रसाळ व प्रासादिक आहे. नारदाचीं भक्तिसूत्रें मुळांतच सरळ नि सुबोध आहेत. महाराजांच्या ' बोधिनी ' मुळें त्यांचा अगदीं ' द्राक्षापाक ' झाला आहे.

'**यतस्तन्मया:**' या सूत्रावरील पुढील स्पष्टीकरण पहा—

**"तीर्थरूप असती संत। कर्मरूप असती संत। शास्त्ररूप असती संत। या तिहींचे पुतळे ते॥ म्हणजे तीर्थ कर्म शास्त्राठायीं। ते तन्मय होऊन जाती पाहीं। सुकर्मावीण कोणा नाहीं। जयाच्या कर्मीं जागा पहा। तीर्थासी तन्मय झाले। म्हणून ते तीर्थरूप बनले। सुकर्मामाजीं रंगले। म्हणोनि झाले कर्मरूप॥ सत्याचेंच केलें शोधन। म्हणोनि शास्त्ररूप जाण। त्यांच्या वर्तनावरून। नियम ठरविले तें शास्त्र॥ म्हणजे अवघ्याच ठिकाणीं। ते पहाती हरी लागुनी। म्हणूनी बैसती होऊनी। हरीच आपणाखेरीज॥"**

मुळांतील अर्थ विशद करून सांगतांना महाराजांचें व्याख्यान इतकें काव्यमय व मधुर होतें कीं वाचकाला आपोआपच तल्लीनता यावी. 'जें अंतरीं असतें, तेंच बाहेर धांवतें' असें संत म्हणतात. आजवर ज्यांनीं आपली वाणी सदैव परमेश्वरचरणींच वाहिली. रिकाम्या मिळालेल्या प्रत्येक क्षणाचा उपयोग परमेश्वराच्या नामस्मरणांतच केला आणि सर्व आयुष्य कीर्तनाच्या निष्काम सेवेलाच वाहिलें, त्यांच्या वाणीला इतका रसाळपणा आला तर नवल कोणतें? मार्मिक सुबोध ओव्या या सर्व ग्रंथभर जागजागीं विखुरलेल्या आहेत. गोपींच्या प्रेमाची उदात्तता पटवून देतांना महाराज लिहितात—

**"म्हणून प्रेम गोपिकांचें। नव्हतें जारस्वरूपाचें।<br>नातें त्या उभयतांचें। होतें देहप्राणांपरी।<br>आत्म्याच्याच प्रेरणेनें। आहे अवयवासी चालणें।<br>वागतां न ये स्वतंत्रपणें। इंद्रियांना केव्हांही।<br>अवयव विषयां सेविती। आणि आत्म्याला तृप्तविती।<br>आपण अलग राहाती। त्या त्या विषया सेवून॥"**

भक्ति ही स्वतःच फलस्वरूप आहे, असें सांगतांना महाराज पुढील काव्यमय स्पष्टीकरण करतात—

**"श्रोते भक्ति उंसापरी। स्वयमेव आहे खरी। तिला फळ येण्याची उरी। मुळींच नसे॥ पहा ऊंस हा एक तरू। आणि फळहि तोच साकारू।**

फळवृक्ष म्हणण्या अवसरू। ऊंसाठायीं मुळीं नसे ॥ उत्तर एवढीच उरत। उंसाच्या बाल्यावस्थेंत। फरक पडे गोडींत। कांहीं अंशीं विबुधहो ॥ तैसेंच येथें होई। सकाम भक्तीचे ठायीं। थोडाबहुत फरक राही। त्या गोडीचे प्रमाणें ॥ ती जेव्हां निष्काम होत। तेव्हांच पूर्णता गोडीप्रत। येतसे हा सिद्धांत। या सूत्रांत केला असे ॥ "

भक्तीच्या फलस्वरूपतेचें हें वर्णन किती समर्पक आहे, तें जाणत्यांना सांगावयास नको. सकाम निष्कामतेचें अवस्थाभेदानें केलेलें वर्णनहि मार्मिक आहे.

विवेचनांतील अशा प्रकारच्या सुबोधपणामुळें ही सर्वच टीका मोठी हृद्य झाली आहे.

## भक्तिरसायन

'भक्तिरसायनभावप्रकाशिका' हा विद्वद्वर मधुसूदनसरस्वतींच्या 'भक्तिरसायना' वर लिहिलेला चौथा टीकाग्रंथ. हा बराच मोठा आहे. या टीकेचे १४ अध्याय असून एकूण ओवीसंख्या २९४५ आहे.

भक्तीची व्याख्या देतांना "चित्ताच्या श्रीकृष्णाभिमुख झालेल्या तैलधारावाहिक वृत्तीला" भक्तिरस म्हणण्यांत फार मोठा अर्थ भरलेला आहे. समाजजीवनांत जो समंजसपणा, मिळतें घेण्याचा स्वभाव असावा लागतो, तो ज्ञानोपासनेमुळें साहजिक रूक्ष होणाऱ्या मनाच्या ठायीं संभवत नाहीं. ज्ञानी न्यायनिष्ठुर बनतो. परस्परांत गोडवा निर्माण होण्यास चित्ताची मृदुताच अपेक्षित असते. हें समाजकार्य भक्तीमुळेंच साधत असल्यामुळें श्री. दासगणूमहाराज–

"जो भगवंतालागीं जाई शरण। त्याचीं अवघींच फिटतीं ऋण।
देव, ऋषी, पितृ ऋण। आणि समाजऋण चौथें पहा ॥"

असें मार्मिकपणें म्हणतात. यांत भक्तीची सांप्रतकालीन आवश्यकताच ते प्रतिपादन करीत आहेत. श्री. महाराजांना संस्कृत येत नाहीं, हें कोणास सांगूनहि खरें वाटणार नाहीं, इतक्या उच्च प्रतीचा अनुवाद त्यांच्या हातून उतरला आहे. संस्कृतज्ञांचें सहाय्य भाषा समजावून

घेतांना त्यांनीं अवश्य घेतलें असलें तरीहि मुळांतील परमार्थाला त्यांची वाणी जी रसिकपणें झोंबली, तिचा गोडवा नुसत्या भाषांतरकर्त्यांच्या ठायीं कधींच संभवणार नाहीं. मुळांतील अभिप्राय सुमुचितपणें विस्तरशः उलगडून दाखविण्यास जें बुद्धिप्रागल्भ्य लागतें, तें मूळ ग्रंथकाराच्या वृत्तीशीं जो स्वानुभवानें तन्मय होऊं शकतो, त्याच्याच ठिकाणीं संभवतें. ग्रंथांतील संस्कृत टीकेचा मागोवा घेतांनाहि स्वयंस्फूर्त अशीं समर्पक उदाहरणें महाराजांनीं वारंवार दिलीं आहेत. टीकाकाराच्या अंगीं आवश्यक असलेला 'समन्वय करण्याचा गुण' त्यांचे ठिकाणीं कसा उत्कटतेनें राहातो, हें अनेक स्थलांतील वेगवेगळया विवेचनांतून दिसून येईल–

" धर्मवीरो दयावीरो बीभत्स शांत इत्यमी।
अतो न भक्तिरसतां यान्ति भिन्नास्पदत्वतः।"

हें वर्णन वास्तविक 'नवरसमिलितं वा' या वचनास विरोध दाखवितें. या ठिकाणची दासगणूमहाराजांची टीका पहाणें उद्बोधक ठरेल. ते म्हणतात—

" धर्मोत्साहपरंपरेनें। कारण भक्तीकारणें।
होईल हेंही म्हणणें। योग्य ठरेल विबुध हो॥ "

पण याहिपेक्षां धर्मोत्साहासंबंधींच्या २३ व्या श्लोकावरील ओव्या महत्त्वाच्या आहेत.

" हे धर्मदानोत्साह दोन्ही। चित्ताचिया ठिकाणीं।
उत्पन्न व्हाया लागुनी। कारण आहे एकची।
तें कारण हेंच सत्य। या दोन्हींमुळें भगवंत।
होतसे कीं पहा प्राप्त। तें करणाऱ्याकारणें॥ "

धर्माची व्याख्या संकुचित नाहीं. 'ज्यानें जें आपलें व्रत म्हणून स्वीकारलें, तोच त्याचा धर्म.' या व्यापक भूमिकेवरूनच महाराजांनीं चितोडच्या राजपूत रमणीचें वा धर्मासाठीं अंगाचें कातडें सोलून

घेणाऱ्या धर्मवीर संभाजी राजांचें उदाहरण दिलें आहे. भक्तिप्रेमानें हा वीरोत्साह उत्कट होऊं शकतो.

> "फुटो हें मस्तक – तुटो हें शरीर
> नामाचा गजर – सोडूं नये ॥"

असें म्हणणाऱ्या श्री. तुकोबारायांचें उदाहरण डोळ्यापुढें मूर्तिमंत असतांना धर्मोत्साहास भक्तिरसता येत नाहीं, असें कसें मानावें? 'वशीकाकार वैराग्यरूपी शमाचा मूर्त पुतळा' असे जे श्री. शुकाचार्य त्यांच्या वृत्तीची भक्तिरसता कशी नाकारावयाची? 'भवान्ति तूष्णीं परमेत्य-निर्वृतः' हें भक्तीचें लक्षण नव्हे काय? म्हणून श्री. महाराजांच्या समन्वय करणाऱ्या ओव्या मार्मिक वाटतात. ही मार्मिकता 'भक्तिरसायन भावप्रकाशिकेंत' ठायीं ठायीं प्रकट झाली आहे.

## पासष्टी

'चांगदेवपासष्टी' हा श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा अत्यंत छोटेखानी, केवळ ६५ ओव्यांचाच पण ब्रह्मतत्त्वप्रतिपादनाबाबतींत अत्यंत अमूल्य व अनुपम असा ग्रंथ आहे. सर्व वेदान्ताचें सार या ६५ ओव्यांत आलें असून यांतील सूत्रमय सिद्धांतांनीं वेदान्तशास्त्रावरील सर्व ग्रंथसंभार गतार्थ झाला आहे, असें म्हणण्यांत मुळींच अतिशयोक्ति नाहीं. त्यामुळेंच या सिद्धांतमय सूत्ररूप ओव्यांना अर्थबोधाच्या दृष्टीनें थोडें काठिण्य आलें आहे. त्यामुळें भाष्याविना, स्पष्टीकरणाविना त्या समजणें स्वाभाविकच कठिण होतें. ६-७ शें वर्षांपूर्वीचा भाषेचा जुनेपणाहि एक प्रकारचा अडथळा निर्माण करतो. श्री. दासगणू-महाराजांनीं यावर 'भावदीपिका' नांवाची ओवीबद्ध टीका आपल्या प्रसादमय वाणीनें लिहून वाचकांची मोठीच सोय करून ठेवली आहे.

पासष्टीची महति गातांना महाराज लिहितात—

> "निर्विकार आत्मतत्वाठायीं। समरस कैसे होतां येई। हेंच या पासष्टीठायीं। सांगते झाले महाराज। सगरपुत्रांच्या उद्धारार्थ। भागीरथी

आणि भगीरथ । परी त्यायोगें असंख्यात । जन कृतार्थ जाहले ॥ तैसेंच झालें येथ । चांगदेव झाला निमित्त । प्रगटावया मृत्युलोकांत । 'पासष्टी' ज्ञानगंगा ॥ ती गंगा जलमय । ही ज्ञानरूप अवघी होय । हिच्याप्रमाणें नाहीं सोय । जगा कृतार्थ होण्याची ॥ ती हिमालयापासून आली । ही ज्ञानेशमुखांतून निघाली । जो कोणी भाग्यशाली । तोच करी सेवन इचें ॥ आत्मानंदसागरीं । ही ज्ञानगंगा गोदावरी । मिळते जाऊन अखेरीं । म्हणून आहे महत्त्व इचें ॥ या आत्मानंदापुढें । इतर आनंद थोकडें । जेवीं कोंबडा मोरापुढें । वा रवीपुढें खद्योत ॥ म्हणूनियां पासष्टीगंगेचा । घ्या उपयोग करून सांचा । तरीच मानवदेहाचा । उपयोग झाला निश्चयें ॥ "

## ईशावास्य

मराठी अध्यात्मपर ग्रंथामध्यें जें पासष्टीबद्दल म्हटलें आहे, तेंच तंतोतंत उपनिषदांच्या बाबतींत 'ईशावास्य' या उपनिषदासंबंधांत खरें आहे. केवळ १८ मंत्रांचें हें उपनिषद् वेदान्ताचा एक अमोल ठेवा आहे. यावरील श्री. दासगणूमहाराजांची 'भावार्थबोधिनी' टीका ही ग्रंथलेखनाच्या कालानुक्रमानें अगदीं पहिली आहे. यांतील मंत्र समजून घेतांना महाराजांनीं दीर्घकालपर्यंत मनन चिंतन केलेलें आहे. केवळ व्याकरण व शब्दकोश यांच्या बळावर समजणाऱ्या शब्दार्थावर भिस्त न ठेवतां मनन व निदिध्यासनपूर्वक त्यांनीं ही टीका लिहिली असल्यामुळें अभ्यासूपणा व सहजता यांचें मनोहर मिश्रण ग्रंथांत प्रत्ययास येतें. अनेक रूपकें व दृष्टांत यांनीं ही टीका अलंकारिलेली आहे. ईशाची सर्वतोव्याप्ति समजावून देण्यासाठीं घेतलेली पुढील उपमा पहा—

" लेकराचे खेळांतरीं । मृत्तिकाचित्रें नानापरी । राजा राणी गज केसरी । चूल बोळकीं श्वानादिक ॥ राजा तरी मृत्तिका । राणी तरी मृत्तिका । गजकेसरी श्वानादिकां । मृत्तिकेनेंच आच्छादिलें ॥ परी, राजाराणी पण । वा श्वानादिकांचें दैन्य जाण । चूल बोळक्यांचें निर्जीवपण । कांहीं न ठायीं मृत्तिकेच्या । ती अवघीच मृत्तिका । तैसेंच हें जगत् देखा । येथें शंकाच

घेऊं नका। अवघा भरला ईशची। एवंच नामरूप गुण। आरोपित ईशाठायीं जाण। ईश या तिन्हींपासून। वेगळा आहे निश्चयें॥"

शब्दज्ञानावर टीका करीत असतांना किती काव्यमय भाषेंत त्यांनीं उपहास केला आहे, तें पहाण्यासारखें आहे.

"कढी भाजी भात वरण। या शब्दोच्चारें करून। जठराग्नीचें समाधान। होईल काय कधीं तरी॥ मृत्तिकेच्या गाई म्हशी। येतील काय दोहण्यासी?। मोरपिसें कोंबड्यासी। लाविल्या होय मोर कां॥ नाटकींचें राजेपण। जैसें आहे व्यर्थ जाण। तैसें शब्दपांडित्यालागून। तुम्ही जाणा बाप हो॥ घाणा गाळी इक्षुरस। परी उसाची न चवी त्यास। तो बिचारा किरकिरीस। सेवुनी फिरे सर्वदा॥ तैसेंच हे शब्दपंडित। शब्दच्छल करिती मात्र। अनुभवाचा किंचित। नाहीं लाभ तयांतें॥"

ईश्वराची करुणा भाकतांना महाराजांचें भाविक पण कविहृदय किती बहुविध कल्पना करून ईश्वरास आळवितें, तें इतर ग्रंथाप्रमाणेंच याहि ठिकाणीं तितक्याच उत्कटतेनें दृष्टोस पडतें. आपल्या हातून 'ईशा-वास्या'चा भावार्थ चांगल्या प्रकारें लिहिला जावा, यासंबंधीं ईश्वराची प्रार्थना करीत असतांना महाराज म्हणतात—

"मी तुझें अज्ञान पोर। स्तनीं लावावें झडकर। कृपेचा वरी घालून पदर। घे ओसंगा विठ्ठलें॥ माझें पोट भरल्यावरी। मग मी ना कुरकुर करी। तुझ्याच भोंवतीं निर्धारीं। खेळत राहीन पांडुरंगें॥ लेकरूं राहिल्या अर्धपोटीं। तें सहज हातपाय आपटी। धरून मातेची कनवटी। सुचूं न दे तिज कायीं॥ त्याचा अपराध मातेकडे। लेकरूं अजाण बापुडें। हें माताच जाणून रोकडें। स्तनीं लावीं त्यास पुन्हां॥ वत्साचें पोट भरल्यावर। खेळणें आणून सुंदर। देऊन तत्करीं साचार। खेळायासी लावितसे॥ आपण पाहि कौतुकांनीं। आपुल्याच ठायीं बैसोनि। कृपाकटाक्ष मात्र जननी। आपुले प्रेरी बाळावर॥ तैसें तुवां करावें। 'ईशावास्य' खेळणें द्यावें। दासगणूच्या करीं बरवें। वत्स आपुलें जाणून॥ यांत झालिया अंतर। माता म्हणावी लागेल कठोर। कठोरपणापासून दूर। मुळींच तूं कीं विठ्ठलें॥ दयानिधि धरिलेंस नाम। आपणांसी उत्तमोत्तम। म्हणून हें

**पुरूषोत्तम। अव्हेर माझा करूं नको। तुझ्या कृपेंकरून। मी हें खेळणें खेळेन। 'ईशावास्यभावार्थ' जाण। वद्वी माझिया मुखानें॥ "**

## 'विष्णुसहस्रनामबोधिनी'

ही विष्णुसहस्रनामांतील नांवाचे अर्थ सांगणारी एक छोटीशी टीका आहे. आपलें सर्व आयुष्य महाराजांनीं विष्णुसहस्रनामाचे प्रत्यहीं १२ पाठ करीत घालविलें आहे. यामुळें त्या टीकेला एक वेगळाच गोडवा आलेला आहे. मात्र प्रत्येक शब्दाचा अर्थ त्यांत सांगितलेला आहे, असें नाहीं. कांहीं कांहीं शब्द हे नुसतेच ओव्यांच्या चरणांत गोविलेलें दिसतात. नांवाचा अर्थ सांगणाऱ्या ओव्यांमध्यें किती सुबोधता आहे, तें खालील दोन तीन ओव्यांतूनच कळून येईल.

**" जयाचिया वक्षस्थळीं। लक्ष्मी ती राहिली।**
**म्हणूनियां प्राप्त झाली। नामाभिधा श्रीमान्॥**
**क अ आणि व। म्हणजे ब्रह्मा विष्णु आणि शिव।**
**हें हृदयांत ज्याच्या तो केशव। वा सुंदर केश जयाचे॥**
**क्षराक्षराहून उत्तम। म्हणून तो पुरुषोत्तम।**
**अखिल विश्वाचें जाणी वर्म। म्हणून म्हणती सर्व तया॥ "**

## ९. बोधकथा :

श्रीदासगणूमहाराजांनीं गद्यग्रंथ फारसे लिहिलेले नाहींत. तरी पण त्यांनीं १२५ बोधकथा गद्यांतच लिहिल्या आहेत. त्यांतील निवडक २५ गोष्टी सुबोध लघुकथा या नांवानें २ वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाल्या आहेत. अनेक प्रकारचा हितोपदेश महाराजांनीं द्रष्टेपणानें केला आहे. वक्रोक्ति, उपहास, विनोद, अत्युक्ति, कल्पनारम्यता इत्यादि प्रकार महाराजांनीं या कथा लिहितांना वापरले असल्यामुळें बोधकतेसवें या कथांना रंजकताहि आलेली आहे. एका जुलमी राजाची शासनपद्धति कशी दिखाऊ आहे, तें सांगतांना महाराज लिहितात—

" छे छे ! तुला आतां राजा ठेवून उपयोगाचें नाहीं.

बघ! तूं न्याय देण्याचे कामीं काय सांगणें असेल, तें ईश्वराला स्मरून सांगावें असें कायद्यांत लिहिलेंस आणि देव मुळींच नाहीं अशी वाङ्मयद्वारां हांकाटी पिटलीस. कैफी द्रव्यावर जबर कर बसवून तूं आपलें उत्पन्न वाढविलेंस. रयतेला व्यसनापासून परावृत्त करण्याचा तुझा हेतु मुळींच नाहीं. असें असतें तर तूं कैफी द्रव्यांचीं दुकानें वाढवलीं नसतीस. अपराधाला उघड नाहीं, पण आंतून ते होण्याला तूं कायदे करून प्रोत्साहनच दिलें आहेस. हें पहा! चोरी करणें हा अपराध ठरविलास, पण ती केल्याचा समक्ष रीतीचा पुरावा न मिळाल्यास ती चोरी होत नाहीं, असें ठरवून चोरांना सावधगिरीनें चोऱ्या करण्यास परवाना दिलास."

कांहीं कथांचीं हीं तात्पर्यें पहा, म्हणजे या कथांचें वैशिष्ट्य लक्षांत येईल.

"कायद्याचें बाह्य स्वरूप किती जरी चांगलें दिसण्यासारखें असलें तरी त्यापासून होणाऱ्या परिणामाकडे लक्ष देऊन सारासार विचाराला न सोडतां कायदा केला पाहिजे, तरच तो लोकांना सुखकर होतो."

"जगाची निंदा होतेच. पण त्याच्या मुळाशीं कांहीं तरी झालेलें असावें लागतें. झालेल्या निंदेनें सदाचारी मनुष्य त्यांच्यावर न रागावतां आपलें वर्तन सुधारतो. सज्जनानें किंवा साधू म्हणविणाऱ्या माणसांनीं लोकनिंदेला वाव मिळेल असें कोणतेंहि कृत्य करूं नये."

"व्यावहारिक संपन्न स्थिति प्राप्त होईपर्यंत खऱ्या नीतीकडे कानाडोळा केला तरी चालेल. पण लबाडीनेंच आपण संपन्न झालों आहों; तेव्हां हेंच करीत रहावें असें वाटल्यास मिळविलेली संपत्ति ही या लबाडांच्या अव्याहत चाललेल्या जोरदार प्रवाहानें नाहींशी होऊन विपन्नावस्था प्राप्त होते. म्हणून विचारवंत पुरुषांनीं कोणतीहि गोष्ट आमूलाग्र विचार करून करावी म्हणजे सहसा बिघाड होत नाहीं."

या ठिकाणीं 'न कोषः शुद्धशौचेन न नृशंसेन जातुजित्। मध्यमं पदमास्थाय कोषसंग्रहणं करेत्॥' हा भारतांतील श्लोक आठवतो.

" कोणतीहि गोष्ट केवळ मताधिक्यावर न ठेवतां सारासार विचार करून विद्वानांच्या मतें जें चांगलें ठरेल तेंच सर्वांनीं केलें पाहिजे. म्हणजे सगळ्यांनाच सुख होईल.

हें खरें असलें तरी आजच्या लोकशाहीच्या काळांत या तऱ्हेच्या बोधाकडे कोण लक्ष देणार हा मोठाच प्रश्न आहे."

" एखादे वेळीं अंगीं वसत असलेला सद्गुणच आपल्या नाशाला कारणीभूत होतो. म्हणून त्या सद्गुणाला सारासार विचारशक्तीच्या स्वाधीन करून चालावें; म्हणजे तोच सद्गुण कल्याणाला कारणीभूत होतो."

भारतवर्षानें 'गुणानामेवायं तव जननि दोषः परिणतः' या स्थितीचा खरोखरीच फार कटु अनुभव घेतला आहे आणि अद्यापिहि या प्रकरणीं शहाणपण आलेलें नाहीं, पण संतकवींनें आपलें कर्तव्य योग्य प्रकारें बजाविलें आहे यांत शंका नाहीं. तिकडे आपण दुर्लक्ष करितों हा आपला दोष आहे. असे अनेक प्रकारचे बहुमोल संदेश या कथांच्या द्वारें श्रीदासगणूंनीं दिले आहेत. भाषा पद्याप्रमाणें सोपी, सरळ पण रसाळ आहे. नमुन्यासाठीं शेवटीं एक संपूर्ण गोष्ट उद्धृत करून हा परिचय आटोपता घेतों.

## मतलबी फूल

श्रीगोदावरीच्या कांठीं ब्रह्मदेवानें दोन प्रकारचीं उपवनें निर्माण केलीं. एका उपवनांत जीं फुलझाडें लावलीं होतीं, त्यांना सुवास मुळींच नव्हता. मात्र दिसण्यास सुरेख व आकारानें मोठीं होतीं. त्यांत जरी कांहीं फुलांच्या ठिकाणीं आकारांत व वर्णांत निराळेपणा होता तरी पण त्या सर्वांचा निर्गंध हा गुणधर्म एकसारखाच होता. त्या उपवनाचें राज्य फुलें चालवीत असत. पण सगळ्यांचा धर्म एकच असल्यामुळें त्यांची विशेष फूट न पडतां एकीच होती व तें उपवन केवळ या एकीच्या बळानें सबळ असें झालें होतें. दुसऱ्या उपवनांत नाना प्रकारचीं सुवासयुक्त, नेत्रानंद देणारीं अशीं लहान मोठीं अन्य अन्य जातीचीं फुलझाडें होतीं. येथलेंहि राज्य तेथलीं फुलझाडें करीत होतीं.

पण त्यांच्या गुणधर्माप्रमाणें मोठेपणाचा दर्जा मानला जात असे. तीं सर्व फुलें आपल्या भिन्न भिन्न सुवासाच्या धर्माकडे न पाहतां मर्माकडे लक्ष देऊन एकीनें वागत असत. असा क्रम बहुत दिवस चालला. हीं दोन्हीं उपवनें निरनिराळ्या ठिकाणीं होतीं. एका वेळेस मोठ्या सोसाट्याचा वारा सुटून या सुगंधी उपवनांतलि फुलांचा सुवास त्या निर्गंध असलेल्या फुलांना कळला आणि त्यामुळें तीं सर्व फुलें सुगंधानें वेडीं होऊन हा सुगंध कोठून येत आहे याच्या तपासास निघालीं. कांहीं दिवसांनीं तीं निर्गंध फुलें या सुगंधी उपवनांत येऊन पोहोंचलीं. पण त्यांनीं पाहिलें कीं, या उपवनांत आपलें बीं रुजणें कठीण आहे. हें उपवन सर्व बाजूनें समृद्ध आहे. तेव्हां हें असलें अनुपम उपवन जर आपल्याला प्राप्त होईल तर आपलें मोठें भाग्य समजलें जाऊन आपण सर्वजण सुखी होऊं. तेव्हां हें सुगंधी उपवन आपल्या ताब्यांत घेण्याला काय युक्ति करावी याचा विचार करूं लागलीं. तेव्हां त्यांत एक पांढऱ्या जातीचा गुलाब होता. त्यानें विचार करून आपलें मत आपल्या जातभाईपुढें मांडल व सांगितलें कीं, जर आपणास या उपवनाचा ताबा हवा असेल तर त्याला थोडी युक्ति आहे. ती अशी कीं, या उपवनांतलि फुलें जरी शक्तीनें, बुद्धीनें, आपणांहून श्रेष्ठ असलीं तरी त्यांच्या भिन्न भिन्न जाती आहेत. तेव्हां याच एका तत्त्वावर त्यांच्यांत आपल्याला यादवी उत्पन्न करतां येऊन हळूंहळूं त्यांचें उपवन आपल्या ताब्यांत घेतां येऊन या सुगंधित फुलांना कायमचें दासानुदास करून टाकतां येईल. त्यांत इतकीच एक अडचण आहे कीं, या उपवनांत आपल्याला थारा मिळेपर्यंत मोठें लीनतेनें वागावें लागेल. असा विचार करून तो पांढरा फटफटीत गुलाब या गुलाबी गुलाबाला भेटण्यास आला व म्हणाला कीं, “ महाराज ! काय आपलें सौंदर्य ! आपलें वैभव इंद्राच्या वैभवालासुद्धां मागें सारील. आम्ही फार लांबचीं फुलें आहोंत. आम्हांला सुवास नाहीं म्हणून तुमच्या उपवनांत जर आम्हां दोघातिघांना थोडीशी जागा द्याल तर

आम्ही तुमच्या सहवासानें सुगंधित होऊं. शिवाय आपलें हें उपवनहि मोठें आहे. तेव्हां आमच्या रहाण्यानें आपल्या वागणुकीस अडचण येईल असा संभव नाहीं." तो सुवासिक गुलाब थोडा भोळा होता व थोडा भोळा असल्याखेरीज ईश्वरी कृपाहि होत नसते. असो. तो सुगंधी गुलाब त्या निर्गंध गुलाबाला चट्दिशीं 'हो' म्हणाला; व आपल्या उपवनांत त्याला थोडीशी जागा दिली. बीं रुजल्यावर त्यांनीं याप्रमाणें उपक्रम सुरू केला तो असा. एक दिवस हा निर्गंध गुलाब मोगऱ्याला म्हणाला कीं, " तुमचें मोठें दैन्य आहे. या कांटेरी गुलाबानें तुमच्यावर वर्चस्व मिरवावें हें कांहीं चांगलें नाहीं. न्यायदृष्टीनें पाहतां तुमच्या अंगीं जो सुवास आहे, त्यायोगानें तुम्हींच या उपवनाचे राजे होण्याला पात्र होतां. तुमचा भोळेपणा तुम्हांलाच भोवला आहे. तुम्हांला जर या उपवनाची मालकी पाहिजे असेल तर आम्ही तुम्हांला मदत करून या गुलाबाचा फडशा पाडूं." हें त्यांचें म्हणणें मोगऱ्यांना पटलें; व मोगऱ्यानें एक सभा बोलाविली. त्यांत पांढऱ्या वर्णाचें प्राधान्य होतें. म्हणजे पांढरा कण्हेर, जाई, जुई, दुधाणी, धोतरा, टाकळी, म्हणजे जेवढीं पांढऱ्या रंगाचीं फुलें होतीं, तेवढ्यांना बोलावून मोगऱ्यानें सांगितलें कीं, " मित्रहो ! आजपर्यंत आपण या गुलाबाच्या जुलमी अंमलाखालीं दिवस काढले. पण आपल्या सुदैवानें हे आपले पाहुणे येथें आल्यामुळें आपला भाग्योदय होण्याची वेळ आली आहे. ती आपण गमावितां कामा नये. त्यांना सामील होऊन या गुलाबाचा फडशा उडविला पाहिजे." मग काय, सर्वच फुलांनीं गुलाबाचें दैन्य मांडलें ! कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत राहिला नाहीं ! असें झालें असतां हा निर्गंधी गुलाब त्या गुलाबाला म्हणाला कीं, " महाराज तुमच्या उपवनांतील हीं अन्य अन्य जातीचीं फुलें उलटलीं आहेत. हीं तुमचा नायनाट करण्यासाठीं आमची मदत मागत आहेत, पण आम्हांला तुम्हीं केलेल्या उपकाराकडे दृष्टि देऊन तसें करतां येत नाहीं. आम्हांला तुमच्या उपवनाशीं केव्हांहि कृतघ्न व्हावयाचें नाहीं.

म्हणून सर्वांनीं गुण्यागोविंदानें व एकीनें रहावें व तें आम्हीं पहावें. याचसाठीं आम्हीं येथें आलों आहोंत. म्हणून आमची भीति न धरतां तुम्ही आमच्यावर विश्वास ठेवा व आम्ही सांगितल्या-प्रमाणें चाला; तर तुमचें कल्याण व हित होणार आहे." हा सुवासिक गुलाब आधींच या भांडणानें गांगरून गेला होता. त्यानें चटूदिशीं मान्यता देण्याचें कबूल केलें. असें झाल्यावर हा निर्गंध गुलाब मोगऱ्याला म्हणाला कीं, "मोगरे महाराज! तुम्हीं जो तुमच्या गुलाबाचा नायनाट करण्याचें मनांत आणलें आहे, हें अगदीं रास्त आहे. पण या कामांत तुमचे कल्याणासाठीं तुम्हीं सबुरी धरली पाहिजे. कारण तुम्हीं जशी पांढऱ्या फुलांनीं आपली एकी करून घेतली तशी तांबड्या फुलांनींहि आपली एकी करून घेण्याचा संभव या उपवनांत आहे. ती अशी—तांबडा गुलाब, तांबडी जास्वंदी, तांबडा कण्हेर, तांबडी कर्दळी. पण हें तत्त्व अजून त्या गुलाबाच्या लक्षांत आले नाहीं. त्यानें जर आम्हांस विचारलें तर त्यास आमच्या उपवनाच्या कायद्याप्रमाणें आम्हांस खरा सल्लाच देणें भाग आहे. आणि तसें झालें तर तुम्हा दोन्ही पक्षांत रणकंदन माजून नाहक एकमेकांचा नाश होण्याचा संभव आहे. तसें झालें तर आमच्या-सारख्या न्यायी व्यक्तीला राहणें असह्य होईल. तूर्त तुमच्या सुवासिक गुलाबाचे अधिकार आम्ही स्नेहबुद्धीनें आमच्याकडे घेतों. त्याला तुम्ही बिनदिक्कत मान्यता द्या. आम्ही तुमच्या कोणत्याहि जातीला, रिवाजाला, धर्माला न दुखवितां तुमचें रक्षण करूं. आम्ही, तुम्ही सौजन्यानें एक-मेकांशीं वागण्यास लायक झालांत असें पहातांच तुमचे अधिकार तुम्हांस देऊं." असें झाल्याबरोबर त्या सुगंधित उपवनांतील फुलांनीं या निर्गंध उपवनाची मालकी दिली. इतकें झाल्याबरोबर त्या निर्गंध गुलाबांनीं सर्व उपवनाची खानेसुमारी करून जाती व आंकडे कायम केले आणि असा कायदा केला कीं, तुमच्या उपवनाचें राज्य तुमच्या सांगण्यावरून आम्हांस करणें भाग आहे. पण आम्हांस कोणाचा

अपहार करावयाचा नाहीं. तेव्हां तुमच्या सल्ल्यानें राज्य करण्यासाठीं तुम्ही आपल्यांतून एकेक व्यक्ति निवडून द्यावी. त्याप्रमाणें सर्व फुलांनीं आपल्यांतील एकेक इसम निवडून दिला. त्यायोगानें फायदा न होतां उलट नुकसानच होण्याची पाळी आली. कारण फुलें चांगलीं तरी त्यांची बाजू मांडणारी व्यक्ति एकच; त्यामुळें चांगल्या फुलांचा ऱ्हास होत चालला. कारण जिकडे बहुमत होईल ती बाजू खरी धरून त्याप्रमाणें उपवनाचे कायदे होऊं लागले. सभेचा प्रथमतः असा कायदा होता कीं, पोटजातीकडे लक्ष देण्याचें कारण नाहीं. तांबडा आणि पांढरा अशाच दोन वर्गाला प्रतिनिधी निवडून देण्याचा अधिकार राहील. निळ्या फुलांना व पिवळ्या फुलांना जसें आजपर्यंत तांबड्या–पांढऱ्यांच्या ताब्यांत राहावें लागलें तसेंच आतां राहिलें पाहिजे. कारण हे दोन्ही वर्ग चांगले सुशिक्षित असल्यामुळें या अल्पसंख्याक असलेल्या फुलांचा नायनाट करण्याला तयार होणार नाहींत. यामुळें असें झालें कीं, त्या सभेच्या ठिकाणीं तांबड्या फुलांचे प्रतिनिधी चारच येऊं लागले, व पांढऱ्या फुलांचे दहावीस येऊं लागले, यामुळें पांढऱ्या फुलांचें बहुमत होऊं लागून तांबड्या फुलांच्या ऱ्हासाला आरंभ झाला. तो इतका कीं, पांढरें फूल तांबड्या फुलाला आपल्या शेजारींसुद्धां राहूं देण्यास तयार होईना व तांबड्या फुलांचें बहुमत नसल्यामुळें त्यांचें कांहींच चालेना. एकदां तर असें झालें कीं, पांढऱ्या फुलांचें बहुमत असल्यामुळें त्यांनीं असा कायदा केला कीं, तांबड्या फुलांना पोषक असलेले खतसुद्धां या उपवनांत राहूं देऊं नये. कारण त्यामुळें पांढऱ्या फुलांच्या स्वास्थ्याला, इज्जतीला कमीपणा येण्याचा संभव आहे. तसेंच पाणीसुद्धां, पांढऱ्या पांढऱ्या फुलांची सगळी आळीं भरल्यावर, तांबड्या फुलांनीं त्यांत अल्पसंख्याक जीं निळीं व पिवळीं फुलें यांना पाणी घेण्याचा मान आधीं दिला पाहिजे. असें झाल्यामुळें थोडे दिवसांतच तांबड्या फुलांची उपवनांतून बहुतेक हकालपट्टीच झाली. कांहीं थोडींशीं काटेकुपाटीला जीव धरून होतीं. या तांबड्या फुलांच्या नायनाटाला या निर्बंध

गुलाबानें मुळींच आळा घातला नाहीं व त्यांच्या तक्रारीकडे लक्ष दिलें नाहीं. त्यांनीं एखादे वेळ प्रयत्न करून तक्रार आणली तर तो निर्गंध गुलाब त्यांना गोड शब्दानें असें सांगे कीं, "काय करावें? तुमचे हाल आम्हांला पहावत नाहींत. पण तुमचें बहुमत नसल्यामुळें आम्हांला कांहीं करतां येत नाहीं." त्यांच्याकडे या निर्गंध गुलाबानें जें लक्ष दिलें नाहीं त्याचें कारण इतकेंच होतें कीं, तांबड्या फुलांचा नायनाट होणेंच त्याला इष्ट होतें. असो. तांबड्या फुलांचा बहुतेक नायनाट झाल्यावर या गुलाबानें निर्गंध असें एक मत मांडलें कीं, आजपर्यंत जें आपण वर्णाचें वर्गीकरण करून कायदे करून घेत होतों, तें कांहीं बरें नाहीं. कारण त्यामुळें तांबड्या सुगंधित फुलांचा आज या उपवनांतून बहुतेक निकाल झाला आहे. तें कांहीं चांगलें झालें नाहीं. जीं तांबडीं फुलें एका काळीं या उपवनाच्या सार्वभौमपदाचा उपभोग घेत होतीं, त्यांचा या असल्या निवडणुकीच्या कायद्यांनीं निकाल व्हावा हें कांहीं चांगलें झालें नाहीं. तेव्हां अशी आपत्ति या उपवनावर पुन्हां न यावी एवढ्यासाठीं आतां जातवार प्रतिनिधीच निवडून देण्याचें तत्त्व अंमलांत आणलें पाहिजे. असें झाल्यावर थोड्याच दिवसांत मोगरा, जाई, जुई, निशिगंध वगैरे उत्तम फुलांचीहि तांबड्या फुलांप्रमाणेंच स्थिति झाली. कारण धोतरा, दुधाणी, हदगा, शेवगा, पांढरा कण्हेर या हलक्या फुलांचेंच बहुमत होऊं लागलें. असें झाल्यावर लगेच पुन्हां एक मत प्रस्थापित झालें कीं, ज्या अर्थीं या हीन फुलांनीं उपवनाची जागा नाहक व्यापून टाकिली आहे, त्या अर्थीं यांचा उपवनाच्या इभ्रतीकरतां सक्तीनें नायनाट करून त्या ठिकाणीं या सुगंधित फुलांची वाढ बंद करून या निर्गंध फुलांची वाढ होऊं दिली पाहिजे. त्यांना निकाल झालेल्या फुलाप्रमाणें जरी वास नसला तरी नेत्रानंद प्राप्त होईल असा कायदा करून त्या सौगंधिक उपवनाचे ठिकाणीं या निर्गंध फुलांनीं आपला जयजयकार करून घेतला व तेथील कदीमचीं नांदत असलेलीं फुलें क्वचित् कोठें

काटेकुपाटीला दृष्टीला पडूं लागलीं. जीं फुलें एका काळीं त्या उपवनांत सत्ताधारी होतीं तींच या पाहुण्यांच्या कृपेनें अक्षयींचीं गुलाम होऊन आसूं गाळीत राहिलीं.

---

अशा रीतीनें महाराजांच्या विस्तृत ग्रंथसंभारापैकीं महत्त्वाच्या ग्रंथांचा केवळ परिचय करून देण्याचा प्रयत्न मी गेल्या कांहीं पृष्ठांत केला आहे. त्यांच्या सर्व ग्रंथांचा परिचय करून देणें, ही गोष्ट माझ्या शक्तीपलीकडील असल्यानें, शेवटीं ( ग्रंथाच्या ) दिलेली ग्रथसूचि पहा, इतकच त्या बाबतींत सांगणें मला शक्य आहे. दिलेल्या परिचयांतूनहि पृष्ठांच्या मर्यादेमुळें आणि साहित्यवाङ्मयाशीं अभ्यासपूर्ण परिचय नसल्यामुळें ग्रंथांची ओळख पूर्णपणें पटवून देण्यास, मी समर्थ झालों असेन, असें मला वाटत नाहीं. तरी पण हे ग्रंथ काय आहेत, पाहूं या तरी, येवढी इच्छा तरी वाचकांच्या मनांत मी उत्पन्न करूं शकेन, असें वाटत असल्यामुळें या तऱ्हेच्या प्रयत्नास मी हात घातला. पुढील प्रकरणामध्यें महाराजांच्या कवित्वासंबंधीं कांहीं विवेचन करण्याचा प्रयत्न करणार आहे.

---

"श्रीशंकर"

# 'काव्यदर्शन'

श्री. दासगणूमहाराजांच्या कवित्वाचें मूल्यमापन करून त्याचें सौंदर्य वाचकांच्या प्रत्ययास आणून देण्याचा अल्पसा प्रयत्न या प्रकरणांत आतां करावयाचा आहे. काव्याचें मूल्यमापन करितांना भौतिक मोजमापाच्या भाषेंत बोलावयाचें म्हटलें तर वाङ्मयाची लांबी, रुंदी आणि उंची कशी विशाल अन् उत्तुंग आहे, हें दाखवितां आलें तर वाङ्मयाचें श्रेष्ठत्त्व आपोआप प्रत्ययास येईल, असें वाटतें. माझ्या समजुतीप्रमाणें कवितांची वा लेखांची संख्या हें वाङ्मयाची लांबी मोजण्याचें साधन ठरविण्यास अडचण नाहीं. त्या दृष्टीनें दासगणू महाराजांच्या काव्याचें मोजमाप वेंच्यांच्या आरंभीं दिलेल्या सूचीवरून वाचकांच्या सहजच लक्षांत येण्यासारखें आहे. त्यांनीं रचलेल्या ओव्यांची संख्या सुमारें पाऊण लाख ( ७५००० ) आहे. ही संख्या ओळींची नाहीं, तर ओव्यांची आहे. या व्यतिरिक्त श्लोक, पदें, इत्यादि कवित्व संख्येंत मोजलें, तर तें सुमारें १०,००० व पंक्तींत मोजल्यास सरासरीनें त्याच्या चौपटीपेक्षां अधिकच भरेल. हें सर्व संख्यान आज मला उपलब्ध असलेल्या कवितेचें आहे. त्यांच्या अनुपलब्ध आणि पूर्वायुष्यांत त्यांनींच नष्ट करून टाकलेल्या कविता यांत मोजतां आलेल्या नाहींत. परंतु ही उपलब्ध असलेली कविताच इतकी विपुल आहे कीं, कोणत्याहि अर्वाचीन कवीची या बाबतींत श्री. दासगणू-महाराजांच्याबरोबर तुलनाच करितां येणार नाहीं. कोणी करूं लागला, तर त्याला डोंगरे बालामृताच्या जाहिरातींचीच आठवण व्हावयाची! त्यामध्यें एका पारड्यांत अपुरा आहाररस मिळालेलीं सात आठ सुदामदेवी पोरें आणि दुसऱ्या पारड्यांत बालामृताच्या सेवनानें पुष्ट झालेलें बाळसेदार बालक दाखविलेलें असतें आणि तरीहि तें बालक बसलेलें पारडें जडच आहे, असें तिरप्या दांडीनें सूचित केलें जातें.

भक्तिरसाच्या सेवनानें परिपूर्ण झालेल्या महाराजांच्या वाङ्मयासंबंधीं-सुद्धां तसेंच म्हणावें लागेल. भरपूर श्रम करूं शकणाऱ्या बुद्धीलाच प्रतिभा म्हणतात, अशा अर्थाचें एक इंग्रजी सुभाषित आहे. त्या दृष्टीनें एखाद्या गोवर्धनाप्रमाणें असलेला विपुल काव्यसंभार पेलणाऱ्या बुद्धीच्या प्रतिभासंपन्नतेविषयीं शंका राहूं नये. लांबीच्या दृष्टीनें श्री. दासगणू-महाराजांचें काव्य स्वभावतःच सर्वश्रेष्ठ ठरेल.

विषयांतील विविधता हें जर रुंदीचें माप समजलें, तर त्या दृष्टीनेंहि श्री. दासगणूमहाराजांच्या वाङ्मयाचें महत्त्व कमी भरणार नाहीं. केवळ भक्ति-रस हाच त्यांच्या वाङ्याचा रस असला आणि आपली काव्यशक्ति त्यांनीं संतकथा वर्णण्यांतच वेचलेली असली, तरीहि त्यामधील विविधता ही निस्संशय लक्षणीय आहे. संतचरित्रें गात असतांना लोकव्यवहाराची जाणीव त्यांच्या मनाला सदोदित होत असते, याची साक्ष महाराजांचें वाङ्मय वाचीत असतांना पटतें. ऐतिहासिक, धार्मिक, सामाजिक, आणि नैतिक दृष्टिकोणांतून त्यांनीं लोकव्यवहाराचें मूल्यमापन वारंवार केलेलें असल्यामुळें, अनुभवाच्या विशालतेमुळें आणि सूक्ष्म निरीक्षणामुळें ज्याला आपण आज वास्तवता म्हणून संबोधितों, अशा किती तरी गोष्टी त्यांच्या काव्यांतून सहजासहजीं गोविल्या जातात. संतांचें चरित्र लिहिणें, म्हणजे केवळ चमत्कारपुराण सांगणें नव्हे, याची जाणीव महाराजा-व्यतिरिक्त इतर संतचरित्रकारांनीं क्वचितच दाखविलेली आढळेल. चमत्कार घडतात, होतात, घडले आहेत, नि घडणें शक्य आहे, यावर जरी दासगणूमहाराजांची पूर्ण श्रद्धा असली तरी त्यांच्यांतील जातिवंत कवि चमत्कार तेवढे सांगून संतुष्ट होणें शक्य नाहीं आणि त्यामुळेंच विषयाची विविधता त्यांच्या वाङ्मयांत सांपडतें. आणखी एका निराळ्या प्रकारानेंहि त्यांच्या काव्याची विविधता लक्षांत येणें शक्य आहे. आजकाल एकाद्या लेखकाच्या लेखनशक्तीची महत्ता सांगत असतांना लघुकथा, नाटकें, कादंबऱ्या, गुजगोष्टी, निबंध इत्यादि इत्यादि वाङ्मयप्रकार त्यानें हाताळिले आहेत, असें सांगितलें जातें.

वस्तुतः या सर्वांतून कोणता तरी ललितविषय प्रतिपादिला जातो, वा कला ही जीवनोपकारक असली पाहिजे, असें मानणारा लेखक आपलीं सामाजिक मतें या विविध वाङ्मयप्रकारांतून वाचकापुढें मांडीत असतो. तरीहि त्याचें लेखन विविधप्रकारचें आहे, असेंच टीकाकार मानतात. तीच कसोटी दासगणूमहाराजांच्या वाङ्मयालाहि लावणें शक्य आहे. त्यांनीं स्तोत्रअष्टकांच्या रूपानें निरनिराळ्या देवतांची स्तुति केली आहे. भक्तिसारामृतासारखे, संतचरित्रात्मक ग्रंथ लिहिले आहेत, शंकराचार्यासारख्या महापुरुषाचें चरित्र एकटाकी ओवीबद्ध केलें आहे. अमृतानुभव, शांडिल्यसूत्र, ईशावास्योपनिषद् यांसारख्या ग्रंथावर टीका लिहिल्या आहेत, गोदा, शिंगणापूर यांचीं माहात्म्यें गायिलीं आहेत, आपल्या अनुयायांना सदुपदेश करणारीं प्रकरणें लिहिलीं आहेत, संतचरित्रें कीर्तनोपयोगी अशा आख्यानांच्या स्वरूपांत रचिलीं आहेत, सद्यःस्थितीचें चित्र भारताच्या कहाणींत रेखाटलें आहे, ऐतिहासिक कथा पोवाड्यांतून गाइल्या आहेत आणि पुराणकथांवर खंडकाव्य निर्मिलें आहे. प्रत्येकीं स्वतंत्र महत्त्व असलेलीं अनेक स्फुटपदें, सुभाषितें त्यांनीं उपदेशिलीं आहेत. ही विविधता लक्षांत घेण्यासारखी आहे. म्हणजेच श्री. दासगणूमहाराजांच्या वाङ्मयामध्यें विषयाच्या वैचित्र्याप्रमाणेंच रचनाप्रकारांतहि वैविध्य आहे आणि म्हणून वाङ्मयाची अत्यंत दीर्घ लांबी चिंचोळी वाटूं न देण्याइतकी रुंदीहि चांगली ऐसपैस आहे, असें म्हणावें लागेल.

कल्पनाशक्ति, काव्यालंकार, रसपरिपोष, भाषासरणी, वर्णनशैली, अनुभूतीची विशालता, व्यासंग इत्यादि काव्यगुणांनीं वाङ्मयाची उंची मोजतां येते व तेंच माप प्रतिभेचेंहि आहे. असें जर म्हटलें तर श्री. दासगणू-महाराजांचें वाङ्मय हें अत्युच्च नसलें तरी उंचांतच मोडणारें आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. भरलेल्या शरीराचा माणूस उंच असला तरी त्या मानानें जसा जरा बुटका वाटतो, तसेंच श्री. दासगणूमहाराजांच्या वाङ्मयासंबंधीं म्हणतां येईल. काव्याच्या विशालतेमुळें त्याची

स्तविक उत्तुंगता योग्य प्रकारें लक्षांत येत नाहीं. मोजक्या कविता
ाणाऱ्याची कल्पनाशक्ति किर्डकिडींत माणसाच्या उंचीप्रमाणें चटकन्
ळयांत भरते. महाराजांच्या काव्यांतील सौंदर्य हें निराळया मापानें
जिल्याशिवाय वा निराळ्या दृष्टिकोनांतून पाहिल्याशिवाय यथार्थपणें
ययास येणें कठिण आहे. एखादें उद्यान सुंदर कां दिसतें, याचें जें
यम असतील, तेच एखाद्या काननाच्या रमणीयेतला लागूं पडणार
हींत. नीटनेटकेपणा, व्यवस्थित नि आखीव रेखीव रचना, स्वच्छता,
ाटछाट करून झुडपांना आणलेलें डौलदारपण यांमुळें उद्यान सुंदर
सतें, मग त्यांत मोगरा, गुलाब, सोनचांफा रातराणी, प्रवेशद्वारीं
डलेले मृदु सुगंधी असे जाईचे मांडव, आपल्या परिमलानें आल्हाद
र्माण करितात. पण अकृत्रिम सौंदर्य असलेल्या विशाल वनभूमीच्या
नोहारित्वाचें कारण यापेक्षां अर्थातच निराळें आहे. आल्हाद उत्पन्न
रणारा सुगंध तर तेथेंहि आहेच, रमणीय दिसणाऱ्या कुंजलता त्याहि
कार्णी आहेत, तृप्ति देणारे फलसंभार तेथेंहि विपुल आहेत,
ताप दूर करणारी शीतलता त्याहि ठिकाणीं उत्कटतेनें अनुभवास
ते, पण हें सर्व निसर्गजात असलेल्या अव्यवस्थेंतून जन्मास आलेलें
ाहे. तेथील गगनचुंबी वृक्षांना बागेंतील सुरूचा नीटसपणा निश्चितच
सेल, पण सुरूला त्यांचा भव्यताहि नाहीं. पसरलेल्या निळया
ऱ्या टेकड्यांनीं वेष्टिलेले एखादें सह्याद्रीच्या पठारावरील सजलसुफल
रण्य दिसावें, त्याप्रमाणें श्री. दासगणूमहाराजांचा काव्यसंभार आहे.
ील सर्व काव्यगुण त्यांच्या वाङ्मयांतहि खरोखरीच भरपूर प्रमाणांत
ाहेत, पण पैलू न पाडलेल्या रत्नासारखी त्याची स्थिति आहे.
ादासगणू महाराजांच्यावर शालेय शिक्षणाचे संस्कार न झाल्याचा हा
ाभाविक असा परिणाम आहे.

यासाठींच श्री. दासगणू महाराजांना विद्वानांच्या वा पंडितांच्या
लिकेंत गोंवितां येणार नाहीं. त्यांनीं अनेक ठिकाणीं स्वतःच्याविषयीं

लीनतेनें काढलेले उद्गार केवळ विनयाचे नसून वस्तुस्थितिनिदर्शकहि आहेत, असें मानतां येईल.

**" दासगणूची वाणी बोबडी । मान्य करा जेवीं साखरखडी ।**
**पद्यरचना वेडीवांकुडी । दोष यांचे पाहूं नका ॥ "**

असें ' भक्तिलीलामृतां 'त त्यांनीं म्हटलें आहे. ' संतकथामृता'मध्यें ते म्हणतात–

**" मी मूढ अज्ञान । पाहिलें नसे व्याकरण ।**
**नाना शास्त्रांचें अध्ययन । मी न केलें दीनबंधो ॥ "**

हें वर्णन वस्तुस्थितीस पुष्कळसें धरून असेंच आहे. पण असें असूनहि श्री. दासगणूमहाराजांची बहुश्रुतता मात्र सामान्य नाहीं. त्यांनीं वेदान्त व तत्त्वज्ञान यांतील विषयांवर ठिकठिकाणीं प्रतिपादिलेलीं मतें पाहिलीं, म्हणजे त्यांच्या विस्तृत व्यासंगाची कल्पना येईल. वेंच्यामधील ' प्रारब्धभोग ' ' सत्य व मिथ्या यांचें स्वरूप, ' ' सगुण–निर्गुण ' ' प्रकृतिपुरुष ' ' अद्वैत आणि भक्ति ' इत्यादि प्रकरणें पाहिलीं म्हणजे वैदिक वाङ्मयांपैकीं उपनिषदें, ब्रह्मसूत्र, षड्दर्शनें, भारत, योगवासिष्ठ इत्यादि ग्रंथाचें स्थूल अवलोकन तरी त्यांनीं केलें आहे, असें दिसतें. संस्कृतांतील कालिदास, भवभूति, भारवी, शूद्रक, मम्मट, अमरसिंह, जयदेव, जगन्नाथ, आदि कवींस संतलीलामृतांत त्यांनीं आदरानें वंदन केलें आहे. तेव्हां या कवींची तोंडओळख तरी त्यांस असलीच पाहिजे. संस्कृतकवींच्या काव्यांतील शब्दसादृश्य आणि कल्पनासादृश्य क्वचित् ठिकाणीं श्री. दासगणूमहाराजांच्या काव्यांतून आढळतें, त्यावरून वरील प्रकारचा परिचय लक्षांत येतो. उदा. जगन्नाथपंडिताच्या चरित्रामध्यें–

**' किंवा ती कामराजाची प्रणयाग्रदूतिका आली '**

या काव्यपंक्तीशीं रघुवंशाच्या ६ व्या सर्गातील–

–' महीपतीनां प्रणयाग्रदूत्यः ' या ओळीचें सादृश्य पहाण्यासारखें

आहे. 'जलददूत' काव्यामध्यें मेघाबरोबर निरोप सांगतांना श्री. दासगणूमहाराजांनीं–

> " बा धूमतेजजलजीवन जें जगाचें।
> साहित्य तें सकल साच तुझ्या रथाचें।
> वायु तुरंगम तयाप्रति सज्ज कीजें।
> बैसोनि त्या रथिं घना करि कार्य माझें॥ "

लिहिलेल्या या श्लोकाचें मेघदूतांतील–

धूमज्योतिःसलिलमरुतां संनिपातः क्व मेघः। या श्लोकांशीं असलेलें कल्पनासादृश्यहि चिंतनीय आहे. अशीं आणखीहि कांहीं उदाहरणें देतां येतील. 'भक्तिलीलामृत' ग्रंथांत होनाजीबाळ, प्रभाकर, रामजोशी, सगनभाऊ, विठोबाआण्णा इत्यादि जुन्या कवींप्रमाणेंच गोडबोले, पेठकर, ओक, कानिटकर, देवल, किर्लोस्कर, लोंढे, कुंटे, घाटे, राधारमण, लेले, खरे, करंदीकर वगैरे आधुनिक व महाराजांच्या समकालीन असलेल्या कवींचींहि नांवें त्यांनीं आदरपूर्वक उल्लेखिलीं आहेत. 'भक्तिसारामृतां' तील ३३ व्या अध्यायांत एका शास्त्रीबोवांच्या बळदांतील अनास्था झालेल्या ग्रंथांचें वर्णन करितांना खूपच विस्तार झालेला आहे. ग्रंथांची ही नांवनिशी पहा.

**बहुश्रुतपणा**

" चारी वेदांच्या या संहिता। दशोपनिषदें तत्त्वतां। नारायणभट्टीं प्रयोगाकरितां। त्रुटित प्रकरणें बहुसाल॥ १॥ सायणभाष्य, शंकरभाष्य पद्क्रमजटेच्या विशेष। शिक्षा निरुक्त ज्योतिष। शंखस्मृति, मनुस्मृति॥ २॥ याज्ञवल्क्यस्मृति शांडिल्यस्मृति। पाराशरस्मृति मनुस्मृति। मुहूर्तमार्तण्ड, कौमुदी ती। नारदाचें भक्तिसूत्र॥ ३॥ रामायण, भारत, भागवत। माघ, कुमार, किरात। रघुवंश आणि मेघदूत। काव्यग्रंथ नानापरी॥ ४॥ अमरकोश, विश्वकोश। शाश्वतकोश, गीर्वाणकोश। आणिक एकाक्षरी कोश। शेखर, मनोरमा, लीलावती॥ ५॥ तर्कशास्त्र, सामशास्त्र, न्यायशास्त्र, वेदान्तशास्त्र। शारंगधर वैद्यकशास्त्र। सुश्रुत,

माधव, वाग्भटादि ॥ ६ ॥ मत्स्यपुराण, गरुडपुराण। वराहपुराण, स्कंदपुराण। कूर्मपुराण, वामनपुराण। देवी भागवत, सप्तशती ॥ ७ ॥ धर्मसिंधु, निर्णयसिंधु, व्रतरत्नाकर आत्मबिंदु। उमाशंकर संवादु। ग्रंथ अध्यात्मज्ञानाचा ॥ ८ ॥ गुरुगीता, रामगीता...कोठवरी सांगाव्या ? ॥"

आणि यापुढें मराठी ग्रंथांची एक भली मोठी विस्तृत यादी आहे. आज निरनिराळया सूचि प्रसिद्ध झाल्यानंतर त्या पाहून वेगवेगळया ग्रंथांची नांवानिशी देणें सोपें आहे. श्रीदासगणूमहाराजांनीं हा ग्रंथ लिहिला त्या वेळीं कोणत्याहि स्वरूपाचें संदर्भकोष प्रसिद्ध झालेले नव्हते. त्या वेळची ही माहिती निश्चितपणें बहुश्रुततेचीं गमकें आहेत.

निरनिराळीं संतचरित्रें वर्णन करीत असतांना मधून मधून त्यांनीं दिलेले ऐतिहासिक संदर्भहि त्यांच्या माहितीची विस्तृतता दर्शवितात. जयरामस्वामीची दशमस्कंदावरील टीका, अनंततनयाचें चंडीरामचरित्र, दयाळनाथांची हैद्राबादेंतील समाधि इत्यादि भक्तिलीलामृतांतील उल्लेख वाङ्मयाच्या अन् इतिहासाच्या दृष्टीनें महत्त्वाचे उल्लेख गणावे लागतील. इतिहास तर त्यांना ठिकठिकाणीं आठवतो. कोंकणाचें नांव येतांच धर्मरक्षणासाठीं तरवार धारण करणाऱ्या बाळाजी विश्वनाथाची, दिल्लीला शह बसविणाऱ्या बाजीराव बल्लाळाची, भीष्मद्रोणाप्रमाणें पराक्रम करणाऱ्या परशुरामभाऊ पटवर्धनाची त्यांना सहजीं आठवण होते. उदगीरचें नांव येतांच निजामाला धूळ चारणाऱ्या मराठ्यांचा पराक्रम त्यांच्या डोळयांपुढें उभा राहतो. पुण्याच्या वर्णनप्रसंगीं शेवटच्या बाजीरावाच्या दुर्वर्तनाच्या स्मृतीनें त्यांचा संताप होतो.

सामान्य वाचकांच्या दृष्टीनें किती तरी नवीन ऐतिहासिक माहितीहि ते सहज जातां जातां पुरवितात. 'संतकथामृता' च्या ६१ व्या अध्यायांत निजामउल्मुल्क बहिरीचा इतिहास त्यांनीं दिलेला आहे. परभणी जिल्ह्यांतील पाथरी गांवचा बहिरवभटाचा तिमाभट या नांवाचा पुत्र होता. त्याला मुसलमानांनीं बालपणींच बाटविलें. तोच हा निजाम-उल्मुल्क. बापाच्या स्मरणार्थ तो आपणांस ' बहिरी ' म्हणवून घेत

असे. याचा मुलगा अहमदशहा. त्यानें आपल्या हिंदुत्वाची खूण म्हणून आपलें अर्धें छत्र लाल रंगाचें ठेविलें होतें. शहा शरीफ नांवाच्या अवलियानें मालोजीला ‘ दोन पुत्र होतील ’ असा आशीर्वाद दिला म्हणून मालोजीनें आपल्या दोन पुत्रांचीं नांवें शहाजी व शरीफजी अशीं ठेवलीं. अशी नवीन माहिती याच ग्रंथांत अन्यत्र आली आहे. ‘ भक्तिसारामृत ’ या ग्रंथांतहि असेच ऐतिहासिक पुरुषांचे नामनिर्देशाचे व त्यांच्या कार्यांचे संदर्भ अनेक ठिकाणीं आले आहेत. ५१ व्या अध्यायांतील ना. गोपाल कृष्ण गोखले व यदूबाबा यांच्या भेटीचें वर्णन या दृष्टीनें वाचण्यासारखें आहे. गुलाममहम्मद् यानें ‘ गर्भगीता ’ लिहिल्याचें वर्णन याच ग्रंथांत अन्यत्र आल्यानें तें वाचकांच्या माहितींत निःसंशयच भर घालणारें आहे.

श्रीशंकराचार्यांच्या चरित्रांत आलेला ऐतिहासिक ज्ञानसंग्रहहि खूपच मोठा आहे. सामान्य इतिहासांत न आलेल्या कांहीं गोष्टी आपणांस येथें प्रथमच समजतात. कुडलगी मठास निजामानें जहागीर दिली, पेशव्यांचे सरदार पटवर्धन व फडके यांनीं शंकराचार्यांचे मठ लुटले व जाळले, विजापूरकरांचा सरदार रण दुल्लाखान वेदांताचा मोठा भोक्ता होता, संकेश्वरास शंकरभारतींचें प्रवचन ऐकून तो खूष झाला व त्यानें त्यास इनाम दिलें, ग्यासुद्दिननें काशी लुटली त्यावेळीं रामानुजस्वामी होते, त्यांस पहातांच ग्यासुद्दिन त्यांना ठार मारण्यास गेला पण तो निर्वैर झाला, मौलाना रसोदुद्दिनानें आपल्या ‘ तज्की रतुल्ल पुकारा ’ या ग्रंथांत रामानंदस्वामींचें विशेष वर्णन केलें आहे. श्रीरंगनाथस्वामीकृत मराठी योगवासिष्ठाची गोदामहात्म्याच्या २२ व्या अध्यायांत पुढील माहिती आली आहे. “ याच मोगरे ग्रामांत । रंगनाथ कवि विख्यात । गेला होऊन ज्याचा ग्रंथ । योग वासिष्ठ असे कीं । कोणी कोणी ऐसे म्हणती । ही योगवासिष्ठ कृति । रंगनाथ स्वामींची निश्चिती । जे झाले निगडीत ॥ परी निगडीकर स्वामीचा । हा ग्रंथ नसावा साचा । त्याचा जन्म गोदातटाचा । जनक रंगनाथ

मोगरेकर ॥ चौकशी करितां ऐसें कळतें । मोगरेकर ग्रंथाते । घेऊन कृष्णातटातें गेले होते कन्यागती ॥ समर्थ रामदास स्वामींसी । मोगरेकर गेले भेटावयासी । त्या पाहतां समर्थांसी । प्रेम दाटलें अनावर ॥ तुझ्या प्रवचनांचा भला । या प्रांतीं लौकिक झाला । एकदां तरी आम्हांला । ऐकीव योगवासिष्ठ ॥ रंगनाथ म्हणाले अवश्य । वाचिलें योगवासिष्ठास । ऐकून त्या ग्रंथास । समर्थें मान डोलविली । श्रीगोदेच्या तटाविना । ऐशी न होय ग्रंथरचना । पारिजात कुसुमांना । जन्म मुळीं नंदनवनीं । ऐशीं बोलणीं झाली बहुत । तै या ग्रंथाची करून प्रत । निगडीकरांचे शिष्य धूर्त । होते त्यांनीं घेतली ॥ आणि आपल्या सद्गुरुंची । परंपरा त्या जोडिली साची । वगळून मोगरेकरांची । केवळ महत्त्व वाढवावया ॥ स्वामी निगडीकरांचा । दोष नाहीं मात्र साचा । हा खटाटोप शिष्यांचा । ग्रंथकर्तृत्व चोरिलें ॥ " याच स्वरूपाचा उल्लेख अगदीं अलीकडे प्रसिद्ध झालेल्या 'श्रीधर काव्यविवेचन' या ग्रंथांच्या प्रास्ताविकांत श्री. पोतदारांनीं केलेला आढळला, त्यावेळीं मला फार नवल वाटलें. श्रीदासगणूमहाराजांनीं ही माहिती ३६ वर्षांपूर्वीं नोंदविली आहे.

या सर्व माहितीवरून कवीची अभ्यासशीलता प्रत्ययास येते. जुन्या व आधुनिक मराठी कविविषयींची माहितीहि महाराजांना बरीच असल्याचें दिसून येतें. संतकथामृतांत मोरोपंतांच्याविषयीं ते म्हणतात– " मराठीचा कालिदास । झाला बारामतीस । त्याच्या काव्यरसास । सेवितां न होय तृप्ति कधीं ॥ ऐसा महात्मा मयूरपंत । साताप्रांतीं पंडित . . . . " रामजोशींना ते 'सरस्वतिकंठमणि' म्हणतात. पांगारकरांचें वर्णन करतांना " तो आंग्लभाषाभिज्ञ असूनी । असे संतांचा अभिमानी । मोरोपंतचरित्र ज्यानें । लिहिलें प्रेमळ वाणीनें । कांकडलों भवरुप थंडीनीं ऐसें वर्णन पंतांनीं । ऐके आर्यैत केलें जाणीं । आळवावया रामचंद्रा ॥ " 'ती आर्या म्हणत म्हणत । येत होते रामचंद्रसुत' या वर्णनांत संताविषयींचा अभिमान असलेले पंतांच्या चरित्रलेखनानें प्रसिद्धीस

आलेले जबर पाठांतराचे आणि नेहमीं कोणतें तरी पद्य गुणगुणणारे ह. भ. प. पांगारकर जसेच्या तसे डोळ्यासमोर उभे राहातात.

या सर्व उल्लेखांवरून श्री. दासगणूमहाराजांची बहुश्रुतता प्रत्ययास येते.

**कल्पनाशक्ति**

कल्पनाशक्तीसाठीं मागें ग्रंथपरिचयप्रसंगीं 'आऊबाईच्या चरित्रां'त उलेखिलेला लेखणी, तरवार, तराजू आणि सारंगी यांच्या वर्णनाचा प्रसंग लक्षांत घेण्यासारखा आहे. गोरा कुंभाराच्या चरित्रांत त्याच्या पत्न्यांनीं गोरोबास आपलेसें करण्यासाठीं योजिलेला उपाय जो कवीनें वर्णन केला आहे, त्यांत उत्कट कल्पनाशक्ति दिसून येते. आपल्या सवतीस आपण निवडलेला उपाय सांगत असतांना गोरोबाची पत्नी म्हणते—

> "देतो मन्मथ ताप फार म्हणुनी तत्पारिपत्यास्तव ।
> पूजूं गे प्रभु नीलकंठ भगवान् जो कां मृडानीधव ।
> शाळुंका निज-वक्ष कल्पुनि बरें वक्षोजलिंगावरी ।
> गोऱ्याचें करबिल्वपत्र बरवें वाहूं गडे लौकरीं ॥"

कामातुर झालेल्या त्या साध्वी स्त्रियांचे तोंडीं घातलेलें या स्वरूपाचें वर्णन किती हृद्य वाटतें, तें रसिकांच्या सहज लक्षांत येईल. पुष्ट, सुडौल वक्षस्थळावर शंकराच्या पिंडीचें आणि गोरोबाच्या हातावरचे बिल्वदळाचें रूपक खरोखरीच मनोहर आहे. अनेक दृष्टींनीं त्यांत औचित्य आहे. भगवान् शंकरानें मदनाचें निर्दालन केलें. या पौराणिक कथेचा उपयोग या ठिकाणीं फारच हळुवारपणें केला आहे! शृंगार-रसाच्या नाजुक आविष्काराचें हा श्लोक म्हणजे एक उत्कृष्ट उदाहरण आहे. कीर्तनोपयोगी आख्यानांतून आणि संतचरित्रांतूनहि कथा मनोरम होण्यासाठीं जीं संविधानकें महाराजांनीं रचलीं आहेत, तींहीं त्यांच्या कल्पनाशक्तीची ओळख पटविणारीं आहेत. सेना न्हाव्याच्या आख्यानांतील गौळणीच्या कामाचा उल्लेख या संदर्भांत अवश्य पहावा.

गोरोबांच्याच चरित्रांत, गोरोबांचें पायदळीं तुडवून मृत झालेलें मूल एक वर्षानें पांडुरंगाच्या कृपेनें परत आलें आणि रांगत येऊन त्यानें आपल्या मातेचा ओचा ओढिला. त्यावेळीं मातेच्या उत्कट वात्सल्याचें वास्तवाला अत्यंत धरून असलेलें पण तितकेंच कल्पनारम्य असें हें शब्दचित्र पहा—

> " जसें वर्षाकालीं जलद जलधारा महिवरी।
> करिती वर्षावा स्तनयुगल त्यांची कृतिवरी।
> पयांतें प्रेराया दम न धरितां हो घडिभरी।
> हजारी कारंजासम स्रवति धारा शिशुवरी॥"

वत्सलरसानें भारावलेलें शब्दचित्र तितक्याच हळुवारपणानें या ठिकाणीं रेखाटलें गेलें आहे. कवीच्या कल्पकतेचा प्रत्यय आणून देणारे असे किती तरी प्रसंग त्यांच्या वाङ्मयांतून ठिकठिकाणीं आलेले आहेत.

## व्यक्तिचित्रण व निरीक्षण

थोडक्या शब्दांत व्यक्तींचें हुबेहूब चित्र रेखाटण्याचें त्यांचें काव्यकौशल अनेक प्रसंगांतून व्यक्त झालेलें आहे. राजाचा खास न्हावी असलेल्या सेनाचें हें वर्णन पहा.

> " सावळा तनूचा वाण, भरिव ती मान, वळविली छान, कानसुलावरती-
> झुलुपें तीं वांकडी, भव्य जयाची छाती !
> धोकटी वाम बगलेंत, दर्पणासहित, असे कंठांत, माळ तुळशीची।
> डोईस पिळ्याची पगडी पीत रंगाची !
> सलकडें रुळे मनगटीं, शिपाई धाटीं, जरीचा कटीं, कशियला शेला।
> पायांत चांदिचा तोडा, अंगिं अंगाला !
> (चाल) करकरा चढाऊं वाजे चालता बाणली जयाच्या अंगीं लीनता।
> दवडिना काळ केव्हांही तो वृथा !
> विमलशा तदिय अंतरीं, वसे हरि हरि, मुखाभीतरीं, नाम हें गाजें।
> निजकर्म कराया म्हणत 'गणू' नच लाजे !!"

पिळदार आडव्या बांध्याचा, ठेंगणाठुसका, काळासांवळा, असा मराठमोळा पुरुष या वर्णनांतून अगदीं दृष्टीसमोर उभा राहिल्यासारखा वाटतो. अंगांतील अंगरख्याचें, डोक्यावरील पिळदार पगडीचे, आणि चालतांना करकरा वाजणाऱ्या चढावाचें वर्णन वाचून राजपुरुषाचा शिपाईबाणा प्रत्यक्ष न सांगतांहि लक्षांत येतो.

जनाबाईच्या आख्यानामध्यें जनाबाईचें वर्णन करीत असतांना महाराज म्हणतात.

> " ठेंगणी जनीची मूर्ति असे कुरुप ती नेसण्याप्रती फाटकीं फडकीं
> बिनकाठि चोळि अंगांत असे बहु तुटकी ॥
> सांवळा जियेचा वाण नयन ते लहान आखुडशी मान शिरीं कच उडतीं
> ' ना तेल ' म्हणुन गाऱ्हाणें जणूं का करिती । "

चारच ओळींचें वर्णन, पण त्यांत जनाबाईचें रंगरूप, दैन्य आणि गरीबीमुळें आलेला अव्यवस्थितपणा याचें अगदीं वास्तवपूर्ण असें चित्र उभें करण्याचें सामर्थ्य आहे.

आईच्या तावडींतून सुटून दारच्या फकीरास घालण्यासाठीं पिठाची चिमूट घेऊन दाराबाहेरील ओट्यापर्यंत धांवत आलेल्या भागूबाईचें–तुकारामबुवांच्या कन्येचें–एकाच आर्येंत रेखाटलेलें हें चित्र पहा–

> " झिंज्या भुरभुर उडतीं, बांडाचें वसन फाटकें जीर्ण
> धांवत आली दारीं, प्रेमें साईप्रती करी नमन ॥ "

भागूच्या अंतःकरणांतील आतिथ्यप्रेम, नम्रता, आईच्या धाकानें आलेली अधीरता, हे सर्व भाव या एकाच आर्येंतून चांगल्या रीतीनें प्रकट झाले आहेत.

शेतकऱ्याचें दैन्य आणि सावकाराचा जुलूम यांचें ' भक्तिसारामृत ' ग्रंथाच्या ' विठोबा घाडग्यांच्या ' अध्यायांत आलेलें हें पुढील वर्णन विचार करण्यासारखें आहे–

तगाद्यास आलेल्या पठाणाला कुणबी विनंती करतों कीं–

> " आज द्याया कांहीं नाहीं । घरामध्यें एकही पै । मका पिकला शेताठायीं ।
> तिच्यावरीच गुजराण ॥ सकाळीं कण्या भरडितों । अस्तमानीं कणसें खातों ।

**ताटें बुरखुंडें घालितों । गाई म्हशी गुरांना ॥ कशाचा अमुचा संसार सगळा फजितवाडा थोर । आज महिने झाले चार । लुगडें नाहीं कांतेसी ॥ तवल्या, मडकीं सैंपाका । हंतराया कांबळा देखा । तोही बहुत फाटका । सहस्रनयन इंद्रासम ॥ धिक् धिक् शेतकऱ्याचें जिणें । धनी मात्र कष्टाचें ।**

याच प्रकरणीं कुणब्यास कोंडून ठेवलेल्या सावकाराच्या बळदाचें वर्णन अत्यंत भयानक व किळस आणणारें असें आहे. तें वाचून सावकारीच्या क्रूर पद्धतीची कुणासहि चीड यावी.

त्या शेतकऱ्याची बायको सावकारास म्हणते—

**" साहु मेले खुशालचंद । चैनींमध्यें सदा धुंद । लक्ष्मीचा अंगीं मद । ओतप्रोत भरलासे ॥ आम्ही कष्ट करावे । खळें त्यांनीं भरून न्यावें । मातेऱ्यावरी काढावे । दिवस आम्हीं मारुती ॥ "**

हे सात्त्विक संतापाचे उद्गार अगदीं यथार्थ असून सावकारीविषयींची तीव्र चीड वाचकांच्या मनांत उत्पन्न करणारे आहेत.

महाराजांच्या वर्णनशैलीचा व व्यापक निरीक्षणाचा पुरावाहि यामुळें मिळणार आहे. ओवीबद्ध ग्रंथांतून या तऱ्हेचीं अनेक क्षणचित्रें महाराजांनीं वर्णिलेलीं आहेत. पुत्रासाठीं अघोर आचरण करणाऱ्या स्त्रिया, पंढरपूरच्या अनाथालयांत जाणाऱ्या बाया, सासुरवास करणाऱ्या कजाग म्हाताऱ्या, जारणमारणादि प्रयोग करणाऱ्या चेटकिणी, पैशा-पासरी भिक्षुक, दुर्वर्तनी शाक्त, नाटकी कीर्तनकार, तुरगब्रह्मचारी तरुण, या सर्वांचीं वर्णनें मार्मिकपणें करून कवींनीं त्यांचा उपहास केला आहे. निरनिराळ्या धंद्याविषयींचीं त्यांचीं मतेंहि सामाजिक दृष्टीनें विवेचिलीं आहेत. नोकरींत गुलामगिरी, व्यापारधंद्यांतील फसवेगिरी, शहरांतील गटाराप्रमाणें वरून स्वच्छ पण आंतून गलिच्छ असलेला वकीलीचा धंदा, रोग्याच्या नडीचा आणि सांथीचा फायदा घेऊन आपला तळीराम गार करणारे आपमतलबी डॉक्टर, वैद्य, याविषयीं ते म्हणतात—

**" जरी करावी नोकरी । तरी ती होय ताबेदारी । मोठा हुद्दा मिळाला जरी । तरी न त्यामध्यें उपयोग ॥ जरी करावा व्यापार । तरी लबाडीचा**

बाजार । लबाडीवीण व्यवहार । एक न होत ते ठायां ॥ आतां परीक्षा वकीलीची । जरी देऊं आज साची । तरी ती शाळाच अनीतीची । नको संबंध तयाचा ॥ वकील वर्गाचें तें ज्ञान । वर्षाऋतूचें गंगेसमान । असत्याचें गढूळपण । सर्वत्र भरलें तें ठाया ॥ अपवित्र म्हणाया जागा नाहीं । पवित्र म्हणतां न उपयोग कांहीं । नौकेवांचून गति नाहीं । वर्षाऋतूंत तरावया ॥ ''

अशा रीतीनें निरनिराळ्या धंद्यावरील त्यांच्या टीका मार्मिक आणि सूक्ष्म निरीक्षणाच्या द्योतक आहेत. उसाच्या पोवाड्यांत आलेलें (वेंच्यामध्यें याचा उल्लेख आहे.) शेतकऱ्याच्या घराच्या जप्तीचें वर्णन किती हृदयद्रावक आहे, तें वाचकांनींच ठरवावें. बाजाराला चाललेल्या नवऱ्याला आपल्यासाठीं इरकली साडी आणि ठुशी आणण्यास सांगत असतांना शेवटीं ज्या वेळीं त्याची बायको " आणण्यास बाळयाचि अफू, सख्या, चुकू नका ! " असें म्हणते त्या वेळीं कोंपरापर्यंत आलेल्या बाह्याची चोळी घालणारी, कपाळावर कुंकवाचा मोठा टिळा असणारी आणि कडेवर किरकोळ हातापायांचें, मोठ्या पोटाचें रडकें पोर घेऊन उभी राहिलेली, दारिद्र्यानें पीडलेली, शेतकरीण नेमकी उभी राहाते कीं नाहीं ? सूक्ष्म निरीक्षण नि हुबेहूब वर्णनें या दृष्टीनें हा सर्वच पोवाडा वाचनीय आहे. " बाकी मुळींच नाहीं, उलट तुझ्या डोक्यावर कर्जाचा बोजा चढलेला आहे, असें सांगतांच, धसका बसून, कंबर ढिली झाल्याचें व खावयाकरितां घेतलेली तंबाखूची चिमूट हातांत तशीच राहिल्याचें वर्णन शेतकऱ्याच्या दीन परिस्थितीची जशीच्या तशी कल्पना आणून देणारें आहे.

नरहरी सोनाराच्या चरित्रामध्यें आलेलें गुजराथी साहूचें वर्णन उत्कृष्ट शब्दचित्राबरोबरच विनोदीहि आहे—

" भिकबाळि कानिं फाकडी । गळ्यांतुन लडी । हातिं सलकडी । पगडी डोक्याला लाजवी जयाचें पोट सहज डेऱ्याला ॥
वातूळ आवघें शरिर । चाल गंभीर । याया आधार । दोन्हि बाजूला
चाकर उभे सांवराति सदा साहूला ॥

अंगरखा अंगिं पायघोळ मखमली । अत्तरें सुवासिक अंगा लाविलीं ।
कंबर पट्टा शेल्यानें बांधिली ।
भालास गंध केशरी । चढावावरी । कलाबुत खरी । भरली नखऱ्याची
गणु म्हणे अशी ही खूण लक्ष्मिपुत्राची ॥ "

मोंगलाईंतील अंदाधुंदी राज्यव्यवस्थेचें उपहासात्मक पण पूर्णपणें यथार्थ असें वर्णन करीत असतांना महाराज म्हणतात—

" अदिलशाही तक्त विजापुर गादि बादशहाची रियासत मुसलमानाची ।
बेबंद, कायदा धुंद, दाद ना लागत कवणाची । खिरापत हमेश पैशाची ।
मनगटीं असे ज्या जोर, तोच शिरजोर मजा त्याची ।
खबर ना कुणास कवणाची ।
सरदार अमिर उमराव ' गणपति ' अडचण खुर्चीला ।
कायदा मुळींच मरून गेला ।
नाझम, मुळिंच बेफाम, दिसाआड कचेरीस येती । बसुन सदरेस झोंप घेती । कसा करिल जो सैल तयावर बहाल मर्जि त्याची । गरीबा गांठ दंडुक्याची । "

मोंगलाईशीं ज्याचा थोडा तरी संबंध यापूर्वी आला असेल, त्याला या वर्णनाची वास्तवता निःसंशय पटेल. मुसलमान अधिकारी केवळ ' आपली राजसत्ता ' याच बळावर मोठमोठ्या स्थानीं नेमले जात. सही कुठें करावी, इथपासून त्यांना समजावून देण्याचा प्रसंग येई. त्यांचें वर्णन ' खुर्चीला अडचण ' या शब्दानें करण्यांत, वा ' सदरेला बसून झोंपा काढतात, हें म्हणण्यांत मुळींच अतिशयोक्ति नाहीं. पराकोटीची लांचलुचपत, उर्मट अन्यायीपणा आणि क्रूर राजवट याची कल्पना या पदांतून अगदीं यथार्थ येते.

महाराजांना त्याज्य वाटणाऱ्या गोष्टीचें वर्णन करीत असतांना सूक्ष्म उपहासाची चमक त्यांच्या वर्णनांतून कशी चमकून जाते, या उदाहरणाच्या दृष्टीनें बोधलेबुवांच्या आख्यानांत आलेलें वारकऱ्यांच्या दिंडीचें वर्णन पाहाण्यासारखें आहे.

" पांढरें, धुवट साजिरें, जरीचें खरें, शिरीं असतीं ।
रूमालाची ती एक धरती ।
कंठांत, तुळशिचि माळ, लोंबता टाळ, वजन ज्याचें ।
असें प्रत्येकी पावशेराचें ।
अंगांत धवल अंगरखा, कपाळीं बुका, कानसुलाच्या ।
वरी मुद्रा कीं चंदनाच्या ।
ढळढळित असे वारकरी, कवाइत पुरी, भजनिं करिती ।
प्रदर्शन जगा दाखविती ।
खळखळां टाळ बोलती, पताका हातीं, मृदंग गर्जे ।
पिपी ...... तुर्र तुर्रक शिंग वाजे ।
टणटणा मारिती उड्या, बहुत फाकड्या, घेति गर्का ।
जणूं साळ्याचा सूत चर्खा ।
असे जरी, सजले वारकरी, मुखीं आहे परी । नाम हरिचें ।
म्हणुनि त्यालागि नमन गणुचें । "

या पदांतील शब्दरचना व त्यामागील भाव, ह्यामुळें वारकऱ्यांची दिंडी जणूं टाळझांजांचा गजर करीत व नामघोषाबरोबर पावलें मागें पुढें टाकीत मोठ्या डौलानें चाललेली आपण पहातों आहोंत, असाच भास होतो. त्यांच्या भजनांच्या तालांतल्या स्वतःच्या अंगाभोंवतीं फिरण्याला साळयाच्या चरख्याची उपमा देऊन महाराजांनीं त्यांच्या भजनाचा निर्जीवपणा मोठ्या कौशल्यानें सूचित केला आहे. या पदांतील प्रत्येक शब्द हा जणूं वारकऱ्याच्या वरवरच्या झांकीचें विडंबन करतो आहे, असें वाटतें आणि तरीहि शेवटच्या ओळींनीं या सर्व उपहासाला एकतऱ्हेची कलाटणी मिळून संप्रदायाचेंहि महत्त्व पटवून दिल्यासारखें झालें आहे.

देशमुख जमीनदारांचें वर्णन करतांना 'भक्तिसारामृता' २६ व्या अध्यायांत जमेदाराचें केलेलें पुढील वर्णन पाहाण्यासारखें आहे.

" त्यावेळचे जमेदार । म्हणजे जुलमाचें केवळ घर । राजरोस दरोडेखोर ।
तेच जाणा निश्चयें ॥ आद्यापेक्षां खर्च भारी । बायका बहुतेक गोषांतरीं ।

**लिहिली न प्रारब्धांत खरी। स्वच्छ हवा तयांच्या ॥ कोठी जयांचीं वणिक घर शिरीं कर्जाचा बोजा फार। इतकेंही असून मग्रूर। अंगीं खिळला दुपष्टणा ॥ "**

थोड्या शब्दांत हुबेहूब ' इनामदार ' डोळयांपुढें उभा राहतो. यांत काय नाहीं ? उर्मट, उधळ्या, कर्जबाजारी आणि दुष्ट असे जमेदार या वर्णनांत स्पष्ट प्रत्ययास येतात. त्यांच्या बायकांचें दैन्य कींव आणतें.

कीर्तनाला जमणाऱ्या श्रोत्यांची ही वर्गवारी पाहा—

**" देखणा असल्यास कथेकरी। बाया कीर्तना जमती भारी। ताना घेत असला जरी। तरी येती नाटकीं ॥ धृपद, टप्पा, घमार। म्हणता गवय्ये जमती फार। वा प्रतिपादितां शृंगार। आंबटशोकीं जमती हो ॥ गीता, पंचदशी, भागवत। सांगतां जमती शास्त्री बहुत। बुवास असल्या अयाचित। गर्दी होते भिक्षुकांची ॥ "**

श्रोत्यांच्या स्वभावाची ही विविधता नि वर्गवारी समाजाच्या सर्व प्रकारच्या थरांतून महाराजांचें निरीक्षण सूक्ष्म असल्याचें दाखवीत आहे. याहीपेक्षां याचकाचें एखाद दुसऱ्या शब्दांतच केलेलें वर्णन वरील विधान चांगलेंच सिद्ध करील.

**" पहा याचका माझारीं। बैरागी कोपिष्ट भारी। लोचटपणाची पायरी। दिली पाहिजे तेलंग्यास ॥ तोंडपुजे क्षेत्रस्थ वारकरी ढोंगी बहुत। वरवरल्या झाकीप्रत। रामदाश्याजवळ जागा॥ शीख याचक मग्रूर। गोसावी दुष्ट फार। उत्कर्ष पराचा फकीर। पाहुन मनीं जळफळती ॥ "**

आप्तेष्टांच्या प्रेमाची वर्गवारी करीत असतांना ' भक्तिसारामृताच्या ' ४४ व्या अध्यायांत पुढीलप्रमाणें वर्णन आलें आहे—

**" सहेतुक प्रेम बापाचें। निष्काम मात्र आईचें। पापमूलक बायकोचें। आशाबद्ध पुत्रप्रेम ॥ कन्याप्रेम भिक्षुकापरी। श्रीमंती असल्या माहेरीं। एखादे वेळ कांहींतरी। मजलागीं मिळेल ॥ मित्रप्रेम निर्भिड। आणि वेऱ्याचें महाजड। ज्याप्रेमीं गवसतां हाड। कडकडा मोडे तनूचें ॥ "**

**" जोड्या प्रेमाच्या लावितां। वैरी आणि निजकांता। समसमान मित्र-माता। पुत्र आणि पितासम ॥ एकवर्गी कन्याभिक्षुक। देवघेवीचे इतर**

**लोक। निरिच्छ सद्गुरुमात्रदेख। त्या अवघ्यांहून वेगळा॥त्याच्या प्रेमाची समता। न ये एकाही सर्वथा। तो आपुल्या शिष्याकारितां। अवघेंचि होउनि राहतो॥"**

नेहमीं संतचरित्राचेंच गायन करणारे श्रीदासगणूमहाराजांचें कवि-मनहि अगदीं व्यावहारिक वस्तूंची नोंद किती लीलया करितें, हें भक्तिसारामृताच्या ४० व्या अध्यायांतील निरनिराळ्या जातींच्या बैलांच्या वर्णनांत दिसून येतें—

**" आधींच बैल खानदेशचे। प्रतिअवतार हरिणांचे। अशांत आश्रया श्रीमंतांचे। मग काय विचारितां? बैल उंच काठेवाडी। महामजबूत भिवरथडी। माळव्याचा पहाडी। सुरेख मात्र कानांत॥ कर्नाटकी सुंदर। गंगथडीचे गरीब फार। पुच्छें धरून पाठीवर। उधळती, परी न करिती इजा॥ खुरटलेले कोंकणी। खानदेशी पळणार जाणीं। वऱ्हाडी उभ्या शिंगांनीं। शोभायमान दिसती हो॥"**

हें वर्णन संतचरित्रांत आलें आहे म्हणून, ललितवाङ्मयांत जर हें आलें असतें, तर कवीच्या यथार्थ निरीक्षणशक्तीचा टीकाकारांनीं कोण गौरव केला असता!

लग्नांत गोळा होणारांचें हें मानसशास्त्र पहा—भक्तिसारामृताच्या ३७ व्या अध्यायांत—

महाराज लिहितात कीं, लग्नांत गोळा होणाऱ्यांचा आनंद प्रत्येकीं आपापल्यापुरताच असतो. मुलीला तरुण, श्रीमंत, सुंदर, सद्गुणी असा पति हवा असतो, मुलाला रूपवती पण आज्ञाधारक वधू पाहिजे असते, मुलीच्या आईला मुलीला दागिने मिळण्यांत आनंद,

**" कन्या—पित्याचें इच्छी मन। सोयरा असावा लौकिकवान्<br>मात्र खर्चाचें तें मान। कमी पडावें मजलागीं।<br>गांवांतील सभ्य इतर। संतुष्ट हारतुऱ्यावर<br>नारळ, वर्खी, विडे अत्तर। मिळाल्या लग्न उत्तम ठरे।"**

वरमाईला हौसमौज चांगली व्हावी असें वाटतें, करवल्या मानापमान पाहातात, वरपक्षाच्या इतर बायांना मिरविण्याची हौस असते, या

वर्णनांतून कोणत्याहि वऱ्हाडाचें मानसशास्त्र काय असतें, तें पाहून घ्यावें.

अनेक बारीकसारीक गोष्टीसुद्धां महाराजांच्या दृष्टींतून सुटलेल्या नाहींत, हें पाहून आश्चर्य वाटतें. सावकारांनीं केलेल्या नमस्काराचा हेतु महाराज कोणत्या शब्दांत सांगतात तें पहा.

**“ हे अवघे सावकार । जों करिताती नमस्कार ॥**
**तों दागिन्यांनीं मंडित कर । आहे हें दाखवावया । ”**

विद्वत्तेला मूठमाती देऊन ब्राह्मण हा भिक्षुकीच्या धंद्याकडे केवळ पोटार्थीपणानें कसा पाहातो, याचें वर्णन करीत असतांना वडिलोपार्जित ग्रंथसंभाराला काय स्वरूप प्राप्त झालें आहे, याचें वर्णन महाराज करितात—

**“ धूळ अगणित तयावर । आणिक कोळ्यांनीं केलें घर ।**
**वेष्टणें तोडिलीं साचा । मूषकांनीं ठायीं ठायीं ॥ ”**

हें असें कां झालें त्याचें कारण सांगतांना ते म्हणतात—

**“उपयोग या ग्रंथांचा । नाहीं सांप्रत मशीं सांचा । मात्र जुन्या चिरगुटांचा । काळ होऊन बसलेत ॥ नवरात्रांत अष्टमीसी । गंधफूल वाहाती त्यासी । उतरून खालीं बळदासी । नैवेद्यही दाखविती ॥ शांतिक, पुष्टिक कोनाड्यांत । पोथी सत्यनारायणव्रत । ह्या ठेविल्या वरतीं मात्र । कांकीं उपयोग तयांचा ॥ ”**

वस्तुतः ब्राह्मणानें कोणतीहि अपेक्षा न धरतां वेदशास्त्रपुराणें यांचा अभ्यास करावयाचा असतो. परंतु विद्वत्ता एकदां पोटार्थी बनली, ब्राह्मणाचा भिक्षुक झाला कीं, तो किती हीनमनस्क होतो, याचें अत्यंत तिरस्कारगर्भ असें चित्र महाराजांनीं वरील प्रसंगांतून रेखाटलें आहे. ज्या पोथ्यांचें वस्तुतः सतत अध्ययन करावें, वरचेवर अवलोकन करावें, त्या पोथ्यांना वर्षांतून एकदां केव्हां तरी ‘ गंधफूल ’ वाहिलें आणि नैवेद्य दाखविला म्हणजे कर्तव्य संपलें, असें मानण्यांत ब्राह्मण्याचा केवढा घोर अधःपात आहे, तें महाराजांनीं सूचित केलें आहे !

एकाच ओंवींत उपवर कन्येच्या मुग्ध भावांचें आलेलें हें वर्णन किती

सुरेख आहे तें पहा—शंकराचार्यचरित्रांत सरस्वतीच्या लग्नाची वाटाघाट चालू असतांना ते लिहितात—

> " नांव ऐकतां मंडण । किंचित् केलें हास्यवदन ।
> विनयें खालीं घालून मान । मुख प्रफुल्लित जहालें ॥ "

कालिदासाच्या कुमारसंभवांतील अशाच प्रसंगींच्या पार्वतीवर्णनाची आठवण या ठिकाणीं होतें. पार्वतीचें वर्णन कालिदासानें ' पार्श्वे पितुः अधोमुखी । ' असेंच केलें आहे. पार्वती हातांतील कमळाच्या पाकळ्या मोजीत होती, तर सरस्वती आपल्या पदराचें टोक बोटाला गुंडाळीत होती ! भाव लपविण्यासाठीं कांहीं तरी चाळा म्हणून केलेल्या या गोष्टींमुळेंच मुग्ध भाव प्रगट होतो, हें शालीन बालिकांच्या लक्षांत आलें नाहीं, तरी जाणते ओळखतातच. महाराज म्हणतात—

> " ही जी ऐशी झाली स्थिति । तीच्च कन्येची संमति ।
> ज्ञाते पुरुष मानिती । लग्ननिश्चय जाहला ॥ "

लोकमान्य टिळक चरित्रामध्यें थोरले बाजीराव पेशवे, गर्भास आशीर्वाद द्यावयास आले, त्या वेळीं महाराजांनीं त्यांच्या मुखीं पुढील पद्य घातलेलें आहे—

> " बालका, मुलुख आपुला, विदित आहे तुला, धनाची वाण-
> खावया साळिचे कण ।
> दारांत केळि नारळ, फणस पोफळ, कळक सदनाला,
> अळु, कडवे, चवळि भाजिला ।
> परि त्याच खंत ना करि वसे कस्तुरि, हीनशा स्थानीं
> तसें आहों आपण कोंकणी ।
> गणु म्हणे, तंडुला पहा, तसा शुचि रहा, दारिंचा माढ-
> तैसा तुं लौकिका चढ । "

कोंकणांतील परिस्थितीचें वास्तव चित्रण या ठिकाणीं झालेलें आहे. ' अळु, कडवे, चवळि भाजिला ' म्हणण्यांत, वेळूनें शाकारलेल्या घरांचें वर्णन करण्यांत, परसांतील केळी पोफळीच्या उल्लेखांत सर्व कोंकण

जणूं डोळयापुढें उभें राहातें. शेवटच्या उपमांतून तर समर्पकतेसहच उपमा देणाराचें व्यक्तिमत्वाहि स्वाभाविकपणेंच प्रकट झालेलें आहे.

भक्तिसारामृताच्या १० व्या अध्यायांत आलेलें कालिकेचें पुढील वर्णन रौद्ररसाच्या सम्यक् परिपोषाचा एक उत्कृष्ट नमुना आहे.

"तयीं ती षोडषभुजा नारायणी। चंडरूपा चंडवदनी। केस मोकळे करूनी। पाठीवरी सोडिले ॥ धवधवीत मळवट भाला। कंठीं नरकपालमाला। घंटा कटिप्रदेशाला। वाजूं लागल्या घणघणा ॥ दांत दाढा भयंकर। जिव्हा रुळे हृदयावर। नेत्र जेवीं खदिरांगार ॥ फणी वेष्टिलें ठायीं ठायीं ॥ असि, गदा शूल करी। भळंदे वाम करावरी। ज्वाला जयाच्या गगनोदरी। असंभाव्य चालल्या ॥ डिमडिमा डमरू वाजत। नाना चवंडकें गर्जत। संबळाची अतोनात। गर्दी केली भूतगणीं। थयथयां नाचे जगदंबा। महाकाली सकलारंभा। मर्दुनी शुंभानिशुंभा। रक्त तोंडा माखिलें ॥ वर्ण अति सांवळा। दैत्यांतडीं घातली गळां। कटीभवती निंबपाला। त्याली असे मातुश्री ॥"

कोमटी सावकाराच्या वर्णनास या थोडयाच ओळी पुरेशा आहेत.

"जामानिमा अंगावरी बचकणी पागोटें शोभे वरी। रेशमी धोतर दुहेरी भव्य कांठाचें अंगावर ॥ पायांत गंगाखेडी जोडा। कानांत मोत्याचा चौकडा। कमरेस खंजीर वाकडा। मूठ जया सुवर्णाची ॥ वर्ण काळा-कुळकुळीत। काजळा मागें सारीत। नेभळेपणा सदा वरित। जयाचिया मुखश्रीला ॥"

सूक्ष्म निरीक्षणाच्या दृष्टीनें पुढील दोन व्यक्तिचित्रें विशेष आकर्षक आहेत.

"हुरडा कोवळा लुसलुशीत। राखणदारही क्षुधावंत। आगटीहि रसरशीत। दैवयोगें पेटलेली ॥ मालक तोही गांवा गेला। पाखरांचा समय टळला। मग तो राखणदार कणसाला। कां न काढून खाईल ? ॥ वा किराण्याच्या दुकानातें। भुइमुगाचें उघडें पोतें। मालक गेला गृहातें। गिऱ्हाईकही नाहीं कुणी ॥ ऐशा स्थितीमाझारी। मुनीम सहज मूठभरी। पदर लावुनि मुखावरी। दाणे खात बैसतसे ॥"

संत सखूच्या आख्यानांत सासुरवाशी मुलीला होणारा जाच व

त्यामुळें जीवन नको, असें तिला वाटावयास लावणारें तिचें दैन्य अत्यंत समर्पक शब्दांत, महाराजांनीं वर्णन केलेलें आहे. सखूची एक मैत्रीण आपली परिस्थिति सांगतांना म्हणते—

**“ मामाजि बहुत रागीट दीर तो कपटी ।**
**जाऊ ती परम लाघवी, मनाची खोटी ॥**
**नवऱ्याचें अंगीं मुळिं ना पक्केपण ।**
**सासु ती पाहतां केवळ कैदाशिण ।**
**जावेचीं लेंकरें हगती रात्रंदिन ।**
**काढितां तयांचा नरक किळस ये पोटीं ।**
**नको नको असा हा जन्म पुरे जगजेठी ॥ ”**

जुन्या काळांतील कोवळया मुलींना होणाऱ्या निष्ठुर सासुरवासाचें हें चित्र मोठें करुणाजनक आहे. मानभावीपणानें वागणाऱ्या दीरजावा, बायकोची बाजू घेऊं न शकणारा दुर्बळ नवरा, खाष्ट सासू, आणि धाकट्या सुनेलाच करावीं लागणारीं निरनिराळीं कष्टाचीं नि किळसवाणीं कामें हें मध्यमवर्गीय कुटुंबाचें काळें चित्र लाज उत्पन्न करणारें आहे, परंतु त्यांतच महाराजांची सहानुभूति किती व्यापक, सर्वस्पर्शी अन् विशाल आहे, तें दिसून येतें. भक्तिमार्गी जुन्या आचारविचारांचे अभिमानी, अशा वृत्तीचे असूनहि, महाराजांच्या अंतःकरणांत सर्व थरांतील पीडितांविषयीं अन् उपेक्षितांविषयीं पराकाष्ठेचा जिव्हाळा आहे.

आपल्या एका फटक्यामध्यें ते म्हणतात—

**“ महारमांग ते भिल रामोशी मरूं लागले नच खाया ।**
**लहान भावंडें तीं तुमचीं, तुम्हांस त्यांची ये न दया ।**
**ज्येष्ठभ्राता पितुःसम हें शास्त्र सांगतें कंठरवें ।**
**या तत्त्वावर लोटुनि माती खूळ काढितां नित्य नवें ? ॥ ”**

अस्पृश्यतेसंबंधींहि कवीचा दृष्टिकोन उदार आहे. भंगी घाणेरडें काम करितात, म्हणून त्यांना नीच मानणें योग्य नव्हे. माता ही आपल्या मुलांचीं मलमूत्रें साफ करिते, तिला जर त्यानें नीचपणा

येत नाहीं, तर समाजाचें तशाच प्रकारचें काम करून त्यास आरोग्य देणाऱ्या जातीस कमी लेखणें, हें अयोग्य आहे; असें महाराजांचें स्पष्ट मत आहे.

'महारांनीं भरल्या पाणी काय विटाळे स्वर्धुनी ?–महार नीच म्हणुनि–काय सोडीलें भूमीनें ?' विमलानंदसाधूंनीं एका महारणीस स्पर्श करून तिचा महारोग बरा केला, त्या वेळीं ब्राह्मणांनीं भ्रष्टपणाचा आरोप केला, त्या वेळीं विमलानंदांनीं त्यांच्या पोकळ कर्मठपणाचा तिरस्कार केला, असें वर्णन महाराजांनीं केलेलें आहे.

'भक्तिलीलामृता' मध्यें श्रीधरस्वामींनीं शूद्रास कमी लेखणें फार वाईट आहे, हें ब्राह्मणांस मोठ्या चातुर्यानें पटवून दिल्याचें वर्णन महाराजांनीं केलें आहे. शूद्र हें विराटपुरुषाच्या पायांप्रमाणें असल्यामुळें त्यांची उपेक्षा करणें हें शरीराला लंगडेपणा आणण्यासारखें आहे, असा युक्तिवाद महाराज करितात. त्याचप्रमाणें जातीजातींत मत्सर वाढविणारा बद्ध जाणावा, असें त्यांनीं स्पष्ट म्हटलें आहे. जातिमत्सर हा एक रोग असून त्याची उपेक्षा करणें हें समाजस्वास्थ्याच्या दृष्टीनें अत्यंत घातक असल्याचें त्यांनीं ठिकठिकाणीं प्रतिपादिलें आहे, मात्र जातीच नसाव्यात, जातिधर्मच नष्ट व्हावा, असें त्यांचें मुळींच मत नाहीं. उलट ते म्हणतात—

**" हिंदु धर्म हा तरुवर मोठा, अनेक जाति तच्छाखा ।**
**म्हणुन तयाला शोभा आली, राहूं द्या त्यां तोडूं नका ॥ "**

कांहीं लोकांना ही दुहेरी कसरत कठीण आहे, असें वाटेल, पण सामाजिक आचारनियम सांगतांना ते कसे अंमलांत येतील, हें महाराजांनीं आपल्या ग्रंथांतून ठिकठिकाणीं स्पष्टपणें सांगितलेलें आहे.

## निसर्गवर्णनें

निसर्गवर्णनाचा थोडासा उल्लेख करून सूक्ष्मनिरीक्षण आणि हुबेहूब वर्णनें हा भाग पुरा करूं.

तुकारामचरित्रांतील हें वर्षाऋतूचें वर्णन पहा.

> " झंझावात बळावला कडकडा झाडें वनीं मोडतीं।
> ठायीं ठायीं विजा नभीं तळपती, तैं मेघ आंदोलती।
> पाण्याचे पथिं पाट वाहति जणूं, आला नद्यांना पुर।
> अंगाच्या वरि द्यावयास नुरलें तै कोरडेंसें चिर ! १ ॥ "

कोसळणारा पाऊस, घोंघावणारा वारा, मेघांचा गडगडाट आणि रस्त्यावरून वेगानें वाहणारें पाणी या सर्वांचें चित्र एकाच श्लोकामध्यें दृष्टीसमोर चांगल्या रीतीनें उभें राहातें. रात्रींचें वर्णन करतांना—

> " नभरूप करंडा। भरला अंधकार काजळानें ॥ रात्र झाली दोन प्रहर। कृष्णाशालू चराचर रजनी वाटे नेसली ॥ नक्षत्रें त्या शालूवर। खडी वाटे साचार। आकाशगंगा हाच पदर। शोभे तया शालूचा ॥ "

दुसऱ्या एके ठिकाणीं 'तुलसीदासचरित्रांत' रात्रींचें वर्णन करीत असतांना, महाराज लिहितात—

> " नक्षत्रसंघ कंठांत, हार साक्षात, भालिं आरक्त, तिलक कुंकवाचा मंगळ पुत्र भूमिचा। "

रात्रींच्या भयानकतेचें वर्णन पुढील पदांत अत्यंत चांगलें झालेलें आहे.

> " दिवाभीत घूत्कार करिती वनी फार।
> सर्वत्र अंधार दाही दिशांना।
> 'टी टी' असा होत टिटवी ध्वनी।
> खाति धुंडाळुती तरस पुरल्या शवाला। "

अंधाऱ्या रात्रीं निर्जन प्रदेशांतून हिंडत असतांना घुबडाचे आवाज आणि स्मशानभूमीवर ऐकूं येणारी तरसाची खसखस या ठिकाणीं चित्रित झालेली आहे. वेंच्यामध्यें उल्लेखलेलें सावतामाळी चरित्रांतील मळयांचें वर्णनहि चांगल्या वर्णनाचा एक नमुनाच आहे. वनश्रींचें वर्णन करीत असतांना शंकराचार्यचरित्रांत ते म्हणतात—

> " श्रोते, हा मलबार। सुपीक आणि संपन्न फार। एक वगळिल्या काश्मीर। याची सरी न ये कुणा ॥ सह्याद्री पूर्व बाजूला। आणि रत्नाकर पश्चिमेला।

तेथिच्या सृष्टिसौंदर्याला। कोठवरी वानूं मी ? ॥ वाटे अवघ्या सुवर्त्तांनीं मुक्काम केला त्या ठिकाणीं। पुढें येणार जाणोनी। जगद्गुरु तया प्रांता ॥ वनविहार करण्या भली। वनश्री ती तेथ आली। काननीं विचरूं लागली। अपुल्या साऱ्या वैभवासह ॥ पादपांच्या नाना जाती। त्यांची नये करितां गणती ॥ ”

“ अश्वत्थवट उदुंबर। साग शिसवी देवदार। आम्र बिंब जंबीर। श्वेत हरित पीत चाफे ॥ करवंदाच्या नाना जाळी। जिकडे तिकडे पसरल्या ॥ सिंह वाघाच्या गर्जना। ऐकूं येती क्षणक्षणा। तेणें लता भिउनीं मना। वृक्षपतींना आलिंगिती मृग लांडगे कोल्हे रोही। कळाबिटाला पार नाहीं। झुडपांतून नायीं ठायीं। ससे पळतीं सुंदर ॥ खिल्लारें गाईम्हशींची ॥ निर्भय चरती काननीं साचीं। रगार्डी हरळकुंदांची। झाली होती महीठायां ॥ किलबिलाट खगवर्यांचे। होती नानातऱ्हेचे। मैनाराघु कोकिळेचे। श्रुतिमधुर शब्द होती ॥ कमळें उदेलीं सरोवरीं। मकरंदानें पूरित सारीं। गुंजारव तयावरी। भ्रमर करूं लागले ॥ पिसारा तो उभारुन। मोर नाचती प्रेमें करुन। जे सरस्वतीचें वाहन। तुरा मस्तकीं जयांच्या ॥ केतकीची अपार वनें। त्यांच्या मधुरसुवासानें। वेधून डोलती आनंदानें। मोठमोठे फाणिवर ॥ ”

शंकराचार्य चरित्रांतच अन्य ठिकाणीं वनश्रीचें वर्णन करतांना महाराज म्हणतात—

“ श्रोते हें कानन। परम होते शोभायमान। वृक्षांसीं वृक्ष लागले सघन। वाटे भेदिती नभातें ॥ वेली त्या नाना जाती। निजपतींस आलिंगिती। वृक्ष हेच त्यांचे पति। ऐशीं विविध दांपत्यें ॥ निजपतींच्या आलिंगनें हर्ष झाला त्याकारणें। तो सुवासिक पुष्परूपानें। दृष्टी पडूं लागला ॥ वाटे महीचा उपकार। फेडावयासी साचार। मोठमोठे तरूवर। वर्षाव करिती सुमनांचा ॥ तीं पडतां दूर्वांकुरीं। वाटतीं बुट्टे जरतारीं। काढिले काय शालवरी। हरितवर्ण पृथ्वीच्या ॥ ”

वृक्षांच्या उंचीचें वर्णन करितांना पुढील वर्णन अत्युक्तिपूर्ण पण रम्य आहे.

“ एकापेक्षां एक मोठे। वृक्ष गगना भेदिती वाटे। कित्येकांनीं बांधिले फेटे। शुष्क मेघांचे निजाशिरा ॥ ”

वृक्षवेलींच्या उल्लेखामध्यें खूपच विविधता आहे. ६०–७० वृक्ष-वेलींचे उल्लेख तरी महाराजांच्या काव्यांतून येतात. या वनवर्णनामध्यें विविधता आहे आणि वनश्रीचें सौंदर्य व्यक्त करणाऱ्या प्रसंगांचें वर्णन साक्षेपानें केलेलें आहे. वेली वृक्षांना आलिंगितात, तें वाघसिंहाच्या गर्जनांच्या भयेंकरून–ही कल्पना काव्यदृष्ट्या खरोखरीच हृद्य असून ती कवीच्या रसिकतेची साक्ष पटविणारी आहे. हिरव्या गवतावर पडलेल्या फुलांना शालूवरील बुट्टे म्हणणें, वृक्षशिरावर टेकलेल्या मेघांना फेट्यांची उपमा देणें, इत्यादि वर्णनशैलीमुळें कवीचें काव्यकौशल्य प्रत्ययास येतें. चपळगतीनें झुडपाझुडपांतून पळणाऱ्या गुबगुबीत सुंदर ससांच्या वर्णनानें तर या सबंध वर्णनाची यथार्थता पूर्ण झाल्यासारखी वाटते. हीं सर्वच वर्णनें मोठीं रमणीय आहेत.

हें सूर्योदयाचें वर्णन पहा—

> "उदयगिरिस येई सूर्य पूर्वा दिशेला ।
> बघुन तम तयातें कंदरीसी दडाला ।
> झुळुझुळुझुळु वाहे शीतवारा प्रभातीं ।
> कृषिवल जन शेतीं बैसुनी शेक घेती ॥ "

शेवटच्या शेकत बसलेल्या शेतकऱ्यांच्या उल्लेखानें वर्णनाला सजीवपणा आला आहे.

आचार्यचरित्रांतील नर्मदेच्या प्रवाहाचें हें वर्णन पहा—

> "जेथें मांधाता भूपति । होवोनी गेला प्रतापज्योति । जयाची ती विमल-कीर्ति । गातीं अजून पुराणें ॥ जेथें रमला ओंकार । परमात्मा पार्वतीवर । जें रमणीय मनोहर । तीर तया नर्मदेचें ॥ मोठमोठ्या पहाडाप्रत । फोडोनी आली धांवत । आपल्या पवित्र उदकासहित । वैश्यगंगा नर्मदा ॥ तोय निर्मल अपरंपार । मोठमोठाले जलचर । मत्स्य कासवें मगर । विहार करिती जलामध्यें ॥ दोन्ही तट तिचे भले । वृक्षराजींनीं झाकिले । नाना जाती बैसले । विहंगम ज्या वृक्षांवरीं ॥ तटींच्या वृक्षकुसुमांचें पराग-जली पडता सांचे । भक्षण त्या सुमनरजांचें । मत्स्य करिती वरच्यावरी ॥ मंद पवनें लाटा उठतीं । नर्मदेच्या जलावरती । त्यांत मिसळतां किरणें

तीं । अरुणोदयींच्या सूर्याची ॥ तेणे लहरी हाच पितांबर । चमचमां जो चमके फार । तोच नेसली साचार । बाला अमरकंटकाची ॥ वृक्षावरी बैसोन । आपुल्या मधुर शब्देंकरून । वाटतें खग करिती भजन । त्या पवित्र नर्मदेचें ॥ भव्य घाट दो बाजूला । असती ज्या नर्मदेला । त्यायोगें न राहिला । उंचसखल भाग तीरीं ॥ "

महेश्वर वा ओंकारेश्वर या ठिकाणच्या भव्य घाटावर उभे राहून नर्मदेच्या प्रवाहाकडे पाहाणाराला या वर्णनांतील यथार्थता सहज पटेल.

याव्यतिरिक्त महाराजांच्या काव्यांतून निरनिराळ्या प्रसंगांचीं व स्थलांचीं वर्णनें करणारीं सुंदर स्थलें किती तरी ठिकाणीं आलेलीं आहेत. वर्णनशैलीच्या दृष्टीनें भक्तिसारामृताचा १६ वा व ३५ वा अध्याय अवश्य वाचावा. ३९ व्या अध्यायांत काशीच्या घाटाचें वर्णन आलेलें आहे. संतकथामृतामध्यें २५ व्या अध्यायांत महाराष्ट्राचें वर्णन कवीनें केलें आहे. पंढरीच्या पालख्यांचें वर्णन ५० व्या अध्यायांत आलें आहे. याशिवाय सूर्योदय, सूर्यास्त, सरोवरें, पर्वत, निर्झर, यांचींहि वर्णनें ठायींठायीं आलेलीं आहेत. मात्र येथें एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे आणि ती ही कीं, या वर्णनांना आज ललित साहित्यांतून असलेला विस्तार महाराजांच्या काव्यांतून आढळत नाहीं. वर्णनें म्हणजे पानामागून पानें लिहिणें, असें यांत नाहीं; आणि आजच्या ललित-साहित्यांतहि या प्रकारचीं दीर्घ वर्णनें आदर्श मानिलीं जात नाहींत. त्यामुळें लालित्य हा प्रधान हेतु नसलेल्या महाराजांच्या काव्यांत वर्णनांचा विस्तार नसावा हें अगदीं स्वाभाविक आहे. परंतु त्यांच्या सूक्ष्म दृष्टीनें समाजांतील आणि निसर्गांतील किती विविध तऱ्हेच्या गोष्टी टिपून घेतल्या आहेत. तें मात्र या उद्धृत केलेल्या उताऱ्यांच्या विविधतेवरून वाचकांच्या लक्षांत येईल. हे बारकावे खरोखरीच काव्याला आकर्षक बनविणारे आहेत. त्यामुळें महाराजांचें संतचरित्रात्मक काव्य वाचीत असतांनाहि रसिकांच्या तोंडून " अरेच्या ! " ' होय कीं ! ' ' वाः वाः ! ' ' हें नव्हतं लक्षांत आलं हं ! ' ' हां हां बरोबर ! ' ' छेः ! ' इत्यादि भावदर्शक उद्गार अनेक वेळां निघतात. अनुभूतीचा प्रत्यय येतो,

कल्पनेची तरलता बुद्धीला विस्मित करते आणि हें सर्व जुन्या वळणाच्या भाविकता व चमत्कार यांनीं भारावलेल्या संतचरित्रामध्यें आढळून येत असल्यामुळें आश्चर्य वाटल्यावांचून राहात नाहीं.

## अलंकार

महाराजांच्या लिखाणाचा अलंकारदृष्ट्या विचार करतांना त्यांत एक गोष्ट अशी आढळते कीं, प्राचीन साहित्यशास्त्रकारांनीं वर्णन केलेल्या अलंकारांपैकीं फारच थोडे अलंकार त्यांच्या काव्यांतून आढळतात. शब्दालंकार तर जवळ जवळ अभावानेंच आहेत असें म्हटल्यास चालेल. अर्थालंकारहि विविधतेच्या दृष्टीनें विपुल नाहींत. उपमा, रूपक, दृष्टान्त, व्याजोक्ति, वक्रोक्ति, अर्थांतरन्यास, क्वचित् विरोधाभास आणि अगदीं थोड्या प्रमाणांत श्लेष हेच अलंकार श्री. दासगणूमहाराजांच्या काव्यांतून आढळतात. साहित्यशास्त्रांतून जरी शेंदीडशें अलंकारांचीं नांवें आलेलीं असलीं, तरीहि त्यांत काव्यदृष्ट्या उपमारूपकांनाच खरें महत्त्व आहे. ते अलंकार स्वाभाविक आहेत. असंस्कृत कविप्रतिभेमध्येंहि त्यांचें उदात्त स्वरूप अनेक वेळीं आढळतें. बाकीच्या अलंकारांना अभ्यास, विद्वत्ता व पांडित्य यांची आवश्यकता असल्यानें त्यामध्यें अगदीं नाहीं म्हटलें तरी थोडीशी कृत्रिमता येतेच येते. श्रीदासगणूमहाराजांचें सर्व लिखाण सहज स्वाभाविक असल्यानें त्यांत मुद्दाम निर्माण केलेल्या कृत्रिम अलंकारांचें अस्तित्व फारसें असूं नये, यांत विशेष नवल नाहीं. कवीच्या प्रतिभेचा आणि कल्पनाविलासाचा जो निकष मानितां येईल, ज्याच्या दर्शनानें वाचक स्तिमित होतो, काव्यकौशलाला ज्यामुळें अलौकिक सौंदर्य प्राप्त होतें, पद्यांचा रसाळपणा वाढतो, अर्थबोध सुलभ होतो, तो उपमादृष्टान्ताचा प्रयोग मात्र महाराजांच्या काव्यामध्यें विपुलतेनें केलेला आढळतो. या उपमारूपकांमध्यें सामान्यतः दोन प्रकार आहेत. कांहीं उपमारूपकें सांकेतिक असतात. निरनिराळ्या कवींच्या काव्यांतून वा त्याच कवीच्या काव्यांतून निरनिराळ्या

ठिकाणीं तींच तींच पुन्हां पुन्हां येत असतात आणि चारचौघांत हिंडतांना ज्याप्रमाणें शिष्टसंमत अशी वेषभूषा करावी लागते, त्याप्रमाणें कवितेला या उपमारूपकांचा वापर करावाच लागतो. असे संकेत वापरणें हें कवितेच्या नीटसपणाच्या दृष्टीनें आवश्यक असलें, तरी कविप्रतिभेचें श्रेष्ठत्व मात्र यावर विशेषसें अवलंबून असत नाहीं. त्यासाठीं अभिनवता, भव्यता आणि उदात्तता, या गुणांचाच अवलंब केला पाहिजे. त्या दृष्टीनें श्रीदासगणूंच्या काव्याकडे पाहिलें असतांना अनेक सौंदर्यस्थळें दिसून येतात. सांकेतिक उपमा वापरतांनाहि त्यांची मांडणी महाराजांनीं अभिनव रीतीनें केलेली आढळते. तसेंच अर्थानुकूल अशा समर्पक शब्दरचनेमुळें सांकेतिकपणालाहि नाविन्याचा साज चढतो आणि हेंहि काव्यकौशल्यच आहे. नाहीं तर अत्यंत नवीन, खऱ्या अर्थानें अपूर्व अशा गोष्टी सांगणें कितीकांना किती प्रमाणांत शक्य आहे ?

> " त एव पदविन्यासा त एवार्थविभूतयः ।
> तथाऽपि नव्यं भवति काव्यं ग्रथनकौशलात ॥ "

याचेंच भाषांतर—

> " तीं तीं पदें नित्य फिरोन येतीं ।
> त्या त्याच अर्थाप्रति दाखितातीं ।
> कौशल्य सारें रचनेंत आहे ॥ "

या मराठी सुभाषितामध्यें आलेलें आहे. त्यामुळेंच महाराजांचें काव्य कुशलतेनें रचलें गेलें असल्यानें रमणीयपणांत सरस ठरतें. मात्र यांत कोणतीहि प्रयत्नपूर्वकता नाहीं. निष्ठावंत भाव, जातिवंत प्रतिभा आणि बहुश्रुतता, या बळावर आलेलें जें कांहीं काव्यसौंदर्य त्यांच्या काव्यांतून प्रकट झालें असेल, तेवढेंच. पण हें सौंदर्य स्वाभाविक असल्यामुळें एक वेगळेंच मनोहारित्व त्याला प्राप्त झालेलें आहे. नुसता पाण्याचा हात तोंडावरून फिरवूनच जिचें भागतें, तिला इतर प्रसाधनांची गरज काय? आणि त्यांतहि आपल्याकडे लोकांनीं निरखून पहावें, अशी इच्छा नसणारी स्त्री प्रसाधनांच्या

भानगडींत पडते तरी कशाला? 'न अकामो मंडनं कुरुते' हें महाराजांच्या काव्यासंबंधीं पूर्णपणें खरें आहे. परंतु त्यांच्या प्रतिभेलाच जन्मजात उजळ वर्णांची आणि रेखीव अवयवांची देणगी मिळालेली असल्यामुळें प्रयत्नपूर्वक केलेल्या संस्कारांच्या अभावींहि कवितेच्या स्वाभाविक सौंदर्यांत तशी उणीव भासत नाहीं.

क्रमानें त्यांच्या काव्यामध्यें आलेले निरनिराळे अलंकार यापुढें मी सांगणार आहें. अनुप्रास हा शब्दालंकार त्या मानानें महाराजांच्या काव्यांत बऱ्याच प्रमाणांत आढळतो. लावणी, कटिबंधादि पद्यरचनेंत चार सहा मात्रेनंतर खटके असतात आणि त्या ठिकाणीं त्याच त्याच अक्षरांची पुनरावृत्ति झाल्यावांचून पद्याला गोडवा येत नाहीं, असा नियम असल्यामुळें या ठिकाणची अनुप्रासयुक्त शब्दरचना अपरिहार्य बनते; म्हणून असे अनुप्रास महाराजांच्या काव्यांत बऱ्याच ठिकाणीं आलेले आहेत. उदा.—

"शाहणा, चतुर देखणा, मदन तो उणा, जयाच्या पुढती......।
राउळीं गर्दि ती फार, झालि अनिवार, आला सावकार पूजनासाठीं ।
ऐकिलें पुराणांतरिं, सभेभीतरी, देव नरहरी, प्रकट कीं झाला ।
हीन असुनी खरा, तोच बघ सोयरा सासरा, नगपती शंकराला ।
सागरानें ती दिली, कन्यका ती भली, इंदिरा आपुली केशवाला ।
किती वानु तेथिंचा थाट, गर्दि आटोकाट मिळेना वाट, पथानें कवणा
गोमटी, हरीसम कटी, वक्र भ्रूकुटी, शुकासम नाक... ।
चटचटा पोळती पाय, तापला काय, उन्हानें हाय मार्ग आक्रमितां...!"

अशीं अनेक उदाहरणें देतां येतील. या अक्षरांच्या पुनरावृत्तींतून कवीची शब्दसंपत्ति प्रत्ययास येते. आवश्यक नसलेल्या अशा इतर अनेक ठिकाणींहि अक्षरांची पुनरावृत्ति आढळते. पुढील श्लोक त्या दृष्टीनें पहाण्यासारखा आहे.

'हरी ठेव माझ्या शिरीं आदरीं पाय गोदावरी जेथ वासा करी ।'

किंवा

‘ करींचा अरी जो तयाच्या परी तन्व शोभे कटि ही तुझी तीवरी । ’

‘ पंचवदन परमेश पार्वतीरमण ... ! ’

“ निर्गुण अमंगळ भंगड स्मशानवासी-जोगडा दिगंबर रागिट दुर्गुणराशी हे कमलनाभा कमलवदना । कमलाकान्ता मनमोहना । कालियाकालमर्दना कारुण्यसिंधो केशवा ॥ गोविप्रिया गोपरंजना । गोकुलवासी दयाघना । गोवर्धनोद्धारणा । गोरक्षका गोविंदा ॥ हे शेषशयना श्रीधरा । सर्वसाक्षी सर्वेश्वरा । सर्वाद्या श्यामसुंदरा । क्षीराब्धीवासा जगत्पती । हे पंढरीशा पांडुरंगा । पापमोचना प्रतापतुंगा । पांडवप्रिया श्रीरंगा । पाठ माझी राखणें ॥ तूं जगद्वंद्य जगदाधार । तूं जगच्चालक जानकीवर । अजातशत्रु प्रियकर । भो जनार्दना तूंच कीं ॥

त्वरा करूनि या धरा सगुणरूप शारंगधरा ।

करा कटिवरी, धरा गणुवरी कृपा ती करा ॥ ”

अशा तऱ्हेची अक्षरांची पुनरावृत्ति महाराजांच्या काव्यांत अनेक ठिकाणीं आढळत असली तरी, त्यांत कोणतेहि शब्द ओढून ताणून केवळ अनुप्रासासाठीं आणल्याचें वाटत नाहीं, हें त्यांचें वैशिष्ट्य आहे.

निरनिराळ्या ग्रंथांतील कांहीं उपमा यापुढें मी वाचकांच्या पुढें मांडणार आहें. त्या प्रत्येक उपमेमधील सौंदर्य विवेचनानें स्पष्ट करणें वा त्यांची समर्पकता सिद्ध करणें, ही गोष्ट केवळ अशक्य आहे. या टीकाटिप्पणीव्यतिरिक्तहि त्यांतील सौंदर्य रसिकांच्या प्रत्ययास आल्याविना राहणार नाहीं, कारण महाराजांच्या सर्व काव्याचा स्वभाव असलेला प्रसादगुण हा या उपमारूपकांताहि आपल्या पूर्ण गुणानेंच व्यक्त झालेला आहे. उपमा, दृष्टान्त, उत्प्रेक्षा, हा अलंकारशास्त्रदृष्ट्या बारकावा न करितां मी सलग स्वरूपांतच अवतरणें देणार आहे. या उपमा बहुधा विषयाचें सौंदर्य वाढावें, यासाठीं आलेल्या नसून तत्त्वज्ञान सुलभ करून सांगण्यासाठीं वापरल्या गेल्या आहेत.

१ " कडकडीत वैराग्यावांचुन । न होय इंद्रियांचें दमन ।
जैसें निवळीबीजाविण । गढुळपण न हरपतसे ॥ " ईशावास्य २ ॥

२ या कारागृहासीं सेवितां । न होय आत्म्याची मुक्तता ॥
जैसें तडागींचें जल सर्वथा । न जाय सागरातें ॥ ईशावास्य ३ ॥

३ बालकाचीं खेळणीं । सहज जातीं मोठेपणीं ।
तैसें झाल्या पूर्णज्ञानी । कर्म सुटे आपोआप ॥ ईशा. ९ ॥

४ घाणा गाळी इक्षुरस । परी रसाची न चवी त्यास ।
तो बिचारा किरकिरीस । सदानि फिर सर्वदा ॥
तैसे हे शब्दपंडित । शब्दच्छल करिती मात्र ।
अनुभवाचा किंचित् । नाहीं लाभ तयातें ॥ ईशा. ७ ॥

५ पाड लागतां आंब्यासीं । पोरें धोंडे मारिती त्यासीं ।
तैसेच तारुण्यावस्थेसीं । शत्रू आहेत बहुसाल ॥ शिष्यबोध ॥

६ तेणें माणिबाग चिंताक्रांत । अहर्निश झुरे मनांत ।
जेवीं फांशीचा कैदी सत्य । उदास असे मानसीं ॥ गोदामहात्म्य ९ ॥

७ गंगोदक शौचकुपींचें । जैसें आहे त्याज्य सांचें ।
तैसें सद्गुण अधमांचे । न वर्णावे कदापि ॥ गोदा. १२ ॥

८ पहा जल मिसळे मृत्तिकेंत । मग त्याचा पंक होत ।
त्या चिखला आकार प्राप्त । झाल्या पाणी न दिसे कीं ॥
पाहून त्याचा ओलेपणा । करावी लागे जलकल्पना ।
तैसी पाहतां ब्रह्मांड रचना । प्रकृतीकल्पना करणें लागे ॥
जलामधील जलपण । तें अविनाश, सच्चिद्घन ।
आणि जल भासे जेणेंकरून । तें स्वरूप प्रकृतीचें ॥ ईशा. १२ ॥

९ सिनेमाच्या खेळापरी । दंभ सर्वदा कृती करी ।
लखलखाट दिव्याचा बाहेरी । आंत पाहतां अंधार ॥ नारदभक्तिसूत्र ।

१० सेवी प्रपंच परि लिप्त न जो तयांत ।
जेवीं जगीं कमल नांदत पल्वलांत ॥ जालनापूरकरचरित्र ॥

११ अग्नीची ती दाहकता । कोण झाला अवलोकितां ? ।
पोळतें म्हणून कल्पना करितां । मात्र तेथें दाहकत्वाची ।
दाहकता आकारशून्य । परी प्रत्यया येतो गुण ।
तेंच प्रकृतीचें स्वरूप जाण । आकार रहित प्रत्यया ये ॥ ईशा. १३ ॥

१२ स्त्रियास अवमानितां भरसभेंत त्या वाटतें।
बरें मरण त्याहुनी नगशिरीं जसें वज्र तें :
कडाडुनि तडित जशी दडूनि जाय मेघोदरीं।
तसा वरुनि कोप तो गमन सत्यभामा करी ॥ गरुडगर्वहरण ॥

१३ आश्चर्य यांत तें काय, खोट्यास भाव भूवरीं ?।
वनवास युधिष्ठिर भोगी, खल दुष्ट हस्तिनापुरीं—
वाळते जुई मालती, तगर शेवती, तिथें राहाती हिरव्यागार—
गणु म्हणे शेर सावरी !

१४ हें नोहे जग विश्वरूप हरिचें सर्वत्र विस्तारिलें।
हा वायू, नभ, तेज, जीवन, मही, झाडें, फुलें वा फळें।
पक्षी कीटक ते पशू नर, गिरी, हा काळ गे सांवळा।
माया माळिण जी तिनें बनविला हा विठ्ठलाचा मळा ॥
॥ चोखामहार आख्यान ॥

१५ जैशी खारिक सुकते, बुधहो, तैशी तनू तिची सुकली।
झुरळ्या पडून गेल्या, गालांचीं तीं निरांजनें झालीं ॥ शेखमहम्मद ॥

१६ नक्षत्रसंघसमुदाय भंवतिं बैसला।
ज्ञानेश तयामाझारीं रोहिणीरमण शोभला ॥ ज्ञानेश्वर चरित्र ॥

१७ ऐशाला पुसणार कोण बुध हो, त्या पंढरीभीतरीं।
मोत्याची कळणार किंमत कशी शिंपींत तें जोंवरी ॥
॥ चांगदेव आख्यान ॥

१८ कर्णोपकर्णीं ही वार्ता। हळोपाळीं पसरली तत्त्वतां।
तैलबिंदु पाण्यांत पडतां। जैसा पावतो विस्तार ॥ मध्वविजय ॥

१९ मायलेक मग दोघे आले असती सखूस धुंडाया।
वधयस्थाना खाटिक यावा धेनूस हो जसा न्याया ! ॥ सखूचरित्र ॥

२० म्हणे आजि तंदुला पहा, तसा शुचि रहा, दारिचा माड।
तैसा तूं लौकिका चढ ॥ ॥ लो. टिळक चरित्र ॥

२१ सौंदर्य हेंच राजाच्या कन्येस कां न बा दिलें ?।
या पारिजातवृक्षाला त्वां उकिरड्यांत लाविलें ! ॥ लाखा कोल्हाटी ॥

२२ झाला देव निरुत्तर मुद्यासह पकडतां जसा चोर ॥ सावतामाळी ॥

२३ जसा जळाचा फेन। किंवा वायूची झुळूक जाण।
किंवा दुपारचें ऊन। तैसें तुमचें वैराग्य ॥ भक्तिलीलामृत ७ ॥

२४ सभेंत नसतां पंडित । मूर्ख वादविवाद करिती तेथ ।
तैसीं नक्षत्रें अगणित । चमकूं लागलीं गगनोदरीं ॥ भ. ली. ४ ॥

२५ बैसून बाभळीचे तळा । मनीं इच्छावें आम्रफळा ।
खडकावरीं लावणें मळा । अशक्य जैसें तैसें हें ॥
संसारीं गुंतविल्या मन । सौख्य मिळणें अशक्यची ॥ भ. ली. ३४ ॥

२६ या पाहुन जोडप्यासी । लोक म्हणती देगलूरासी ।
एक भांग एक तुळसी । एके ठायीं लावली ॥ ४ ॥
एक चंदन मलयागिरी । एक सकंटक सावरी ।
एक थिल्लर एक गोदावरी । एके ठायीं झाली कशी ? ॥ सं. कंथा ॥

२७ टांकसाळ खोट्या रुपयाची । कोण राजा घालील सांची ?
या मिथ्याभूत जगताची । ईश्वरें रचना कां केली ! ॥ सं. क ४४ ॥

२८ कोणी रचून व्याकरण । भाषेचें हरिलें स्वैरपण ।
तैसा मदांत वारण । अंकुशानें आवरीतसे ॥ भक्तिसारामृत ४ ॥

२९ जगाच्या अंतापर्यंत । कवी प्रासादिक होतील सत्य ।
जैसा प्रत्येक वर्षीं वसंत । येत आहे पुनः पुनः ॥ भ. सा. ४ ॥

३० भूपतीच्या सेवेंत अर्थ नाहीं । सुळावरली ती पोळी दुजी पाही-
वरी झकपक परि आंत घाण फार । राजसेवा जणुं शहरिचें गटार ।
॥ सेना न्हावी ॥

३१ जैसा दीपावली येतां सण । कन्यकांचें हर्षतें मन ।
कीं येईल पाचारण । निज माहेरचें म्हणूनी ॥
तैसे हरीच्या भक्ताप्रत । होतें आषाढ मासांत ।
म्हणती आतां पंढरीनाथ । पडेल अमुच्या दृष्टीला ॥ भ. सा. २० ॥

३२ परी खुणा कराव्या धारण । लोकसंग्रहाकारण ।
जैसी कां ती सुवासिण । कुंकुम भालीं लावीतसे ॥ भ. सा. २० ॥

३३ खिचडी अवघ्या धर्मांची । भरतखंडीं झाली साची ।
म्हणून एकीरूप तुपाची । तिला आहे आवश्यकता ॥ भ. सा. २० ॥

३४ मायबाप जें बोलिती । तें तुझ्या हितार्थ निश्चिती ।
काढे कडू लागती । परि वारिती रोगाला ॥ भ. सा. २७ ॥

३५ आधींच शिपाई कडवे फार । त्यांतून देसायाच्या देवडीवर ।
जैसा माकडा पोचतो जोर । वृक्षशाखीं बैसल्या ॥ भ. सा. २६ ॥

३६ जैसे फोनो करी गायन। परि अर्थ दृष्टी नसे जाण।
तैसेच हे ब्राह्मण। आले वेद पढोनी॥ सं. कथामृत ३४॥

३७ प्रपंचांत पाहिजे वित्त। शरीरांत जेवीं पित्त।
मात्र हव्यास अतोनात। न धरावा तयाचा॥
तो हव्यास केल्यावरी। स्थिती आम्लपित्तापरी।
धनलोभानें भूमीवरी। सुख नाहींच होणार॥ छात्रबोध॥

३८ भौतिक जगाचे व्यवहार। सांडावे न साचार।
ते निरर्थक जरी असार। तरी पाळिले पाहिजेत॥
आंब्रा लिंबू डाळिंबाची। साल, कवटी नारळाची।
जरी निरर्थक आहे साची। परि तिचें असणें अवश्य॥
तैसाच हा व्यवहार। परमार्थाची साल थोर।
त्या सालीचा विचार। करून वागावें सर्वदा॥
साल निरर्थक ना म्हणावी। अथवा कंठीं न बांधावी।
तारतम्यानें करावी। त्याची छाननी सर्वदा॥ छात्रबोध॥

३९ वृथा या वेदान्ता वदुनि वदनातें न शिणवी।
तृषा तान्हेल्याची मृगजल जगीं काय शमवी ?।
शिऱ्यानें बोलाच्या उदर भरतें कां कधिंतरी ?।
स्त्रियेला चित्रींच्या कधिं न धरितां ये निज करीं !॥ उद्धवागमन॥

४० उगाळूं नको राधिके कोळशाला।
हरी टाकि ना गे कधीं दुर्गुणाला॥ उद्धवागमन॥

४१ दृष्टि आपुल्या लीलेकरून। जें जें दृश्य करी निर्माण।
त्या त्या दृश्यासमान, आपणचि होई॥
जैसा मेघ अंबरीं। एका क्षणामाझारीं।
नानाविध रूपें धरी। आपुलेंपण न मोडितां॥
मेघ उंटाकार झाला। परी आकारीं मेघची भरला।
तलवारीसम दिसे चपला। परि ते वीजाचि वीज असे॥"

॥ अमृतानुभव ७॥

या सर्व उपमांमध्यें सांकेतिक उपमा फारच थोड्या आहेत, हें वाचकांच्या लक्षांत येईल. जेथें संकेताचा भास होतो, तेथेंहि उपमान-

विषयच बहुधा सांकेतिक आहेत. ज्या विषयांना उद्देशून हीं उपमानें वापरलीं आहेत, तो संबंध नवीनच आहे. हेंच ग्रथनकौशल्य म्हणावयाचें. किती विविध विषय या ठिकाणीं उपमानभूत झाले आहेत, तें पाहिलें म्हणजे महाराजांच्या निरीक्षणशक्तीसंबंधीं आदर वाटूं लागतो. वेदान्तविषय सोपा करून सांगण्याची येथील हातोटी असाधारण वाटते. त्या दृष्टीनें महाराजांची 'ईशावास्यबोधिनी' वाचीत असतां ज्ञानेश्वरांच्या उपमाप्रभुत्वाची स्मृति वरचेवर व्हावी, अशी रसमयता तेथें व इतर ग्रंथांतूनहि आढळते. या उपमाहि सहजासहजीं आढळल्या त्याच येथें नोंदल्या आहेत. सकाळच्या वेळीं पारिजातकाच्या वृक्षाला हळूच धक्का द्यावा आणि त्या क्षणींच वरून मृदुमधुर सुगंध असलेल्या मनोहर फुलांचा वर्षाव व्हावा, अशीच स्थिति महाराजांच्या काव्यांतील उपमा शोधतांना होते. सहज उघडल्या जाणाऱ्या ग्रंथांच्या प्रत्येक पानागणिक वाचनीय उपमारूपकें आढळतातच आढळतात. त्यांची निवड करतांना संपादकांची कुचंबणा होते. या सर्व उपमांतून समर्पकता आणि अभिनवता विशेष रीतीनें आढळते. वर्ण्य विषय स्पष्टपणें वाचकांच्या डोळ्यापुढें उभा राहतो आणि काव्याचें सौंदर्य खुलून त्यास रसाळपणा येतो.

### रूपकें

पल्लेदार रूपकेंहि श्री. दासगणूमहाराजांच्या समर्थ प्रतिभेनें यशस्वी रीत्या पेललेलीं आहेत. हीं सर्व रूपकें बहुधा अध्यात्मिक विषयांचें विवेचन करितांनाच योजिलीं गेलीं आहेत. क्वचित् भव्योदात्त कल्पनांच्या आविष्कारासाठीं वा तत्त्वज्ञानाचा समन्वय साधण्यासाठींहि त्यांचा उपयोग केला गेला आहे.

ज्ञानेश्वर चरित्रांतील 'भोवऱ्याचें रूपक' पुढीलप्रमाणें आहे--

" खेळूं पोरारे, चाल पोरा । अपरोक्ष ज्ञान भंवरा ।
याला वैराग्याचे अरी । जाळी भक्तिची साजिरी । भावें फेकूं हा
गरगरा ॥ खेळूं पोरा ।

या भंवऱ्याचा रंग । आहे अक्षय अभंग । भविं बुडवील तुज ना जरा ।
याला गुच्याची ना भिती । नादें कळेल आत्मज्योति । रिंगण
ब्रह्मांडाचें करा ।
गणु म्हणे ऐसा भोवरा । पाहिला मी साई करा । पहा शिरडींत
जाऊन जरा ॥ "

असेंच साधन मार्गावरील रूपक लाख्या कोल्हाट्याच्या आख्यानांत आढळतें.

" उमग खेळासी-आलि कोल्हाटिण रंगासी ॥
विश्वास स्तंभ साचार । आहेत केवढे थोर ।
भावाचा बांधिला दोर । फिराया तिजसी ॥ आलि कोल्हाटिण...
सत्कर्म हाच कीं थाळा । त्या दोरावर ठेवियला ।
आंत उभी भक्तिवेल्हाळा । सावरी तोलासी ॥ आलि कोल्हाटिण...
हातिं बांबू पापपुण्याचा । नासाग्रें रोख दृष्टीचा ।
घे अनुभव स्वानंदाचा । बघे न कवणासी ॥ आलि कोल्हाटिण...
गणु म्हणे उड्या जरि मारी । आधार सोडी ना दोरी ।
ही विद्या येईल सारी । वंदितां गुरुसी । आलि कोल्हाटिण रंगासी !!"

हीं दोन्हीं रूपकें केवळ अध्यात्मपर असून पारमार्थिक विषय मांडणें येवढेंच त्याचें प्रयोजन आहे. त्यांत रूपकाकारितां वापरलेल्या वस्तु अतिशयच समर्पक असून साधनमार्गाच्या दृष्टीनें त्यांचें महत्त्व जीवनांत त्या दृष्टीनें प्रयत्न करणाराच्याच लक्षांत येण्यासारखें आहे. उदा. कोल्हाट्याच्या खेळावर केलेल्या रूपकामध्यें भावाच्या दोरावर सत्कर्माचा थाळा कां ठेवला पाहिजे, तो दोर विश्वासरूपी स्तंभीं बांधणें आवश्यक कां, तोल संभाळण्यासाठीं पापपुण्य हीं ज्याचीं दोन टोकें आहेत, असाच बांबू हातांत कां धरावा लागतो, सत्कर्माच्या थाळ्यांत उभी राहणारी व्यक्ति 'भक्तीच' कां असली पाहिजे, व्यवहारांतील वागणें हें उड्या मारणें कसें आहे, तरीसुद्धां मूळ दोरीचा आधार सोडून कां चालत नाहीं, याचें स्पष्टीकरण करणें म्हणजे साधनमार्गावरील एक निबंध लिहिल्यासारखें आहे. तरीहि त्यांतील अर्थ स्पष्ट होईलच असें

नाहीं. महाराज म्हणतात त्याप्रमाणें, 'ही विद्या येईल सारी वंदितां गुरुसी।' हेंच शेवटीं खरें!

भव्योदात्त कल्पनेच्या दृष्टीनें वेंच्यामध्यें उद्धृत केलेल्या सांईनाथ स्तवनमंजिरींतील संतावर केलेलें गोदावरीचें रूपक मनन करण्यासारखें आहे. कल्पनेची भव्यता, त्या ठिकाणीं प्रत्ययास येते. संत ही एक गोदावरी आहे. केवळ मानवी देहसादृश्यानें सामान्यजन आणि संत यांना समान लेखूं नये, मेघांतील उदक एकच असलें तरीहि डबक्यांत साठलेलें आणि त्र्यंबकश्वरावर पडलेलें जल भिन्न योग्यता पावतें. वासनांची घाण असलेलें डबक्यांतील पाणी आणि त्र्यंबकाच्या निर्मळ उन्नत शिखरावर पडलेलें गोदाजल, यांत अंतर राहतें, तसेंच सामान्यजन व संत यांचें आहे. ही संतत्वाची गोदावरी अनादि कालापासून अनंत काळापर्यंत वाहात आहे. वाहात राहील. निरनिराळीं शतकें हीं येथें वर्षे समजावीं आणि त्या शतकांत होऊन गेलेले संत व सत्पुरुष हा जणूं गोदावरीला येणारा पूर समजावा. याप्रमाणें सनत्कुमार, वसिष्ठ-वामदेव, गोपगोपी, उद्धव, ज्ञानेश्वर, तुकाराम, तुळशीदास, कबीर इत्यादि संत आणि आतां सांईनाथ हे या संतगोदेस आलेले पूर होत. ही कल्पनाच अतिशय भव्य पण रमणीय आहे. साहित्यशास्त्रानें उल्लेखलेला उदात्त अलंकार आपल्या खऱ्या स्वरूपांत येथें प्रकट होतो आहे, असें मला वाटतें.

समन्वयवादी तत्त्वज्ञानाचा आविष्कार करितांना ईश्वरपूजेचें रूपक महाराजांनीं योजलेलें आहे. ईशावास्योपनिषद्बोधिनींत ते म्हणतात—

"हा उपनिषदरूप ईश्वर। आचार्यांनीं सजविला थोर। टीकारूप अंगावर घालून भव्य दागिना ॥१॥ गीर्वाणरूपी सुवर्णाचा। तो अलंकार असे सांचा। स्वामी शंकराचार्यांचा। खचित थोर अधिकार ॥ २ ॥ त्यांनीं अद्वैताचें सिद्धांत। घातिले दागिने प्रभुप्रत। जयतीर्थांनीं द्वैतमत। पितांबर नेसविला ॥ ३ ॥ विशिष्टाद्वैताचा शेला। वैखानसांनीं अर्पिला। या उपनिषदरूप देवाला। रामानुजमतीचें जे ॥ ४ ॥ आतां अलंकार पायींचें। महाराष्ट्रीरूप

चांदीचे। गणू बनवून तोडे सांचे। घालीत त्याचे पायांसी ॥५॥ पन्नास तोडे घालूं जातां। पाय येईल खचित हातां। त्या शब्दब्रह्म पंढरिनाथा। असो गणुचें नमन हें ॥ ६ ।"

या रूपकांमध्यें सर्वमतसिद्धान्त हे शेवटीं एकाच ईश्वरी तत्त्वाच्या आविष्कारासाठीं अधिकारपरत्वें कसे उपयोगी पडतात, तें या ठिकाणीं महाराजांनीं पूजासाहित्याच्या रूपकांतून स्पष्ट केलें आहे. षोडशोपचार पूजा होण्यासाठीं अनेक साधनांची आवश्यकता असते, क्रमाक्रमानें त्या सर्वांचा उपयोग करावा लागतो; तसेंच तत्त्वज्ञानांतहि भिन्न मतांचें समजावें. या रूपकामध्यें तोड्याच्या रूपानें आपलाहि अलंकार समाविष्ट केला, हा जणूं अधिकारातिक्रम झाला. पाय हातीं येण्याच्या लोभानें हें अतिक्रमण केलें असलें तरीहि महाराजांच्या अत्यंत नम्र वृत्तीला तेंहि जणूं भावलें नाहीं. आणि म्हणूनच आपल्या टीकेचें स्वरूप सांगत असतांना पुढील रूपक त्यांनीं योजिलें आहे--

"ईशावास्य हाची ऊंस। ऋचा हींच पेरी त्यास। भाष्यरूपी चरकास। शंकराचार्यें धरियेला ॥ अर्थरूपी रस नव्हाळी। जगद्गुरूनें काढिली। महाराष्ट्रमृत्तिका घटीं भरली। येथें दासगणुनं ॥ पात्र ओखटें म्हणून। रमा अव्हेरूं नका सूज्ञ। रसपरीक्षा पात्रावरून। करणें न योग्य रसिकांतें ॥"

वेच्यामध्यें उल्लेखिलेलें 'नाममात्रा' हें रूपकहि परमार्थ साधनाच्या रूपकाच्या दृष्टीनें लक्षांत घेण्यासारखं आहे. ही संन्यासदीक्षा पहा--

"आतां कशाला उशीर। करावा येथेंच प्रेषोच्चार। निजकृपेचें अंगावर। वस्त्र काषाय घाला हो। सद्बोधाचा दंडा हातीं। द्या माझ्या कमलापति। कमंडलु जी प्रेमभक्ती। भावजलानें भरून द्या। संशयरूप शेंडी काढा। कर्मबंधन हें सूत्र तोडा। अभिमानाची मिशी बोडा। मुंडा करा मजलागीं ॥"

खरोखरीच असे संन्यासी जर होतील, तर समाजावरील नैतिक अधःपाताचें संकट निश्चयानें दूर होईल. पण संन्यासदीक्षेचा हा अर्थ सामान्यतः कोणी लक्षांतच घेत नाहीं. नुसती कवाईत केल्यासारखी दीक्षा घेतली जाते.

भक्तिरसामृतांत पंढरपूर येथील वारकऱ्यांच्या दिंड्यावर केलेलें वीरसेनेचें अभिनव रूपक महाराजांच्या वर्णनशैलीचा एक उत्तमपैकीं नमुना म्हणून उद्धृत करण्यासारखा आहे.

"अभिनव वैष्णवांचा मेळा। कंठीं रुळे तुळशीमाळा। भालीं गोपीचंदन टिळा। स्कंधीं पताका फडकती॥ उठे टाळांचा झणत्कार। मृदंगध्वनी गंभीर। विठ्ठलनामें पंढरपुर। गजबजून गेलें हो॥ रूप पाहतां लोचनीं। हेंच ज्यांच्या त्यांच्या वदनीं। कोणी उधळती मधोनी। गुलाल बुक्का संतावर॥ वाटती हे अवघे संत। संसाररूपी मैदानांत। षड्रिपु करूनी पादाक्रांत। आले विजयी होऊनी॥ ठेवुनी विश्वासाच्या रथावरी। निश्चयाच्या तोफा भारी। विजेसम त्या तलवारी। सद्भक्तीच्या चालविल्या॥ अभंगवाणी तुकयाची। जोडगोळी बंदुकीची। पाउली कवाइत बहारीची। शिकले शत्रूस जिंकावया॥ ज्ञानेश्वरींचा कुलपी गोळा। चालतां शत्रू चीत झाला। ऐशा संतांच्या बळाला। वर्णन किती करावें ?॥ कामक्रोध-मत्सर। लोभ मोह दंभ थोर। हे त्या संसारभूमीवर। मृत होऊन पडले कीं॥ निंदक कुटिल गिधाडें तेथ। फिरूं लागलीं आकाशांत। चार्वाक ते दिवाभीत। सूर्याभावीं करी शब्द॥ ऐशा त्या रणभूमी ठायीं। होऊन आले संत विजयी। शिंग तुताऱ्या म्हणुन पाहीं। वाजूं लागल्या दिंड्यांत॥"

या ठिकाणीं दिंड्यांमधील तुताऱ्या कां वाजतात, यासंबंधींची केलेली ही कल्पना अभिनव आहे. या रूपकांतून संतत्व प्राप्त होण्याचीं साधनें उत्तम रीतीनें वर्णिलीं असून गाथा-ज्ञानेश्वरीचें श्रेष्ठत्व साधनमार्गांत किती आहे तेंहि स्पष्ट केलें आहे. निश्चय, विश्वास, सद्भक्ति, यांवांचून परमार्थांत कांहीं हातीं लागणार नाहीं, यासाठीं त्यांना रथ, तोफ, तरवारीचें विशेषण दिलें असावें. या गुणांचें अध्यामिक क्षेत्रांतील महत्त्व कुणीच नाकारूं शकणार नाहीं.

कर्म भक्ति ज्ञानाच्या समन्वयाच्या दृष्टीनें शंकराचार्यांच्या चरित्रांतील वैदिकपंथावर केलेलें जें जोंधळ्याचें रूपक तर फारच मनोहर असल्याचें ह. भ. प. दांडेकरांनींहि आपल्या प्रस्तावनेंत उल्लेखलेलें आहे. महाराज म्हणतात—

**" वैदिकपंथ जोंधळा । कर्म हें बाटुक तयाला । उपासना मार्गाला । कणिस म्हणणें योग्य असे । दाणे हेंच आहे ज्ञान । त्या कणसालागून । ऐसा वेदमार्ग संरक्षण । करणें ज्ञानी पुरुषांनीं ॥ "**

जगद्गुरु शंकराचार्यांनीं संस्थापिलेल्या अद्वैतमताचा पुरस्कार महाराजांनीं निष्ठेनें केला असला तरीहि अद्वैताच्या नांवावर चालणारा सांवळागोंधळ मात्र त्यांना मुळींच संमत नाहीं. यासाठींच अधिकारपरत्वें कर्म, उपासना, ज्ञानाचें महत्त्व त्यांनीं सर्वत्र साक्षेपानें प्रतिपादिलें आहे.

उसाच्या पोवाड्यांत लाकडी आणि लोखंडी चरकाच्या गुऱ्हाळावर लग्न आणि म्होतुर यांचें रूपक काव्यदृष्ट्या विनोदी पण हृद्य आहे. उसाचा शेतकरी म्हणतो—

**" होता गुऱ्हाळघरचा मान जगीं अजवरी । अमुच्यांत खरोखर लागिन घराच्या परी ॥ मुद्दाम आणिती लोक मूळ धाडुन । भावजया भाऊ जांवई लेक बहीण । चालतां चरक तो मैल मैल कळतसे । लाकडी, प्यावया पांथ रसा येतसे ॥ लोखंडी करित हा साच म्होतुरापरी । नावडे जवळच्या कुढुन लांब मग तरी ॥ "**

पुढें जुन्या काळच्या म्होतुराच्या विधीचें हें वर्णन करून त्याचें लोखंडी चरकाच्या मळकटपणाशीं साम्य कल्पिलें आहे. सभोंवतींच्या सर्व थरांतील आचारांची नोंद घेऊन महाराजांची कविप्रतिभा तिचा कसा सम्यक् उपयोग करिते, तें अशा उदाहरणावरून चांगलें प्रत्ययास येतें.

शेवटीं मानसपूजेच्या रूपकांचा उल्लेख करून हें रूपकाचें प्रकरण आवरतें घेतों. पांडुरंगस्तोत्रामध्यें ते म्हणतात—

**" तुझें कराया पूजन । साहित्य आणूं कोठून ? तुझ्या प्राप्तीवांचुन । वस्तु नुरली नारायणा ॥ आतां हें घननीळ । प्रेमाश्रु माझें हेंचि जल । तेणें तव पदें सोज्वळ । प्रक्षाळीन पांडुरंगा ॥ चंदन माझी तेथ भक्ति । ती तुज लावितो रमापति । मन्मनरूप सुमनाप्रती । मान्य करी रे गोविंदा ॥ मायेचा दाविती धूप । मोहरूपी जाणिजे दीप । क्रोध कर्पूर साक्षेप । जाळून तुज ओंवाळितो ॥ त्वन्नाम हें पक्वान्न । त्याचा दाविता नैवेद्य जाण । तो सेवोनि**

**तुष्टमान। व्हावें तुवां पांडुरंगा॥ प्रार्थनापूर्वक नमस्कार। तुज मी करितों वरचेवर। करी करुणेची पाखर। देवाधिदेवा मजवरी॥"**

देवतेला प्रसन्न करण्यासाठीं गोंधळ घालण्याची एक प्रथा आहे, पण त्या गोंधळाचें स्वरूप लौकिक संबळतुणतुण्याचें असूं नये, तर भावात्मक असावें हें सांगण्यासाठीं महाराजांनीं जें अध्यात्मिक गोंधळाचें रेखाचित्र रेखाटलें आहे, तें वेंचा क्रमांक ३५ मध्यें पहा. महाराज शेवटीं म्हणतात–

**" असे गोंधळी झाल्या येईल पुंडलिक वरदायिनीं।**
**रंगा तुमच्या दासगणु म्हणे लाव बधा मज स्तनीं ग॥"**

ज्या देवतेचें आराधन महाराजांनीं आतांपर्यंत केलें, त्याविषयींची त्यांची कल्पना किती भव्योदात्त स्वरूपाची आहे, तें नामदेवाख्यानांतील पुढील श्लोकांत उत्तम रीतीनें वर्णिलें गेलें आहे.

**" सिद्ध-ज्ञान भिमातटानिकटाहि ब्रह्मांड रे पंढरी।**
**जीवांचा समुदाय हाच महिच्या वीटे उभा श्रीहरी॥**
**येथींचा मुनि पुंडलीक समजे सद्भाव रे राजसा।**
**तेथींचा झणिं होय वारकरि तूं सेवीं सुभक्तीरसा॥"**

ईशभक्ति ही संकुचित नसून मानवाच्या परमोच्च कल्याणासाठीं ती किती व्यापक भूमिकेवर सुप्रातिष्ठित झालेली आहे, हें या रूपकांतून महाराजांनीं स्पष्ट केलें आहे. हें केवळ रूपक नाहीं; महाराजांच्या दृढविचारानें निश्चित झालेल्या तत्त्वज्ञानाचा तो स्वाभाविक असा आविष्कार आहे.

त्यामुळें त्यांच्या तत्त्वज्ञानाचें स्वरूप काय आहे, तें स्पष्टपणें लक्षांत येईल. सिद्धांताच्या दृष्टीनें श्रीमत् शंकराचार्यांचें अद्वैत तत्त्वज्ञान त्यांना संपूर्णपणें मान्य असून त्याचाच पुरस्कार त्यांनीं आपल्या सर्व ग्रंथभर केला आहे.

**तत्त्वज्ञान**

" तूं सर्व घटीं ओतप्रोत " हा अध्यात्म्याचा सिद्धांत किंवा 'जीव तोच शिव साक्षात्' अशा तऱ्हेचे उल्लेख त्यांच्या सर्व ग्रंथभर ठिकठिकाणीं आढळतात. अव्यक्त, अक्षय, सच्चिदानंद, अशा परमात्म्याच्या इच्छेमुळें सर्व ब्रह्मांड साकार झालें, ही साकार होण्याची इच्छा, हेंच मुळीं मायेचें स्वरूप. ईश्वराची जी शक्ति तीच प्रकृति, तिलाच माया असें म्हणतात, पण हा फक्त शाब्दिक व्यवहार झाला. अग्नि आणि अग्नित्व हे जसें मुळांत मुळींच भिन्न नाहींत, तेंच पुरुष आणि प्रकृतीचें स्वरूप आहे. माया ही असत्य मुळींच नाहीं, पण तिला सत्याहि म्हणतां यायचें नाहीं. 'सदसद्विलक्षण' असा तिचा मिथ्याभाव असल्यामुळें तिचें शब्दानें वर्णन करणें शक्य नाहीं. सोन्याचे अलंकार झाले, तरी त्या अलंकारामुळें जसा सोने-पणाचा लोप होत नाहीं, त्याचप्रमाणें मायेमुळें विस्तारलेल्या या विश्वाकारांत सच्चिदानंद असा पुरुष लोपला जात नाहीं. कारण सोन्याचे दागिने पण जसें सोन्यांतच समाविष्ट आहेत त्याप्रमाणें प्रकृतिहि पुरुषांतच सामावलेली आहे; तिला वेगळें असें अधिष्ठान नाहीं. सुंदर पुरुषानें स्त्रीवेष घ्यावा, आणि त्या स्त्रीवेषाच्या सौंदर्याला मूळचें सुंदरपणच अधिष्ठान असावें, तसेंच जगत् आणि जनार्दन यांचें आहे. त्यामुळेंच सगुणाची उपेक्षा करूं नये. ब्रह्मज्ञान झालें तरी सगुण भक्ति करावी, कारण ब्रह्मज्ञान झालें या जाणिवेपोटींच अहंकार मूळ धरून असण्याची शक्यता असते आणि त्याचा निरास भक्तिविना होत नाहीं. याच स्वरूपाचें त्यांचें मत आचार्यपरंपरेशीं आणि संतांनीं प्रतिपादिलेल्या भागवतधर्माशीं पूर्णपणें सुसंगत आहे. त्यांत त्यांचें स्वतःचें असें कांहींच नाहीं. कोणत्याहि संतवाङ्मयांत याच तऱ्हेचें प्रतिपादन आढळेल. महाराजांचें वैशिष्ट्य आहे, तें निरनिराळीं मतें आणि साधनें यांच्याशीं आपलें न सोडतां द्वेषरहित समन्वय राखण्यांत! त्यामुळें कर्म, उपासना, भक्ति, ज्ञान, योग, या सर्वांचेंच आपापल्या-

परीनें त्यांनीं ग्रंथांतून विवेचन केलेलें आढळतें. साधनमार्गांतील पायऱ्या म्हणून अधिकारपरत्वें त्या सर्वांचा त्यांनीं साधनमार्गांत समावेश केला आहे. बाल्य, तारुण्य, वार्धक्य या स्थितीप्रमाणें कर्म, उपासना, ज्ञान यांचा स्वीकार मुमुक्षूनें केलाच पाहिजे. एकाशिवाय दुसऱ्याची, दुसऱ्याशिवाय तिसऱ्याची उत्पत्तिच होऊं शकत नाहीं. म्हणून या सर्वांचा स्वीकार साधकानें करणें आवश्यक आहे. मात्र तो करीत असतांना स्वतःशीं संपूर्णपणें प्रामाणिक असलें पाहिजे, त्यांत दंभाचा लेशाहि येऊं नये. अन्यथा सर्व साधन व्यर्थ जातें. तसेंच इतरांच्या साधनांचा व त्यांच्या उपासनापद्धतीचा लवमात्र द्वेषहि करूं नये; कारण शेवटीं एकच आहे.

आपल्या आराध्य दैवताचें वर्णन करीत असतांना एका संस्कृत श्लोकाचा मागोवा घेत महाराजांनीं रचलेला श्लोक त्यांच्या मतांचा निदर्शक आहे.

> " शैवा जो शिव, वैष्णवा हरि गमे, वेदांतिया ब्रह्म जो ।
> बौद्धा बुद्धहि जो, खुदाहि यवनां, अर्हन्त जैनांस जो ॥
> कर्ता जो हि गमे प्रमाणपटुंना, जें कर्म मीमांसका ।
> ख्रिस्त्यां येशुहि, तोच हा गणू म्हणे घ्या रुक्मिणीनायका ॥ "

याच तऱ्हेचें वर्णन त्यांनीं ' व्यंकटेशस्तोत्रांतहि ' केलेलें आहे. या तऱ्हेच्या भावनेमुळें ज्याला आपण पंथनिष्ठेचा दुराग्रह म्हणतों, तो महाराजांच्या जीवनांत कधींच दिसून येत नाहीं. आपलें तत्त्वज्ञान ते खरोखरीच जगत आहेत. कळतें, पण वळत नाहीं, अशी त्यांची स्थिति नाहीं. त्यांच्या तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें वेंच्यामधील ' प्रकृतिपुरुष ' ' अद्वैत व भक्ति ' ' सत्य व मिथ्या ' ' सगुणनिर्गुण ' ' कर्मभक्तिज्ञान ' हे वेंचे अवश्य अभ्यासले पाहिजेत.

या तत्त्वज्ञानांतूनच त्यांनीं सांगितलेला सदाचाराचा उपदेश जन्म घेतो. त्यांत व्यवहारीपणाच्या दृष्टीनें अगदीं बारीकसारीक गोष्टीविषयींचे आचारानियम वास्तव दृष्टिकोणांतून त्यांनीं बांधून दिले आहेत. सुखी

जीवन जगण्याच्या दृष्टीनें प्रत्येक संसारी माणसानें त्यांचा अवलंब करावा, असा सखोल मार्मिकपणा या उपदेशांना प्राप्त झाला आहे. वेंच्यामधील ‘ सदाचार ’ आणि ‘ शिष्योपदेश ’ हीं दोन प्रकरणें त्या दृष्टीनें पाहिलीं पाहिजेत. चातुर्वण्यासंबंधीं त्यांचा दृष्टिकोणहि उदार पण सनातनपरंपरेला धरून असा आहे. वर्णच असूं नयेत, त्यांच्या कर्मांचा संकर व्हावा, विवाहबंधनें तुटावींत व सारा एकंकार व्हावा, हें मत महाराजांना तिरस्कारणीय वाटतें. त्यांना वर्णसंकर मुळींच नको आहे. पण जातिमत्सर हा मात्र ते एक भयंकर रोग समजतात. हिंदुधर्महि चार पायांची एक सुलक्षणा कपिलाधेनु आहे; किंवा हिंदुधर्म हा एक मोठा वृक्ष असून अनेक जाति या त्याच्या फांद्या आहेत; त्यामुळें वृक्षास शोभा आली आहे. त्या तोडून वृक्षाचा सरळ असा सौंदर्यहीन सोट बनवूं नये, परंतु या फांद्यांना आपण एकाच वृक्षाच्या शाखा आहोंत, हें मात्र लक्षांत ठेवण्यास ते सांगतात. फुटीरपणा त्यांना मुळींच पसंत नाहीं. एका स्फुटांत ते म्हणतात—

> “ **जातिजातिचें समाज निघाले ‘ ऐक्यवर्धन नांव तया ॥**
> **झाड पडलें धरणीवरतीं फांद्या लागल्या नाचाया ॥** ”

चारी वर्णांच्या ठिकाणीं कांहीं गुण, कांहीं दोष आहेत. कुणींच स्वयंपूर्ण नाहीं. एकमेकाला पूरक होण्याच्या दृष्टीनेंच ही ईश्वरी योजना झालेली आहे, असें महाराजांचें मत आहे. त्यामुळें प्रत्येक व्यक्तीनें आपापल्या क्षेत्रांत आपापल्या परीनें कर्तव्यदक्ष राहून निःस्वार्थपणें कार्य करावें आणि त्याचा लाभ सगळ्यांना घेऊं द्यावा. वेंच्यामधील ‘ चातुर्वर्ण्य ’ हा उतारा यासाठीं अवश्य पाहिला पाहिजे.

स्वसंस्कृतीचा अभिमान महाराजांच्या ठिकाणीं पुरेपूर भरलेला आहे. आपलें सोडणें, त्यांना भेकडपणाचें वाटतें. आचारामध्यें परक्यांचें अनुकरण करणें, यासारखी दुसरी वाईट गोष्ट नाहीं, हें आग्रह-पूर्वक आणि नवीन रीतिरिवाजांचा उपहास करीत त्यांनीं आपल्या काव्यांतून अनेक ठिकाणीं प्रतिपादिलें आहे. वेंच्यामधील रंगपंचमीच्या

पोवाड्यांतील उत्तरार्ध, व स्फुट पदांतील कांहीं फटके, या दृष्टिकोनांतून वाचून विचार करण्यासारखे आहेत. इंग्रजांचें घ्यायचे ते गुण कांहीं आपण घेतले नाहींत, असा महाराजांचा दावा आहे. गायत्रीस्तोत्रांमध्यें त्यांनीं आपलें हें मत अगदीं स्पष्टपणें मांडलेलें आहे. पाश्चात्यांचा एकोपा, त्यांचें देशप्रेम, त्यांची संशोधकबुद्धि, त्यांचें धाडस, त्यांची आपल्या रिवाजाला न टाकण्याची निष्ठा, यांपैकीं कांहींहि न करितां आपण त्यांच्या कोटपाटलोण, स्त्रीपुरुषस्वैरता, मनसोक्त विधिनिषेधरहित आहार अशाच गोष्टी स्वीकारल्या आणि त्यामुळेंच आपल्या देशाची, धर्माची, समाजाची सर्वांगीण अवनति झाली आहे. त्यामुळें समाजामध्यें सर्वत्र दुःखदैन्य यांचा अनिर्बंध संचार होतो आहे. 'सद्यःस्थितीवरील कवनांत' याचें विस्तारानें वर्णन आलें आहे. या ठिकाणीं वर्णिलेली समाजाची दुरवस्था कोणासच नाकारतां येणार नाहीं. त्यावरील उपाययोजना आणि तिची कारणमिमांसा यासंबंधीं आधुनिक जगतांतील लोकांचा श्रीदासगणूमहाराजांशीं मतभेद होण्याची पूर्ण शक्यता आहे. पण श्रीदासगणूमहाराजांची भूमिका पूर्णपणें लक्षांत घेतली, म्हणजे मग हा मतभेद मूळ तत्त्वाचा न उरतां, कांहीं थोड्या तपशीलाच्या दृष्टीनेंच अस्तित्वांत राहील, यांत मला शंका नाहीं. ऐहिक सुखास लालचावून त्याच्यामागें स्वैरपणें धावण्यांत समाजाला अनेक तऱ्हेच्या आपत्ति भोगाव्या लागतात, ही गोष्ट आजच्या, ऐहिक सुखवादाचा प्रसार धूमधडाक्यानें चालू असलेल्या काळांत सहजपणें न पटली तरीहि ती वस्तुतः पूर्ण सत्य आहे. त्यामुळें ऐहिक सुखाचा अतिरिक्त लोभ कमी करणारी हरिभक्ति हाच त्यावरील उपाय आहे, कारण 'त्यागेनैकेन अमृतत्वमानषुः' हा उपनिषद्सिद्धांत त्रिकालाबाधित सत्य असून हरिभक्तीव्यतिरिक्त या त्यागाचें महत्त्व आचरणांत येणारें नाहीं. या अशा सामाजिक भूमिकेवरूनच महाराज हरिभक्तीचा पुरस्कार करीत असल्यामुळें त्यांच्या प्रतिपादनास इतर कोणाहि भक्तिमार्गीयापेक्षां अभिनवता आलेली आहे.

ह. भ. प. श्री. धुंडा महाराज म्हणतात, "श्रीदासगणु महाराजांनीं केलेली भक्तिसंबंधीची व्याख्या फार व्यापक आहे. भक्ति तीच खरी, आणि तेंच म्हणावें भजन ( वेचा ४०, ४१ ) हीं दोन पदें त्या दृष्टीनें अभ्यासली पाहिजेत. दुसऱ्या एका पदांत ते म्हणतात—

विश्वास मुळे या भक्ति तरूची खरी ।
सन्नीति हेच तूं खोड समज अंतरी ।
प्रेमाची शोभे साल सुबक त्यावरी ।
उपासना त्या वरती फांद्या नानाविध सज्जना ॥
पाने मनिचा कोमलपणा ॥
अशा भक्तिच्या तरूस साक्षात्कार मोहर येतसे
जगा जो थक्क सदा करितसे
सहजासहजी ज्ञानफळाचा उद्भव मग होतसे
कधी ना श्रम पडती फारसे

( वेचा ५२ )

या पदांतील वृक्षाचें रूपक नुसतेंच मनोहर नाहीं तर महाराजांच्या भक्तिविषयक तत्त्वज्ञानाचे तें द्योतकहि आहे. श्रीदासगणू महाराज पूर्णपणें सुगुणोपासक आहेत मात्र त्याचे उपास्य जो पांडुरंग त्याला ते कैवल्यकंद म्हणतात हें विसरतां येणार नाहीं. त्याची उपासना प्रतिक-निष्ठ नाहीं. शुद्ध तात्त्विक आहे. या सगुणोपासनेच्या विरुद्ध असणाऱ्यांचा त्यांनीं योग्य शब्दांत समाचार घेऊन शेवटीं स्वमत प्रतिपादन केलें आहे.

भक्तिमार्ग हा श्रद्धाप्रधान आहे. संशयात्मा विनश्यति हें या मार्गांत संपूर्ण अर्थानें खरें आहे. त्यामुळें चिकित्साच करूं नये असें म्हणावयाचें नसलें तरी फाजिल चिकित्सा कामाची नाहीं ती घातक ठरण्याचा फार संभव असल्यानें.

"वृक्षाचे पाहिल्या मूळ । दिसेल दगडमाती आणि गाळ ।
त्यातचि गोविल्या मन, फळ । न येईल हातासी ॥
म्हणुन चिखल चिवडूं नको । फल घेण्या विसरूं नको ।
इतिहासासी देऊं नको । महत्त्व कदा भक्तिमधे ॥

इतिहासासी महत्त्व देता । खरी भक्ति नये हाता ।
या साठीं पुण्यवंता । सार शोधणे सर्वकाळ ॥ ”

म. सा. २१

श्रीदासगणू महाराजांनीं शुष्क चिकित्सेचा जसा वर निषेध केला आहे, तसाच ज्ञानरहित अंधश्रद्धेचा व दांभिकतेचाहि पूर्ण निषेध त्यांच्या वाङ्मयांतून पदोपदीं आढळून येतो.

श्रद्धा ठेवणे धर्मावरी । परि अंधश्रद्धा नाही बरि । अंधश्रद्धेनें होळी खरि । होईल तत्त्वासह सुखाची ॥

म. सा. अ. २३-२८१.

तसेंच दांभिकतेचीहि त्यांनीं पदोपदी निंदा केली आहे. भक्तिमार्गांत दांभिकांचा भरणा झाल्यास त्या श्रेष्ठमार्गाची किंमत कशी कमी होते हें त्यांनीं अनेक ठिकाणीं विस्तृतपणें कडक भाषेंत सांगितलें आहे. सांप्रदायिकांमध्यें दांभिकपणा शिरल्यानें सांप्रदायाचें स्वरूप कसें विकृत बनलें हें अनेक ठिकाणीं त्यांनीं सिद्ध केलें आहे. श्री. शं. चरित्रांत म. म्हणतात--

मत प्राबल्य माजले । आंतील तत्त्व पळाले । दंभाचाच महत्त्व आले । खरे कोणीच पाहिना ॥ ३४ ॥ भस्मकोळसा द्वारावति । कुंकुम सेंदुर हळद ती । ऐशा विशेष चिन्हाप्रति । महत्त्व आले पंथाच्या ॥ ३५ ॥ मग काय विचारता । एकमेकांच्या करण्या घाता । टपूनि बसले सर्वथा । पंथाभिमानी पुढारी ॥ ३६ ॥

खालील पद पहा--

ढोंग धतूरा माजऊनिया जन नादी लाविती । अशाला भेटेल काय श्रीपाति ॥ धृ. ॥ भाळि टिळे ढळढळित चंदनी लावुनि चतुराइचे । जणुं का सिग्नल आगगाडीचे ॥ १ ॥ उपकरण्याला बघुनि भाळता जरि भगवान कीरिटी । तरी का तांबट थोडे हटी ॥ २ ॥ चांदीसोने पाचहिऱ्याला जरि भगवान भाळता । तरी का सराफ हटी बैसता ॥ ३ ॥

दांभिक व अधार्मिक वृत्तीचे सुधारक हें गोंडस नांव धारण करणारे

या दोघांची योग्यता समानच आहे असें एका सुंदर रूपकाच्या द्वारे महाराजांनीं भक्तिसारामृत अ. २३ मध्यें सांगितलें आहे.

कां कीं हिंदूमध्यें ऐंसे जाहले। समाजत्व मुळीं न उरले। कित्येक उघड उघड लागले। निंदावया निजधर्मा॥ कित्येक विद्वत्तेच्या जोरावरि। चव्हाटीं धर्म म्हातारी। आणून विटंबना खरी। करूं लागले नित्यशः॥ कित्येक शंकराचार्याला। लागले शिव्या द्यावयाला। कित्येक अशक्य गप्पाला। झोकूं लागले त्या विषयीं॥ ज्यांनीं शिव्या दिल्या त्याला। ते सुधारक म्हणविती आपणांला। ज्यांनीं झोकिले गप्पांला। ते भाविक म्हणविती॥ या योगे ऐसे झाले। खरे चरित्र लोपले। कोठे अभक्तीनें गढूळ झाले। कोठे दांभिक भावे सडले कीं॥ विधी मुळींचा निरर्थक। त्याचे दांभिके केले कौतुक। अभक्तानीं मुरडिले नाक। त्याचा लक्षून नीरसपणा॥ म्हणजे दांभिके ताकाचा। लोणी नसून लोण्याचा। त्यावरि-करून आरोप साचा। करूं लागले उपयोग॥ आतां सुधारकांनीं सिद्धांत-केला। तक्र प्रयोजन ना लोण्याला। आंबटापासूनि मधुराला। जन्म कैसा होईल॥ ऐंसे म्हणोनि त्यागिले। ताक सुधारकांनीं भले। एवंच दोघेही मुकले। नवनीताच्या लाभाला॥

ओ० २३२-४३

भक्तिमार्ग हा अंतरंग आहे त्यांत बाह्यसाधनावांचून अडत नाहीं व त्यांना किंमतहि नाहीं. शुद्ध निर्विकार अशा प्रेमाचीच तेथे आवश्यकता आहे. महाराज म्हणतात.

तुज स्नान घालावया। बंदी आम्हास येठाया। परि प्रेमाश्रूनें प्रक्षाळाया। अधिकार आहे केव्हांही॥ मनरूपी वाहतो सुमन। भावाचे लावितो चंदन। स्तुतीचीं नाना भूषणें। तुजलागीं घालितो॥ धूप काममोहाचा। तुज लागीं दावितो साचा। प्रेमरूपाशिऱ्याचा। दावितो तुम्हा नैवेद्य॥ तुझी भक्ति ही दक्षिणा। ती तुज मी अर्पितो नारायणा। स्तोत्रपारायण प्रदाक्षिणा मान्य करणें गोविंदा॥ तुझी जी दिव्य नामावली। ती मी वाहतो पुष्पांजलि। केशवा रामा वनमाळी। वासुदेवा अधोक्षजा॥ अहंकाराचा कापूर। ओवाळून घालितो नमस्कार।

त्र्यं. स्तो. ओ. ८८-९३.

कोठें कोठें उपासनामार्गाच्या नांवाखालीं ज्ञानाची व कर्मधर्माची निंदा केलेली आढळते पण महाराजांनीं. तसे कोठेंहि केलें नाहीं, त्यांच्या वाङ्मयांत कर्म उपासना ज्ञान यांचा योग्य समुच्चय केलेला दिसून येतो. भक्ति हा मुख्य विषय असला तरी वर्णाश्रमधर्माचें महत्त्व व त्यांच्या आचाराची आवश्यकता अनेक ठिकाणीं त्यांनीं पटवून दिली आहे. वर्णाश्रमधर्म कां व कसें झाले, ईश्वरानें ते कां निर्माण केले, समाजधारणास त्यांची कशी आवश्यकता आहे या विषयाचें उत्कृष्ट विवेचन श्री. शं. चरित्र अ. ३३ मध्यें केलें आहे.

**कर्मकांडपाया खचित। ज्ञान उपासना इमारत। हे आणून ध्यानांत। कर्ममार्ग हा आचरणे॥**

याहीपेक्षां खालील रूपक फारच मनोरम साधलें आहे.

**शेती जोंधळा पेरिला। आणि येऊं न देतां कणिस त्याला। तो पाणी घालोनि पोशिला। बाट्टक करुनि रक्षिले॥ पशूलाच पोशी भले। ते बाट्टक रक्षण केलेले। तैसे कर्मकांडाचे झाले। त्यावेळीं जगतीतला॥ जोंधळा जो लाविला। तो बाटुक होण्यासाठीं न भला। आले पाहिजे कणिस त्याला। ही इच्छा मालकाची॥ नुसते कणिसही येऊन। इच्छा न त्याची होय पूर्ण। त्या कणसा लागून। दाणे आले पाहिजेत॥ तेव्हांच जोंधळा पेरल्याची। सार्थकता झाली साची। नुसत्या बाटुके तयाची। होणे नाहीं प्रतिष्ठा॥ वैदिकपंथ जोंधळा। कर्म हे बाटुक त्याला। उपासना मार्गाला। कणिस म्हणणे योग्य असे॥ दाणे हेच आहे ज्ञान। त्या कणसा लागुन। ऐसा वेदमार्ग संरक्षण। करणे ज्ञानी पुरुषानें॥**

वरील रूपकांत कर्म, उपासना व ज्ञान यांचा परस्पर संबंध कसा आहे हें फार उत्कृष्ट रीतीनें दाखविलें गेलें आहे. तसेंच उपासनेकरितां द्वैतच पाहिजे अद्वैतांत उपासना होऊंच शकत नाहीं असें म्हणणाऱ्या द्वैतवाद्यांना श्री. शं. च. अ. ३३ मध्यें योग्य उत्तर दिलें आहे; इतकेंच नव्हे तर द्वैतभावनेमुळें उपासनेच्या ऐवजीं परस्परांत फूट, द्वेष, कलह इ. विकार वाढून उपासनेचें खरें स्वरूप कसें नष्ट होतें हें स्पष्ट प्रतिपादिलें आहे.

द्वैतनिर्मित उपासना। जरि आहेत पहा नाना। तरि त्या अवघ्यांना। अद्वैत दोऱ्यांत गोंवावें॥ म्हणजे उपासनेचे भिन्नपण। सर्वांशी कायम राहून। अद्वैताचे मोठेपण। तेंच ठायीं टिकणार आहे॥ प्रतीक उपासनेचे। धातूचें वा पाषाणाचे। असते अन्योन्य आकाराचे। तशीच नांवे भिन्न-भिन्न॥ तो आकार नांवाचा भिन्नपणा। साच ऐसा मानिल्या जाणा। ऊत येईल अभिमाना। द्वेष वाढेल समाजांत॥ याचा न केल्या विचार। शकले होतील भराभर। तत्त्व जाऊन वाढेल जोर। उगीच तेथल्या उपाधींचा॥ पहा शैववैष्णवामाझारी। फूट पडून परस्परी। एकमेकाचे व्हावया वैरी। कारण झाले ते पहा॥ दगड काळे पांढरे। वादास कारण झाले खरे। तैसेंच पहा दुसरे। राख आणि कोळसा॥ म्हणोनि विचार अद्वैताचा। प्रत्येक ठिकाणीं करणे साचा। हाच दंडक वेदाचा। तो केव्हांही न अवमानणे॥ कोणतेही औपासन। सेविल्या अद्वैतावांचून। तेच कलहास कारण। होईल पुढल्या पिढीते॥ द्वैत हे कलेवर। अद्वैत सिद्धांत प्राण थोर। हे पृथक् झाल्या साचार। एकमेकांपासुनि॥ दोघांसही न किंमत। देह जो का असूं रहित। ते प्रेत होय साच कीं॥

शं. च. अ. ३३

हा सर्वच अध्याय फार मननीय आहे. यांत प्रचलित अनेक सामाजिक व धार्मिक प्रश्नांचा फार उत्कृष्ट व समतोल विचार केला गेला आहे. असो. प्रेमभक्ति ही अद्वैतरूपच असते असें महाराजांचें स्पष्ट मत आहे. श्रीनारदभक्तिसूत्रावरील आपल्या टीकेंत आरंभीच ही गोष्ट त्यांनीं सिद्ध केली आहे.

परमेश्वराप्रीत्यर्थ। भक्ति प्रेमरूप साक्षात। भक्ति हाच सुखद पंथ। ईश्वराकडे जावया॥ २॥ ज्याचे विषयीं सादर। इच्छा असणें तीव्रतर भेटण्याची साचार। ऐसी स्थिती ती प्रेमरूपा॥ ३॥ भेटणे म्हणजे एक होणे। मुळींच न रहाणे द्वैतपणे। ऐशा स्थितीकारणे। प्रेम म्हणणे उचित॥ ४॥ साधारणतः प्रेमाची। व्याख्या श्रोते हीच साची। द्वैत टाकून एकत्वाची। इच्छा उपजणे ते प्रेम॥ ७॥

तसेंच या विषयांतील १।२ पदें हीं फार सुंदर आहेत.

हे काय न देऊळ हरीचे। माझ्या पंढरीच्या विठ्ठलाचे॥ ध्रु०॥ विश्वी

भरला पुरा । बाप माझा खरा । पुसा ज्ञानेश्वरा । वेद बोलून गेले जे वाचे ॥ १ ॥ जेथे जेथे भाव । तेथे तेथे देव । कशास हवा गाव । म्हणा रामकृष्णहरि वाचे ॥ २ ॥ विठ्ठल नरहरी । हीच शिरापुरी । सेवा अत्यादरी । कधि जाड्य न होईल याचे ॥ ३ ॥ नाही वृत्तीवरि । बोधला उड्या मारी । चित्ती ठसला हरि । गणु दास मी बटकुर त्याचे ॥ ४ ॥

संत मणकोजी बोधल्यांच्या आख्यानांतील हें पद आहे. मणकोजीच्या द्वारें श्रीदासगणू महाराजांचेंच अंतरंग बाहेर पडलें नाहीं काय ?

जनाबाईकडून खालील वदविलेलें पदहि अत्यंत मननीय आहे.

नको मज साडी नसे मी रे उघडी । भक्तीचि पैठणी नेसुन बसल्ये । राजा भवि मन विटले ॥ धृ० ॥ वैराग्याची अंगात चोळी । केशवराघव नग हे मी ल्याले ॥ १ ॥ मीपण जाळुनि काजळ केले । ज्यायोगे जग हरिरूप दिसले ॥ २ ॥ सद्भावाचे कुंकू कपाळी । गुरुरायाने मज लावियले ॥ ३ ॥ त्या पुढती या तंव भूषणांची । किंमत ना मज गणुदास बोले ॥ ४ ॥

तसेंच श्रीसांवतामाळयाच्या आख्यानांत जें एक पद आलें आहे त्यांत भक्तिरसाची परमसीमा झाली आहे.

विठ्ठल वापी विठ्ठल मोट । विठ्ठल नांद्या बैल ग ॥
विठ्ठल पाणी विठ्ठल हाकिता । त्या विण हे काय होईल ग ॥ धृ० ॥
विठ्ठल शेत विठ्ठल वाफा । विठ्ठल नांगर वखर ग ।
घडि घडि विठ्ठल विठ्ठस भटे । मग कां व्हावे अधीर ग ॥ १ ॥
विठ्ठल बेणे विठ्ठल उगवे । विठ्ठल अवध्या जगांत ग ॥
मग का डोळे बांधुनि भटकू । दुर्धर माया वनांत ग ॥ २ ॥
दासगणू म्हणे माया गांठण । थोडी करिता सैल ग ॥
बघणारासह स्थावरजंगम । रूप विठूचे होईल ग ॥ ३ ॥

हें पद वाचीत असतां श्री. तु. म. यांच्या विठलटाळ विठल दिंडी । या अभंगाचें स्मरण आल्यावांचून रहात नाहीं.

वरील सर्व कवनें पाहिल्यास ‘ मानस जाणि जे बोले ’ ( ज्ञा. ) या न्यायानें भक्तिरसानें ओथंबलेल्या हृदयांतूनच असे प्रासादिक व प्रेमळ उद्गार बाहेर पडणें शक्य आहेत. याकरितां भक्तिरसप्रधान काव्यांत

श्रीदासगणू महाराजांना श्रेष्ठत्वाचें स्थान प्राप्त होणें सहज प्राप्त आहे. ज्यांना त्यांची प्रेमळ, विनोदगर्भ, पण भक्तिरसप्रचुर कीर्तनें ऐकण्याचें भाग्य प्राप्त झालें आहे त्यांच्या हें तेव्हांच ध्यानांत आल्यावांचून रहाणार नाहीं.

रामदासासारखे कांहीं संत जर सोडले, तर धार्मिक आचारांचा व परमार्थप्रवणतेचा चालू परिस्थितीशीं मेळ घालण्याचा प्रयत्न कोणीहि विशेषसा केलेला नाहीं. आजच्या काळाच्या दृष्टीनें श्रीदासगणूमहाराजांनीं ही उणीव भरून काढलेली आहे.

वैदिक संस्कृतिप्रियतेचा ठसा त्यांच्या काव्यावर चांगलाच उमटला असला तरी समाज व राष्ट्र यांच्या उत्कर्षाची तळमळहि त्यांच्या काव्यांतून पूर्णपणें व्यक्त होते. भक्तिलीलामृत ग्रंथांत ४ थ्या अध्यायांत आलेले हें पुढील वर्णन त्या दृष्टीनें पहाण्यासारखें आहे—

"स्वराज्य प्राण राष्ट्राचा । स्वराज्य हाची मोक्ष साचा ।
स्वराज्य पाया धर्माचा । त्यावीण अवघे ओखटें ॥
स्वराज्य सुखाची सौख्यखाणी । स्वराज्य वैभवनभींचा वासरमणि ।
स्वराज्य हाच चिंतामणि । चिंतिलें फळ देणारा ॥
सैनिकाचे जोरावर । स्वराज्य रक्षणें साचार ।
एकीचें राहो सरोवर । त्यास पाट फोडूं नका ॥
एकी स्वराज्याची जीवनकळा । एकी स्वधर्माचा पुतळा ।
एकी व्यापाराचा मळा । आहे धनत्तर वागाईत ॥
आपमतलब हेवा द्वेष सकळ । हे एकीचे शत्रु प्रबळ ।
विघ्नसंतोषी दुर्जन खळ । यांचा त्याग करावा ॥
स्वराज्याचा वृक्ष जाण । निर्माण एकीपासून
तो तूं करावा फार जतन " हे सवाई माधवा ॥

पुढें एके ठिकाणीं ते म्हणतात—

" कृत्य व्यक्तीनें करावें । त्याचें यश सर्वां यावें
अजरामर होऊन बसावें । आपण अपुल्या देशासह ॥
व्यक्तिस्वातंत्र्य द्वेष सोडा । समाजस्वातंत्र्य प्रेम जोडा
शहाणे असतील त्यांनाच करा । अवघ्यांचे पुढारी ॥

दासगणूमहाराजांच्या अंतःकरणांतील राष्ट्रहिताची तळमळ व देशप्रेम या वरील अवतरणांतून सहज प्रकट झालें आहे. रंगपंचमीच्या पोवाड्याच्या शेवटीं ते म्हणतात–

> " हे मत्कविते तुला न आतां नृपवैभव ते वर्णाया
> मिळेल बाई, गोदातटिं तूं चाल हरीचे गुण गाया ।
> कालचक्र हें विपरीत फिरलें. दोष कुणाला लावावा
> धन्य लोक पूर्वीचे गेले, भोगुन स्वातंत्र्याचि हवा ॥
> फंदि, प्रभाकर जोशिबुवांनीं स्वराज्यरंगांसीं लुटिलें
> दासगणूला परवशतच्या वेरंगा बघणें आलें ॥ "

पारतंत्र्याची मीमांसा करीत असतांना आपसांतील फुटीरपणा हाच कारण आहे, असें सांगतांना महाराज लिहितात–

> " म्हणूं लागले मारवाडी । मरेना का कानडी ।
> बंगाली म्हणे द्राविडी । नाहीं आम्हांस कामाचा ॥
> ऐसें झालें म्हणून । भारता आलें दुबळेपण ।
> तें परक्यांनीं पाहुन । स्वाऱ्या केल्या या देशीं ॥ "

पण त्यानें तरी आम्हांस शहाणपण सुचलें काय? सोमनाथावर महंमदाच्या घणाचे घाव पडले तरी दक्षिणेचे लोक म्हणूं लागले, 'अरे पण आमचा रामेश्वर तर सुरक्षित आहे ना?' या बेकीमुळें तर राष्ट्रास दुबळेपण आलें आहे. महाराजांनीं यावर उपाययोजनाहि सांगितलेली आहे. त्या दृष्टीनें वेंच्यांतील 'हिंदुधर्म आणि समन्वय' हा सबंध उताराच अवलोकन करण्यासारखा आहे.

समाजहिताच्या या तळमळीमुळेंच महाराजांची दृष्टि निरनिराळ्या थरांतील लोकांच्या दैन्यापर्यंत जाऊन पोहोंचली असून आपल्या काव्यांतून त्यांनीं त्याचें वर्णन केलें आहे. या निमित्तानें या रीतीच्या दुःखास महाराजांनीं वाचाच फोडली आहे, असें म्हणतां येईल. वेंच्यामधील 'उसाचा पोवाडा' हा त्यासाठीं पहाण्यासारखा आहे. शेतकऱ्यांचें दैन्य अत्यंत हृदयद्रावक शब्दांनीं त्या ठिकाणीं त्यांनीं

उल्लेखिलें आहे, जीव द्यावयास निघालेल्या शेतकऱ्यास उद्देशून त्याच्या नातेवाइकांनीं केलेलीं भाषणें वाचून आणि पाणीपट्टीसाठीं झालेल्या जप्तीच्या पंचनाम्यांतील वस्तूंचें स्वरूप पाहून ज्याचें हृदय हेलावणार नाहीं, डोळे ओलावणार नाहींत असा वाचक विरळाच! हा सर्व पोवाडाच अनेक दृष्टींनीं अभ्यासण्यासारखा आहे. श्रीदासगणूमहाराजांची स्वाभाविक प्रवृत्ति जरी जुन्या संतकवींची असली तरीहि सद्यःकालीन परिस्थितीचा संस्कार तिजवर इतका घडला आहे कीं, त्यांच्या काव्यानें जुन्या नव्या मराठी काव्याचा सांधाच जोडला गेला आहे कीं काय असें वाटतें. त्यांच्या कवितेंत अनेक प्रगत नि नवीन असे विचार जागजागीं आढळतात. शेतीसंबंधीं संतकथामृताच्या ४८ व्या अध्यायांत आलेलें वर्णन त्यांच्या व्यापक दृष्टिकोनाचें द्योतक आहे.

> "शेती जगाचें जीवन । शेती राष्ट्राचें भूषण ।
> शेती व्यापाराचा प्राण । शेती प्रधान अवघ्यामध्यें ॥
> पायमल्ली शेतीची । ज्या देशांत होय साची ।
> तो देश दारिद्र्याची । जहागीर झाला समजावा ॥
> शेतकरी जेथें अशिक्षित । तो देश न ये उच्चतेप्रत ।
> शेतकऱ्याची किंमत । आगळी आहे सर्वांहुन ॥
> सुधारणा होतां शेतीची । सहज प्रगति देशाची
> श्रोतेहो होय साची । येथें शंका घेणें न लगे ॥"

राष्ट्राच्या सर्वांगीण उन्नतीच्या दृष्टीनें चार प्रकारचे पुरुष लागतात. याचें वर्णन भक्तिरसामृतींत शेवटीं आलें आहे. आशीर्वादासाठीं व सन्मार्गदर्शनासाठीं राष्ट्रामध्यें संत अवश्य असले पाहिजेत...त्यांच्या अस्तित्वामुळेंच कोणत्याहि कार्यास भगवंताचें अधिष्ठान लाभत. भौतिक शास्त्रांचें संशोधन करणारे शास्त्रज्ञ यांचें महत्त्व राष्ट्राच्या उद्धारांत किती असतें, हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. समाजापुढें उज्वल ध्येय ठेवण्यासाठीं कवि व ग्रंथकार लागतात. राष्ट्रहिताचें कोणतेंहि कार्य यशस्वीरीत्या तडीस नेण्यासाठीं

प्राणाची तमा न बाळगतां परिस्थितीशीं झगडत राहणारे निस्वार्थी शूर तरुणहि राष्ट्रास हवे असतात. तेव्हां हीं कार्यें करणाऱ्या विभूतींना देशामध्यें पाठवून देण्यासाठीं दासगणूमहाराजांनीं परमेश्वरास विनविलें आहे. आज सर्वच विपरीत झालें आहे. ढोंगी स्वत:ला संत म्हणवितात, शास्त्रज्ञ विनाशाचा वांटा हुडकतात, कवि पैसे घेऊन कोणत्याहि बऱ्यावाईट गोष्टींचें समर्थन करूं लागतात आणि कार्यकर्त्या पुरुषाचें सामर्थ्य स्वार्थी झालेलें आढळतें; त्यामुळें सर्वांगीण सुधारणा झाल्या-वांचून तरणोपाय नाहीं. अशी परिस्थिति धार्मिक दृष्टीनें सुधारणा होतांच समाजांतील परस्पर हेवा, मत्सर व द्वेष नाहींसे होतील. भक्ति-सारामृताच्या ५२ व्या अध्यायांत श्रीसांईबाबांच्या तोंडीं महाराजांनीं घातलेला उपदेश या दृष्टीनें लक्षणीय आहे.

सर्वत्र सच्चिदानंद पहावा, तोच अल्ला इलाही आहे. पूर्वींच्या संतांनीं— ‘ आम्ही जातीचे ब्राह्मण। आमुचे सोयरे मुसलमान ’। असें म्हटलें आहे. त्यांतील हें मर्म लक्षांत घेऊन वागावें. हिंदु, मुसलमान हे केवळ वरवरचे भेद आहेत. आत्म्याचे ते केवळ पोषाख आहेत. एकाच भूमीचें अधिष्ठान मशीद व देवळास असतें हें कोणींहि विसरूं नये आणि द्वेषाच्या वांटा हुडकूं नयेत. आज सर्वत्र द्वेष मत्सराचें ठाणें माजलें आहे. एकाच जातींतील पोटभेदांतहि एकोपा नाहीं. कोंकणस्थ देशस्थांना अजागळ म्हणतात; तर ‘ कोंकणें तेवढे दुबळे ’ असा देशस्थांचा दावा असतो. वास्तविक सर्व देश हा एक सलग गालिचा आहे. त्यावर देश कोंकणासारखें कृत्रिम भेद कशासाठीं ? महाराष्ट्राचें वैभव ज्या काळीं उन्नतीच्या शिखरावर चढलें होतें. त्या काळीं महाराष्ट्रांत ब्राह्मण-मराठयांची दुफळी नव्हती. मुसलमान म्हणत असत—“ कठिण बडा है दख्खन, मराठा आदमी यही बदन, बम्मन उसकी रूह है। ” षट्कर्माचरणामध्यें निमग्न असणारे ब्राह्मण वेळ येतांच तरवार घेऊन उभे राहात आणि नेहमीं शेतींत नांगर धरणारा मराठा वीर तितक्याच सफाईनें रणां-

गणावर आपली प्रतापी तलवार बिजलीप्रमाणें चालवीत असे. यामुळेंच दिल्लीवर भगवें निशाण फडकूं शकलें. (भक्तिसारामृत अ.२८)

आज मात्र शोचनीय दशा आली आहे. रंगपंचमोच्या पोवाड्यांत महाराज म्हणतात—

**' विप्र मराठे ज्या शहरीचे एक ख्याती दूरवर ।**
**होती तेची बसूं लागले परस्परांच्या उरावर ॥ '**

वास्तविक जातिभेद हे व्यावहारिक आहेत. त्यांना पारमार्थिक महत्त्व अजिबात नाहीं. यासाठीं व्यवहारापुरतें त्यांस सांभाळून जातिमत्सराचें हें विष टाकून द्यावें कारण——

**' जातिद्रोह धर्मद्रोह । पथद्रोह राजद्रोह ।**
**गोत्रद्रोह नीतिद्रोह । हीं द्वारें अनर्थाचीं ॥ '**

शरीराच्या अवयवांप्रमाणेंच सर्वांनीं गुण्यागोविंदानें राहावें. हा ५३ व्या अध्यायांतील उपदेश श्रीदासगणूमहाराजांच्या समाजोन्मुख प्रवृत्तीचा द्योतक आहे.

**' ज्याचे मनीं न स्वदेशप्रीति । तो जंताहून नीच अती ।**
**त्या मूढाचें निश्चिती । तोंड कदापि पाहूं नये ॥ '**

भक्तिसा. अ. ३५

या जळजळीत उद्गारावरून श्रीदासगणूमहाराजांच्या देशप्रेमाची ओळख सहज पटणारी आहे.

या सर्व रीतींच्या वर्णनाचा साकल्यानें विचार करितां श्रीदासगणू-महाराजांच्या संतजनसुलभ अशा भक्तिप्रेमालाहि देशप्रेम, समाजो-न्नतीची आस्था, जातीय ऐक्याची इच्छा, याची शोभून दिसणारी महिरप आहे आणि म्हणून आधुनिक काळांतील कोणत्याहि रसिकाला त्यांच्या काव्याविषयीं आकर्षण वाटण्यास अडचण पडूं नये.

**भाषाप्रभुत्व**

यानंतर श्री. दासगणूमहाराजांचें भाषाप्रभुत्व व शब्दसृष्टि यासंबंधीं विचार करणें आवश्यक आहे. कारण साहित्यगुणांत यांचाहि समावेश केला पाहिजे. श्री. दासगणू महाराजांच्या काव्यांत तत्सम, तद्भव, देशी,

विदेशी अशा शब्दांचा संग्रह झालेला आढळतो. त्यांनीं वापरलेले संस्कृत शब्द प्रायः नेहमींच्या प्रचारांतलेच आहेत. अप्रसिद्ध संस्कृत शब्द व दीर्घसमासघटित पदें यांचा त्यांच्या काव्यांत बहुधा अभाव आहे. बहुधा म्हणण्याचें कारण 'असु (प्राण) स्तनयित्नु (मेघ) यासारखे अप्रसिद्ध संस्कृत शब्दहि त्यांच्या काव्यांत आढळतात. क्वचित् 'राधाधरमधुमिलिंद' 'सजलजलदसमश्यामतनु' यासारखीं लांबट पदेंहि आहेत, परंतु अशा तऱ्हेचे अवघड प्रयोग अगदीं शोधूनच काढायला लागावेत, इतके अल्प आहेत. सामान्यतः श्री. दासगणू-महाराजांची रचना ही अगदीं सुबोध असल्यामुळें प्राचीन साहित्य-शास्त्राप्रमाणें 'वैदर्भी' रीतीचा त्यांचें वाङ्मय हा एक उत्कृष्ट नमुना आहे.

उर्दू शब्द त्यांच्या वाङ्मयांत त्या मानानें पुष्कळच येतात. कांहीं ठिकाणीं त्यांची बोंचहि जाणवते. श्री. दासगणुमहाराजांनीं शंकराचार्य-चरित्रांमध्यें आपल्या या संवयीचें थोडेंसें समर्थन केलें आहे. ते म्हणतात—

> " मी नाहीं विद्वान। नाहीं मशीं भाषाज्ञान।
> यावनी शब्द मधुनमधुन। येतात कीं बहुसाल॥
> यांत माझा दोष नाहीं। तो संगतीचा गुण पाही।
> स्वभाषेचा मलाहि। आहे अभिमान हें खरें॥
> शब्द शोधण्या परी जावें। तरी सहजतेला मुकावें।
> डोकें खाजवीत बसावें। लागेल मशीं दयाळा॥ "

त्यामुळें महाराजांच्या शब्दसंग्रहांत यावनी शब्दांचा विशेष भरणा आढळणें अगदीं स्वाभाविक आहे. त्यांची शब्दसंपत्तीहि चांगलीच संपन्न आहे. अमृतानुभव वा भक्तिरसायन यासारख्या अवघड ग्रंथांचेंहि स्पष्टीकरण करतांना त्यांना शब्द शोधीत बसावें लागलें आहे, असें दिसत नाहीं. सर्व ठिकाणची रचना, सारखीच सहज व प्रासादिक आहे. निरनिराळीं वृत्तेंहि या बळावर त्यांना चांगल्या रीतीनें हाताळतां आलीं

आहेत. ग्रंथसंभाराच्या दृष्टीनें तर शब्दसंपत्तीविषयीं शंका राहाण्याचें कारणच नाहीं. शब्दांची उणीव असणाऱ्याच्या हातून येवढी विस्तृत रचना होणें ही गोष्ट सर्वथैव अशक्य आहे. व्यक्तिविशेषानें उपमाविशेष व भाषाविशेष साधणें हें भाषाप्रभुत्वाचें एक प्रधान लक्षण आहे. त्या दृष्टीनें श्री. दासगणूमहाराजांनीं–' केलें अर्जावरतीं अर्ज दाद लागेना। खर्चिलें द्रव्य जणु काय तमाखूचुना'। जातां येतां पानाची चंची पुढें करणाऱ्या शेतकऱ्याच्या तोंडीं उसासाठीं झालेल्या बेसुमार खर्चाला उद्देशून तमाखूचुन्याची दिलेली उपमा मार्मिक असून कवीच्या भाषाप्रभुत्वाची नि त्याचबरोबर त्याच्या कवित्वशक्तीची ओळख पटवून देणारी आहे. शाकुंतलांत कालिदासानें दुष्यंतशकुंतलेच्या विवाहास उद्देशून कण्वाच्या तोंडीं घातलेली "धुरामुळें दृष्टि व्याकुळ झालेली असूनहि आहुति नेमकी अग्नींतच पडली।" ही उपमा यज्ञपरायण व्यक्तीच्या तोंडीं जितकी व ज्या अर्थानें समर्पक आहे, तितकीच महत्त्वाची महाराजांची वरील उपमाहि आहे. सेनाच्या चरित्रांत गवळणीच्या तोंडीं आलेलीं ताकाच्या वाटीची उपमाहि अशीच आहे.

श्री. दासगणूमहाराजांना शब्दसृष्टीचें महत्त्व चांगलेंच अवगत आहे. ते म्हणतात—

**" या शब्दसृष्टीची। स्थिती रंगासमान साची**
**तेथें कुशलता चिताऱ्याची। येते कळून जगातें ॥ "**

हें वर्णन शंकराचार्यचरित्राच्या तृतीयाध्यायाच्या आरंभीं निराळ्या प्रकरणांत आलें असलें तरी, त्यांतील दर्शनी अर्थहि महत्त्वाचा आहे आणि तें महत्त्व श्री. दासगणूमहाराजांनीं ठिकठिकाणीं रेखाटलेल्या क्षणचित्रांत अत्यंत नवलाईनें व्यक्त झालें आहे.

चार्वाकाच्या भाषणाचें वर्णन करतांना ते म्हणतात–

**' जैसे एरंडाचें गुऱ्हाळ। ऊस ना रस ते ठायां ' ॥ संतकथामृत २३ ॥**

थोडक्या शब्दांत पुष्कळ अर्थ सांगण्याची कला श्री. दासगणू-

महाराजांना कशी अलौकिक रीतीनें साधली आहे, तें पुढील व्याख्यांच्या ठांशीवपणामुळें सहज प्रत्ययास येईल.

> " राजा—जो प्रजेचें दुःख जाणें । तोच राजा म्हणावा ॥
> पत्नी—ऐसेंच असावें कलत्र । कीं जें भर्त्यास सहाय्य करी ॥
> संत—सामर्थ्य अंगिं असुनि नच दंभ दावी !
> थोर—जे थोर साहाति सदोदित ते छळाला ॥
> सोवळा—ज्याचें शुद्ध झालें अंतर । तो सोवळा कोठंही ॥
> सुख—सारख्यास सारखें भेटे—तेव्हांच सुख होय गोमटें ॥
> महंत—ना दे महत्त्व महादाश्रय हीन दोषा । "

समर्पक शब्दयोजना व वृत्तयोजना हीहि भाषाप्रभुत्वाच्या दृष्टीनें महत्त्वाची मानली जाते. उपमेच्या प्रसंगीं उल्लेखलेल्या—

> ' कडाडुनि तडित जशी दडुनि जाय मेघोदरीं—
> तसें वरून कोप तो गमन सत्यभामा करी । '

यांतील संतापून पाय दणदण आपटीत निघालेल्या सत्यभामेला दिलेली विजेची उपमाच केवळ यथार्थ आहे असें नाहीं, तर त्या ओळींतील ' ड ' या अक्षराची झालेली पुनरावृत्ति ही सत्यभामेचा कोप व तिचें तणतणत जाणें, या दोनहि गोष्टींची सूचक आहे.

लाखा कोल्हाट्याच्या आख्यानांतील ' नको बोलुं पुढें ' ही छक्कड, बोलणाऱ्याच्या मनांतील संताप व्यक्त करण्याच्या दृष्टीनें अत्यंत अनुकूल असें वृत्त आहे. वत्सलाहरणांतील ' गर्गगुरूला बाहून आणी । ' या पदांतून बलरामाच्या अधिरेपणाला योग्य अशीच त्वरा आढळते. ती पदांची चालहि घाईनेंच उच्चारण्यास योग्य अशी आहे. परमेश्वर महार बनल्याचें दामाजी आख्यानांतील एका श्लोकांत आलेलें वर्णन शब्दरचना व वृत्त या दोन्हींहि दृष्टीनें कसें सुरेख झालेलें आहे, तें पहा—

> " करी काय हो तेधवा, तो मुरारी
> दिलीं भूषणें टाकुनी उंच सारीं ।

करीं कांबळा, कंठिं तो कृष्ण दोरा
निघाला प्रभु बेदरासी झरारा ॥ "

धांदल, घाई, गडबड इत्यादि भाव या श्लोकांतून सहज प्रगट व्हावेत अशी येथील पदांची मांडणी आहे

श्री. दासगणु महाराजांच्या या भाषाप्रभुत्व गुणाचा उल्लेख करितांना के. श्री. चिं. ना. जोशी लिहितात "प्रत्येकाचें मत थोडक्यांत देऊन शंकराचार्यांनीं त्याचें खंडण कसें केलें तें अगदीं संक्षेपानें पण विशद-तेनें केलेलें पाहून कवीच्या ज्ञानसंग्रहाची व चातुर्याची तारीफ करावी तेवढी थोडीच वाटते! अतिशय थोड्या शब्दांत अतिशय अर्थ सांगण्याची कला ( Terseness ) ह्या स्थळीं कमालीची आश्चर्यकारक झाली आहे. ज्ञानदेवाच्या अंगीं हा गुण प्रामुख्यानें असल्याचें ज्ञानेश्वरी सर्वस्व ह्या ग्रंथांत म्हटलें आहे. महाकवींच्या लक्षणांपैकीं हें एक लक्षण ह्या कवीमध्यें ठळकपणें दिसतें. तीक्ष्ण बुद्धि व भाषाप्रभुत्व असल्या-शिवाय हें साधणें कठिण असतें. ह्यांच्या सर्व ग्रंथांतील विविध ज्ञानसंग्रह पाहून कोणताहि जाडा विद्वान् थक्कच होईल. अर्थात् इकडील आधुनिक कवींपैकीं कोणीहि त्यांची बरोबरी करूं शकणार नाहीं."

वेंच्याच्या शेवटीं उद्धृत केलेल्या सूक्तिसंग्रहावरून श्री. दासगणू-महाराजांच्या भाषाप्रभुत्वाचा यथार्थ प्रत्यय येईल. कारण भाषेला विलक्षण सामर्थ्य असल्यावांचून सुटसुटीत पण अर्थगर्भ सुभाषितें रचतांच येणार नाहींत.

रचनाकाल आणि वाङ्मयविस्तार यांच्या सापेक्ष संबंधांतूनहि कवीच्या भाषाप्रभुत्वावर प्रकाश टाकतां येईल. असलेल्या उदंड वेळांमध्यें थोडेसें लिखाण करावयाचें असेल, तर कवीला निवान्त वेळ भरपूर असल्यामुळें समर्पक शब्दाच्या शोधासाठीं तासन् तास चिंतन करून काव्यदोष टाळण्यासाठीं कोशांतील निरनिराळ्या शब्दांचें साहाय्य घेता येते. समर्पक वर्णनासाठीं शोभतील अशा उपमांचें दीर्घकाल मनन करून नीटनेटकी रेखीव नि घोटीव काव्यरचना करणें

हें त्या दृष्टीनें बरेंचसें सुलभ होतें. पण चांगला पाठ असलेला मजकूर तोंडानें सांगावा, इतक्या वेगानें आश्चर्य वाटण्याइतकी दीर्घ काव्य-रचना करणाऱ्या व्यक्तीच्या वाङ्मयांतहि ज्यावेळीं मनोहर निसर्गवर्णनें, मार्मिक स्वभावचित्रें, नीटस व्यक्तिरेखा, समर्पक उपमा, उत्प्रेक्षा, भव्य कल्पना, मनोहर रूपकें, सर्व प्रकारचे हृद्य विनोद, चटकदार म्हणी, सुटसुटीत वाक्प्रचार आणि अर्थयुक्त सुभाषितें यांची पखरण विपुलतेनें आढळते; सूक्ष्म निरीक्षणाचा जागोजागीं प्रत्यय येतो; अनुभूतीची विशालता, मनाचा ठाव घेते आणि भावभरित रसपरिपोष हृदयास हालवून सोडतो, असें आढळतें, त्यावेळीं जाणताहि आश्चर्यानें थक्क झाल्यावांचून राहात नाहीं.

> नैसर्गिकीच प्रतिभा श्रुतंच बहुनिर्मलम् ।
> अमन्दश्चाभियोगोस्याः कारणं काव्यसंपदः ॥

श्रीदासगणूमहाराजांच्या काव्याच्या बाबतींत हें सर्व पूर्णपणें सत्य आहे. म्हणूनच या प्रकरणाच्या आरंभीं मीं त्यांच्या वाङ्मयाला विशाल पण रमणीय अशा नैसर्गिक काननाची उपमा दिली आहे.

**वृत्त, छंद, जातिः—**

श्रीदासगणूमहाराजांच्या वाङ्मयांत ओवी छंदाचें प्राधान्य आहे. काव्यसंख्येचा साधारणपणें तीन चतुर्थांशाहून थोडा उणा असा भाग ओवीनेंच व्यापिला आहे; तरी इतर अक्षरगण आणि मात्रागण वृत्त जातींची संख्याहि बरीच आहे. त्यांनीं वापरलेल्या वृत्त जातींचीं केवळ नांवें पुढें उद्धृत करीत आहे. उदाहरणें देणें फार विस्ताराचें होईल म्हणून टाळतों.

**वृत्तें :**—इंद्रवज्रा, उपजाति, शालिनी, मालिनी, रथोद्धता, वसंततिलका, पृथ्वी, स्रग्धरा, शार्दूलविक्रीडित, हरिणी, अश्वधाटी, चित्रलेखा, कोकिरव, रथोद्धता, स्वागता, चामर, पंचचामर, वंशस्थ, भुजंगप्रयात, शिखरिणी.

**जाती :**—आर्या, दिंडी, साकी, तुन्दिल, मदनतत्त्वार, वनहरिणी, हरिभगिनी, प्रियलोचना, भवानी, शुक्रकला, कमललोचना, आदिसुन्दरी,

समुदितमदना, सूर्यकला, चंद्रकान्त, चंद्रकला, शुभगङ्गा, गोपालन, भूपति, जगदीश्वरबाला, लीलारति, पादाकुलक, उद्धव, भुवनसुंदर, महाराष्ट्रलक्ष्मी, धवलचंद्रिका, रसना, विजयिनी, श्रीरंग, मदनमञ्जरी, राजेश्वरी, केशवकरणी, शरण, अभिमन्यू, अक्रूर, मोहमाया, विश्राम, श्यामाराणी, पुष्पिता, कृष्णनाथ, आत्मवञ्चना.

हीं नांवें श्री. पटवर्धनांच्या छंदोरचना या ग्रंथाच्या आधारें दिलीं आहेत. या सर्वच वृत्तांत आणि जातींत महाराजांनीं सरस रचना केली आहे. आणि विषयानुरोधानें त्याचा प्रसंगाला शोभेल असा वापर पण केला आहे.

## काव्यदोष

शेवटीं प्राप्त कर्तव्य म्हणून श्रीदासगणूमहाराजांच्या काव्यांतील दोष दाखविणेंहि आवश्यक आहे. भव्य सुंदर इमारतीवर काळ्या चिंधीची बाहुली बांधली नाहीं, तर तिला दृष्ट लागते असें म्हणतात. यासाठीं इमारतीच्या मानानें काळ्या चिंधीच्या बाहुलीप्रमाणें मुळांतच अल्प असलेलें हें दोषदर्शनहि वाङ्मयप्रासादावर बांधणें उचित ठरेल.

श्रीदासगणूमहाराजांच्या काव्यांतील मुख्य दोष म्हणजे शब्दांच्या शुद्ध स्वरूपांतील असलेल्या ऱ्हस्वदीर्घाकडे त्यांनीं पराकाष्ठेचें दुर्लक्ष केलें आहे हा. ज्याच्याजवळ शब्दसंपत्तीच थोडी, त्या बापड्याला ऱ्हस्व-दीर्घाची ऐट सांभाळणें, हें अशक्य होतें; पण श्रीदासगणूमहाराजांनींहि वृत्तसुखार्थ, तदिय, मदिय, अनूभव, द्वीरेफ, धिवर, ग्रिवा, अशीव, सुशिल, भुषवी, यासारखे शब्द वापरावे, हें खटकल्यावांचून राहात नाहीं.

भूपआज्ञकरून, तुष्टमान, दास्यत्व, पतीज्ञाधारक, ममोदरीचा, यासारखे व्याकरणदुष्ट प्रयोग; ओहोटकालसमयीं, वन्हीचक्षु, यासारखे विचित्र समास त्यांच्या काव्यांतून अनेक वेळां आढळतात. शब्दांचीं रूपें तर महाराजांनीं पाहिजे तशीं बनविलीं आहेत. ठिविल्या ( ठेविल्या ), विसरल ( विसरेल ), पडल ( पडेल ), अठव (आठव), यासारखीं पदें अक्षरगणवृत्त व मात्रावृत्त या दोन्हींतहि बऱ्याच वेळीं आढळून येतात.

उद्धवागमनाचें नांव या संदर्भांत सांगण्यासारखें आहे. काव्यगुणांनीं रमणीय आणि श्रेष्ठ असलेल्या काव्यांत दोषाहि बरेच आहेत. श्रीहर्ष या प्रसिद्ध संस्कृत कवीविषयीं अशी एक दंतकथा सांगतात कीं तो आपलें नैषधीय चरित हें महाकाव्य घेऊन आपला मामा काव्यप्रकाश-कर्ता मंमट यांस दाखवावयास गेला. त्यावेळीं मंमट म्हणाला 'अरे थोडा आधीं आला असतास तर किती बरें झालें असतें. काव्यशास्त्रावरील ग्रंथ लिहितांना मला गुणांचीं आणि दोषांचीं उदाहरणें शोधतांना कोण दगदग पडली. तुझ्या या काव्यांत मला सारींच उदाहरणें एकत्र मिळून कितीतरी श्रम वांचले असते!' उद्धवागमन काव्याविषयींहि थोडेसें असेंच म्हणतां येईल. तरी पण काव्य गोडच आहे यांत शंका नाहीं. उत्तम केशराला नयनरम्य रंग आणि मनोहर सुगंध यासवें मधुरत्वहि असती तर कुणास नको झाली असती तसेंच हें आहे. पण थोडेसें कडसर लागणारें केशर हवेहवेसें वाटतेंच ना.

> **विश्वाभिराम गुणगौरवगुंफितानां ।**
> **दोषोऽपि निर्मलधियां रमणीय एव ॥**
> **लोकंपृणैः परिमलैः परिपूरितस्य ।**
> **काश्मीरजस्य कटुतापि नितान्तरम्या ॥**

असें पंडितराय जगन्नाथ म्हणतात तें महाराजाच्या सर्वच काव्याच्या बाबतींत खरें आहे असें प्रत्ययास येईल.

कित्येक वेळीं महाराजांची भाषा अत्यंत कडक बनते व शब्दांना ग्राम्य स्वरूप येतें.

> **" वर्तन बघतां गूखाडी जणु, डामडौल तो वर भारी ।**
> **गरतीपेक्षां सुंदर वेश्या सहज चमकते बाजारीं ॥ "**

यासारखी ग्राम्य शब्दरचनाहि महाराजांच्या काव्यांत क्वचित् आढळते. " आत्मनः तु कामाय सर्वं प्रियं भवति " हा तात्त्विक सिद्धान्त उपनिषदामध्यें अध्यात्मिक भूमिकेंत उच्च पातळीवरून प्रतिपादिलेला आहे. पण त्याचें व्यावहारिक स्वरूप 'मात्र आपल्या स्वार्थासाठीं सर्व हवें

असतें' असें आहे. आप्तेष्टांचा स्नेह हा मतलबी असतो हें सर्वांच्या थोडें फार अनुभवाचेंहि आहेच पण अगदीं निकटच्या स्वकीयांचें प्रेमहि स्वार्थीच असतें हें स्पष्ट करतांना श्रीदासगणूमहाराज किती भडक भाषा वापरतात पहा. एक सत्पुरुष दुखणाईत आहेत व स्वतःला पंढरपुरास न्यावें अशी त्यांची इच्छा आहे. आप्तांना बोलावूं नका माझ्यासाठीं ते दाखवितील तें दुःख खरें नाहीं हें सांगतांना महाराज त्याच्या शोकापाठीमागील हेतु उघडा करितांना म्हणतात —

पुत्रासाठीं जो रडे पिता। तो पुढच्या अडचणी करिता।
जे वाढविलें तेंच आता। गेलें म्हणून माता रडे॥
आणि कांता जी का रडते। ती केवळ कुंकवालागीं भीते।
अंथरूण रात्रीं पडेल रितें। मोडेल ठिकाण हट्टाचें॥
म्हणून सांगतों तुम्हीं कोणा। नकाच करूं पाचारणा।
पंढरीस जाताच जाणा। होईन मी बरा हो॥

भ. सा. ४४

ध्वनि वा सूचकता हें जें काव्यानंदाचें कारण तें या ठिकाणीं पार झुगारून दिलें आहे असें दिसतें. वैराग्योत्पत्ति हें या ठिकाणीं प्रयोजन आहे म्हणून भर्तृहरीच्या वैराग्यशतकांतील कांहीं श्लोकांप्रमाणें या ओव्यांतील भाषा समर्थनीय मानतां येईल असें मानलें तरी इतकें उघड बोलणें केलें नसतें तर बरें झालें असतें असेंच सुसंस्कृत मनाला वाटतें यांत शंका नाहीं.

आपला पति चांगदेवाच्या नादीं लागलेला पाहून एक स्त्री म्हणते

आता वाट कैशी करूं। माझ्या पतीनें केला गुरू
लक्ष याचें ना संसारीं। वदे वाचें अक्षय हरी
आलें नशिबा झुरणें मनीं। शेज साजरी कोठुनी
गणुदास म्हणे स्त्रिया। सदा चाहाताती विषया॥

सरसकट असें विधान करण्यांत अत्युक्तीचा दोष चांगलाच जाणवतो. हीं विधानें फ्राइडच्या मानसशास्त्राप्रमाणें सामान्य माणसाच्या बाबतींत वास्तव असलीं तरी कांहीं सत्य गोष्टी बोलावयाच्या नसतात हें कवीनें ध्यानांत ठेवणें बरें.

अश्लील शब्दहि त्यांच्या काव्यांत क्वचित् वेळां आढळतात. त्यांतील कांहीं येथें उद्धृतहि करणें कठीण.

' शिंदळ जरी असली नारी, तरी कुंटीण आड लागे । '

यासारख्या उपमा देतांना त्यांना मुळींच विचित्र वाटत नाहीं. कदाचित् पोलिसांतील गांवढळ भाषेचा आणि लावण्या, पोवाडे या वाङ्मयाच्या झालेल्या संस्काराचा हा परिणाम असावा; पण सुशिक्षित माणसास तो कांहीं वेळां तरी बोचतो, यांत शंका नाहीं. जुन्या काळचीं वडील माणसें अशीं थोडी फटकळ असावयाचींच, असें म्हणून त्याला समाधान मानून घ्यावें लागतें.

कांहीं कल्पना या चार पांच ठिकाणीं तरी पुनरुक्त झालेल्या आहेत. शंकराच्या भस्मकौपीनाचें उदाहरण असें सारख्याच अर्थ-संदर्भात निरनिराळ्या आख्यानांतून बऱ्याच वेळां आलेलें आहे. स्तोत्र-वर्णनांतील मानसपूजाहि कांहीं ठिकाणीं तीच तींच आढळते. श्रेष्ठत्व दाखविणाऱ्या, गंधामध्यें कस्तुरी, वृक्षामध्यें चंदन, गाईमध्यें कामधेनु, नक्षत्रामध्यें चंद्र, तीर्थांत गोदावरी, इत्यादि उपमा पुनः पुनः येतात. हाहि दोषच मानला पाहिजे.

उद्धवागमनामध्यें आलेल्या—

' नर्कांडिचें पटतमें खत त्या उसाला ।
लक्ष्मी तशी विनटली हरिच्या पदाला ॥ '

या उपमेचें समर्थन करणें कठिणच आहे! अप्रयोजकतेचें तें एक चांगलेंच उदाहरण आहे. कांहीं ठिकाणीं पाल्हाळ झालेला आढळतो

हे काव्यदोष आहेत हें खरें, पण ते काव्याच्या विस्ताराचा आणि समुच्चयाचा विचार करिता अगदींच थोडे आहेत. कालिदासाच्या उक्तींत थोडा पालट करून महाराजांच्या काव्यांतील दोषाविषयीं

अल्पोहि दोषो गुणसन्निपाते
निमज्जतीन्दोः किरणेष्विवांकः

असें म्हणता येईल. ऱ्हस्व–दीर्घासंबंधींचे दोष मात्र त्या मानाने विपुल

| | ओवीसंख्या |
|---|---|
| * पांडुरंग स्तोत्र | १११ |
| * संत गजानन स्तोत्र | १८१ |
| श्रीगणेश स्तवराज | १४६ |
| **५ ओवीबद्ध टीकाग्रंथ** | — |
| * भक्तिरसायन | २९४५ |
| * पासष्टी भावदीपिका | ५९३ |
| * नारदभक्तिसूत्रबोधिनी | १०४९ |
| * ईशावास्य बोधिनी | १३२८ |
| * शांडिल्य सूत्रबोधिनी | १६२६ |
| * अमृतानुभव भावार्थमंजरी | ३०६२ |
| * विष्णुसहस्रनाम बोधिनी | ४१६ |
| विचारसागर ( चालू. अपूर्ण ) | ४५०७. |
| **६ ओवीबद्ध निवेदनपर प्रकरणें** | — |
| * शिष्यबोध | १२५ |
| * छात्रबोध | १७९ |
| * दासबोध दर्शिका | १०७ |
| स्वप्रकथा | १५९ |
| पंढरीनाथ स्तोत्र | ४६३ |
| सद्यःस्थिति ( अपूर्ण ) | २६५ |
| राजकारणी पुरुषास विनंति | ८८ |
| भगवान बोध | ४९ |
| बाईसाहेब गोखले यांस पत्र | ७ |
| राजे मिरजकरांस पत्र | ३० |
| पांडुरंग प्रार्थना ( अपूर्ण ) | ३४९ |
| कीर्तनपद्धति | ६९ |
| साईबाबा प्रार्थना | ४५ |
| प्रतापशेठ सत्कार | ९ |
| प्रभावतीराजे यांस पत्र | ५ |
| पांचलेगांवकर महाराजांस पत्र | १५ |

| | पंक्तिसंख्या |
|---|---|
| * एकनाथ चरित्र ( भा. १ ) | २०६ |
| * ” ” ( भा. २ ) | १०३ |
| * ” ” ( भा. ३ ) | १०३ |
| * ” ” ( भा. ४ ) | २६६ |
| ” ” ( भा. ५ ) | १८० |
| * सावता माळी | ३३१ |
| * सेना न्हावी | २९८ |
| * तुकाराम ( भा. १ ) | १९६ |
| ” ( भा. २ ) | १९५ |
| ” ( भा. ३ ) | ३५० |
| * कूर्मदास | ३४४ |
| * शेख महंमद | ३८५ |
| * माणकोजी बोधले ( भा. १ ) | २५० |
| * ” ” ( भा. २ ) | ३०१ |
| * गोराकुंभार | ३७७ |
| * तुलसीदास | २८९ |
| * संतसखू | ३६६ |
| * कान्होपात्रा | ३५४ |
| * मिराबाई | ३१५ |
| * मेहेता कन्या | २२२ |
| * मेहेता पुत्र | २२८ |
| * दामाजी | १८० |
| * रामदास | २४४ |
| * चांगदेव ( भा. १ ) | २४० |
| ” ( भा. २ ) | ४११ |
| * दादाजी | २५४ |
| * नरहरी सोनार | २४४ |
| * लाखा कोल्हाटी | २८८ |
| * रोहिदास चांभार | ३५० |

| | पंक्तिसंख्या |
|---|---|
| * चोखा महार ( भा. १ ) | २४३ |
| ,, ,, ( भा. २ ) | ३०० |
| बिल्वमंगल | १४१ |
| * जनाबाई | २५० |
| * जगन्नाथ पंडित | ३०० |
| * जालंदरनाथ ( भा. १ ) | २४५ |
| * ,, ( भा. २ ) | ३४५ |
| * मच्छिंद्रनाथ | ३६७ |
| * आऊबाई | २८६ |
| * गजानन महाराज चरित्र ( भा. १ ) | १९६ |
| ,, ,, ,, ( भा. २ ) | १३२ |
| ,, ,, ,, ( भा. ३ ) | १५९ |
| * कबीर चरित्र | १५३ |
| * कमाल चरित्र | २२० |
| * साईनाथ चरित्र | १८४ |
| * अहिल्याबाई चरित्र | ४४३ |
| जालनापूरकर चरित्र | २९३ |
| गोंदवलेकर चरित्र | ९४ |
| प्रल्हाद बडवे चरित्र | ३४४ |
| संतोबा पवार चरित्र | ३९५ |
| * शंकराचार्य चरित्र ( भा. १ ) | १३२ |
| ,, ,, ( भा २ ) | १६६ |
| ,, ,, ( भा. ३ ) | २०० |
| महादेव चिमणाजी आपटे | २९२ |
| शिवरामअप्पा खाजगीवाले | १८७ |
| * लोकमान्य टिळक | २४७ |
| बापू गोखले | २३० |
| राजा भर्तृहरी ( अपूर्ण ) | २०१ |
| शिवदत्त राजाचें चरित्र ( अपूर्ण ) | १२ |
| तानाजी मालुसरे ( अपूर्ण ) | ५६ |
| कल्याणस्वामी चरित्र ( अपूर्ण ) | ३२ |
| शिवछत्रपति चरित्र | २८८ |

॥ श्रीशंकर ॥

संतकवि श्रीदासगणूमहाराजांच्या काव्यसंभारांतील

# निवडक वेचे

## भजनें

### १. भूपाळी—श्रीपांडुरंगाची ( भैरव ) ताल—झपताल

ऊठ वेगें झणीं, वासुदेवा हरी । ऊठ कमलापते हे मुरारी ॥ ध्रु० ॥
ऊठ नंदात्मजा, ऊठ गरुडध्वजा । वाट पाहती अजा गोप भारी ॥
करुन संमार्जना सकल गोपांगना । म्हणति दे दर्शना वेत्रधारी ॥
सरुन गेली निशा सुखद झाली उषा । वरित प्राची दिशा हा तमारी ॥
मुख प्रक्षालणें ल्यावि हीं भूषणें । दासगणु हा म्हणे मजसि तारी ॥

### २. कांकडा

ओवाळूं कांकडा माझ्या विठ्ठला रामा, माझ्या राघवा रामा ।
दाखवावें मुख आम्हां मुनिजनविश्रामा ॥ ध्रु० ॥
अनंत कोटी ब्रह्मांडाचा असशी तूं जनिता ।
मुके झाले वेद चारी विभवासी गातां ॥ १ ॥
निर्गुण मुळिंचा असुनी तूं निजभक्ताकरितां ।
राहिलासी उभा विटे पंढरीनाथा ॥ २ ॥
आलावला किती घेऊं तव मेघःश्यामा ।
पदाम्बुजीचा विनवी षट्पद गणु तुज सुखधामा ॥ ३ ॥

### ३. बालभोग ( चाल—गुजराथी गर्भ्याची )

बालभोग ये लेवो किसनजी । शिरा, पुरी, कंसार, करंजी ॥ ध्रु० ॥
किया गया है वासित जल ये । केशरवाला मिलाके प्रभुजी ॥ १ ॥
पक्के पानकी बिडिया बनाई । ग्रहण करो ये श्यामसुंदरजी ॥ २ ॥
कवनकुसुमका गुच्छ बनाके । देत गणू ये अब रहो राजी ॥ ३ ॥

## ४. भूपाळी

झाला बालभोग आतां उघडावें द्वार ।
गरूडपारीं आले देवा वैष्णव डिंगर ॥ ध्रु० ॥
गाहिनीनाथाचा तो शिष्य निवृत्ति दातार ।
घाली दंडवता तुम्हां जोडुनियां कर ॥
तुझिया कृपें ज्यांनीं देवा रेडा बोलविला ।
प्रवरेच्या तटीं ग्रंथ ज्ञानेश्वरी केला ॥
ते हे वैष्णवाचे गुरू श्रीज्ञानेश्वर ।
चांगा, नामा, जनी, कान्हो, नरहरि सोनार ॥
महाद्वारीं राहुनि चोखा करीत जोहार ।
मंगळवेढ्याहुनी आले तव ठाणेदार ॥
कुलाल, गोरा, राका, बंका, मुक्ता, सोपान, ।
देवगिरीचे आले देवा पंत जनार्दन ॥
पैठणीचे आले असती भानुदास देवा ।
नामयाचा गुरू खेचर, विसोबा बरवा ॥
ज्याचेसाठीं आपण देवा पाणक्या झालां ।
गोदातटिचा साधू तो हा एकनाथ आला ॥
डोइस गोफण, हातांत खुरपें माणि तव कंठीचा ।
सांवता तो आला माळी अरणभेंडीचा ॥
भवाब्धीचें केवळ तारूं श्रीदेहूकर ।
तुकोबा ते आले आतां कां हो उशीर ? ॥
ज्याचेसाठीं आपण बसलां राखण शेताला ।
धामणगांवचा तो पाटिल बोधला आला ॥
आवड देवा तुम्हां बहू निंबराजाची ।
देव इच्छीताती लाही ज्याच्या काल्याची ॥
संतचरित्रीं ज्याचा प्रेमा जडला अनिवार ।
तो हा महिपति आला साधू तहाराबादकर ॥
निळा, शेखमहंमद, सखू, पवार संतोबा, ।
आधुनिक संतांसह आले शिर्डीचे बाबा ॥

या अवघ्यांनीं येउन तुमचें भजन मांडियलें ।
दासगणु म्हणे आतां उघडा द्वार विठ्ठले ॥

## ५. भूपाळी—श्रीसांईबाबांची

चिदानंद हे सगुणस्वरूपा गुरुबाबा सांई ॥
धांव पाव पदिं ठाव आम्हां दे, हे आमुचे आई ॥ ध्रु० ॥
कर्मदशा ही रात्र भयंकर मोहतमें भरली ॥
क्रोधरूपि या दिवाभितानें घूं घूं ध्वनि केली ॥
काम पिंगळा किलबिल करितो रतिसुखवृक्षावरी ॥
आशा सटवी टिटवी दुर्धर अक्षय टी टी करी ॥
दंभ हा कठिण चोरटा ॥
बैसला भक्तीच्या चोहटा ॥
पांघरून मानमरातब पटा ॥
मत्सर हाची डांस डसतसे त्रास बहुत देई ॥
यांतुन सुटण्या तुजवांचुनियां स्थान अन्य नाहीं ॥ चि० ॥१॥
दर्शन तव हें हाच सुखदसा उषःकाल झाला ॥
नाम हरीचें हाच कोंबडा देतसे बांगाला ॥
तुझ्या कृपेचा शीत समीरण मंद मंद वाहे ॥
प्रेमरूपि मग त्या अरुणाचा उदय होउं पाहे ॥
दशेंद्रियें हीं दिशा दहा तें उदयाचल चित्त ॥
बोधरवी तव उदय पावुं दे गुरुवर्या तेथ ॥
ज्ञान हे प्रभा त्याची ॥
पसरतां भीती रात्रीची ॥
कशाला राहिल बा साची ॥
मग ते अवघे उलुक पिंगळे पळातिल कीं पाही ॥
मेघ वर्षतां जसा धुराळा रहात कुठें नाहीं ॥ चि० ॥ २ ॥
अभक्तिचा हा मल तव शिशुचा जावो विलयाला ॥
वैराग्याचें पाणि असावें तोंड धुवायाला ॥
मुखिचीं वचनें तुझ्या समर्था हा भाकरकाला ॥
आम्ही लेंकरें तुझीं भुकेलीं घाली खायाला ॥

तापत्रय हा कडक हिंवाळा आणुन ध्यानाला ॥
योग्य दिसेल ती बंडी आम्हां अपुल्या करें घाला ॥
खेळणें शास्त्र करीं द्यावें ॥
नीतिला दाई नेमावें ॥
आतुरतें वरच्यावर पहावें ॥
हेंचि मागणें तुला आमुचें झडकर तें देई ॥
दासगणूला तुम्ही भेटवा विट्ठ शेषशायी ॥ चि० ॥

## ६. भूपाळी–श्रीसांईबाबांची

उठा उठा बाबा सांई ॥ भोळ्या भाविकांचे आई ॥
निज पायांचें दर्शन देई ॥ अवघ्या अपुल्या पाडसां ॥ १ ॥
दीप-तेज मंदावलें ॥ शशिला प्रभेनें सोडिलें ॥
कुक्कुट ओरडूं लागले ॥ नक्षत्रें तीं लोपलीं ॥ २ ॥
झाला उषःकाल पाहुनी ॥ पहाती उमलाया कमलिनी ॥
बसली कुंकुमातिलक रेखुनी ॥ पूर्व दिशा ती अरुणाचा ॥ ३ ॥
येई उदयातें दिनकर ॥ म्हणूनी उठा हो झडकर ॥
भक्त अवघे जोडुनी कर ॥ वाट आपुली पहाती ॥ ४ ॥
द्वारीं चौघडा तो झडे ॥ पंथीं गोमयाचे सडे ॥
रंगवल्ली द्वारापुढें ॥ सुवासिनी काढिती ॥ ५ ॥
आम्ही घेऊन पंचारती ॥ आलों ओंवाळायाप्रती ॥
उठा बाबा सत्वर गती ॥ दासगणु हा विनवीतो ॥ ६ ॥

## ७. संतांचें अष्टक

॥ श्लोक ॥

जयांनीं मुखें गाइल्या रामलीला । मनाचीं शतें तीं रचूनी जगाला ।
असे दाविला मार्ग तो सौख्यदेसा । नमस्कार माझा तया रामदासा ॥
महाक्षेत्र भीमातटीं पंढरींत । असे जाहला जन्म शिंपी कुलांत ।
सदा विठ्ठलाच्या पदीं घे विसांवा । नमस्कार माझा तया नामदेवा ॥
अपेगांवीं तो जन्म पोटीं यतीचे । असे घेतला भाष्य ल्याह्या गितेचें ।
जयांनीं तनू अर्पिली लोककाजा । नमस्कार माझा तया ज्ञानराजा ॥

जयाच्या करें तो विणायास शेला । अती हर्ष होई रमेच्या वराला ।
जयाची असे वाणी पीयूष धारा । नमस्कार माझा तया श्रीकबीरा ॥
करें पोट तें फाडुनी बा जयांनीं । असे सांठवीला सखा चक्रपाणी ।
मुखानें सदा गाइलें विठ्ठलाला । नमस्कार माझा तया सावत्याला ॥
प्रतिष्ठान हें नाम विख्यात ज्याचें । महाक्षेत्र तें तीर श्रीगौतमीचें ।
तिथें राहिला टाकुनी जो अहंता । नमस्कार माझा तया एकनाथा ॥
जया भंग नाहीं अशा त्या अभंगा । रचूनी सदा गाइले पांडुरंगा ।
जयाची लिला या त्रिलोकीं अगाधू । मना वंदितों श्रीतुकाराम साधू ॥
सिनेच्या तटीं डोमगांवीं जयानें ।
असे वास केला गुरूच्या कृपेनें ।
खरा योग्य तो दासबोधास ल्याह्या ।
चला त्या नमूं स्वामि कल्याण पायां ॥
टिका करूनी भारतीं रचियलीं पुराणें बरीं ।
अजून जगिं गाजते धवलकीर्ति ज्याची खरी ॥
असेहि स्थित जो सदा पुनितशा भिमेच्या तिरा ।
असो नमन हें तया यतिवरा कवी श्रीधरा ॥
कशाच्यामधें हीत माझें कळेना । कळे जें मना तेंच त्याला वळेना ।
असा जाहलों त्राहि त्राही समर्था ।, मला पावणें सद्गुरू सांईनाथा ॥
गुरूराज हे वामना शीघ्र यावें । गणूच्या तुवां दुःखशोका हरावें ।
आलेल्या सदा संकटातें निवारीं । भवाब्धीमधें शीघ्र दासास तारी॥

८.

घनश्याम सांवळ्या मुकुंदा कृष्णा कंसारी ।
चरणिं शरण मी पाप ताप नी दैन्य सकल वारी ॥ध्रु०॥
पाउलें तुझीं गोमटीं ।
जाहलीं साह्य जया शेवटीं ।
तुझा तो प्राणसखा कीरिटी ।
तवकर–पंजर दासगणूच्या ठेव शिरीं सत्वरीं ॥

९.

अनंतनामा अनंतशक्ते मायातीता भगवंता ।
जय करुणाकर अघमल संहर ब्रह्म सनातन श्रीदत्ता ॥ ध्रु० ॥
सदय हृदय तूं पतितपावना ।
चरणिं शरण मी तव कृपाघना ।
विश्वेशा जगदीशा अनाथनाथा अत्रिसुता ॥

१०. ( सोहनी—दादरा )

जयजय प्रभु पंचवदन । त्रिपुरांतक मदनदहन ।
नीलकंठ अहिभूषण । पार्वतीवरा ॥ जय० ॥
शूल शंख डमरु करीं । धवल जटा मुगुट शिरीं ।
नरकपाल अति आदरीं । धरियेलें करा ॥ जय० ॥ १ ॥
व्याघ्रांबर विमल असन । अंगिं विभुति कटिं कौपिन ।
वन्हि तुझा तृतिय नयन । चंद्रशेखरा ॥ जय० ॥ २ ॥
शोभे शिरिं मंदाकिनि । गोदावरि अघनाशिनि ।
दासगणू शरण चरणिं । तारि शंकरा ! ॥ जय० ॥ ३ ॥

११.

अवधूत दिगंबर मूर्ती । त्रैलोक्य ज्यास वंदिती ध्रु० ॥
कृष्णातटिं अति निकट उदुंबरिं वास जयानें केला ।
ब्रह्म सनातन जो परमात्मा स्थावर जंगमिं भरला ॥ १ ॥
कमलासन, कमलावर, शिवहर, त्रिगुणात्मक जो बनला ।
दत्तनिरंजन पदकमला त्या अर्पण गणु करि भाला ॥ २ ॥

१२. ( भूप—त्रिवट )

रमावरा ! सजल जलदसम श्याम कमलनयना ॥ ध्रु० ॥
धीरा वीरा रघुकुमरा ।
दशकंधर-रिपु, वायु-तनयपति कालिमथना ॥ १ ॥
निरंजना दयाघना जनार्दना ।
पीतवसन धृत कौस्तुभ, तूं हे परिपूर्णा ॥ २ ॥

चाप करीं, मुगुट शिरीं शोभे हरी ।
मृगलांछन-तिल भाल भूषवी अघशमना ॥ ३ ॥
वारा सारा ताप खरा ।
पंढरिनाथा ! अनंतशक्ते, दाव गणुस चरणा ॥ ४ ॥

## १३.

सुन अरजी रणछोड रे । सुन स्वामीन रणछोड ।
सुन मारे रणछोड रे । बल मारे रणछोड ॥ ध्रु० ॥
मान मरातब बल धन मारो पग तारे ठाकुरजी ।
केम करवा पछि पकरि अदयता, आपो पगनी जोड रे ॥ १ ॥
हूं तो प्रभुजी नानी वावडी, कृपा तमारी धागो ।
सारी रीते खेंच कन्हय्या, ते धागो मति तोड रे ॥ २ ॥
तमे पुनमके पुरण निशापति खग गणुदास चकोर ।
तमे गौ-कपिला वत्स हुं तारो, प्रेमनुं पान्हा छोड रे ॥ ३ ॥

## १४. ( शामसुंदरजी )

वेद पुकारत बडे आदबसे । वो गोकुलमें खेल करे ॥ ध्रु० ॥
पांगुळगाडा लेकर चालत । जो पर्वतकु अधर धरे ॥ १ ॥
ग्यानि मुनीको लाभ नहीं है । पेंद्या उस्का कर पकरे ॥ २ ॥
माऱ्यो रावण माऱ्यो पुतना । वो बिल्लीसे शाम डरे ॥ ३ ॥
भक्त न खातर बाल भये प्रभु । उनकी इच्छा पूर्ण करे ॥ ४ ॥
दासगनू कहे ऐसो दयाघन । हम पतितनकू क्यौं बिसरे ॥ ५ ॥

## १५.

पंढरिनाथा त्वं शरणं ॥ रुक्मिणिकांता त्वं शरणं ॥
केशव माधव हरि नारायण अच्युत नरहरि त्वं शरणं ॥
पंढरिवासा त्वं शरणं ॥ जगद्विलासा त्वं शरणं ॥
सजल-जलदसम-श्याम-तनूधृत पीतपितांबर त्वं शरणं ॥
नंदनंदना त्वं शरणं ॥ गोप-रंजना त्वं शरणं ॥
गोवर्धनधृत अघमलनाशक कुंजविहारी त्वं शरणं ॥
कंसमर्दना त्वं शरणं ॥ पतितपावना त्वं शरणं ॥

राधाधर-मधुमिलिंद-मुनिजन-मानस-हंसा त्वं शरणं ॥
जानकिजीवन त्वं शरणं ॥ रघुकुलभूषण त्वं शरणं ॥
गाधिजमुनिमखरक्षक राघव ॥ दशवदनांतक त्वं शरणं ॥
मायातीता त्वं शरणं ॥ विमलचरित्रा त्वं शरणं ॥
दीनजनोद्धर परमभक्तप्रिय बहुविधवेषा त्वं शरणं ॥
अनाथनाथा त्वं शरणं ॥ परमपवित्रा त्वं शरणं ॥
धृतकटिकर श्रीपुंडलीकमुनिवरद दयाघन त्वं शरणं ॥
जगद्व्यापका त्वं शरणं ॥ सौख्यदायका त्वं शरणं ॥
समचरणीं नत दासगणू नित पालय विठ्ठल त्वं शरणं ॥

१६.

विठोबा ॥ हे भीमातटवासा ॥ देवा धांव रे ॥
केशवा ॥ झडकर पद मज दावा ॥ देवा धांव रे ॥
नारायणा ॥ नको करूं माझी दैना ॥ देवा धांव रे ॥
माधवा ॥ अनाथ पदरीं घ्यावा ॥ देवा धांव रे ॥
गोविंदा ॥ परम विमल सुखकंदा ॥ देवा धांव रे ॥
श्रीविष्णू ॥ किति तरी तव गुण वानूं ॥ देवा धांव रे ॥
मधुसुदना ॥ रामा दशमुखहनना ॥ देवा धांव रे ॥
त्रिविक्रमा ॥ तूंच पोशिता आम्हां ॥ देवा धांव रे ॥
वामना ॥ बटुवेषा अघशमना ॥ देवा धांव रे ॥
श्रीधरा ॥ त्रिताप वेगें वारा ॥ देवा धांव रे ॥
हृषिकेशा ॥ आद्या पुराणपुरुषा ॥ देवा धांव रे ॥
पद्मनाभा ॥ तूं कैवल्याचा गाभा ॥ देवा धांव रे ॥
दामोदरा ॥ जगत्त्रया तूं असरा ॥ देवा धांव रे ॥
संकर्षणा ॥ करि मम भवभयहरणा ॥ देवा धांव रे ॥
वासुदेवा ॥ घ्यावी मम करिं सेवा ॥ देवा धांव रे ॥
प्रद्युम्ना ॥ लागत मी तव चरणा ॥ देवा धांव रे ॥
अनिरुद्धा ॥ धरी न मजविशिं क्रोधा ॥ देवा धांव रे ॥
पुरुषोत्तमा ॥ मुनिमानसविश्रामा ॥ देवा धांव रे ॥
अधोक्षजा ॥ पंढरपुरच्या राजा ॥ देवा धांव रे ॥

नरसिंहा ॥ भेटासि सांगे केव्हां ॥ देवा धांव रे ॥
अच्युता ॥ परम शांति दे चित्ता ॥ देवा धांव रे ॥
जनार्दना ॥ करि भक्तावर करुणा ॥ देवा धांव रे ॥
उपेंद्रा ॥ जगत्त्रयाच्या केंद्रा ॥ देवा धांव रे ॥
श्रीहरी ॥ बुडतों मी मज तारी ॥ देवा धांव रे ॥
श्रीकृष्णा ॥ मानीं गणुच्या कवना ॥ देवा धांव रे ॥

## १७.

पाव गा तूं पाव गा तूं पंढरिच्या राया ॥
हीन दीन द्वारीं तुझिया दावी मज पाया ॥ पाव० ॥
दामाजीच्यासाठीं देवा महार झालासी ॥
कान्होपात्रा कलावंतिण नेली पायापाशीं ॥ पाव० ॥
नामदेवाचें त्वां शाकारिलें घर ॥
हीनजाति चोख्याचीं त्वां ओढियेलीं ढोरें ॥ पाव० ॥
गोरोबा-काकाची माती तुडवीली ॥
सेना न्हाव्यासाठीं रामा हजामत केली ॥ पाव० ॥
धामणगांवामाजीं देवा बोधल्याच्यासाठीं ॥
बक्षी गहूं निर्मियेले भोपळ्याच्या पोटीं ॥ पाव० ॥
देहूचा तुकोबा ज्ञानजेठी केला ॥
ज्ञानदेवाहस्तें त्वांची रेडा बोलविला ॥ पाव० ॥
जनाबाईच्या त्या भाग्या पार नाहीं ॥
वैकुंठासी नेला रामा सजन कसाई ॥ पाव० ॥
यात्रेलागिं येतां संतोबा पवार ॥
चंद्रभागेमधुनी त्यासीं त्वांचि केलें पार ॥ पाव० ॥
संत सखूबाईसाठीं लुगडें गुंडाळीलें ॥
भक्तवत्सल एक तूंची विठाई माउले ॥ पाव० ॥
गणुदास म्हणे मज पातक्याला ॥
पावशील कधीं आतां सांग रे विठ्ठला ॥ पाव० ॥

१८.

उभा कैवल्याचा गाभा चंद्रभागे कांठीं ॥
सांवळें स्वरूप मूर्ती परम गोमटी ॥ उभा० ॥
निढळावरती कर दोन्ही कांसे पीतांबर ॥
मस्तकीं पागोटें अंगीं शेला अंगावर ॥ उभा० ॥
कर्णी तीं कुंडलें नाना पुष्पहार कंठीं ॥
रत्नें हिरे मोतीं नीळ माणिकांची दाटी ॥ उभा० ॥
निर्गुणाचा सगुण झाला एक भक्तांसाठीं ॥
दासगणू म्हणे घाला समचरणा मिठी ॥ उभा० ॥

१९.

निराकार निर्गूण निरंजन व्यापक भुवनोदरीं ॥
तें ब्रह्म गौळिया घरीं । खेळ खेळत नानापरी ॥
अनंत ब्रह्मांडें ज्या उदरीं सामावलिं साजिरीं ॥
तो उंबरा चढतां हरी । भिंतीचा टेंका धरी ॥
उपमन्यूला पयाब्धि दिधला ज्यानें अत्यादरीं ॥
तो वाटी घेऊन करीं । पय मागे व्रजाभीतरीं ॥
फणी दंडिला कंस मारिला जाउन मथुरापुरीं ॥
पर्णिली भीमकसुंदरी । कौंडिण्यपुराभीतरीं ॥
निज मोठेपण त्यजुन जाहला पार्थरथाच्यावरी ॥
सारथी सखा श्रीहरी । जो कलिमल अवघा हरी ॥
तो जगजेठी पुंडलिकानें या भिवरेच्या तिरीं ॥
केला उभा विटेच्यावरी । गणुदास तदिय पद धरी ॥

२०. ( सोहोनी–त्रिताल )

घर जानेदे जानेदे शाम मुरारी ॥ ध्रु० ॥
सिरपर मटका नीर भरेला । कर छोडो अब तुम नंदलाला ।
रात भयी हैं कठन अंधेरी ॥ १ ॥
तोरि सुरतमें जादु भरी है । बिन–रस्सीसे बांध देति है ।
पद न बढत आगे कुंजबिहारी ॥ २ ॥

डुबा दिया संसार किसनजी । प्रीत लगाके नंदतनयजी ।
चरणकमल तोरे मैं भयि भ्रमरी ॥ ३ ॥
दासगनू कहे गोपगोपिका । भाग्य बडो भगवान उन्होंका ।
दास भया करे खालि थटोरी ॥ ४ ॥

## २१.

कलिजुगमें ये भक्ति बिगर भाई रामचरन नहिं मिलते हैं ।
भक्तीके बडे शौकिन प्रभुजी भक्तनकू नित चहाते हैं ॥ ध्रु० ॥
जब आयी वो शबरि बिचारी, लेकर बनफल बदरीके ।
आगे तब रघुनाथ आदर करे, पास बिठाई चरनोंके ॥ १ ॥
हनुमान चढे अस्मान हातमो, लेकर नग नृप द्रोणगिरी ।
बंदर होकर मान्य भये ये, रामचरनकी बलहारी ॥ २ ॥
नृपसिंगासनि बैठे बिभीखन, वाल्याके वाल्मीक भये ।
दासगनू कहे रामनामसे, कबिर तुका वैकुंठ गये ॥ ३ ॥

## २२. ( असावरी—त्रिवट )

पाव हरी मज तार हरी । निष्ठुरता ती आशि न बरी ॥ ध्रु० ॥
दामाजीस्तव जगन्निवासा । अंत्यजाच्या घेउनि वेषा ।
गेलासी की हे जगदीशा । अतिहर्षानें बिदरपुरीं ॥ १ ॥
कान्होपात्रा गणिका असुनी । समरस केली अपुल्या चरणी ।
जनाबाइचे दळण दळूनी । गायन करिसी मधुर स्वरीं ॥ २ ॥
नामा, गोरा, नरहरि, चोखा । पंत जनार्दन, श्रीधर, एका ।
कबीर, तुलसी, कमाल, शेखा । भवीं तारिले धरुनि करीं ॥ ३ ॥
दासगणू म्हणे कमललोचना । पंढरिवासा आशिवशोषणा ।
करि दीनांवर सत्वर करुणा । धरी सुखदशा करा शिरीं ॥ ४ ॥

## २३. ( भैरवी—धुमाळी )

मोरे नंदाजिके लाल तोरी शाम तनू बहु हारी ॥ ध्रु० ॥
बेद तुमारे जश गुण गावे ।
ऐसे तुमको दूध पिलावे । गोकुलमो ब्रिजनारी ॥ १ ॥

जगत तुमारे लागत पय्यां ।
वो तुम ब्रिजमो चारत गय्या । राधा करत थटोरी ॥ १ ॥
दासि भयी है लछमी तुमारी ।
सबके कारन तुम गिरिधारी । करे गोरसकी चोरी ॥ ३ ॥
दासगनू कहे संतन खातर ।
अब तुम ठाडे पंढरि भीतर । लेउ बलय्या तोरी ॥ ४ ॥

## २४. ( मंगलमय नाम तुझें )

वृंदावनिं भेट हरी शीघ्र होउं दे ॥ ध्रु० ॥
या परिचे झाडांतुनि । दे लपणें प्रभु सोडुनी ।
मुरलीधृत त्वदिय पाणि । नयनिं पाहुं दे ॥ १ ॥
कुटिल केस भव्य भाल । शाम तनू अधर लाल ।
वैजयंति कंठिं माळ । भुषण राहुं दे ॥ २ ॥
देहुडा तुं मध्यंतरीं । राहुनिया धरुन अधरीं ।
मुरलीचें गायन हरी । मधुर चालुं दे ॥ ३ ॥
दासगणू धरित चरण । दैन्य दुःख करुनि हरण ।
वाचेनें सतत स्मरण । त्वदिय होउं दे ॥ ४ ॥

## २५.

राहेर क्षेत्र अति पवित्र गोदातिरीं ।
नांदतो तेथ हा सदैव नरकेसरी ॥ ध्रु० ॥
कडकडा स्तंभ मोडला प्रभू प्रगटला ।
प्रल्हाद-वरद हा दिवौकसीं गाइला ॥
चमकतो पितांबर जरी कटीं पीवळा ।
लागली रुळाया जीभ हृदयिं ळळळळा ॥
खटखटा वाजती दंत मुगुट तो शिरीं ।
प्रभु पापमतीचें पोट विदारण करी ॥ १ ॥
चमकती कानिं कुंडलें वन्हि लोचनीं ।
करि सहज लिलेनें गुरगुर ऐसा ध्वनी ।

भीतसे जावया पुढें कमललोचनी ।
इंदिरा म्हणे हें तेज न सौदामिनी ॥
यापरी कधिं न पाहिला प्रभू आजवरी ।
उधळिली सुरांनीं सुमनें राहुनि दुरी ॥ २ ॥
प्रल्हाद पाय वंदितां शांत जाहला
तो नारसिंह म्यां सिंहासनिं देखिला ।
पूजुं मी कशानें सांग दयाळा तुला ।
व्यापिलें तुवां ब्रह्मांड नससि वेगळा ।
लाचार असे मी फार कृपा ती करी ।
मम पाप ताप आणि दैन्य अवघे हरी ॥ ३ ॥
मन सदा विकल्पावरी स्थिर राहिना ।
छळि काम मोह मद मत्सर दुर्वासना ।
या अवध्यासी घालवी हीच याचना ।
तुज उदार मोठा म्हणती नारायणा ।
भक्तार्थ तुझा अवतार अभय कर धरी ।
इंदिरावरा या दासगणूच्या शिरीं ॥ ४ ॥

२६. ( यमन—दादरा )

रामदास माय माझी पतित पावना ॥ ध्रु० ॥
सज्जनगडीं वस्ति तुझी ।
लाज राख येउनि माझी । हे कृपाघना ॥ १ ॥
दीन दास दासगणु ।
करित आस, चुकवि त्रास । यमयातना ॥

२७. ( पिलू—दिपचंदी )

रहम नजर करो अब मोरे साई
तुमबिन नहिं मुझे मा बाप भाई ॥ ध्रु० ॥
मैं अंधा हूं बंदा तुमारा ।
मैं ना जानूं अल्लाइलाही ॥ १ ॥

खाली जमाना मैंने गमाया ।
साथी अखेरका किया नहिं कोई ॥ २ ॥
अपने मसजिद्का झाडू गनू है ।
मालिक हमारे तुम बाबासांई ॥ ३ ॥

## २८.

साई रहम नजर करना । बच्चोंका पालन करना ॥ ध्रु० ॥
जाना तुमने जगतपसारा । सबहि झूट जमाना ॥ १ ॥
मैं अंधा हूं बंदा अपका । मुझसे प्रभु दिखलाना ॥ २ ॥
दासगनू कहे अब क्या बोलूं । थक गयि मेरी रसना ॥ ३ ॥

## २९. ( आनंदाचा कंद )

दीनोद्धारा परमोदारा आनंदकंदा माधवा ॥ ध्रु० ॥
रुक्मिणिरमणा हे परिपूर्णा तव समचरणा केधवां ।
नकळे दाविसी हे हृषिकेशी पंढरिवासा केशवा ॥ १ ॥
श्रुति स्मृती त्या कुंठित झाल्या ।
मौनें तुझिया पायिं लागल्या ।
भक्ति सुधेला हे जगपाला दासगणूला चाखवा ॥ २ ॥

## ३०. ( भैरवी—दादरा )

जय जय प्रभु कमलनाभ कमललोचना ॥ ध्रु० ॥
शेषशयन नारायण । गरुडासन सच्चिद्घन ।
करुणाकर अघमलहर । पतितपावना ॥ १ ॥
विश्वात्मा विश्वपते । नटनर्तक नागरंहरी ।
पीतवसन वनमाळी । नंदनंदना ॥ २ ॥
गोवर्धन उद्धारण । जयगोपी मनरंजन ।
मदनदहन प्राण तूंचि । भो कृपाघना ॥ ३ ॥
दीन दास दासगणू । चरणीं शरण, हरण करी ।
सकल दुरित हीच सतत । तुजसि याजना ॥ ४ ॥

## ३१.

तूं माझा आधार ॥ मी तुझा आश्रित ॥
होई कृपावंत पांडुरंगा ॥ होई कृपावंत ॥
तूं शुद्ध गौतमी ॥ मी एक ओहोळ ॥
मशीं देई स्थळ पायापाशीं ॥ मशीं देई स्थळ ॥
तूं साच कस्तुरी ॥ माति मी निर्धारी ॥
मला धरणें दूरी नाहीं बरें ॥ मला धरणें दूरी ॥
गणू हा अज्ञान ॥ करावें पालन ॥
देऊनियां ज्ञान ब्रीदासाठीं ॥ देऊनियां ज्ञान ॥

## ३२.

अनंत अपराधाच्या राशी पोटीं घालणें ॥
महान् पापी मी मज परि तूं आपुला म्हणणें ॥
पतित-पावन ऐसें आपणा नाम धरिलेंसी ॥
आतां पतिता उपेक्षिणें योग्य नव्हे तुजसी ॥
दीनानाथा विश्वंभरा करुणावतारा ॥
दासगणूला नको लावूं विन्मुख माघारा ॥

## ३३.

मुखीं राहो नाम ध्यानीं मनीं तुझी मूर्ती ॥
घडो कीर्तनसेवा देवा सदैव या हातीं ॥
प्रतिवर्षासी वारी रामा पंढरिची होवो ॥
तुझिया समचरणाचा प्रेमा वाढत कीं जावो ॥
साधुसंतांची ती होवो सदैव मज भेटी ॥
दासगणू म्हणे वस्ती राहो गोदेच्या कांठीं ॥

## ३४. आरती

जय देव जय देव जय रुक्मिणीरमणा ॥
श्रुतिवंद्या सकलाद्या जय जगदाभरणा ॥ जय० ॥

पुंडलिकाच्या भाके गुंतुन जगजेठी ॥
उभा विटेसी विठ्ठल ठेवुनि हस्त कटीं ॥
मलयागरुची वासित अंगा रम्य उटी ॥
धरिल्या प्रेमें माळा तुळशीच्या कंठीं ॥ जय० ॥
दामाजीस्तव प्रभु हा बिदरासी गेला ॥
भक्त सावडा नामा त्याचें पय प्याला ॥
दासि जनीच्या संगें दळण्यासी बसला ॥
श्रीज्ञानेश्वरहस्तें रेडा बोलविला ॥ जय० ॥
गोरोबाचीं मडकीं अति हर्षे घडिलीं ॥
चोखोबारायाचीं ढोरें ओढियलीं ॥
नाथगृहातें स्कंधीं कावड घेतियली ॥
सर्वस्वी ती बाजू तुकयाची धरिली ॥ जय० ॥
दीनवत्सल प्रभु हा राजा पंढरिचा ॥
कलिकाळाचा काळ सागर सौख्याचा ॥
तन्नामस्मरणीं ही शिणवावी वाचा ॥
दासगणू हा किंकर श्रीहरिचरणांचा ॥ जय० ॥

## ३५. गोंधळ

पंढरपुरवासिनी विठाबाइ अनंतसुखदायिनी ।
उदो उदो बोला हो बया ही तापत्रयमर्दिनी ॥ ध्रु० ॥
भुवनत्रय व्यापुनी वसविलें ठाणें पंढरपूर ॥
सांवळी बयाची मूर्ति विटेवरि हात कटीच्यावर ॥
दांत दाढा बहुत भयंकर अयुधें मंडित कर ॥
मुख सिंहाचें धरुन विठाई स्तंभीं करी गुरगुर ॥
कडकडला तो खांब चांदण्या पडल्या भूमीवर ॥
डळमळलें ब्रह्मांड भयाभित झाले वरुण दिनकर ॥
सवा हात ळळलळे जीभ तो वन्हि तृतिय लोचनीं ॥
तैं प्रल्हादें गोंधळ घालुन तुष्टविली ही झणी ॥ पंढ० ॥
याच आइनें विरोचनात्मज पाताळीं दडपिला ॥
अंजनीकुमारा हातीं बयानें द्रोणाचळ उचलिला ॥

इंद्रजीत अतिकाया रावण मातीला मिळविला ॥
ती हि विठाई मानि शबरीच्या इच्छी उष्ट्या फळा ॥
वक्रदंत शिशुपाल कंस तो मथुरेसी मर्दिला ॥
वेडा वांकुडा पेंद्या गोंधळी कंठामधें बांधिला ॥
विठाईचे या बहुत गोंधळी वेद नारद मुनी ॥
उद्धव अक्रूर सुदाम शबरी गोकुळिंच्या गौळणी ॥ पं० ॥
नाथ मच्छिंदर गोरख कानिफ नामा ज्ञानेश्वर ॥
तुळसिदास गुरु नानक एका मेहताजी नागर ॥
मिरा जनाई कबिर चोखोबा मुक्तेश्वर श्रीधर ॥
दामाजीनें मात केली दाखविलें बेदर ॥
समर्थ स्वामी संतशिरोमणि साधू देहूकर ॥
तुकाराम महाराज तयांचे गुण वानूं कुठवर ॥
कूर्मदास सांवता बोधला कुलाल गोरा गुणी ॥
या संतांनीं हिला कोंडिलें गोंधळ घालुनि मनीं ॥ पं० ॥
म्हणून व्हारे गोंधळी चला तो गोंधळ घालुं बरा ॥
क्रोध-बोकड बळी पाहिजे बयास पंढरपुरा ॥
दृढ निश्चय हा अंगिं झगा तुणतुणें गुणाचें करा ॥
तेल आशेचें वैराग्याचा पोत करीं तो धरा ॥
कीर्तिरूपी संबळा वाजवा भक्तिरसाला वरा ॥
पदिं घुंगुरें निरिच्छेचीं शांतिरूप मंजिरा ॥
असे गोंधळी झाल्या येइल पुंडलिकवरदायिनी ॥
रंगा तुमच्या दासगणू म्हणे लाव बया मज स्तनीं ॥ पं० ॥

## ३६. श्रीपंढरीचा सोहळा

आज शयनी एकादशी । आली यात्रा पंढरीसी ॥
गजबजलें पंढरपूर । विठ्ठलनामाचा गजर ॥
टाळ झांजा त्या गर्जती । नाहीं मुर्दुंगाला मिति ॥
गणु म्हणे कंठीं विणा । भक्त ध्याती नारायणा ॥ १ ॥
गांव लक्षूनी वाखरी । रंगण धरिती वारकरी ॥
कंठिं तुळशीच्या माळा । भालीं गोपीचंदन-टिळा ॥

स्कंधिं पताका फडकती । अती आनंदें नाचती ॥
गणु म्हणे भाविकांचें । देहभान हरपे साचें ॥ २ ॥
वैष्णवांचे अग्रेसर । महा साधू ज्ञानेश्वर ॥
ज्यांनिं प्रवरेच्या तिरीं । ग्रंथ रचिला ज्ञानेश्वरी ॥
नाथ निवृत्ती सद्गुरू । जो कां अध्यात्माचा मेरू ॥
गणु म्हणे श्रीसोपान । मुक्ता, गोरा, जनार्दन ॥ ३ ॥
एकनाथ ज्ञानखनी । वैष्णवांचे अग्रगणी ॥
ज्याचे सदनीं सखा हरी । पाणि वाही गंगातिरीं ॥
जगमित्र नागा आला । संगें घेऊन सांवत्याला ॥
गणु म्हणे ठाणेदार । पंत मंगळवेढेकर ॥ ४ ॥
मायबाप वैष्णवांचे । महाराज तुकोबा देहूचे ॥
रोहिदास सेना न्हावी । महाद्या निळोबा गोसावी ॥
धामणगांविचा पाटिल । भक्त बोधला प्रेमळ ॥
गणु म्हणे ज्याच्यासाठीं । शेता राखण जगजेठी ॥ ५ ॥
चांगा, संतोबा पवार । आणिक मिळाले इतर ।
आले काल्याचे मानकरी । देव ज्यांचे खांद्यावरी ॥
ते हे साधू दैठणकर । निंबराज महाथोर ॥
गणु म्हणे यांचा काला । मान्य माझ्या विठ्ठलाला ॥ ६ ॥
ऐशा संतांच्या पालख्या । रंगरूपांत सारख्या ॥
मिळाल्या हो वाखरींत । संगें यात्रा अगणित ॥
भक्त पदीं बांधुन चाळ । करिती नामाचा कल्लोळ ॥
गणु म्हणे मुखीं वाणी । रूप पाहतां लोचनीं ॥ ७ ॥
त्या हो सामोरा संतांसी । नामा निघाला वेगेंसी ॥
संगें घेउन चोखा महार । कान्हो जनी नी सोनार ॥
करुनि अवघ्यां दंडवत । चला म्हणती पंढरींत ॥
गणु म्हणे संतांसाठीं । विठ्ठल उभा भिवरातटीं ॥ ८ ॥
बहुत भक्त पादचारी । लुले खुळे घोड्यावरी ॥
पडशा ठेऊन खांद्यावरी । पाठिं गाथा ज्ञानेश्वरी ॥
मुखी गाती हरीपाठ । विठ्ठलछंदें क्रमिती वाट ॥
गणु म्हणे घेती उड्या । स्कंधिं पांढऱ्या घोंगड्या ॥ ९ ॥

जय जय रामकृष्ण हरी । नाद न माये गगनोदरीं ॥
मेघराज सडा घाली । कां कीं उडूं नये धुळी ॥
मंद मंद वाहे वारा । उभ्या द्वारांतुन सुंदरा ॥
गणु म्हणे दीप हातीं । घेऊन संतां ओवाळिति ॥ १० ॥
आले संत पंढरिसी । आपुलाल्या बिऱ्हाडासी ॥
मात कळली राऊळांत । आनंदला पंढरिनाथ ॥
धेनु पाहून वांसरा । पान्हवून सोडी धारा ॥
गणु म्हणे पंढरिराय । तिन्ही लोकां दुभती गाय ॥ ११ ॥
एकादशीस प्रातःकाळीं । जमली संतांची मंडळी ॥
चंद्रभागेचिया तीरीं । स्नान करिती वारकरी ॥
वंदूनिया पुंडलिका । प्रदक्षिणा करिती देखा ॥
गणु म्हणे झालें छत । अबीराचें आकाशांत ॥ १२ ॥
गुलालानें मात केली । चढे पांघरुणाला लाली ॥
बुका घेऊनियां हातीं । एकमेकांला लाविती ॥
पथिं चालावया नीट । नाहिं उरली तेथें वाट ॥
गणु म्हणे ही पंढरी । सिंधु पाणी वारकरी ॥ १३ ॥
आल्या दिंड्या महाद्वारीं । वंदावया तो श्रीहरी
बारि बसली राउळांत । एकएका दर्शन होत ॥
माय मुलाचा कंटाळा । करितां कोण पुरवी लळा ॥
गणु म्हणे हें जाणुन । उभा विटे नारायण ॥ १४ ॥
कोणि राहूं जातां उभा । त्यास पोलिस मारी तोबा ॥
छड्या वेताच्या त्या हातीं । वारकऱ्या दटाविती ॥
धक्के गचांड्यां ना मिती । घामघूम तनू अती ॥
गणु म्हणे हें अवघें दुःख । हरपे पाहतां विठ्ठलमुख ॥ १५ ॥
धन न ठेवितां तुजपुढें । बडव्या बोलतो वांकडें ॥
शेंडी धरूनिया करी । डोकें आपटी पायावरी ॥
मायबापाचा उद्धार । करी वाचें वरच्यावर ॥
गणु म्हणे या कारण । साक्षी तूं बा नारायण ॥ १६ ॥
पुनर्जन्म वाटे झाला । येतां पाहुन बाहेर तुला ॥
आळोआळीं तीं कीर्तनें । भक्त करिती आनंदानें ॥

द्वादशीचा मोठा थाट। चाले ताटामागें ताट ॥
गणु म्हणे नैवेद्याची। गर्दी राऊळांत साची ॥ १७ ॥
जाई पुन्नाग शेवती। कुंद मोगरा मालती ॥
चांफा हरित पांढरा। घोंस गुलाबाचे हारा ॥
रामकृष्ण तुळशीच्या। रुळति माळा कंठीं साच्या ॥
गणु म्हणे पीतांबर। कांसे शेला अंगावर ॥ १८ ॥
डोई पागोटें कंकणी। शोभे तुझिया चक्रपाणी ॥
अष्टगंध बुक्का फार। देवा तुझिया अंगावर ॥
गणु म्हणे हरलें भान। तुझे पाहतां चरण ॥ १९ ॥
राहुनिया विटेवरी। गस्त घाली पंढरपुरीं ॥
जे का भावीक सज्जन। त्यांसी भेटाया कारण ॥
घेइ त्यांचा समाचार। करी करुणेची पाखर ॥
गणु म्हणे विठ्ठ वाली। अनाथांचा भूमंडळीं ॥ २० ॥
ऐसें क्षेत्र नाहीं कोठें। देव उभ्याउभी भेटे ॥
वैष्णवांचें माहेरघर। तें हें जाणा पंढरपुर ॥
जन्म जगीं त्याचा धन्य। जो घे विठूचें दर्शन ॥
गणु म्हणे अष्टभाव। दाटुन येती घेतां नांव ॥ २१ ॥
भक्त करुनी खिरापती। एकमेकांला अर्पिती ॥
विठ्ठल नामाच्यावांचुनी। न ये ऐकावया ध्वनी ॥
ऐसा आनंदी आनंद। सेऊं भक्ती मकरंद ॥
गणु म्हणे आहे उभा। विटे कैवल्याचा गाभा ॥ २२ ॥
संगें संतांचा समुदाय। काला करण्या पंढरिराय ॥
येते झाले गोपाळपुरीं। चंद्रभागेचिया तीरीं ॥
जेथें उभे दैठणकर। त्याचे पाठीं शारङ्गधर ॥
गणु म्हणे आठव करी। निंबराजाचा श्रीहरी ॥ २३ ॥
पंढरीसी वृंदावन। करिता झाला नारायण ॥
यमुना ती भीमाबाई। संत गोपाळांचे ठायीं ॥
क्षमा शांती त्या गोपिका। भक्ति हरीची राधिका ॥
गणु म्हणे त्यांच्या मेळीं। खेळ खेळे वनमाळी ॥ २४ ॥

काला झाला दोनप्रहर। लाहि वांटिली अखेर ॥
मुखिं घालि कवळ कवळ। अवघ्या संतांच्या विठ्ठल ॥
पायीं ठेऊनियां डोई। संतां विनवी विठाबाई ॥
येत जावें चातुर्मासीं। तुम्ही क्षेत्र पंढरिसी ॥
तुमचें झालिया दर्शन। चित्ता होय समाधान ॥
गणु म्हणे ऐसा कोण। आहे विठोबावांचुन ॥ २५ ॥
मिळतां प्रसादाची लाही। संत निघाले लवलाही ॥
जाया आपुल्या ठिकाणीं। मागें पाहती मुरडुनी ॥
अजुन देवांचें शिखर। दिसतें करा नमस्कार ॥
गणु म्हणे माहेरवासी। जाय जैसी सासऱ्यासी ॥ २६ ॥
माय पालवी कन्येसी। तैसें करी हृषीकेशी ॥
हातीं करूनियां खूण। सांगे अवघ्या नारायण ॥
सुखें जारे स्वस्थलासी। मी तो आहे तुमच्यापाशीं ॥
येतां चातुर्मास जाण। मूळ तुम्हां पाठवीन ॥
नामा चोखा गोरेमोरे। नेत्र पुसती अपुल्या करें ॥
गणु म्हणे दंडवता। जनी घाली तया संतां ॥ २७ ॥
कान्होपात्रा तशापरी। संतांलागीं नमस्कारी ॥
सांगे नरहरी सोनार। देवा संत गेले दूर ॥
चला आतां राऊळासी। भाक तुमची पुंडलिकासी ॥
यावच्चंद्रदिवाकर। राहिन उभा विटेवर ॥
देवा-संतां नाहीं भेद। तूंच अवघा कीं गोविंद ॥
गणु म्हणे विसरूं नका। मशीं रुक्मिणीनायका ॥ २८ ॥

## ३७. श्रीसाईनाथ-स्तवनमंजरी

श्रीगणेशाय नमः। हे सर्वाधारा मयूरेश्वरा। सर्वसाक्षी गौरी-कुमारा ॥ हे अचिंत्या लंबोदरा। पाहि मां श्रीगणपते ॥ तूं सकल गणांचा आदि ईश। म्हणून म्हणती गणेश ॥ तूं संमत सर्व शास्त्रांस मंगलरूपा भालचंद्रा ॥ हे शारदे वाग्विलासिनी। तूं शब्दसृष्टीची

स्वामिनी ॥ तुझें अस्तित्व म्हणूनी । व्यवहार चालती जगताचे ॥ तूं ग्रंथकाराची देवता । तूं भूषण देशाचें सर्वथा ॥ तुझी अवघ्यांत अगाध सत्ता । नमो तुजसी जगदंबे ॥ हे पूर्णब्रह्मा संतप्रिया । हे सगुणरूपा पंढरीराया ॥ कृपार्णवा परम सदया । पांडुरंगा नरहरे ॥ तूं अवघ्यांचा सूत्रधार । तुझी व्याप्ती जगभर ॥ अवघीं शास्त्रें विचार । करिती तुझ्या स्वरूपाचा ॥ पुस्तकज्ञानी जे जे कोणी । त्यां तूं न गवससी चक्रपाणी ॥ त्या अवघ्या मूर्खांनीं । शब्दवाद करावा ॥ तुला जाणती एक संत । बाकीचे होती कुंठित ॥ तुला माझा दंडवत । आदरें हा अष्टांगीं ॥ हे पंचवक्त्रा शंकरा । हे नररुंडमालाधरा ॥ हे नीलकंठा दिगंबरा । ॐकाररूपा पशुपते ॥ तुझें नाम ज्याचे ओठीं । त्याचें दैन्य जाय उठाउठीं ॥ ऐसा आहे धूर्जटी । महिमा तुझ्या नांवाचा ॥ १० ॥ तुझ्या चरणां वंदून । मी हें स्तोत्र करितों लेखन ॥ यास करावें साह्य पूर्ण । तूं सर्वदा नीलकंठा ॥ आतां वंदूं अत्रिसुता । इंदिराकुलदैवता ॥ श्रीतुकारामादि सकल संतां । तेवीं अवघ्या भाविकांसी ॥ जय जयाजी साईनाथा । पतितपावना कृपावंता ॥ तुझ्या पदीं ठेवितों माथा । आतां अभय असूं दे ॥ तूं पूर्णब्रह्म सौख्यधामा । तूंच विष्णु नरोत्तमा ॥ अर्धांगी ती ज्याची उमा । तो कामारी तूंच कीं ॥ तूं नरदेहधारी परमेश्वर । तूं ज्ञाननभींचा दिनकर॥ तूं दयेचा सागर । भवरोगा औषधी तूं ॥ तूं हीनदीना चिंतामणी । तूं तंव भक्तां स्वर्धुनी ॥ तूं बुडातियांना भव्य तरणी । तूं भीतासी आश्रय ॥ जगाचें आद्य कारण । जें कां विमलचैतन्य ॥ तें तुम्हीच आहां दयाघन । विश्व हा विलास तुमचाचि ॥ आपण जन्मरहित । मृत्युही ना आपणांप्रत ॥ तेंच अखेर कळून येत । पूर्ण विचारें शोधितां ॥ जन्म आणि मरण । हीं दोन्ही अज्ञानजन्य ॥ दोहोंपासून अलिप्त आपण । मुळींच महाराजा ॥ पाणी झऱ्यांत प्रगटलें । म्हणून कां तेथ उपळलें ॥ तें पूर्वींच होतें पूर्ण भरलें । आलें मात्र आंतुनी ॥ २० ॥ खांचेंत आलें जीवन । म्हणून लाधलें अभिधान ॥ झरा ऐसें तिजलागून । जलाभावीं खांचाचि ॥ लागला आणि आटला । हें मुळीं ठावें न जला ॥ कां कीं जल खांचेला । देत नव्हतें महत्त्व मुळीं ॥ खांचेसी मात्र अभिमान । जीवनाचा परिपूर्ण ॥ म्हणून तें

आटतां दारुण । दैन्यावस्था ये तिसी ॥ नरदेह ही खांच खरी । शुद्ध चैतन्य विमल वारी ॥ खांचा अनंत होती जरी । तरी न पालट तोयाचा ॥ म्हणून अजन्मा आपणां । मी म्हणतसें दयाघना ॥ अज्ञाननगाच्या कंदना । करण्या व्हावें वज्र तुम्ही ॥ ऐशा खांचा आजवर । बहुत झाल्या भूमीवर ॥ हल्लीं अजून होणार । पुढेंही कालावस्थेनें ॥ त्या प्रत्येक खांचेप्रत । निराळें नांवरूप मिळत ॥ जेणेंकरून जगतांत । ओळख त्यांची पटतसे ॥ आतां चैतन्याप्रत । मी-तूं म्हणणें ना उचित ॥ कां कीं जेथें न संभवतें द्वैत । तेंच चैतन्य निश्चयें ॥ आणि व्याप्ती चैतन्याची । अवघ्या जगाठायीं साची ॥ मग मी-तूं या भावनेची । संगत कैशी लागते ॥ जल मेघगर्भीचें । एकपणें एक साचें ॥ अवतरणें भूवरी होतां त्याचे । भेद होती अनेक ॥ ३० ॥ जें गोदेच्या पात्रांत । तें गोदा म्हणून वाहिलें जात ॥ जें पडे कूपांत । तैसी न त्याची योग्यता ॥ संतरूप गोदावरी । तेंथील तुम्ही आहां वारी ॥ आम्ही थिल्लर कूप सरोवरीं । म्हणून भेद तुम्हां आम्हां ॥ आम्हां व्हावया कृतार्थ । आलें पाहिजे तुम्हांप्रत ॥ शरण सर्वदा जोडून हात । कां कीं पवित्रता तुम्हांठाईं ॥ पात्रामुळें पवित्रता । आली गोदा-जलासी सर्वथा ॥ नुसत्या जलांस पाहतां । तें एकपणें एकचि ॥ पात्र गोदावरीचें । जें कां ठरलें पवित्र साचें । तें ठरण्यांत भूमीचे । गुणदोष झाले साह्य पहा ॥ मेघगर्भीच्या उदकाला । जो भूमिभाग न बदलवी भला ॥ त्याच भूमीच्या भागाला । गोदा म्हणाले शास्त्रवेत्ते ॥ इतरत्र जें जल पडलें । त्यानें पदगुणा स्वीकारलें ॥ रोगी कडू खारट झालें । मूळचें गोड असूनी ॥ तैसें गुरुवरा आहे येथ । षड्रिपूंची न घाण जेथ ॥ त्या पवित्र पिंडाप्रत । संत अभिधान शोभतसे ॥ म्हणून संत ती गोदावरी । मी म्हणतों साजिरी ॥ अवघ्या जीवांत आहे खरी । आपुली श्रेष्ठ योग्यता ॥ जगदारंभापासून । गोदा आहेच निर्माण ॥ तोयही भरलें परिपूर्ण । तुटी न झाली आजवरी ॥ ४० ॥ पहा जेव्हां रावणारी । येता झाला गोदातीरीं ॥ त्या वेळचें तेथील वारी । टिके कोठून आजवरी ॥ पात्र मात्र तेंच उरलें । जल सागरा मिळालें ॥ पावित्र्य कायम राहिलें । जल-पात्रांचें आजवरी ॥ प्रत्येक संवत्सरीं ।

जुनें जाऊनि नवें वारी ॥ येत पात्राभीतरीं । तोच न्याय तुम्हां ठाया ॥ शतक तेंच संवत्सर । त्या शतकांतील साधुवर ॥ हेंच जल साचार । नाना विभूती ह्या लाटा ॥ या संतरूप गोदेसी । प्रथम संवत्सरासी ॥ पूर आला निश्चयेंसीं । सनत्सनक-सनंदनाचा ॥ मागून नारद तुंबर । ध्रुव प्रल्हाद बलि नृपवर ॥ शबरी अंगद वायु-कुमर । विदूर गोपगोपिका ॥ ऐसे बहुत आजवरी । प्रत्येक शतका-माझारीं ॥ पूर आले वरच्यावरी । तें वर्णण्या अशक्त मी ॥ या सांप्रतच्या शतकांत । संतरूप गोदेप्रत ॥ आपण पूर आलांत । साईनाथा निश्चयें ॥ म्हणून तुमच्या दिव्य चरणां । मी करितों वंदना ॥ महाराज माझ्या दुर्गुणा । पाहूं नका किमपीही ॥ मी हीन दीन अज्ञानी । पातक्यांचा शिखामणी ॥ युक्त अवघ्या कुलक्षणांनीं । परी अव्हेर करूं नका ॥ ५० ॥ लोहाअंगींचे दोष । मना न आणी परीस ॥ गांवींच्या लेंड्या ओहोळास । गोदा लावी न परतवूनि ॥ माझ्यामधील अवघी घाण । आपुल्या कृपाकटाक्षेंकरून ॥ करा करा वेगें हरण । हीच विनंती दासाची ॥ परिसाचा संग होऊन । लोहाचें तें लोहपण ॥ जरी न होय गुरुवरा हरण । तरी हीनत्व परिसासी ॥ मला पापी ठेवूं नका । आपण हीनत्व घेऊं नका ॥ आपण परीस मी लोह देखा । माझी चाड आपणांतें ॥ बालक अपराध सदैव करितें । परी न माता रागावते ॥ हें आणून ध्यानातें । कृपाप्रसाद करावा ॥ हे साईनाथ सद्गुरु । तूंच माझा कल्पतरु ॥ भवाब्धीचें भव्य तारू । तूंच अससी निश्चयें ॥ तूं कामधेनू चिंतामणी । तूं ज्ञान-नभींचा वासरमणी । तूं सद्गुणांची भव्य खाणी । अथवा सोपान स्वर्गीचा ॥ हे पुण्यवंता परमपावना । हे शांतमूर्ति आनंद-घना ॥ हे चित्स्वरूपा परिपूर्णा । हे भेदरहित ज्ञानसिंधो ॥ हे विज्ञानमूर्ति नरोत्तमा । हे क्षमाशांतीच्या निवासधामा ॥ हे भक्त-जनांच्या विश्रामा । प्रसीद प्रसीद मजप्रती ॥ तूंच सद्गुरु मच्छिंदर तूंच महात्मा जालंदर ॥ तूं निवृत्तिनाथ ज्ञानेश्वर । कबीर शेख नाथ तूं ॥ ६० ॥ तूंच बोधला सांवता । तूं रामदास तत्त्वता ॥ तूंच तुकाराम साईनाथा । तूंच सखा माणिक प्रभु ॥ या अपुल्या अव-ताराची । परी आहे अगम्य साची ॥ ओळख आपुल्या जातीची ।

होऊं न देतां कवणातें ॥ कोणी आपणां म्हणती यवन । कोणी म्हणती ब्राह्मण ॥ ऐसी कृष्णासमान । लीला आपण मांडिली ॥ श्रीकृष्णास पाहून । नाना प्रकारें वदले जन ॥ कोणी म्हणाले यदुभूषण । कोणी म्हणाले गुराखी ॥ यशोदा म्हणे सुकुमार बाळ । कंस म्हणे महाकाळ ॥ उद्धव म्हणे प्रेमळ । अर्जुन म्हणे ज्ञानजेठी ॥ तैसें गुरुवरा आपणांसी । जें ज्याच्या मानसीं ॥ योग्य वाटेल निश्चयेंसी । तें तें तुम्हां म्हणतसे ॥ मशीद आपुलें वसतिस्थान । विंधावांचून असती कान ॥ फात्याच्या तऱ्हा पाहून । यवन म्हणणें भाग तुम्हां ॥ तैसी अग्नीची उपासना । पाहूनि आपुली दयाघना ॥ निश्चय होत आमुच्या मना । कीं आपण हिंदू म्हणूनी ॥ परी भेद हे व्यावहारिक । यांतें चाहतील तार्किक ॥ परी जिज्ञासू भाविक । त्यां न वाटे महत्त्व यांचें ॥ आपुली आहे ब्राह्मस्थिति । जात गोत ना आपणांप्रती ॥ आपण अवघ्यांचे गुरुमूर्ती । आहां आद्यकारण ॥ ७० ॥ यवन-हिंदूंचें विपट आलें । म्हणून तदैक्य करण्यां भलें ॥ मशीद-अग्नीला स्वीकारिलें । लीला भक्तांतें दावावया ॥ आपण जातगोतातीत । सद्वस्तु जी कां सत् ॥ तीच तुम्ही साक्षात् । तर्कातीत साच की ॥ तर्कवितर्कांचें घोडें । चाललें किती आपणांपुढें ॥ तेथें माझें बापुडे । शब्द टिकतील कोठुनी ॥ परी पाहुनी तुम्हांला । मौन न ये धरितां मला ॥ कां कीं शब्द हेच स्तुतीला । साहित्य आहेत व्यवहारीं ॥ म्हणून शब्देंकरून । जें जें होईल वर्णन । तें तें सर्वदा करीन ॥ आपुलया कृपाप्रसादें ॥ संतांची योग्यता भली । देवाहून आगळी ॥ अजादुजास नाहीं मुळीं । स्थान जवळ साधूंच्या॥ हिरण्यकश्यपु-रावणांला । देवद्वेषें मृत्यु आला ॥ तैसा एकही नाहीं घडला । प्रकार संतहस्तानें ॥ गोपीचंदें उकीरड्यासी । गाडिलें जालंदरासी ॥ परी त्या महात्म्यासी । नाहीं वाटला विषाद ॥ उलट राजाचा उद्धार केला । चिरंजीव करूनि सोडिला ॥ ऐशा संतांच्या योग्यतेला । वर्णन करावें कोठवरी ॥ संत सूर्यनारायण । कृपा त्यांची प्रकाशपूर्ण ॥ संत सुखद रोहिणीरमण । कौमुदी ती तत्कृपा ॥ ८० ॥ संत कस्तुरी सोज्ज्वळ । कृपा त्यांची परिमळ ।

संत इक्षु रसाळ। रसनव्हाळी तत्कृपा॥ संत सुष्टदुष्टां-प्रती। समसमान निश्चिती॥ उलट पाप्यावरी प्रीती। अलोट त्यांची वसतसे॥ गोदावरीजलांत। मळकट तेंच धुवाया येत॥ निर्मल तें संदुकींत। राहे लांब गोदेपासुनी॥ जें संदुकीमध्यें बसलें। तेही वस्त्र एकदां आलें॥ होतें धुवावयालागीं भलें। गोदावरीचे पात्रांत॥ येथें संदुक वैकुंठ। गोदा तुम्ही निष्ठा घाट॥ जीवात्मे हेच पट। षड्विकार मळ त्यांचा॥ तुमच्या पदाचें दर्शन। हेंच आहे गोदा-स्नान॥ अवघ्या मळातें घालवून। पावन करणें समर्था॥ आम्ही जन हे संसारी। मळत आहों वरच्यावरी। म्हणून आम्हीच अधिकारी। संतदर्शन घेण्यास्तव॥ गौतमीमाजी विपुल नीर। आणि धुणें मळकट घाटावर॥ तैसेंच पडल्या साचार। त्याचें हीनत्व गोदेसी॥ तुम्ही सघन शीत तरुवर। आम्ही पांथस्थ साचार॥ तापत्रयाचा हा प्रखर। तापलासे चंडांशु॥ त्याच्या तापापासून सदया। करा रक्षण गुरुराया॥ सत्कृपेची शीतळ छाया। आहे आपुली लोकोत्तर॥ ९०॥ वृक्षाखालीं बैसून। जरी लागतें वरून ऊन॥ तरी त्या तरू लागून। छायातरू कोण म्हणे॥ तुमच्या कृपेवीण पाहीं। जगांत बरें होणें नाहीं॥ अर्जुनाला शेष-शायी। सखा लाधला धर्मास्तव॥ सुग्रीव-कृपेनें बिभीषणा। लाधलासे रामराणा॥ संतांमुळेंच मोठेपणा। लाधला श्रीहरीसी॥ ज्याचें वर्णन वेदांसी। न होय ऐशा ब्रह्मासी। सगुण करवून भूमीसी। राबविलें संतांनींच॥ दामाजीनें बनविला महार। वैकुंठपती रुक्मिणीवर॥ चोखोबानें उचलण्या ढोर। राबविलें त्या जगदात्मया॥ संत महत्त्व जाणून। पाणी वाही जगज्जीवन। संत खरेच यजमान। सच्चिदानंद प्रभूचें॥ फार बोलणें नलगे आतां। तूंच आम्हां माता पिता॥ हे सद्गुरु साईनाथा। शिर्डी-ग्रामनिवासिया॥ बाबा तुमच्या लीलेचा। कोणा न लागे पाड साचा॥ तेथें माझी आर्ष वाचा। टिकेल सांगा कोठून॥ जड-जीवांच्या उद्धारार्थ। आपण आलां शिर्डींत॥ पाणी ओतून पणत्यांत। दिवे तुम्हीं जाळिले॥ सवा हात लाकडाची। फळी मंचक करून साची॥ आपुल्या योगसामर्थ्याची। शक्ति दाविली

भक्तजनां ॥ १०० ॥ वांझपणा कैकांचा । तुम्ही केलात हरण साचा। कित्येकांच्या रोगांचा । बींमोड केलात उदीनें ॥ वारण्या ऐहिक संकटें । तुम्हां न कांहीं अशक्य वाटे ॥ पिपीलिकेचें कोठून मोठें । ओझें मानी गजपति ॥ असो आतां गुरुराया । दीनावरी करा दया ॥ मी तुमच्या लागलों पायां । मागें न लोटा मजलागीं ॥ तुम्ही महाराज राजेश्वर । तुम्ही कुबेराचे कुबेर ॥ तुम्ही वैद्यांचे वैद्य निर्धार। तुम्हांविण ना श्रेष्ठ कोणी ॥ अवांतराचे पूजेस । साहित्य आहे विशेष ॥ परी पूजाया तुम्हांस । जगीं पदार्थ न राहिला ॥ पहा सूर्याचिया घरीं । सण दिपवाळी आली खरी ॥ परी ती त्यानें साजिरी । करावी कोणत्या द्रव्यें ॥ सागराची शमवावया । तहान, जल ना महीं ठाया ॥ वन्हीलागीं शेकावया । अग्नी कोठून द्यावा तरी ॥ जे जे पदार्थ पूजेचे । ते ते तुमच्या आत्म्याचे ॥ अंश आधींच असती साचे । श्रीसमर्था गुरुराया ॥ हें तत्त्वदृष्टीचें बोलणें । परी न तैशीं झालीं मनें ॥ बोललों अनुभवाविणें । शब्दजाला निरर्थक ॥ व्यावहारिक पूजन जरी । तुमचें करूं मी सांगा तरी ॥ तें कराया नाहीं पदरीं । सामर्थ्य माझ्या गुरुराया ॥ ११० ॥ बहुतेक करून कल्पना । कारितों तुमच्या पूजना ॥ तेंच पूजन दयाघना । मान्य करा या दासाचें ॥ आतां प्रेमाश्रुकरून । तुमचे प्रक्षालितों चरण ॥ सद्भक्तीचें चंदन । उगाळून लावितों ॥ कफनी शब्दालंकाराची । घालितों ही तुम्हां साची ॥ प्रेमभाव या सुमनाची । माळा गळ्यांत घालितों ॥ धूप कुत्सितपणाचा । तुम्हांपुढें जाळितों साचा ॥ जरी तो वाईट द्रव्याचा । परी न सुटेल घाण त्यासी ॥ सद्गुरुविण इतरत्र । जे जे धूप जाळितात ॥ त्या धूप द्रव्याचा तेथ । ऐसा प्रकार होतसे ॥ धूपद्रव्यास अग्नीचा । स्पर्श होतांक्षणीं साचा ॥ सुवास सद्गुण तदंगींचा । जात त्याला सोडून ॥ तुमच्यापुढें उलटें होतें । घाण तेवढी अग्नींत जळते ॥ सद्गुण उरती पाहण्यातें । अक्षयींचे जगास। मनींचें जळाल्या कुत्सितपण । मलरहित होईल मन ॥ गंगेचें गेल्या गढूळपण । मग ती पवित्र सहजचि ॥ दीप मायामोहाचा । पाजाळितों मी हा साचा ॥ तेणें वैराग्यप्रभेचा । होवो गुरुवरा लाभ मसी ॥ शुद्ध निष्ठेचें सिंहासन । देतों बसायाकारण ॥ त्याचें करूनियां

ग्रहण। भक्तिनैवद्य स्वीकारा ॥ १२० ॥ भक्तिनैवेद्य तुम्ही खाणें। तद्रस मला पाजणें ॥ कां कीं मी तुमचें तान्हें। पयावरी हक्क माझा ॥ मन माझें दक्षणा। ती मी अर्पितों आपणां ॥ जेणें नुरेल कर्तेपणा। कशाचाही मजकडे ॥ आतां प्रार्थनापूर्वक मात्र। घालितों मी दंडवत ॥ तें मान्य होवो आपणांप्रत। पुण्यश्लोका साईनाथा ॥

॥ प्रार्थनाष्टक ॥

॥ श्लोक ॥

शांतचित्ता महाप्रज्ञा। साईनाथा दयाघना ॥ दयासिंधो सत्स्वरूपा। मायातमविनाशना ॥ १ ॥ जातगोतातीता सिद्धा। अचिंत्या करुणालया ॥ पाहि मां पाहि मां नाथा। शिर्डिग्रामनिवासिया ॥ २ ॥ श्रीज्ञानार्का ज्ञानदात्या। सर्वमंगलकारका ॥ भक्तचित्तमराळा हे। शरणागतरक्षका ॥ ३ ॥ सृष्टिकर्ता विरिंची तूं। पाता तूं इंदिरापती ॥ जगत्त्रया लया नेता। रुद्र तो तूंच निश्चितीं ॥४॥ तुजवीणें रिता कोठें। ठाव ना या महीवरी ॥ सर्वज्ञ तूं साईनाथा। सर्वांच्या हृदयांतरीं ॥५॥ क्षमा सर्वापराधांची। करावी हेंच मागणें ॥ अभक्तिसंशयाच्या त्या। लाटा शीघ्र निवारणें ॥ ६ ॥ तूं धेनू वत्स मी तान्हें। तूं इंदु चंद्रकांत मी। स्वर्नदीरूप त्वत्पादा। आदरें दास हा नमी ॥ ७ ॥ ठेव आतां शिरीं माझ्या। कृपेचा करपंजर ॥ शोक चिंता निवारावी। गणू हा तव किंकर ॥ ८ ॥

या प्रार्थनाष्टकेंकरून। मी करितों साष्टांग नमन ॥ पाप ताप आणि दैन्य। माझें निवारा लवलाहीं ॥ तूं गाय मी वासरूं। तूं माय मी लेंकरूं ॥ माझेविषयीं नको धरूं। कठोरता मानसीं ॥ तूं मैलागिरी चंदन। मी कांटेरी झुडुप जाण ॥ तूं पवित्र गोदाजीवन। मी महापातकी ॥ तुझें दर्शन होवोनियां। दुर्बुद्धि-घाण माझे ठाया ॥ राहिल्या तैशीच गुरुराया। चंदन तुजला कोण म्हणे ॥ कस्तुरीच्या सहवासें। मृत्तिका मोल पावतसे ॥ पुष्पासंगें घडतसे। वास सूत्रा मस्तकीं ॥ थोरांची ती हीच रीती। ते ज्या ज्या गोष्टी ग्रहण करिती ॥ त्या त्या वस्तु पाववितो। ते महत्पदाकारणें ॥ भस्म कौपीन नंदीचा। शिवें केला संग्रह साचा ॥ म्हणून त्या वस्तूंचा।

गौरव होत चहूंकडे ॥ गोपरंजनासाठीं । वृंदावनीं यमुनातटीं ॥ काला खेळला जगजेठी । तोही मान्य झाला बुधां ॥ तैसा मी तों दुराचारी । परी आहें तुमच्या पदरीं ॥ म्हणून विचार अंतरीं । याचा करा हो गुरुराया ॥ १४० ॥ ऐहिक वा पारमार्थिक । ज्या ज्या वस्तूंस मानील सुख ॥ माझें मन हें निःशंक । त्या त्या पुरविणें गुरुराया ॥ आपुल्या कृपेनें ऐसें करा । मनालागीं आवरा ॥ गोड केल्या सागरा । क्षारोदकपणाची नसे भीति ॥ सागरा गोड करण्याची । शक्ति आपणांमध्यें साची ॥ म्हणून दास गणूची । याचना ही पुरी करा ॥ कमीपणा जो जो माझा । तो तो अवघा तुझा ॥ सिद्धांचा तूं आहेस राजा । कमीपणा न बरवा तुजसी ॥ आतां कशास्तव बोलूं फार । तूंच माझा आधार ॥ शिशु मातेच्या कडेवर । असल्या निर्भय सहजचि ॥ असो या स्तोत्रासी । जे जे वाचतील प्रेमेंसीं ॥ त्यांच्या त्यांच्या कामनेसी । तुम्ही पुरवा महाराजा ॥ या स्तोत्रास आपुला वर । हाच असो निरंतर ॥ पठणकर्त्यांचे त्रिताप दूर । व्हावे एक संवत्सरीं ॥ शुचिर्भूत होऊन । नित्य स्तोत्र करावें पठण ॥ शुद्ध भाव ठेवून । आपुलिया मानसीं ॥ हें अशक्य असलें जरी । तरी प्रत्येक गुरुवारीं ॥ सद्गुरुमूर्ति अंतरीं । आणून पाठ करावा ॥ तेंही अशक्य असल्यास । प्रत्येक एकादशीस ॥ वाचणें या स्तोत्रास । कौतुक त्याचें पहावया ॥ १५० ॥ स्तोत्रपाठकां उत्तम गती । अंतीं देईल गुरुमूर्ति ॥ ऐहिक वासना सत्वरगती । त्यांची पुरवून श्रोते हो ॥ या स्तोत्राच्या पारायणें । मंदबुद्धि होतील शहाणे ॥ कोणा आयुष्य असल्या उणें । तो पठणें होय शतायु ॥ धनहीनता असल्या पदरीं । कुबेर येऊन राबेल घरीं । हें स्तोत्र वाचल्यावरी । सत्य सत्य त्रिवाचा ॥ संततिहीना संतान । होईल स्तोत्र केल्या पठण ॥ स्तोत्र-पाठकाचे संपूर्ण । रोग जातील दिगंतरा ॥ भयचिंता निमेल । मानमान्यता वाढेल ॥ अविनाश ब्रह्म कळेल । नित्य स्तोत्राच्या पारायणें ॥ धरा बुध हो स्तोत्राविशी । विश्वास आपुल्या मानसीं ॥ तर्कवितर्क-कुकल्पनेसी । जागा मुळीं देऊं नका ॥ शिर्डी क्षेत्राची वारी करा । पाय बाबांचे चित्तीं धरा ॥ जो अनाथांचा सोयरा । भक्तकामकल्प-द्रुम ॥ त्याच्या प्रेरणेकरून । हें स्तोत्र केलें लेखन ॥ मज पामरा हातून

ऐसी रचना होय कैसी ॥ शके अठराशें चाळीसांत । भाद्रपद शुद्ध पक्षांत ॥ तिथी गणेश-चतुर्थी सत्य । सोमवारीं द्वितीय प्रहरीं ॥ श्रीसाईनाथस्तवनमंजरी । पूर्ण झाली महेश्वरीं । पुनीत नर्मदेच्या तीरीं । श्रीअहिल्येसन्निध ॥ १६० ॥ महेश्वर क्षेत्र भलें । स्तोत्र तेथें पूर्ण झालें ॥ प्रत्येक शब्दासी वदविलें । श्रीसाईनाथें शिरून मनीं ॥ लेखक शिष्य दामोदर । यास झाला साचार ॥ दास गणू मी किंकर । अवघ्या संतमहंतांचा ॥ स्वास्ति श्रीसाईनास्तवनमंजरी । तारक हो भवसागरीं ॥ हेच विनवी अत्यादरीं । दास गणू श्रीपांडुरंगा ॥१६३॥

## ३८. श्रीव्यंकटेशस्तोत्र

श्रीगणेशाय नमः । श्रीरुक्मिणीपांडुरंगाय नमः । ॐ नमोजी गौरीकुमरा । महामंगला मयूरेश्वरा । बुद्धिदात्या उदारा । प्रसीद मातें गणपति ॥ हे आदिमाये शारदे । हे जगज्जननी भक्तवरदे । वरद पाणि असूं दे । तुझा दासगणूचे शिरीं ॥ हे पुंडलीकवरदा पंढरीराया । हे भाललोचना पार्वतीप्रिया । हे अत्रिनंदना दत्तात्रेया । साह्य माझें कराहो ॥ हे कुलदेवते इंदिरे । हे कालिके शैलकुमरे । हे म्हाळसापते मल्हारे । नमन माझें तुम्हांसी ॥ हे श्रीरामदासा वैराग्यधामा । हे श्रीसाधुवर्या तुकारामा । हे श्रीसांईसमर्था नरोत्तमा । हे श्रीवामना पाव मशीं ॥ ॐ नमोजी व्यंकटेशा । हे शेषाचलनिवासा । आदि अनादि पुराणपुरुषा । ॐकाररूपा आद्यपीठा ॥ तैलंगणामाझारीं । तुम्ही राहिला शैलशिरीं । तेथें बसून हलवितां दोरी । त्रिभुवनाची नारायणा ॥ ब्रह्म जें का निराकार । तें तूंच साचार । परी ये स्थलीं साकार । झालांत लीला दावावया ॥ नाना ब्रह्मांडें हाच गिरि । चैतन्य जें तें तूं हरि । तेथ तुझे हस्त चारी । धर्म अर्थ काम मोक्ष ॥ चारी वेद तुझें वंदन । उपनिषदें हाच प्राण । पूर्वोत्तरमीमांसा जाण । पाठपोट देवा तुझें ॥ १० ॥ मत जें का अद्वैत । तोच तुझा मुगुट शोभत । द्वैत सिद्धांत झळकत । वत्सलांछन हृदयावरी ॥ विशिष्टाद्वैत पीतांबर । वल्लभीमत शेला सुंदर । जगद्रूप देहावर । धारण केलास व्यंकटेशा ॥ म्हणजे सर्व मतांसी । तूं संमत निश्चयेसी । अंतर्बाह्य विश्वासी । तूंच व्यापिलें गोविंदा ॥ परी त्या तव स्वरूपाला । समर्थ कोणी न

जाणण्याला । म्हणून वाटे हा धरिला । वेष तुम्ही सगुण येथ ॥ तनू सजल जलदापरी । शाम मनोहर गोजिरी । भव्य भाल धनुष्यापरी । भृकुटी तुझ्या शोभतात ॥ सरळ नासिक हास्यवदन । सतेज कमलापरी नयन । शंखाकृति तुझी मान । दंत मुखीं झळकताती ॥ आजानु बाहू भव्य छाती । उदर तुझें कूर्माकृति । मांड्या पोटऱ्या शोभती । कर्दळीगर्भासमान ॥ सुकुमार तुझे द्वयचरण । नलिनीच्या समान । भक्त हाच भ्रमरगण । रुंजी तेथें घालितो ॥ कटिमंडित पीतांबरें । मुगटावरी रुळती तुरे । मौक्तिकांचे साजिरे । शंख चक्र गदा हातीं । सव्य हस्त उताणा । नखाग्रें त्याची नारायणा । अधोभागीं धरून खुणा । दावितां पदा धरण्याची ॥ २० ॥ कर्णीं कुंडलें मनोहर । कंठीं नवरत्नांचे ते हार । वैजयंती त्यावर । आपाद तुवां धरियेली ॥ भरजरी अंगी अंगांत । तेज त्याचें लखलखत । जेवीं विद्युल्लता तळपत । सजलशा मेघोदरीं ॥ कडीं तोडे मनगटीं । नानाविध मुद्रिका बोटीं । सर्वांगीं लाविली उटी । मलयागरू चंदनाची ॥ पदरीं सुवर्णाचे तोडर । गर्जती वाळे वरच्यावर । नासाग्र दृष्टि मनोहर । रामानुजी तिलक भाला ॥ श्रीचिन्ह मध्यभागा । विराजतें श्रीरंगा । आदरें तुळशीस दिली जागा । पदीं हृदयीं आणि शिरीं ॥ ऋतुमानाप्रमाणें । धारण करिसी सर्वदा सुमनें । मंदिर ज्याच्या सुवासानें । जाय अवघें दरवळून ॥ मध्यान्हीला भृगुवासरीं । पंचामृतपूजा अत्यादरीं । भक्त करिती तुझी हरी । षोडशोपचारें करूनिया ॥ रामानुजपंथी धरामर । उभे राहून समोर । मंत्रघोष वरच्यावर । करिती स्पष्ट कंठरवें ॥ गोविंदा गोविंदा भक्त म्हणती । अत्यादरें कर जोडिती । क्षणक्षणा पाहताती । न्याहाळून तुझ्या स्वरूपाला ॥ परी न ते धाती नयन । ऐसें तुझें लावण्य । त्या तुझ्या रूपावरून । वाटतें तनू ओंवाळावी ॥ ३० ॥ खिचडी दहींभात शिरा । तुझ्या नैवेद्यासी श्रीवरा । परमविलासी शार्ङ्गधरा । येथें तुम्ही जाहलांत ॥ तव विलासा पार नाहीं । तूं देवाधिदेव शेषशायी । व्यंकटेशा माझे आई । उपेक्षा आतां करूं नको ॥ तूं विश्वव्यापी जगज्जीवन । तूं सर्वसाक्षी आनंदघन । तूं महामंगल नारायण । सर्व संकटें नाशिता ॥ पार

तुझ्या वैभवाचा। तैसाच तूझ्या स्वरूपाचा। वेदांही न लागला साचा। तो नेतिनेति म्हणतसे॥ तुझाच पवाडा मुखें गातीं। सर्व पुराणें अवघ्या स्मृती। ज्या श्रवणें डुल्लताति। भक्त तुझे मयूरासम॥ अनंतरूपा अनंत नामा। तूं व्यंकटेशा सर्वोत्तमा। भक्तजनांच्या विश्रामधामा। हे सर्वाद्या सर्वशक्ति॥ मच्छ कूर्म वराह नरहरि। वामन परशुराम रावणारि। कृष्ण बौद्ध कलंकी हरि। तूंच स्वलीलें झालास॥ तूंच होऊन दिगंबर। शैवार्थ झालासी शंकर! भोंवतीं भूतांचा बाजार। रंजनास्तव निर्मिला॥ तेथें कस्तूरीचिन्ह पुशिलें। भस्माप्रती स्वीकारिलें। पीतांबरासी त्यागिलें। कौपीन लेऊन वल्कलाची॥ किरीट शिरींचा काढिला। तेथें जटाभार वाहिला। धारण केलें हलाहला। कौस्तुभाऐवजीं ते ठाया॥ ४०॥ गदेऐवजीं धरिला शूल। एक्या करीं नरकपाल। शंखाठायीं मात्र विमल। प्रेम धरिलें दोहों ठायीं॥ कां कीं तुझा मेहुणा। म्हणून त्यातें नारायणा। न विसरलासी मनमोहना। वाटे लक्ष्मीभयानें॥ कां कीं जेव्हां झालास सगुण। तेव्हांच माये-आधीन। राहिलां तुम्ही होऊन। नाना खेळ करावया॥ लक्ष्मीलाच पार्वती। केलीत तुम्हीं जगत्पति। शिवस्वरूपीं निश्चिती। गरुड नंदी बनविला॥ तेथें त्यागिलें सिंहासन। स्वीकारून व्याघ्रासन। झांकिलें आपुलें रंगेलपण। जोगी झालांत ते ठायां॥ नीलकंठ पार्वतीपति। विरूपाक्ष दक्षिणामूर्ति। भीम त्र्यंबक ऐशा रीतीं। नांवें धरिलीं ते ठायां॥ कोठें समूळ जटेचा त्याग केला। अल्ला इलाही तुम्हीच बनलां। वेदांऐवजीं निर्मिला। नमाज तेथें तुम्हींच॥ कोठें बनून अहिंसक। झालांत जैनमताचे पोषक। कोठें नीति व्यावहारिक। बौद्ध होऊन सांगितली॥ कोठें झगा घातिला। शांतपणाचा कळस केला। कोठें होऊन राहिलां। पारशांसाठीं अग्नि तुम्ही॥ जरी गोदेचे पाट फुटले। परी न तिशीं पारखे झाले। दृष्टिकारणें अनेक दिसले। परी जल एकची॥ ५०॥ ऐसा तूं सर्व मतां। संमत अससी लक्ष्मीकांता। कां कीं तुझ्यावीण परता। देव मुळीं उरला नसे॥ ऐसा तूं पुराणपुरुष। सर्वकर्ता ब्रह्मांडाधीश। तोच तूं स्वामी व्यंकटेश। उभा अससी गिरिवरी॥ हे केशवा केशीमथना। हे माधवा मधुसूदना। हे गोविंदा नारायणा। हे प्रद्युम्न

दानवारी ॥ हे नृसिंह प्रल्हादरक्षका । हे बलीच्या याचका । हे दानव-संहारका । ब्राह्मणप्रिया महाविष्णो ॥ हे रघूच्या कुलभूषणा । श्रीरामा जानकीजीवना । हे पांडवप्रिया श्रीकृष्णा । नंदनंदना यदुपते ॥ हे गोपगोपीमनरंजना । हे अघवकांतक जनार्दना । हे सर्वव्यापी सुहास्यवदना । यज्ञभोक्त्या यज्ञपते ॥ तुम्हीं श्रीरामावतारीं । दुर्बळशी तारिली शबरी । येऊन पंपा सरोवरीं । रीसवानरां उद्धरिलें ॥ त्या श्रीराम-अवतारा । चैनीस फांटा दिधला खरा । म्हणून हव्यास साजिरां । तुम्हां सुटला गिरिवरी ॥ कृष्णावतारीं गोकुळीं । पाउलें तुमचीं सवंग झालीं । त्याची का काढिली । उणीव येथें भरून ॥ अथवा सोडून द्वारका नगरी । जेव्हां आलांत पंढरपुरीं। तेव्हां महार होऊन बेदरीं । जावें लागलें पंतांस्तव ॥ ६० ॥ नामदेवाचें दूध कढत । प्यावें लागलें तुम्हांप्रत । सांवत्याच्या मळ्यांत । जावें लागलें खुरपावया ॥ जनीचें तें दळिलें दळण । भक्त बोधल्याकारण । थंडींत शेता राखण । बसणें भाग आलें तुम्हां ॥ चोख्याचीं ओढिलें ढोरं । नाथसदनीं वाहिलें नीर । यात्रेस येतां पवार । कूर्म व्हावें लागलें तुम्हां ॥ उत्तर हिंदुस्थानांत । ऐशींच कामें थोडींबहुत । करावीं लागलीं तुम्हांप्रत । शेले विणिले कबिराचे ॥ मेहत्याची हुंडी पटविली । कोल्हाट्याची साथ केली । कर्माबाईची भक्षिली । खिचडी तिच्या भक्तीस्तव ॥ अष्टपदी भजनांत । तुम्हां करावें लागलें नृत्य । सेनासाठीं हजामत । करावी लागली शहाची ॥ रोहिदासाचे जोडे शिविले । सजन कसायाचें विकिलें । मांस आपुल्या हस्तें भलें । सुवागशाचें दाविलें पद ॥ म्हणून सोडून उत्तर देशा । महाराष्ट्रीं आलास जगदीशा । तों त्यानें पंढरीशा । तान केली अवध्यांवर ॥ कृष्णातीरच्या सखूसाठीं । लुगडें तुम्हीं लाविलें कटीं। त्याची भीति बसली पोटीं । म्हणून एथें भीतसां ॥ येऊं न देतां कुणा जवळीं । तुम्ही आपुल्या वनमाळी । जागा ही बरी पाहिली । शैलाशिरास एकीकडे ॥ ७० ॥ पदा न कुणा शिवूं देतां । तुम्ही आपुल्या भगवंता । दर्शनासाठीं कुणी येतां । पैसे मागतां त्यातें बहू ॥ कां कीं देवा पंढरींत । पैशावरी न ठेविला हेत । मोकळीक पद स्पर्शण्याप्रत । ठेविली तुम्हीं ते ठाया ॥ आणि तुझ्या पदीं तो

ऐसा गुण। त्याचें सद्भावें केल्या वंदन। तुम्हांलाच आपुलेंपण। द्यावें लागतें शरणागता॥ त्या अवघ्याच कृत्याचा। विचार येथें केला साचा। महिमा क्षेत्रगिरीचा। केलांत कांहीं निराळा॥ बरें झालें विश्रांति। तुम्ही येथें घ्या श्रीपति। परी येथेंही तुम्हांप्रती। भक्त ते न सोडतील॥ देवा साखरेचा रवा। जरी झांकून ठेविला बरवा। तरी त्याचा सुगावा। सहज लागे मुंगीस॥ ती त्याला हुडकीत येते। कष्टें आंत प्रवेश करिते। संकटां ना जुमानिते। केवळ त्याच्या गोडीस्तव॥ तैसें येथें तुम्ही हो केशवा। वाटेल तितुके कर बसवा। पदही आपुले झांकून ठेवा। परी न आम्ही भिऊं तया॥ शक्त्यनुसार करही देऊं। दुरून तुझे पाय पाहूं। आणि सौख्यठेवा घेऊन जाऊं। तुझ्यापासून कृपाळा॥ कां कीं हें ठावें आम्हांप्रत। तुजला राग नाहीं किंचित। भक्तांचें पुरविण्या आर्त। वाट पाहशी व्यंकटेशा॥ ८०॥ चन्द्रापासून कदाही। ताप जैसा होणेंच नाहीं। तैसा तूं शेषशायी। आम्हां आहेस निश्चयें॥ व्यंकटागिरीची पायरी। जों जों एक चढावी हरि। तों तों दुरितें मागील सारीं। जाती भस्म होऊनियां॥ तुझ्या शिखराचें दर्शन। झाल्या पळतीं महादैन्य। होतां तुझें मुखावलोकन। मोक्ष रोकडा शेवटीं॥ आम्ही वाट पहात राहूं। दार उघडेल तेव्हांच येऊं। तुला नेत्रवाटें लुटून घेऊं। कोंडून ठेवूं हृदयांत॥ येथें तूं दारें लाविशी। तैसाच रहा हृदयाशीं। कां कीं संवय हृषीकेशी। कोंडून घेण्याची लागली तुज॥ असो जो जो आमुचा दीनपणा। तो तो तुझाच नारायणा। व्यंकटेशा कमलनयना। याचा विचार करा हो॥ दैन्य लावा पिटाळून। सुखी करा अवघे जन। शरणागतांलागून। हो न बाधा संकटाची॥ तुला स्नान घालावया। बंदी आम्हांस ये ठायां। परी प्रेमाश्रूनें प्रक्षाळाया। अधिकार आहे केव्हांही॥ मनरूपी वाहतों सुमन। भावाचें लावितों चंदन। स्तुतीची नाना भूषणें। तुजलागीं घालितों॥ धूप काम-मोहाचा। तुजलागीं दावितों साचा। प्रेमरूप शिऱ्याचा। दावितो तुम्हां नैवेद्य॥ ९०॥ तुझी भक्ति ही दक्षिणा। ती तुज मी अर्पितों नारायणा। स्तोत्रपारायण प्रदक्षिणा। मान्य करणें गोविंदा॥ तुझी जी दिव्य नामावलि। ती मी वाहतों पुष्पांजलि! केशवा रामा वन-

माळी । वासुदेवा अधोक्षजा ॥ अहंकाराचा कापूर । ओंवाळून घालितों नमस्कार । आतां कृपा माझेवर । केली पाहिजे व्यंकटेशा ॥ भरतखंडरूपी राउळांत । तूं सर्वदा आहेस स्थित । रांगसी गोकुळीं अंगणांत । नाथद्वारीं दूध पितां ॥ बद्रिकाश्रमीं अध्ययन । अयोध्येंत भोगिसी सिंहासन । जगन्नाथीं नैवेद्यग्रहण । दक्षिणा घेतां गिरिवरी ॥ बालभोग तो डाकुरीं । स्नान धरमपुरीस गोदातीरीं । भक्तगाऱ्हाणें भजनद्वारीं । पंढरीसी ऐकतां ॥ श्रीरंगीं करितां शयन । मथुरा तुमचें विलासस्थान । विहार कराया कारण । जातां परशुरामगडासी ॥ क्षण एक वसतां द्वारकापुरीं । चिंतन कराया मुरारि । बहुतेक वेळ दरबारीं । पंढरीसी राहतां ॥ ऐसा तूं सर्वगामी सर्वेश्वर । सर्वव्यापी जगदाधार । तुला माझा नमस्कार । वारंवार असो हा ॥ माझ्या सर्व अपराधां । क्षमा करावी गोविंदा । दुःख दैन्य आपदा । समूळ माझी निवारीं ॥ १०० ॥ सुमार्गी वळवा मन । करवा भक्तीचें सेवन । हेंच पदर पसरून । आहे आतां मागणें ॥ यांत अंतर झालिया । ब्रीदास हानि होईल तुझिया । याचा विचार व्यंकट-राया । करा आपुले मानसीं ॥ वर तुझा या स्तोत्रासी । हाच असो हृषीकेशी । जो पठण करील यासी । त्याचे पुरोत मनोरथ ॥ ज्यास नसेल कुमार । त्यानें एक संवत्सर । या स्तोत्राचा त्रिवार । रोज पाठ करावा ॥ या स्तोत्राचा पाठ जेथ । आदरें होईल रोज तेथ । ओखदा न राहील दुरित । सत्य सत्य त्रिवाचा ॥ बद्धाचें तोडील बंधन । रोगियासी आरोग्य पूर्ण । देईल हा व्यंकटरमण । स्तोत्र भावें वाचिल्या ॥ पुत्र होतील वांझेसी । अल्पायु ते शतायुषी । करील माझा हृषीकेशी । स्तोत्रीं भाव ठेवितां ॥ शत्रू वागतील मित्रवत । हें स्तोत्र वाचिल्या नित्य । कर्जबाजारी कर्जरहित । एक मासांत होतील हो ॥ या स्तोत्राचें पारायण । केल्या होईल गोदा-स्नान । ब्रह्महत्येसम दोष दहन । होतील त्यांचे निश्चयें ॥ भोगून संतति संपत्ति । वैकुंठलोक मिळेल अंतीं । ज्ञानेच्छूला ज्ञानप्राप्ति । होईल या स्तोत्रपठणें ॥ १० ॥ केल्या ग्रंथाचें संरक्षण । भूतबाधा निमेल पूर्ण । त्याचें झाडितील अंगण । येऊनियां अष्टसिद्धि ॥ प्रतिकूल ग्रह असले जरी । ते अनुकूल होतील निर्धारीं । आदरें या

स्तोत्रावरी। शुद्ध भाव ठेविल्या ॥ आतां फार बोलूं किती। पहा स्तोत्राची प्रचीति। विपरीत भावना मात्र चित्तीं। येऊं न द्या तेविषयीं हो ॥ पौषमासीं वद्यपक्षांत। तिथी पंचमी धादांत। शके अठराशें अडतिसांत। भृगुवासरीं हें स्तोत्र लिहिलें ॥ स्थान व्यंकटेशगिरी। पुण्यभूमि निर्धारी। तेथें व्यंकटेशासमोरी। दासगणूनें स्तोत्र रचिलें ॥ लेखक झाला दामोदर। या स्तोत्रासी साचार। व्यंकटेशपदीं होऊन भ्रमर। रुंजी घाली दासगणू ॥ स्वस्ति श्रीव्यंकटेशस्तोत्र। पुरविण्या भक्तांचे मनोरथ। सदासर्वदा समर्थ। असो म्हणे दासगणू ॥ ११७ ॥

॥ इति श्रीव्यंकटेशस्तोत्र संपूर्ण ॥

---

# उपदेशपर पद्यें

## ३९. ( भला जन्म हा )

भक्तिपथाविण इतर पंथ ते असार कांहिं न रया।
नरा भज पंढरपुरवासिया ॥ ध्रु० ॥

चराचरा या व्यापुनि उरला स्थावर जंगम हरी।
उभा जो पाहि विटेच्यावरी ॥

मुक्तिपेठ वैकुंठ प्रति बोभाट बहुत दुरवरी।
अशी ही क्षेत्रराज पंढरी ॥

कवाडि न लागे दवाडि न घटका षड्रिपु सारुनि दुरी।
भक्तिनें भजन प्रभूचें करी ॥

( चाल ) संसार नव्हे दुःखाचा केवळ मळा।
त्यामधें न आपुला गोंवुन घ्यावा गळा।
हा कठिण जरी तुज उकलायाला पिळा।
तरि सद्गुरुला शरण रिघावें येइल त्यासी दया ॥ नरा० ॥ १ ॥

पळ, घटका, दिन, मास चालले आयु धांवतें पुढें ।
कसा ना बघासि तयाच्याकडे ॥
वित्त लाधतां चित्त सुखाच्या मृगजल-डोहीं बुडे ।
परी तें तुला शेवटीं नडे ॥
ठुमकत येतां मुरडत कांता बालक घेऊन कडे ।
तुला तिज बघता धुंदी चढे ॥
खोटी माया, झूट पसारा, तूं मेल्या ती रडे ।
पेटिला कुलुप घालुनी बडे ॥
( चाल ) मग मानमरातब सांग राहतो कुठें ।
जै तुझ्या आयुची तटकन् दोरी तुटे ।
ना इलाज जन जै यम-पाचारण सुटे ।
येतिल रडतिल क्षणभर वर वर तुज भंवतीं बसुनिया ॥ २ ॥
जन्ममृत्युची खेप चुकविण्या भक्तिपताका करीं ।
पाहिजे धरिली अत्यादरीं ॥
शाब्दिक वेदान्त्याची बडबड ऐकुं नको क्षणभरी ।
समुळ ती नाश तुझा बा करी ॥
निश्चय विश्वासाला अपुले आधि सौंगडी करी ।
क्षमेला स्थल द्यावें अंतरीं ॥
भूतदया ती जागृत ठेवी सत्य तशी वैखरी ।
तुझा मग सहजाचि विकला हरी ॥
( चाल ) फुटलेत पाहिजे प्रेमाचे पाझर ।
बोलणें जणूं का रायपुरी साखर ।
साधका असावें मन जणुं गंगानिर ।
अशी व्रतें पाळिल्या गणु म्हणे येइल विठु प्रत्यया ।
नरा ! भज पंढरपुरवासिया ॥ ३ ॥

### ४०. ( भला जन्म हा )

तेंच म्हणावें भजन हरीचे जे नुरवी कलिमला ।
इतर जणुं बाजारचा गलबला ॥

जलीं मिसळल्या जी नच बसवी माळ तयांतिल तळा ।
अशा जो निवळी म्हणेल तो खुळा ॥
( चाल ) जो तमास उरवी तो न रवी बा खरा ॥
जी गोड नसे ती होय काय शर्करा ।
चमकतो कांचमाणि म्हणुनि होय कां हिरा ।
क्षमा दया वाढते ज्या बळें शशिसम एकेक कळा ।
गणु म्हणे अशाच भजनीं वळा ॥

## ४१. ( राम स्मरावा राम )

भक्ति तीच खरी । हरीची ॥ ध्रु० ॥
दंभा फाटा अद्वेष्टे मन । सन्नीतिला आचरी ॥ १ ॥
नामस्मरणा वांचुनि आवडे । गोष्ट न ज्या दुसरी ॥ २ ॥
निश्चय ज्याचा कधिं न ढळे कीं । जैसा अचलगिरी ॥ ३ ॥
परोत्कर्षें दुःख न मानी । उलटी मदत करी ॥ ४ ॥
शांत सदय शुचि मन तें ज्याचें । विषया धरित दुरी ॥ ५ ॥
दासगणु म्हणे असा असे जो । त्याचे मी पाय धरी ॥ ६ ॥

## ४२.

जगजीवन जगदाधारा रे ॥ ध्रु० ॥
विस्तारला पट भुवनत्रय हा । अंतर्गत तूं दोरा रे ॥ १ ॥
जग हें पाणी, पातळपण तूं । होशिल कोठुन न्यारा रे ॥ २ ॥
द्वैत तयावरि तरंग उठण्या । कारण मीपण वारा रे ॥ ३ ॥
दासगणु म्हणे तो प्रभु बघण्या । मायापट सारा रे ॥ ४ ॥

## ४३. ( भला जन्म हा )

तूं कोण कुठिल तव स्वरुप कैसे विचार याचा जरा ।
करिं बा होऊं नको बावरा ॥ ध्रु० ॥
देही म्हणविसी तरी न देही, तूं त्याहुनि वेगळा ।
कठिण हा गुरुविण नुकले पिळा ॥
सुख दुःखे ती भास खरोखर त्यांत न कांहीं कळा ।
नको बनुं दादुन तूं बावळा ॥

अविनाशी त्या चैतन्याचा अंश एक तूं खरा ।
घेई अनुभव त्याचा नरा ॥
दासगणु म्हणे स्थावरजंगम व्यापकशा ईश्वरा ।
स्मरसि तरि जन्म सफल तव खरा ॥

४४.

माया ममता लोभ अहंता परमार्थाचे अरि ।
तदंकित मना झाल्या नुमगे बापा तुजला हरी ॥ ध्रु ॥
दांभिक भक्ति अचरुनि जगतीं संतपणा तो जरी ।
मेळविला तरि उमगेल हरि हें बेगड कथिलावरी ॥ १ ॥
कापुनि माना ब्राह्मणभोजन नित्य जरी घातिलें ।
परि तें अवघें व्यर्थ जणू का रेतिंत जल ओतिलें ॥ २ ॥
भूतदया मनीं, वचन सत्य ते सद्भक्ती अंतरीं ।
असल्या गणु म्हणे येइल चालत विठ्ठल माझा घरीं ॥ ३ ॥

४५. ( वद जाऊं कुणाला )

हे मना गड्यारे सज्जना उमज तूं कांहीं ।
या नरतनुसम पर्वणी दुजी बघ नाहीं ॥ ध्रु० ॥
गमवि ना अशी ही सुगी मुढा वाउगी सोय बघ आतां ।
जाशील अंतिं यमलोकिं खावया लाथा ॥
नसे नसे लवहि भरंवसा, बुडबुडा जसा, उठे फुटे फटकन् ।
तशि आयु झुळुक वाऱ्याचि समज धरि झटकन् ॥
जोंवरी तुझा बा प्राण, तोंवरी जाण, सुहृज्जन साथी ।
लावून रिकामा मोह रौरवा नेती ॥
राहतील जागचे जागीं, शेत बागबगी, राहता वाडा ।
करशील स्मशानीं शयन शेवटीं उघडा ॥
तनुचा रे किति अभिमान, वाहसी जाण, गड्या मायेनें ।
परि काष्ट शुभांचें तिला अखेरी लेणें ॥
गणुदास म्हणे रे मना, भुलुं नको कुणा, पंढरीराणा ।
घे करुन आपुला तरिच जगीं तूं शहाणा ॥

४६. ( कधिं तिला )

का मना उगा तूं नटसी । शाश्वत सारे जग गणिसी ॥ ध्रु० ॥
माया, बसली न्याया निरया- । तुज, नको भुलूं तूं हिजसी ॥ १ ॥
काळ घडोघडिं आयुस नेतो । कां यांसी, नच पाहसी ॥ २ ॥
कुणि नाहीं जगिं याही, तव पाही, लवलाही ।
गणु म्हणे शरण जा गुरुसी ॥ ३ ॥

४७. ( तोवरि तळमळ रे )

मनुजा तूं पाणी । का जासी मोहोनी ॥ ध्रु० ॥
सद्वस्तू ती तो परमात्मा बघ मूढा शोधोनी ।
जें ब्रह्मांडीं तें या पिंडीं ओळख घ्यावी करुनी ॥ १ ॥
मायांबर हे टाक वृथा तूं जाऊं नको बा फसुनी ।
देव तुझ्याविण नाहिं निराळा वेद कथी हे वचनीं ॥ २ ॥
व्यंकटेश श्रीदाजि गुरूच्या ऐशा सद्बोधांनीं ।
दासगणु म्हणे भवीं तरावें स्वयें ब्रह्म होवोनी ॥ ३ ॥

४८. ( माझी विनवणी )

आल्या संसारीं । संसारिं होय जागा । गव्हारा ध्याइं पांडुरंगा ॥ध्रु०॥
नको विषयाचा । विषयाचा खेळूं पिंगा, । अनितिला देऊं नको जागा ॥
कामक्रोधासि । क्रोधासि आळा घाली । टाकि ज्या जगाति निंद्य चाली॥
नको मरमर । मरमर करुंस कांहीं । पाहिल्या कांहिं तुझें नाहीं ॥
जाशिल उलथून । उलथून एकटा गा । पापपुण्यास घेउन संगा ॥
म्हणुनि कर कांहीं । करिं कांहीं विवेका गा । गणु म्हणे जाय भक्तिमार्गा ॥

४९. ( वद जाऊं कुणाला )

नरतनू तुला लाधली, पर्वणी भली, तरुन जा भवरे ।
मद, मत्सर, माया, लोभ, अहंता भंवरे ॥
बसुं नकोस गाफिल जरा, मुढा पामरा, सोय कांहीं धरि रे ।
पदकमल विमल श्रीहरिचे चित्तीं स्मर रे ॥

नच जगीं कुणाचे कुणी, पुत्र कामिनी, धनाचे साथी ।
जाशील उलथुनी नये कुणी सांगाती ॥
भवनदिंत काम हा मगर, असे बहु जबर, सुजन हे कथिती ।
श्रीनाथ, तुकोबा, रामदास, निवृत्ति ॥
तुजभवति फिरे गरगरा, काळ हा खरा, जया यम म्हणती ।
घेऊन कठिणसे पाश आपुल्या हातीं ॥
सोड सोड उपाधी सारी, भजे श्रीहरी, गमवि ना आयु रे ।
करूं नको व्यर्थ या नरतनुचें मातेरें ॥
धरि धरि समज अंतरीं, सोयरा करी, सखा श्रीहरी रे ।
नेवासें प्रवरातटीं कवन गणु करि रे ॥

## ५०. ( भला जन्म हा )

अमोल ऐशा नरदेहाचें सार्थक कांहीं करीं ।
आपुला घ्यावा करून श्रीहरी ॥ ध्रु० ॥
नानापरिच्या गटारमाळा घालुन कंठांतरीं ।
मुद्रा कोरुन लाविसी वरी ॥
पोटासाठीं सोंगें ढोंगें सारिच वरच्यावरी ।
तयाला राजी नसे बा हरी ॥
( चाल ) निर्लोभताहि तूं माळ गळा घालणें ।
अक्षय्य शांतीची वरि मुद्रा लावणें ।
सद्भक्ति पताका मग निजकरिं मिरविणें ।
दासगणु म्हणे तरशिल बाप्पा तरि या भवसागरीं ।
तुजला भेटेल माझा हरी ॥

## ५१. ( श्रीमंत पतीची राणी. )

भुलुं नको मना संसारा । ना येथ सुखाचा वारा ॥ ध्रु० ॥
दुःखाचें मूळ संसार । बा करिल बहुत बेजार ।
लोभाचें करून मांजर । तुज फिरविल दारोदारा ॥ १ ॥
मानिसी जयातें गोत । तें वैरि तुझे साक्षात ।
ढकलुनी मोह भवऱ्यांत । तुज फिरवितील गरगरा ॥ २ ॥

कामिनी नव्हे कटियार । प्रेमाचा करिल तुज वार ।
बा खरुज कोरडी थोर । खाजवूं नको खरखरा ॥ ३ ॥
नको होऊं मना तूं धुंद । धरि विठ्ठल नामीं छंद ।
हा तरिच तुटे भव-बंध । कथी गणू करुनि विचारा ॥ ४ ॥

## ५२. ( भला जन्म हा )

भक्तिमार्गिच्या गोष्टी खोट्या ऐसि न करि वल्गना ।
भजुन बघ भावें नारायणा ॥ ध्रु० ॥
निराकार निर्गुण निरंजन ब्रह्म जरी तें असे ।
परी भक्तार्थ सगुण होतसे ॥
भक्तिपथाची अगाध शक्ति, संशय कांहीं नसे ।
बघण्या अशक्य तें घडतसें ॥
( चाल ) निष्पाप करी बा चित्त आधीं आपुलें ।
तैशींच जाळणें कुकल्पनेचीं मुळें ।
दुष्कर्म त्यजुनी नीतिमधीं या वळे ।
वैराग्याला जागृत ठेवुनि लीनतेस वरि मना ।
रिकामा दंभ कुणा दावि ना ॥ १ ॥
राहो जावो प्राण परी तें असत्य ना बोलणें ।
जनाला निजबांधव मानणें ॥
हरि-भजनाविण एक विपलहि, जाउं न द्यावें सुनें ।
सर्वदा भक्ति-रसीं रंगणें ॥
( चाल ) विश्वास मुळें या भक्ति तरुचीं खरीं ।
सन्नीति हेंच तूं खोड समज अंतरीं ।
प्रेमाची शोभे सुबक साल त्यावरी ।
उपासना त्यावरती फांद्या नानाविध सज्जना ।
पानें मनिंचा कोमलपणा ॥ २ ॥
अशा भक्तिच्या तरूस साक्षात्कार मोहर येतसे ।
जगा जो थक्क सदा करितसे ॥
सहजासहजीं ज्ञान फळाचा उद्भव मग होतसे ।
कधीं ना श्रम पडती फारसे ॥

(चाल) यासाठिं अशा भक्ति स्वीकारा करी ।
मग तूं न खरोखर बकाशिल वेड्यापरी ।
बघशील दृष्टि कैवल्यकंद श्रीहरी ।
दासगणु म्हणे परमेशाला न रुचे दांभिकपणा ।
सदा ह्या ध्यानिं धराव्या खुणा ॥ ३ ॥

५३. ( पांडु नृपाति )

अंतर्मुख वृत्ति करी । जरि बघणें असेल हरी ।
माया पट सारी दुरी । द्वैतभावना ॥ ध्रु ॥
ब्रह्मांडीं तोच पिंडीं । देह नव्हे तदिय बंडी ।
हृदयभुवनिं त्यास धुंडी । सज्जना मना ॥ १ ॥
गुरुकृपा हें दिव्यांजन । निज नयनीं झणिं लेऊन ।
म्हणत गणू घे दर्शन । नव्हत कल्पना ॥ २ ॥

५४.

विवेक निशिदिनिं वरा । दादांनो ॥
तरि विठ्ठल येइल घरा । दादांनो ॥ ध्रु० ॥
(चाल) नाहीं लोभ कुणाचा बरा । स्थल द्या न मनीं मत्सरा ।
क्रोधाचि होळि ती करा । मद, अहंपणा दुर धरा ॥ १ ॥
भवनदी भरली दोथडी । नका टाकुं इच्यामधिं उडी ।
हरि-नाम हीच सांगडी-करुनियां नदिस या तरा ॥ २ ॥
धन, मान, जमिन, कामिना । हे क्षणिक सर्वहि गणा ।
आले अंति न कामा कुणा । भलभलत्या न गमजा करा ॥ ३ ॥
नको योग, याग तर्पण । नको व्रतादि उद्यापन ।
वहा विठ्ठल-चरणीं मन गणु म्हणे दयेला वरा ॥ ४ ॥

५५. ( चंद्रकांत राजाची )

द्वेष-मत्सरासम तो घातक जगांत नच नच दुसरा ।
या दुष्टाचा सदैव असतो अनीतिला आसरा ॥ ध्रु० ॥
ऐहिक सुखाची करून होळी परमार्था बुडवी ।
भूतदयेचा खून करुनियां सन्नीती तुडवी ॥ १ ॥

यास्तव आधीं या दुष्टाला यत्नें दूर करा।
तरीच होइल जाणें गणु म्हणे भवनदि पैलतिरा ॥ २ ॥

५६. ( चंद्रकांत राजाची )

नुसतें शब्दज्ञान मना रे घातक बहु पाहीं।
तें नच करि बा कृतार्थ कवणा बुडविल भव डोहीं ॥ ध्रु० ॥
लेश जलाचा नसून मृगजल जलास भासवितें।
तसें ज्ञान हें अनीतिलागीं नीतिरूप आणितें ॥ १ ॥
सोंग नृपाचें बहुरूप्याला महीपती करितें।
वा गणिकेला अहेवपण तें जणुं कुंकुम देतें ॥ २ ॥
म्हणुनि सांगतों यापासुनि तूं सावध बहु राहीं।
दासगणु म्हणे शुद्ध वर्तनें ध्याइं विठाबाई ॥ ३ ॥

५७. ( भला जन्म हा )

सद्धर्माचें आचरण हेंचि कारण अभ्युदया।
करा त्या हरिला येईल दया ॥
आतां कशाचे दिवस सुखाचे वैभव आपणांवरी।
रुसुनियां गेलें देशांतरीं ॥
एकी जाउन बेकी झाली सौख्य पळालें दुरी।
जाहलों तृणवत या भूवरी ॥
द्वेष मत्सरें ठाणें दिधलें प्रत्येकाच्या घरीं।
आतां ही गोष्ट न कांहीं बरी ॥
( चाल ) यासाठीं गड्यांनो सावध व्हावें आतां।
धर्मासि न माना उगाच भाकडकथा।
जें करणें असेल तें खरें करा तत्त्वतां।
दासगणु म्हणे दुर्दैन्याच्या बोचूं लागल्या सुया।
नरा भज पंढरपुर–वासिया ॥

५८. ( भला जन्म हा )

सदाचार हा शरीर खरोखर अध्यात्माचें नरा।
येथ ना शंका घ्यावी जरा ॥

अलोट श्रद्धा रुधिर असावें त्या शरिराभीतरी ।
दयेचि कातडि त्याच्यावरी ॥
(चाल) विवेक मांस, धैर्याचि अचलशी हाडें ।
सौजन्य हेंच सौंदर्य समज फांकडें ।
पवित्रपणाची वाण मुळिं न मग पडे ।
दासगणु म्हणे अशा शरीरीं भ्रम हा निरसुन खरा ।
जीव हा शिव होईल साजिरा ॥

५९. ( राम स्मरावा राम )

जो का कीर्तिरूपें उरला । बुधहो ! नर समजा त्याला ॥ ध्रु० ॥
अवांतराचे जन्म जणूं का । तरवड वनिं फुटला ॥ १ ॥
हरिचरणाच्या प्रातिंत ज्यानें । आयुव्यय केला ॥ २ ॥
राष्ट्रहिताची कळकळ वाहुन । नित करि कार्याला ॥ ३ ॥
निज स्वातंत्र्यासाठीं जो का । रणिं कामा आला ॥ ४ ॥
नाना शास्त्रें शोधुनि रचि जो । अभिनव ग्रंथाला ॥ ५ ॥
दासगणु म्हणे नमन करी मी । ऐशा चौकडिला ॥ ६ ॥

६०. ( भला जन्म हा )

अभिमानाधिन होऊं नको रे बुडविल तुज तो नरा ।
नको रे गाफिल राहुस जरा ॥
अभिमानासम शत्रू न दुसरा वाटोळें हा करी ।
प्रथमता मान धनातें हरी ॥
(चाल) शेवटीं तुझा हा प्राण गड्या घेइल ।
हा जगत्त्रयामधीं निंद्य तुला ठरविल ।
यासवें कदा ना शांत चित्त राहील ।
दासगणू म्हणे म्हणुन गड्यांनो ! विचार याचा करा ।
सदा या शत्रुस दूरी धरा ॥

६१. ( माझी विनवणी )

अनेकांचीं तीं । अनेकांचीं अनेक मतें । तयानें चित्त व्यग्र होतें ॥ध्रु०॥
कुणी म्हणतात । म्हणतात निराकार । असुनियां ईश निर्विकार ॥१॥

कुणी म्हणतात सगुण तुजला । कुणी म्हणतात विश्वि भरला ॥ २ ॥
तसें कुणि म्हणती । म्हणति हें समुळ खोटें । कशाचा ईश, कर्म मोठें ॥ ३ ॥
परी इतुक्यांही । इतुक्यांहि तुझी जागा । कळलि ना काय पांडुरंगा ॥ ४ ॥
सगुण निर्गुण । निर्गुण सर्व कांहीं । असासि तूं एक विठाबाई ॥ ५ ॥
तुझें दर्शन । दर्शन जया होई । तया मग वाद उरत नाहीं ॥ ६ ॥
तूंच कीं अवघा । अवघाहि रमारंगा । गणूला भेट पांडुरंगा ॥ ७ ॥

## ६२. ( भाव धरा रे )

काय करावें । हरि पहाया कोठें जावें ॥ ध्रु० ॥
म्हणती वारकरी पंढरिला । ' प्रभु असे विटेसी ठेला ' ।
म्हणतात यवन परि त्याला । ' दगड लेखावें ' ॥ हरि० ॥
' प्रार्थनासमाजी ' म्हणती । " प्रभु असे ढगाच्यावरती ।
ध्यावया करुनि तत्प्राप्ति । नेत्र झांकावें " ॥ हरि० ॥ २ ॥
सांगत्ये ' थिऑसफि ' लोकां । ह्या चालिरीतिला धक्का ।
ॐकार शब्द हा घोका । विधि टाकावे ॥ हरि० ॥ ३ ॥
मत ' आर्यसमाजीयांचें ' । असें खरें परि न कामाचें ।
' तनु त्यजुनि पूजन आत्म्याचें ' । म्हणति साधावें ॥हरि०॥४॥
मत वैचित्र्याचें बंड । माजलें महिस उदंड ।
बळि पडलि बडिबडी धेंड । म्हणुनि कां ध्यावें ॥ हरि० ॥ ५ ॥
गणुदास म्हणे यासाठीं । नामिं प्रीति धरूनियां मोठी ।
विश्वास धरूनियां पोटिं । वारिला यावें । डोळे भरून प्रभुला
पहावें ॥ ६ ॥

## ६३. ( भला जन्म हा )

जन्ममरण तें चुकवायाला पद संताचे धरी ।
तयाचि संगत जाउनि करी ॥
मताभिमानें मत्त असति जे त्याग तयांचा करी ।
पडे न त्या गाबाळाचे भरीं ॥
शाब्दिक बडबड वर वर बहुपरि अनुभव ना अंतरीं ।
तयाच्या पासुन राहे दूरी ॥

(चाल) दांभीक राहती वर वर संभावित ।
त्या डामडौलिं बा सार नसे किंचित ।
तो संत नव्हे जो षड्रिपुच्या अंकित ।
अद्वेष्टा नी शांत दांत जो संत तोचि भूवरी ।
गणु म्हणे वरकड सोंगें खरीं ॥

## ६४. (राम स्मरावा राम)

संत म्हणा त्याला । जो का ऐहिक सुखा विटला ॥ ध्रु० ॥
काम, क्रोध, मद, मत्सर, भीती । स्पर्श करायाला ॥ १ ॥
निंदा–स्तुतिवर लावुनि कांटी । अक्षयिचा थुंकला ॥ २ ॥
दासगणु म्हणे तोचि संत हो । हरि–पदिं नत झाला ॥ ३ ॥

## ६५.

तोच म्हणावा जगिं संत । वर्तित राहुन लोकाचारा ।
त्यजि न धरी परि हेत ॥ ध्रु० ॥
हेवा देवा नच कवणाचा । जो अवध्याही मित्र जगाचा ।
लाग न जवळीं ज्या षड्रिपुंचा । अतुल अंगिं सामर्थ्य ॥ १ ॥
न्याय नीतिला नच दे फांटा । निज महतीचा अतिशय कांटा ।
सद्धर्माच्या चालवि वाटा । उभा पुढें भगवंत ॥ २ ॥
जवळ उपाधी नाहिं कशाची । आयू परहित करण्या वेंची ।
सत्यामाजि न भीड कुणाची । हाच जयाचा पंथ ॥ ३ ॥
दासगणु म्हणे ऐशा संता । शरण गेलिया मोक्ष ये हाता ।
त्रिताप पळतिल हां हां म्हणतां । उगे न पडा फंदांत ॥ ४ ॥

## ६६. (भला जन्म हा)

साधुसंत सत्पुरुष गड्यांनो, सत्पथ वासरमणी ।
अथवा भूतदयेची खणी ॥ ध्रु० ॥
साधुसंत हे वैराग्याचे मूर्तिमंत डोंगर ।
सज्जनाप्रती रोहिणीवर ॥ १ ॥

त्यांच्या मुखींचीं अमृत वचनें अमृतास जिंकती ।
संत हे सर्व भया वारिती ॥ २ ॥

दासगणु म्हणे केलें सार्थक जन्मुन यांनीं जनीं ।
संत हे केवळ चिंतामणी ॥ ३ ॥

६७. ( लावणी )

आहे चित्तवृत्ति जोंवरी गड्या ! बावरी ।
तोंवरि न कांहिं होणार । जरि बसलास गोदातिरीं ॥ ध्रु० ॥
मानापमान जोंवरी कळे अंतरीं ।
तोंवरि न तत्त्व कळणार । वाचि खुशाल ज्ञानेश्वरी ॥ १ ॥
जोंवरी 'आपण शाहणा' म्हणविसी मना ।
तोंवरि न लीन होशील । करि खुशाल हरि-पूजना ॥ २ ॥
जोंवरी छळाया परा पाहसी खरा ।
तोंवरि न दया कळणार । वाचि खुशाल भागवत घरा ॥ ३ ॥
कामास रजा जोंवरी देसि ना खरी ।
तोंवरि न खरें वैराग्य । सुखें बाइल ठेवी दुरी ॥ ४ ॥
जोंवरी अनुभवावीण करिसी भाषण ।
तोंवरी फोल तें सारें । करि सुखें ग्रंथशोधन ॥ ५ ॥
गणु म्हणे ज्ञान आणि कृती जेथ नांदती ।
तेथेंच स्थिरावें मन । घरिं चालत ये श्रीपती ॥ ६ ॥

६८. ( फुलें वेलीचीं )

कठिण उमगाया । दुर्धर ती हरिची माया ॥ ध्रु० ॥
खोट्यास खरें भासविते । जें सत्य तया लोपविते ।
मर्कटापरी नाचविते । जिवासी वायां ॥ १ ॥
संसार असुन निःसार । माया तो भासवि सार ।
ईश्वरा करितसे दूर । जिवा बुडवाया ॥ २ ॥
स्त्री-संग जणुं का अनल । तो तीच भासवी शीतल ।
उपजवी प्रेम मनिं सबल । तया खेटाया ॥ ३ ॥

गणुदास म्हणे ती माया। जिंकण्या कथित सदुपाया।
दृढ धरा पंढरीराया। भक्ति करूनियां ॥ ४ ॥

६९. ( तोंवरी तळमळ रे )

मना हे तुजपाशीं। भेटविणें हृषिकेशी ॥ ध्रु० ॥
पापाचरणा तूंच करविसी, तूंच रौरवा नेसी।
सुखदुःखाला कारण तूंची, ठाईं ठाईं नाचविसी ॥ १ ॥
काम, क्रोध, मद, मत्सर, वैरी दे फांटा झणि त्यासी।
दासगणु तुज नित्य विनवितो, ने मज वैकुंठासी ॥ २ ॥

७०. ( चंद्रकांत राजाची )

सदाचार, सन्निती तशिच ती तिसरी सद्वासना।
जागृत असल्या रक्षण होतें जगताचें सज्जना ॥ ध्रु० ॥
स्वार्थ-बुद्धि ती बळावल्या वर हतबल यांना करी।
द्वेष दयेचें सोंग आणि मग अनीति होते नीति खरी ॥ १ ॥
याचि चौकशी पूर्ण कराया सत्ताधिश भूपती।
तोहि जाहल्या स्वार्थ-परायण हरिविण नाहीं गती ॥ २ ॥
दासगणु म्हणे या अवध्यांचा उत्पादक जो मना।
तो नारायण करि अपुला मग नुरतिल कीं यातना ॥ ३ ॥

७१. ( भला जन्म हा )

अध्यात्माचें खरें स्वरूप तें विसरून गेल्यावरी।
आपत्ति चालुन येते घरीं ॥
खऱ्या खुऱ्या या अध्यात्माला सेवन जो का करी।
सदा तो तेजस सूर्यापरी ॥
( चाल ) यासाठिं गड्यांनो ! सावध व्हावें आतां।
का उगीच राष्ट्रा दास्यत्वीं ठेवितां।
बळकट धरुनियां अध्यात्म्याच्या हाता।
सर्व सुखातें भोगुन उरवा निजकीर्ती भूवरी।
गणु म्हणे सार्थकता ती खरी ॥

## ७२. ( भला जन्म हा )

सच्चिद्‌घनसुख आनंदरूपी नारायण श्रीहरी ।
असा करिं निश्चय अत्यादरीं ।
कर्ता कारण कार्य सर्व तो एकच वस्तू हरी ।
तूंहि ना त्यापुन बापा दुरी ॥
( चाल ) दे टाकुन अवघी द्वैताची कल्पना ।
जी जाचक तुजला आदि अंति सज्जना ।
भज भावभक्तिनें त्या तूं मनमोहना ।
दासगणु म्हणे असें झालिया शुद्ध सौख्य सागरीं ।
खचित तूं रमाशिल हंसापरी ॥

## ७३. ( तोंवरि तळमळ )

मना हें ऐकावें ऐकावें । त्यापरि तूं वागावें ॥ ध्रु० ॥
रीतिनीतिला संमत ऐसें ज्ञान सदा सेवावें ।
या दोहीला फांटा जेथें तें न विचारीं घ्यावें ॥ १ ॥
रीतिनीति ही प्रभा खरोखर ज्ञानरूप रत्नाची ।
या दोहींची फारकत जेथें गारगोटि ती साची ॥ २ ॥
रीतिनीति हा सौरभ वेड्या ! ज्ञानरूप कस्तुरिचा ।
या दोहींचा अभाव असल्या ढेकुळ तो मातीचा ॥ ३ ॥
दासगणु म्हणे असेंच आले सांगत अनुभवि संत ।
भाव तयावर ठेवुन चाले उगि न पडे फंदांत ॥ ४ ॥

## ७४.

परब्रह्ममूर्ति । सद्गुरु हाच एक जगतीं ॥ ध्रु० ॥
हरुनि जिवाचें जिवपण सारें, शिवपण दे निज हातीं ।
कृपाकटाक्षें त्रिताप वारुन, बटिक करवि तो मुक्ति ॥ १ ॥
आत्मस्वरुपा पाहणें असल्या दर्पण घ्या गुरु हातीं ।
हें नच केल्या पाहूं गेल्या, होईल अवघी फजिती ॥ २ ॥
गुरु गुरुपणा दे शिष्याला, अनन्य झाल्यावरती ।
दासगणु म्हणे भेद नुरे, ज्योतीस मिळाल्या ज्योती ॥ ३ ॥

### ७५. ( वद जाऊं कुणाला )

अभिमान, हरी धनमान, शेवटीं प्राण, घेतसे पाही।
यापरी षड्रिपूमधें दुजा कुणि नाहीं॥
अभिमान, जहर हे समज, मना धरि उमज, नको पडुं फंदा।
जा शरण भाव-भक्तिनें तया गोविंदा॥
अभिमान, द्वेषमत्सरा, शिकवितो खरा, नीति नाठवते।
बघ रांडबाज पुरुषास वधू नावडते॥
गणुदास म्हणे जे संत, हरीचे भक्त, तयाच्यापाशीं।
ना मिळे सूर्य मंडळीं तमाच्या राशी॥

### ७६. ( चंद्रकांत राजाची )

जरि व्हावा तुज देव तरी त्या उपाय हा पाही।
सर्वांभूतीं नम्र रहा अभिमान बरा नाहीं॥ ध्रु०॥
योग, याग, तशि त्रिकाल पूजा भावें जरि केली।
गर्वछटा परि किंचित् उठतां मातिंत ती गेली॥
(चाल) भाराभर पोथ्या वाचुनि पाठांतर।
केलेस परी ना सार त्यांत तिळभर।
नासते विषानें अटिव दुधाची खीर।
गर्वरुपि हें जहर गव्हारा। मारक अवघ्यांही।
दासगणु म्हणे बहुत बुडाले या गर्वापायीं॥

### ७७. ( तोंवरि तळमळ )

हरि तूं जगताचा, जगताचा। चालक म्हणविसी साचा॥ ध्रु०॥
कोणा हस्तें पाप करविसी, पुण्य कुणाच्या हस्तें।
आवड निवड कां त्याचि मागुनी, हा नच पथ थोराचा॥ १॥
जसे नाचविसी तसेच नाचूं, स्वतंत्रता नच आम्हां।
पापपुण्य हें तुझ्याच योगें, जगिं घडतें सुखधामा॥ २॥
मनास येइल तुझ्या घडें तें, तेथ पाड नच आमुचा।
आम्हा हातीं आश्रय करणें, गणु म्हणे तव पायाचा॥ ३॥

## ७८. ( फुलें वेलींचीं )

कर्म गतीचा । नच लागे अंतचि साचा ॥ ध्रु० ॥
कोणा महाल, बिछाने, माडया । कोणि निजे महीवर उघडया ।
कुणि उडवित घोडे गाडया । शौक फुकाचा ॥ १ ॥
कुणि खाउन खाउन विटती । कुणि अन्नावांचुन मरती ।
कुणि प्रार्थुन मागूं घेती । भाग अन्नाचा ॥ २ ॥
कोणी गृहिणी गृहिणी करिती । कोणी बाइल सोडुन देती ।
कुणि रांडा ठेविती फिरति । नाद विषयाचा ॥ ३ ॥
सुख दुःख मुळीं हें खोटें । ते भेद दृष्टिनें वाटे ।
आश्चर्य यांत नच मोठें । खेळ मायेचा ॥ ४ ॥
गुरु-कृपें निमाल्या माया । मग अवघेंच वाटेल वायां ।
ना उरेल कर्म सांगाया । वदे गणु वाचा ॥ ५ ॥

## ७९. ( वसंतीं बघुन )

तनूचें अमूल्य भूषण तें ।
एक लीनता, शृंगारानें त्यापरि नच खुलतें ॥ ध्रु० ॥
तांबुल भूषवि न वदनातें ।
' विठ्ठल विठ्ठल ' सदैव वदतां सहजचि भंगल तें ॥ १ ॥
दानें शोभा हस्तातें ।
गोठ, पाटल्या, जडित अंगठ्या ओझेंच कीं त्यातें ॥ २ ॥
यास्तव धरि वैराग्यातें ।
दासगणु म्हणे पुनः पुनः ही नरतनु नच मिळते ॥ ३ ॥

## ८०. ( राम स्मरावा राम )

बद्ध प्रभू झाला । भक्तिनें बद्ध प्रभू झाला ॥ ध्रु० ॥
नाथगृहीं तो पाणी वाही । घेउनि कावाडिला ॥ १ ॥
चोख्यासंगें ओढि गुरें तो । घेउनि खांद्याला ॥ २ ॥
जनीसंगें दळण दळी तो । गाउन गाण्याला ॥ ३ ॥
सांवत्याचीं पांखरें राखी । बैसुन माळ्याला ॥ ४ ॥

दामाजीस्तव तो परमात्मा । महार असे बनला ॥ ५ ॥
दासगणु म्हणे तो परमात्मा । भीमातटिं रमला ॥ ६ ॥

८१. ॥ पद ॥

अय मन मेरे ख्याल करो कुछ सब दुनियामें गिरिधारी ।
भरा हुवा है, साची झुटी बात किसनसे नहिं न्यारी ॥ ध्रु० ॥
जो करना सो तूं कर सांचा कहे न किसीकू बुरे भले ।
दवरे कुत्ते, भागे गद्धे, हाथी अपनी चाल चले ॥ १ ॥
जिसके मुवाफिक उसको देकर अपना आपहि नटता है ।
पदकू जूता, सिरकू पगडी, लफ्ज भेद दिखलाता है ॥ २ ॥
भेद बुद्धिकू छोडो मन तुम जाकर भगवतसे मिलना ।
दासगणु कहे तेरा मेरा ये मूसे ना कबु कहना ॥ ३ ॥

८२. ( चंद्रकांत राजाची० )

घाल मनाच्या गळयांत माळा वराचि न उपयोगी ।
कुटील मोठें तेंच नाचवी तुज जागोजागीं ॥ ध्रु० ॥
मन हें खोटें चंचल बेटें अति छंदी फंदी ।
त्याच्या छंदें वागलयास तूं तुज बनविल नंदी ॥ १ ॥
भक्तिजलानें न्हाणुन करि त्या विमल ज्ञान भोगी ।
दासगणु म्हणे असें झालिया रमशिल श्रीरंगी ॥ २ ॥

८३. ( गुरु दत्त दिगंबर )

होणार कुणा नच चुकतें । मन व्यर्थचि मरमर करितें ॥ ध्रु० ॥
शिशु व्हावया बळकट पाजिती आणुनि बालामृत तें ।
भवितव्यत्वें तेंच कारटें मरिनें उलथुनि जातें ॥ १ ॥
गाढि बांधावी कधीं न पडेसी सिमिट, शिसें घालोनी ।
भूकंपाचा धक्का बसुनी तीच पहुडते शयनीं ॥ २ ॥
'अफाट दर्यामधें बुडाला फलाफलाणा' म्हणती ।
तोच फळीला धरून तरून ये सहजच कांठावरती ॥ ३ ॥
घडामोडिचा उत्पादक जो तो हरि बळकट धरितां ।
मनाप्रमाणें घडेल गणु म्हणे करणें नलगे चिंता ॥ ४ ॥

### ८४. ( भला जन्म हा )

स्वार्थपरायण दृष्टी होता सात्त्विक आंधळेपणा।
येतसे जगतासी सज्जना॥
या स्वार्थानें न्याय नीतिला फाटा तो मिळतसे।
स्वार्थावांचुन कांहीं न दिसे॥
( चाल ) आवश्य जगा स्वार्थाची दृष्टी जरी।
अतिरेक तियेचा त्याज्य सर्वतोपरी।
हें पूर्ण समजुनी चाल जगाभीतरी।
झंजावातें तरू उन्मळती तो नच साहे कुणा।
गणु म्हणे ध्यानिं धरा या खुणा॥

### ८५.

सुख दुःख नव्हे हें खरें गव्हारा तरंग भ्रांतीचा
नसत्या मृगजळिं बुडुनी घेशी अनुभव मायेचा॥
मी पण पडदा पडून झाला लोपचि सत्याचा
तिन्ही अवस्था टाकून घेई अनुभव तूर्येचा॥
नदी सागरा मिळता नुरतो अनुभव पूर्वीचा
गणु म्हणे ऐसे साधिल झाल्या सेवक सद्गुरुचा॥

### ८६. ( भला जन्म हा )

ढोंग धत्तूरा माजवुनीयां जन नादीं लाविती।
अशाला भेटेल काय श्रीपती ?॥ ध्रु०॥
भाळिं टिळे ढळढळित चंदनी लावुनि चतुराइचे।
जणूं का सिग्नल आगगाडिचे॥
उपकरण्याला बघुन भाळतां जरि भगवन् किरटी।
तरी का तांबट थोडे हटीं॥
चांदी सोनें पांच हिऱ्याला जरि भगवन् भाळतां।
तरी का सराफ हटिं बैसतां ?॥
उज्वल तांब्या आसन लोंकरी घणघण वाजे घाट।
पूजेचा लांबवरीं बोभाट॥

गुलाल, बुक्का, अबीर, चंदन, अष्टगंध, अर्गजा -।
पाहिजे, म्हणती गरुडध्वजा ॥
जाइजुई नी बकुल मालती निशिगंधाचा तुरा।
हारामधिं निव्वळ बटमोगरा ॥
निरांजनें तीं दहाविस जळतीं नाश तुपाचा खरा।
बदामी नैवेद्याला शिरा ॥
अशी पूजेची करी कवाईत बहुरुप्याचे परी।
भक्तिचें नांव नसे अंतरीं ॥
भक्तिरसाविण असार सारें कुंकुमतिलकाविना।
पहा ती अशुभ जेविं कामिना ॥
षडरिकपाटा घाल गव्हारा! वैराग्याची कडी।
भक्तिच्या दे डोहामधिं बुडी ॥
भेटेल मग तुज रमारमण अघशमन दयाघन हरी।
उभा जो गणु म्हणे पंढरपुरीं ॥

८७. ( भला जन्म हा )

त्रिविध ताप हे मार्गे असतां 'सुखि' आपणा मानिती।
अशांची नको मला संगती ॥ ध्रु० ॥
पळ घटिका ज्या लोभ सोडिना, मान धना इच्छिती ॥ अशांची ॥१॥
दर्दुरवत् जे पंचशराच्या कर्दमांत लोळती ॥ अशांची ॥ २ ॥
अष्टाष्टकिं चौसष्टी पढला परि न पालटे मती ॥ अशांची ॥ ३ ॥
सोवळें ओवळें दंभ रिकामा किल्मिष ज्याच्या चित्तीं ॥ अशांची ॥४॥
हेतु धरूनी दर्भ घृताला अग्निमधें जाळिती ॥ अशांची ॥ ५ ॥
वाटा मारुनि मान मिळाया भूतदया दाविती ॥ अशांची ॥ ६ ॥
शांति न चित्तीं वरुनि रिकामी द्वारावति फासती ॥ अशांची ॥ ७ ॥
स्कंधिं पताका, गळयांत माळा, वर्तन नच त्या रिती ॥ अशांची ॥८॥
परनिंदा ती ऐकुनि ज्याच्या प्रमोद वाटे चित्तीं ॥ अशांची ॥ ९ ॥
द्वेष, लोभ तो सदैव ज्याचा उंबरठा राखिती ॥ अशांची ॥ १० ॥
दासगणु म्हणे या अवध्यांच्यापासुन कमलापती।
ठेवि मज दूर, विनति तुजप्रति ॥ ११ ॥

## ८८. ( फटका )

कुठून आठवले ढंग तुम्हांला बदफैलीमधें काय मजा ? ।
संकटानें उठाव केला द्या चैनीला झणीं रजा । भाई सावध व्हा ॥ध्रु०॥
जिकडे तिकडे पाप अनन्वित वाण जाहली पुण्याची ।
म्हणुन संकटें घरांत घुसलीं फोडुनि कवाडें निष्ठुरचीं ॥ भा० ॥ १ ॥
जबर ताप तो प्लेगोबाचा पटकीला ती नाहीं दया ।
मधुन मधुन तो इन्फ्लुएन्झा येउं लागला भेटाया ॥ भा० ॥ २ ॥
मलेरियाचें ठाणें उठेना अशक्तता ती बळावली ।
मधुमेहानें बड्याबड्यांच्या माळ गळ्यामधें घातियली ॥ भा० ॥ ३ ॥
अवष्टंभ ते तरुणमागें घेति हमेशा त्रिफळयाला ।
न्हात्या पोरी विचारिती लाजुन औषध प्रदराला ॥ भा० ॥ ४ ॥
लहान लेंकरें किरकिर करिती दूध मिळेना जननीचें ।
बाळशाचा मुळीं न पत्ता जिवंत सांपळे हडकांचे ॥ भा० ॥ ५ ॥
आला काळ हा किति उफराटा बाप मुलाची करी क्रिया ।
सासु म्हणे ती सुनबाईला कुंकु भालिचें पूस बया ॥ भा० ॥ ६ ॥
ज्येष्ठ गेला, आषाढ सरला श्रावण आला नाहिं परी ।
पर्जन्याची एकहि धारा अवतरलि या भूमिवरी ॥ भा० ॥ ७ ॥
काळिं वावरें जिकडे तिकडे गुरें चाटितीं दगडाला ।
माध्यान्हींचा काळ कठिण तो झाडा नच पाला उरला ॥भा०॥ ८ ॥
गायि म्हशींचीं खिल्लारें तीं हालूं लागलीं वाऱ्यांनीं ।
वरती माना करून बघती आणुन लोचनामधिं पाणी ॥ भा० ॥ ९ ॥
तान्हि वांसरें ढुसण्या देती दूध मिळेना कांसेला ।
पाणी प्यावें पोटभरी परि थेंब न वाहे सरितेला ॥ भा० ॥ १० ॥
हें ऐसें तें व्हाया कारण पाप तुमचें तुम्हां फळें ।
पुण्यावांचुन सुख तें नाहीं कुतर्क घेऊं नका बळें ॥ भा० ॥ ११ ॥
वेदवेत्त्या अग्निहोत्र्याला मिळति न तांदुळ मूठभरी ।
त्याहि जांवई घरास येतां झडूं लागते शिरापुरी ॥ भा० ॥ १२ ॥
सालोसाल पडति देवळें चुना लाविना कुणि त्याला ।
इकडे पाहतां हॉल बांधिले ब्रदरहूडच्या जेवणाला ॥ भा० ॥ १३ ॥

कथा-पुराणें अवघीं मेलीं कुणी न येती श्रवणाला।
नाटकाचें नाशिव शिकंदर मिळे न जागा बसण्याला ॥ भा० ॥ १४ ॥
देवापुढती सांजवात ना अनंत बत्त्या रंगमहालीं।
कुलस्त्रियेला सुतकांठी ना, छिनाल पांघरते शाली ॥ भा० ॥ १५ ॥
श्रुति स्मृती नी भारत भागवत ज्ञानेश्वरिवर करडि नजर।
भाकड कादंबऱ्या, नाटकें यांचा प्रेमें होत आदर ॥ भा० ॥ १६ ॥
साधु, सज्जना, संत, महंता, पाहुनि नाकें मुरडीती।
सवाइ गंधर्वास आणाया हटकुनि टांगा पाठविती ॥ भा० ॥ १७ ॥
स्नान, संध्या, ध्यान, धारणा, ईशभक्तिला वेळ नसे।
घंटा घंटा सांवरि नेक्टाय् केंस डोकिचें विंचरितसे ॥ भा० ॥ १८ ॥
आल्या अतिथि अन्न मिळेना ग्यादरिंगची बहु गोडी।
सोडा लिम्लेट पीत ढसाढस, व्हिस्कीच्या बाटल्या फोडी ॥ भा० ॥ १९ ॥
स्त्री वर्गामधि सालोसाल बहूत नखरा बळावला।
विषयाचीं ती गोडि वाढली वैराग्या फाटा मिळला ॥ भा० ॥ २० ॥
परस्परीं तो द्वेष वाढला, प्रेमप्रीतिला झालि रजा।
दुःखें याया कारण हेंची आतां तरि भाइ मनिं उमजा ॥ भा० ॥ २१ ॥
महार मांग ते भिल्ल रामोशी मरूं लागले, नच खाया।
लहान भावंडें ती तुमची, तुम्हांस त्यांची ये न दया ॥ भा० ॥ २२ ॥
"जेष्ठ भ्राता पितुः सम" हें शास्त्र सांगतें कंठ रवें।
या तत्त्वावर लोटुनि माती खूळ काढितां नित्य नवें ॥ भा० ॥ २३ ॥
सत्य न उरलें लवहि कोठें खोट्यालागीं पुर आला।
याच योगें समाज तुमचा गेला गेला रसातळा ॥ भा० ॥ २४ ॥
टॉनिक पाहतां कॉडलिव्हरॉइल, कोको, कॉफी, चहा हवा।
चाळे उलटे जगा आठवले मुळिंच पटेना दूध, खवा ॥ भा० ॥ २५ ॥
जाति जातिचे समाज निघाले ऐक्यवर्धन नाम तया।
झाड पडले धरणीवरती फांद्या लागल्या नाचाया ॥ भा० ॥ २६ ॥
नकली साधू संत निघाले वर वर झांकी पाहुन घ्या।
उत्सव, चातुर्मास, पुण्यतिथी ह्याच ज्यांच्या आहेत सुग्या ॥ भा० ॥ २७ ॥

गप्पा ठोकित फिरूं नको ! आपुलि पायरी सोडुं नको ।
भवसागरिं या पचूं नको । वेळ रिकामा दवडुं नको ।
आपुलयाच्याने होइल ऐसें काम कुणाला सांगु नको ॥ ३ ॥
द्वेष कुणाचा करूं नको । अशुभ पराचें चिंतुं नको ।
ऋण काढुन सण करूं नको । अढीबाज तूं होउं नको ।
मृण्मय देहा घालुनी कपडे बैलोबापरी सजूं नको ॥ ४ ॥
ऐट उसनी आणुं नको । छान छोकिनें राहुं नको ।
साधेपण तें सोडुं नको । घात कुणाचा करूं नको ।
निजकृत्यानें जन निंदेला पात्र रिकामा होउं नको ॥ ५ ॥
स्त्रियांमधें कधि बसूं नको । मोह कुणाचा वाहुं नको ।
दोष कुणाचा पाहुं नको । आशापाशीं गुंतुं नको ।
घरचा पुरुष घरीं नसतां । घरीं कुणाच्या जाउं नको ॥ ६ ॥
दांभिक भक्ति करूं नको । शाब्दिक ज्ञाना सेवुं नको ।
अनुभवाविण बोलुं नको । निज वचनाला विसरूं नको ।
शिष्य आपुला झाला म्हणुनी नीच काम त्या सांगुं नको ॥ ७ ॥
उगिच तर्कटीं पडूं नको । वादविवादा करूं नको ।
भक्तिपथाला सोडुं नको । वारि कराया चुकूं नको ।
खोटें नाटें सांगुन कोणा पोट कुणाचें फुगवुं नको ॥ ८ ॥
नीच संगती धरूं नको । व्यसन कशाचें पाळुं नको ।
बेअब्रूनें चालुं नको । लीनतेला ! सोडुं नको ।
दासगणुचा ऐकुनि फटका तसें चालण्या चुकूं नको ॥ ९ ॥

## ९०. ( चाल—फटक्याची )

आजपासुनी मना गव्हारा ! ऐसें वागत रहा ।
खिळ घालुन तोंडास चक्षुनें मौज जगाची पहा ॥ ध्रु० ॥
बोल त्यासी बोलत जावें सरळपणानें सदा ।
निज वचनाला यत्किंचितही विसरूं नको तूं कदा ॥
( चाल ) नको वाहुं कुणाचा मोह मना ! मानसीं ।
कां उगीच जाउनी मृगजळ कवटाळिसी ।
गंधर्व नगरिचें वऱ्हाड का जमविसी ।

गप्पा ठोकित फिरूं नको ! आपुलि पायरी सोडुं नको ।
भवसागरिं या पचूं नको । वेळ रिकामा दवडुं नको ।
आपुल्याच्याने होइल ऐसें काम कुणाला सांगु नको ॥ ३ ॥
द्वेष कुणाचा करूं नको । अशुभ पराचें चिंतु नको ।
ऋण काढुन सण करूं नको । अढीबाज तूं होउं नको ।
मृण्मय देहा घालुनी कपडे बैलोबापरी सजूं नको ॥ ४ ॥
ऐट उसनी आणुं नको । छान छोकिनें राहुं नको ।
साधेपण तें सोडुं नको । घात कुणाचा करूं नको ।
निजकृत्यानें जन निंदेला पात्र रिकामा होउं नको ॥ ५ ॥
स्त्रियांमधें कधिं बसूं नको । मोह कुणाचा वाहुं नको ।
दोष कुणाचा पाहुं नको । आशापाशीं गुंतुं नको ।
घरचा पुरुष घरीं नसतां । घरीं कुणाच्या जाउं नको ॥ ६ ॥
दांभिक भक्ति करूं नको । शाब्दिक ज्ञाना सेवुं नको ।
अनुभवाविण बोलुं नको । निज वचनाला विसरूं नको ।
शिष्य आपुला झाला म्हणुनी नीच काम त्या सांगुं नको ॥ ७ ॥
उगिच तर्कटीं पडूं नको । वादविवादा करूं नको ।
भक्तिपथाला सोडुं नको । वारि कराया चुकूं नको ।
खोटें नाटें सांगुन कोणा पोट कुणाचें फुगवुं नको ॥ ८ ॥
नीच संगती धरूं नको । व्यसन कशाचें पाळुं नको ।
बेअब्रूनें चालुं नको । लीनतेला ! सोडुं नको ।
दासगणुचा ऐकुनि फटका तसें चालण्या चुकूं नको ॥ ९ ॥

९०. ( चाल—फटक्याची )

आजपासुनी मना गव्हारा ! ऐसें वागत रहा ।
खिळ घालुन तोंडास चक्षुनें मौज जगाची पहा ॥ ध्रु० ॥
बोले त्यासी बोलत जावें सरळपणानें सदा ।
निज वचनाला यत्किंचितही विसरूं नको तूं कदा ॥
( चाल ) नको वाहुं कुणाचा मोह मना ! मानसीं ।
कां उगीच जाउनी मृगजळ कवटाळिसी ।
गंधर्व नगरिचें वऱ्हाड का जमविसी ।

कुणी कुणाचें खचीत नाहीं ध्यानिं धरून हें पहा ।
'माझें माझें' तुज म्हणवीते माया दुर्धर महा ॥ १ ॥
भल्याबुऱ्यानें जग हें भरलें शोधुन पाही मना ।
नाहिं ठिकाणा म्हणून उरला दोष लावण्या कुणा ॥
दुर्गुण टाकुन निज हित व्हाया ग्रहण करीं सद्गुणा ।
कटु वचनें बोलुनियां दुखवूं नको कुणाच्या मना ।
( चाल ) शशि रवि-प्रकाशा आवड कशाची नसे ।
पाहिल्या किं तो तर चहूंकडे भरला असे ।
तूं ठेव बऱ्याबुरीं वर्तन अपुलें तसें ।
आपुल्या पुरतें आपण पहावें उगिच उतरंडिला ।
जाउं नको तूं कदा पराच्या बापा ! उतरायाला ॥ २ ॥
घाण सांचली घरांत तुझिया तीच काढ बा आधीं ।
अहंपणानें तोंड घालण्या जाइं न कोणामधीं ॥
निंदा स्तुतिवर लाव गऱ्हारा ! विवेक काटी आधीं ।
कोप खड्ग घेउनी करी तूं शांति कदा ना वधी ॥
( चाल ) आयुष्य तुझें हे जललहरीच्या परी ।
यासाठिं तयाचा विचार कर अंतरीं ।
दवडी न पळाला भज अक्षय श्रीहरी ।
दासगणु म्हणे पांडुरंग-पदिं रुंजी घालित रहा ।
भक्ति मधूला सेवित जावें, तें तुज तारिल पहा ॥ ३ ॥

## ९१. ( चाल—फटक्याची )

परमसुगर तो ज्ञान सांगतां वर्तन बघतां मैंद जसा ।
असा नराधम कोठुनि सेवी स्वानुभवाच्या ज्ञानरसा ॥ भाई० ॥ ध्रु० ॥
वर्तन बघतां गूखाडी जणुं डाममौल तो वर भारी ।
गर्तीपेक्षां सुंदर वेश्या सहज चमकते बाजारीं ॥ भाई० ॥ १ ॥
म्हणे परांसी 'जगत् अशाश्वत' आपण बांधी मठ, वाडे ।
भूतदयेचा टेंभा मिरवी करुनि पराचे धिंडवडे ॥ भाई० ॥ २ ॥
जेवी जाऊन घरीं पराच्या परिवारासह आपण सदा ।
येतां अतिथी चालत गेहीं चिमुट घालिना त्यास कदा ॥ भाई० ॥ ३ ॥

'जनक जननीची सेवा करणें महत्पुण्य हें' म्हणे जरी।
एक दिवसाहि सुना जाइना घरिं रडल्याविण म्हातारी ॥ भा० ॥ ४ ॥
नवरेपणाचा हक्क आपुला बाइल झोडुन गाजवितो।
साडि, चोळी फाटुनि गेल्या घेण्याकामीं मुग गिळितो ॥ भा० ॥ ५ ॥
सून नसे तरि 'सून सून' करी घरीं बसुनियां म्हातारि।
तीच मिळाल्या दैवबळें करी तिची शिकायत बाजारीं ॥ भाई० ॥ ६ ॥
जिवंत असतां सासुश्वशुरा सून सर्वदा अव्हेरिते।
मेल्यावरती थाट करुनियां येत वंदण्या पिंडातें ॥ भाई० ॥ ७ ॥
घरची बाइल आर्जव करितां आठ्या घालितो बहु भालीं।
परस्त्रियेच्या लाथा सोशी म्हणे फुलें तीं जणु पडलीं ॥ भाई० ॥ ८ ॥
पती बोलतां टाकुनि थोडें फुणफुण करुनी नाक पुशी।
तीच कुलटा बहुप्रेमानें जाराचे चाबुक सोशी ॥ भाई० ॥ ९ ॥
होत वेगळा भावांमधुनी भांडण करुनी पहा घरीं।
ऐसें असतां समाज-स्थापन करण्याची मनिं हाव धरीं ॥ भाई० ॥१०॥
पुराण, कीर्तन, आरति धूपारति करित राउळीं फिरे बया।
खरा देव जो पति तो बैसे घरीं भाकरी भाजाया ॥ भाई० ॥ ११ ॥
भावहि आला खोट्याला तो सत्यधर्म ना कुणा पटे।
होतिल पोरें कोठुन सांगा नटव्याला जरि रोज नटे ॥ भाई० ॥ १२ ॥
दासगणु म्हणे यासाठीं तुम्हि विचार कांहीं मनीं करा।
सार शोधुनी सत्य पथें जा, श्रीहरिचे ते पाय धरा ॥ भाई० ॥ १३ ॥

### ९२. ( चाल—फटक्याची )

बेबंद जाहले लोक माजले फंद अनावर।
चालिरितीचा ठाव मोडला कठिण समय फार ॥
खरा धर्म तो पार बुडाला दया नीति मेली।
अस्सल जाउन नकला पहाणें आलें पहा भालीं ॥
राजे अमीर उमरावांना हीन दशा आली।
वाटूं लागल्या गोड जनांना नव्या नव्या चाली ॥
( चाल ) वेदाचे झाले मातेरें कथुं कुठवर।
सांचली धूळ भारत भागवतावर।

ढुंकून पाहिना कुणी तया तिळभर।
नाटक कादंबऱ्या लावण्या गोष्टि चटकदार॥
ज्याच्या त्याच्या बगलेंत घुसल्या दिमाख बहु थोर ॥ १ ॥
जगद्गुरूचीं पिठें निघालीं करण्या संचार।
उपदेशाचें नांव कशाला? दृष्टी धनावर॥
धर्मग्लानी कितीक झाली हें न तया समजे।
महावस्त्र नी थोर पुढीची गोष्ट मात्र उमजे॥
आद्य जगद्गुरू आतां कशाचे दिसातिल या नयना।
जो तो आपणां मानितसे मी जगीं दीड शहाणा॥

(चाल) फाटलें असे जें तेंच अधिक फाडिती।
त्यामधेंच आपुलें मोठेपणा दाविती।
पाटाव पटेना चिंध्यावरती प्रिती।
समाजरूपी पुरुष ग्रासिला क्षयें अनिवार।
एकी शक्ती लयास जाउन झाला कमजोर ॥ २ ॥
गुजराथेमधीं मोल घेउनी मृतार्थ जसे रडती।
तसे पुराणिक कथेकरी ते कंटशोष करिती॥
गांवोगांवीं ते साधु जाहले बाह्य वेषधारी।
वैराग्यासी मुळिंच वाकडें चित्त न अविकारी॥
परमहंस संन्यासी यांचा सुकाळ बहु झाला।
दंडकमंडलु ‘त्याज्य ग्राह्य’ हा विचार मावळला॥

(चाल) भगव्याची केलीं कोट झगे जाकिटें।
देतात पदींच्या बुटास रंगीं पुटें।
पाहतां उपाधी मुळिं न मठाची सुटे।
पुसतां म्हणती देह प्रारब्ध हें टाकिल्या न सार।
भोगुनि तें पाहिजे निवटिलें म्हणुनि आम्हीं थोर ॥ ३ ॥
वारकरी ते बहूत झाले कशाचि ती वारी।
हेवा, मत्सर, लोभ, मोह हे बसले कीं द्वारीं॥
संसारींचें चित्त उठेना बांधितात वाडे।
घोडे टांग्या जोडुनि फिरती खात सदा पेढे॥

उत्सवाचे मीष करूनी पैसा सांवरिती।
मान-हानि ती किमपिहि होता फिर्यादी करिती ॥
(चाल) संतांनि तुम्हां जो घालुन दिघला धडा।
वळविणें तोच, आयु पाण्याचा बुडबुडा।
ह्या कष्टमयी भवडोहिं कुणी ना बुडा।
हरिनामाची कांस धरूनियां शोधित जा सार।
दासगणु म्हणे तनू नराची नच वारंवार ॥ ४ ॥

## ९३. (चाल—फटक्याची)

दुष्ट जनांची खाण न कोठें जासि कुठें त्या हुडकाया।
तोच समज खलचित्त नराधम असे, दिसे तुज ज्या ठाया ॥ ध्रु० ॥
परोपकारी विन्मुख बेटा जेथ नीतिला मुळिं फाटा।
त्रास पराला होईल जेणें अशाच शोधी नित वाटा ॥
उणें पराचें मनीं आवडे जणुं सडक्याला गिध पक्षी।
स्त्री पुरुषामधिं विपट आणाया निज यत्नानें जो लक्षी ॥
(चाल) निज दुर्गुण ना मुळीं कळे। उणें पराचें काढि बळें।
परोत्कर्षें सदा जळे। आपण शहाणा लोक खुळे।
वैराग्याची ऐट उसनी लांब लांबशा वदे गोष्टी।
पाहूं जातां आपण घेतो विषयासंगे झटापटी ॥
अशा लक्षणें युक्त असे जो संगति त्याची जगिं वायां।
दासगणु म्हणे फुटकी नौका कारण उलटी बुडवाया ॥

## ९४. ॥ कटाव ॥

कुणी म्हणे हो वर्ग स्त्रियांचा। करणें आधीं शिक्षित साचा।
तरीच होईल लाभ सुखाचा। कोणी म्हणतो देशी धंदे।
वाढवुनि रमुं त्याच्या छंदें। कुणि कुणि इतिहासाचे मुद्दे।
शोधी, कुणि म्हणे अवघ्या जाती। एक करूनी वागूं जगती।
टाळूं आपली फद्द फजिती। कोणी शोधी मूगभोला।
कोणी हुडको ती गृहमाला। कोणी जाती विलायतेला।

ज्ञान तिकडचे मिळवायाला। कोणती म्हणती अपुली शेती।
गेली मातिंत आणूं वरती। कुणि कुणि व्यापारामधें रमती।
दैनिक पत्रें, कुणी मासिकें। कोणी रचितो अभिनव चुटके।
गोष्टी, कादंबऱ्या नाटकें। कोणी ख्याली कुणि बदफैली।
कुणी सिनेमा काढुन अपुली। तुंबडि भरितो, कोणी सरकस।
कोणी सोडावाटर फसफस। कोणी गायन, कोणी वादन।
कुणि संसारी, कुणी भीकारी। ऐशापरीचे ढंग निघाले।
सत्य शोधण्या कुणि न भुकेले। म्हणुन गणु म्हणे वायां गेले॥

९५. ( चाल—फटक्याची )

कोठवरी हें दैन्य पाहसी आर्यमहीचे श्रीरंगा।
दीनदयाळा मेघश्यामा निजूं नको रे हो जागा॥ ध्रु०॥
माधुकऱ्यांची संख्या वाढे अन्न मिळेना पोटभरी।
त्यातें दिडकी द्याया जातो प्राण जगाचा सख्या-हरी॥ १॥
नाटकाला गर्दि भयंकर शनिवार बुधवार होय तोबा।
गरीब म्हणती, ' आम्ही उपाशी ' ह्या न ऐकती कुणि बोंबा॥२॥
महर्गतेनें कमाल केली झालि जवारी दहा चिपटीं।
नाटकाचे तिकीट घेतो वधू जरी घरिं कर आपटी॥ ३॥
व्याख्यात्यांचा सुकाळ झाला कोणी करीना खरी कृती।
नित्य लेखण्या व्यर्थ पाजळुन ढवळ्यावर काळें करिती॥ ४॥
शहाणे सुरते भांडुं लागले वर्मैं काढुन परस्परीं।
फुकट जगाला मौज जाहली, ती मी वानूं कोठवरी॥ ५॥
अवघा समाज एकचि व्यक्ति अनंत व्यक्ती अवयव ते।
अवयव-धर्मीं दुही माजल्या सौख्य कुठुनि मग देहातें॥ ६॥
गृहिणि घराला भूषण ज्या कीं जगा विशेषण सगुण सती।
त्याच पतीला घेउनि संगे टेनिस खेळाया जाती॥ ७॥
फ्रेंच कटानें जर्जर केली पुरुषपणाची खूण मिशी।
टिकली होती अर्धी मुर्धी तिज फॅशननें दिली फांशी॥ ८॥
" ओठावरती मिशा कशाला वागविता ? " हे म्हणण्याला।
तरुणपिढीनें ठेविलि न जागा, भांग स्त्रियासम डोक्याला॥९॥

जिकडे पहावे तिकडे देवा! घाण सांचली अनावर।
करूं कशाला तिजला उघडें ती झांकावी हेंच बरं ॥ १० ॥
दुही, सिनेमा, रेसेस्, नाटक यांची बाजू बळावली।
तेणें शिरलें दैन्य घरोघर समाज बनला बहु ख्याली ॥ ११ ॥
आधीं समाज दुबळा आमुचा नको तयाची करुं दैना।
दासगणु म्हणे आर्यमहीची येवो मानसिं तरि करुणा ॥ १२ ॥

## ९६. ( कटाव )

प्रवाळ, कीटक, डास, डोंगळा। पिसूं, चिलट, ढेकूण, मुंगळा।
उवा, अळी, कांतीण, पिसोळा। कोळि, काजवा, मुंगो, माशी।
शेपकिडे गोचिड गोमाशी। पतंग झुरळें नागतोडे।
पिंगुळ भुंगे फुलपांखरे। होळ खरपुडी पाल गांधिण।
गोम वाळा आणि कुंभारिण। रक्तकिडे मखमली मृगाचे।
घुले इंगळ्या दो जातीचे। विंचू रेशिम कीटक सरडा।
सर्प खडी धामीण माकुडा। कवडच्या डोम्या नाग अजगरी।
सुसरी कांसव मासा काळा। खेकड दर्दुर डोमकावळा।
हंस गरुड पारवा कबूतर। गीध घार कावळा नि तित्तर।
चातक भारद्वाज पिंगळा। काक साळ्या चिमण्या बगळा।
सुतार टिटवी उलूक होला। मैना पोपट मोर कोकिळा।
शहामृगें लांडोर कोंबडी। श्वान घुशी उंदीर मांजरें।
घोरपडी मुंगूस वानरें। ऊद लांडगा तरस माकडें।
अस्वल कोल्हा हत्ती गेंडे। रानसुकर मृग व्याघ्र केसरी।
मेष महिष आणि बोकड बकरी। काळवीट नळनीळ रोही।
बैल सांबर घोडे गायी। ससा गाढव उंट खेचरें।
इत्यादिक या योनी बारे। गणित करितां लक्ष चौऱ्यांशीं।
त्या भोगुनियां नरदेहासी। जन्मलास तूं ये अवनीसी।
म्हणुनि गव्हारा। करी विचारा। लुब्ध न होई या संसारा।
मायामय हा जगत्पसारा। सौख्य खरें नच, आभास सारा।
जन्म–मृत्युचा दुर्धर फेरा। चुकवायासी उपाय हाची।
धरी कांस या हरिनामाची। दासगणु हा म्हणुनी यांची।

वारि करावी पंढरीची । नमा पाऊलें विठ्ठलाची ।
भीमातटवासिया हरीची ॥

## ९७. सुभाषित श्लोक

१

थोरांचे जितुके तयावरि असे सत्ता जगाची खरी ।
गंगेला बुध भूप विप्र खलही, येऊन पाणी भरी ॥
सूर्याचीं किरणें समान सकलां, मेघोदरीचें जल ।
केली कां महिनें कधीं निवड ती, हा सुष्ट वा हा खल ॥

२

सद्वस्तू अति सोवळी खलजना ती भेटते ना कधीं ।
बैसाया कधिं इच्छि का कुलवधू वारांगनांच्या मधीं ॥
राहे लांबचि राजहंस विपिनीं कागावली पाहतां ।
देतां ये पयपात्र तें नच कधीं बा दारुड्याच्या हतां ॥

३

या साऱ्या असती कला नच बऱ्या सन्मार्ग लावावया ।
केरा झाडित शोधिती म्हणुन का ती योग्य पूजावया ॥
जाणा गायन हें करील जगतीं चैनी समाजाप्रती ।
मद्याची चट लागल्या पय, खवा कोणी न वाखाणती ॥

४

सर्वत्र मान मिळतो जगतीं जयाला ।
भूपें निरर्थक नये करूं कैद त्याला ॥
सन्माननीय जन कंठमणी गणावें ।
प्रत्येक कृत्य-प्रति त्या पुसुनी करावें ॥

५

उसाजवळ बैसुनी मिटिल काय कोल्हा सुखा ।
त्यजी वृषभ कां कधीं हरित वर्णशा बाटुका ॥
कृशानुवरि ठेविल्या सहज तूप ते पाघळे ।
तसेंच तरुणांसवें तरुणि व्याप्त कामानळें ॥

६

साधूचा सहवास योग्य मुळिं ना त्याच्या पडा ना भरीं।
फाडाया पतिपत्नि प्रेम-पट हो ती कातरी साजिरी।
यासाठीं त्यजणें तया घरिं अल्या चालून त्या वंदणे।
जेवाया झणिं घालुनी न ठेवितां वाटे पुढें लावणें॥

७

साधूचे गुण सर्व एक दिसती ठायीं तुझ्या रे उंसा।
घालोनी चरकांत ही रगडिल्या, तूं अर्पितोसी रसा॥
कोणी चावुनि बाकुसास तुझिया फेंकोंत बापा पथीं।
त्याच राग न, थोर जे कधिं न ते मोठेपणा टाकिती॥

८

जो थोर साहति सदोदित ते छळाला।
ऐरावतीप्रतिच अंकुश, ना खराला॥
हेमाप्रतीच बसती नित वन्हिडाग।
की पंजरार्थ शुक, ना गिध, घूक, काग॥

९

वर्षाऋतूंत घन भूवरि वर्षतात।
स्वात्यंबुलाच परि चातक सेवितात॥
तैसे वदोत कुणि कांहिं अनेक लोक।
युक्तास घेउनि सुखें इतरास टाक॥

१०

त्याचा तयास कधिं दुर्गुण तो कळेना।
वाटे कुठें स्वरव कर्कश रासभांना।
ते उच्च काढुनि रवा जरि गर्जतात।
ज्ञाता कदा न परि ढुंकुनि त्या पहात॥

११

तेजी, मृदू, चपल, सुंदर, शीत, शेष।
ना ठेवितां परि तया कुणि संग्रहास॥

त्या ठिकाणीं चांगलेपणा कमी असण्याची शक्यता अधिक. असा सिद्धान्त त्यांनीं आपल्या मनाशीं बांधला होता. पोलिसांतील नोकरींत आलेला अनुभव या सिद्धान्तास अनुकूल असाच होता.

## १२. दंभाचा तिरस्कार :

शिरडींत असतांना या दृष्टीनें एक विशेष प्रसंग घडला. श्री. सुंदराबाई क्षीरसागर या नांवाच्या एक बाई श्रीसाईबाबांची सेवा करण्याच्या निमित्तानें शिरडीस येऊन राहिल्या होत्या. वयानें तरुण, रूपानें नीटस व परिस्थितीनें गतभर्तृका असल्यानें लोकांच्या मनामध्यें या स्त्रीविषयीं विशेष कुतूहल असणें, स्वाभाविक होतें. श्रीसाईबाबांची सेवा अनेक तऱ्हांनीं करण्याचा त्या प्रयत्न करीत. श्रीसाईबाबा जात असतील त्या रस्त्याची व मशिदीची स्वच्छता राखणें, त्यांचीं वस्त्रें प्रावरणें निर्मळ धुणें, भांडीं घासणें इत्यादि कामें श्री. सुंदराबाई मोठ्या तत्परतेनें करीत. साईबाबांना मात्र हा सर्व प्रकार रुचत नसे. ते बाईंचा फार राग राग करीत. शिव्यागाळ तर नेहमींचीच होती; पण क्वचित् बडवूनहि काढीत. या सर्वांतूनहि बाईंनीं आपला उपक्रम सोडला नाहीं. लोकांच्या मनावर त्यांच्या या निग्रहीपणाचा फार परिणाम झाला. साईबाबांच्या त्या एकनिष्ठ भक्त आहेत, अशी लोकांची दृढ भावना झाली. लोक त्यांना फार मानूं लागले. आज शिरडीला आरती, धुपारती, काकडा-आरती, चावडी, रथाची मिरवणूक इत्यादि जो सोहाळ्याचा नित्यक्रम आहे, तो सर्व या बाईंनींच कार्यवाहींत आणलेला आहे. लोकांच्यावर छाप कशी ठेवावी, त्यांना श्रीसाईबाबांच्याविषयीं अनेक गोष्टी रंगवून फुगवून कशा सांगाव्या, पूजेच्या थाटामाटाकरितां लागणारीं निरनिराळीं साधनें, उपकरणें, साईबाबांना अर्पण करण्यास लोकांना कसें प्रवृत्त करावें, ही विद्या या बाईंना चांगलीच अवगत झालेली होती. भक्तीच्या बाह्यांगाकडे आकर्षित होणें, पूजेच्या डौलदार पसाऱ्यांत रंगून जाणें, हें मानवी मनाला स्वाभाविक असेंच आहे; परंतु इष्ट मात्र नाहीं. बाह्यांगांत-

रंगणें वा सहज साध्य होणारें हें बाह्यांग म्हणजेच खरी भक्ति समजण, हें वस्तुतः अत्यंत अनिष्ट असल्यानें श्रीदासगणूंना मात्र हें सर्व अनवश्यक वाटे. लोक तर या बाईच्या इतके भजनीं लागले होते कीं, ते त्यांना राधाकृष्ण आई म्हणत. त्यांची आज्ञा शिरसावंद्य मानीत. लौकिकाच्या या वेडांतून पुढें न लिहिण्यासारख्या इतरहि अनेक गोष्टी या ठिकाणीं होऊं लागल्या.

श्रीसाईबाबांच्यासारख्या वैराग्यभरित, निरिच्छ सत्पुरुषाच्याजवळ अशा तऱ्हेचा पसारा असावा, हें बरें न वाटून दासगणूंनीं या गोष्टीस विरोध करण्यास आरंभ केला. बाईच्या दिसणाऱ्या आणि मुळांत असणाऱ्या स्वरूपामध्यें वेगळेपणा आहे, अशी त्यांना आरंभींच शंका आली होती; पण आतां त्यांच्या सूक्ष्म दृष्टीला अनेक निंद्य प्रकार आढळून आल्यानें त्यांना स्वस्थ बसणें शक्य नव्हतें. लोक तर बाईच्याविषयीं कांहींहि शंका काढणें हें नास्तिकपणाचें मानीत. त्यामुळें श्रीसाईबाबांच्याकडे येणाऱ्या सर्व मंडळींत श्रीदासगणू हेच पुन्हां एकटे पडले. बडी बडी सर्व मंडळी एका बाजूस म्हणजे राधाकृष्ण आईच्या पक्षाची व एकटे श्रीदासगणू एका बाजूस असें द्वंद्व शिरडीस उत्पन्न झालें. प्रत्यक्ष श्रीसाईबाबाच श्रीदासगणूंना अत्यंत अनुकूल असल्याचें दिसत असल्यामुळें विरोधी पक्षीयांना कांहीं विशेष करतां येण्यासारखें नव्हतें. मनुष्यस्वभावाची चांगली पारख आणि चाणाक्ष स्वभाव यांमुळें श्री. नानासाहेब चांदोरकर मात्र श्रीदासगणूंच्याच मताचे होते. या सर्व प्रकरणाचा आपल्या पूर्वीच्या संवयीप्रमाणें उपहास करण्यासाठीं श्रीदासगणूंनीं एक विडंबनात्मक काव्य लिहिलें. त्याचा प्रसारहि झाला. या काव्याचें वृत्त समजतांच शिरडीस येणाऱ्या एका फार मोठ्या श्रीमान् गृहस्थानें श्रीदासगणूंना बजावून सांगितलें. " याद राखा. आईच्याकरितां मी तुमच्यावर अब्रूनुकसानीची फिर्याद करीन आणि त्यासाठीं कितीहि खर्च आला तरी शेवटपर्यंत लढेन. श्री. चांदोरकरांचा वशिला वरच्या कोर्टांतून तुमच्या कामीं येणार नाहीं, हें पूर्ण

पंथाचा भरण्यास केर आणिती श्रृंगारुनी का करी ।
रत्नाचा बहुमोल खोविति तुरा का गाढवाच्या शिरीं ॥

२४

नेल्या नृपें लुटुनियां धनधान्य सारें ।
वा लागला भिजविण्या तनु मेघ बारें ॥
जायेस वा पति तिचा धजतां छळाया ।
फिर्याद ती हरिविणें स्थळ ना कराया ॥

२५

केसांनी बघुनी वयास अपुलें कृष्णत्वही त्यागिलें ।
लक्षावें विषयास ना म्हणुनि ते चक्षूहि मंदावलें ॥
ताठा टाकुनि वाकली बघ तनू सर्वांस वंदावया ।
चित्ता ! टाक अतां तरी भटकणें शोभे न जे या वया ।

२६

क्रोधापरी मुळिं न दुर्गुण या जगांत ।
क्रोधेंच होय धनमान–सुखास घात ॥
देवाधिदेव परि शंकर तो स्मशाना ।
बैसावयास बुध कारण तोच जाणा ॥

२७

जेथें प्रेम तिथेंच मानव पहा हट्टाप्रती पेटतो ।
मातेच्या जवळीच पल्लव शिशू ओढून आक्रंदतो ॥
अन्याच्यां जवळी सदा वदन तें केवीलवाणें करी !
नाचे गौळणिच्या पुढें, परि घरीं फोडी दुधाणें हरी ॥

२८

वृथा या वेदांता वदुनि वदनाते न शिणवी ।
तृषा तान्हेल्याची मृगजळ जगीं काय शमवी ।
शिऱ्याने बोलाच्या उदर भरते का कधितरी ।
स्त्रियेला चित्रींच्या कधि न धरिता ये निज करीं ॥

२९

उदार धन अर्पिता कृपण फार संतापतो।
बघून परकामिनी जळफळे मनी जार तो।
निरोगजन पाहता सुख न होय वैद्या परी।
नसेल झगडा तरी वकिल मोडि बोटे घरी॥

३०

धनानें जगी ना कधी मत्त व्हावें।
अती आदरे माधवातें भजावें।
कधीं ना कधी काळ नेणार साचा।
नये संगती लेश या वैभवाचा॥

३१

निष्ठा एकविधा कुठेहि बसता निष्ठाच ती पावते।
वस्तूच्या जवळीच केवळ पहा सामर्थ्य ना राहते।
आहे वस्तु महीपरी निजबळें बीजा सदा पोषवी।
थोड्याचे करि फार ना बदलिता त्या त्या गुणा वाढवी॥

३२

शैवा जो शिव वैष्णवा हरि गमे वेदांतिया ब्रह्म जो।
बौद्धा बुद्धहि जो खुदा हि यवना अर्हन्त जैनास जो।
कर्ता जो गमतो प्रमाणपटुता जे कर्म मीमांसका।
खिस्त्या येशुहि तोच हा गणु म्हणे ध्या रुक्मिणी नायका॥

## ९८. रंगपंचमीचा पोवाडा

सवाई माधवराव पेशवे पुण्यप्रतापी अवतरले। श्रीमंत झाले 'श्रीरंग' पुण्याला गोकुल वृंदावन केलें॥ शके सत्राशें पंधरा सालीं प्रमादि संवत्सर असतां। चैत्र शुद्ध प्रतिपदा तिथीसी रवि मध्यान्हा प्रति येतां॥ शहर पुण्यामधें आनंद झाला रंग उडाला अनिवार। राहत्या वाड्यामधें भरविला श्रीमंतांनीं दरबार॥ सजविले हत्ती रंगवुन सोंडा अंबाऱ्या बांधून वर। भगवा झेंडा हौद्यावरती, घोड्यावर घोडेस्वार॥ तमाम मागें, पथके, कारकुन, येकांडे, शिलेदार। मानकरी मुत्सद्दि पायदळ कारभारि आणि सरदार॥

भरविले हौद रंगानें रस्त्यावरी।
मोतिया, कुसंबी, लाल, निळा, केशरी।
खिडक्यांतुन पहाया मौज उभ्या सुंदरी।
दणदणति नगारे अगणित उंटावरि।
लागले झड्डू चौघडे ढोल झल्लरी।
सारंग आळविति गुरव सनइच्या सुरीं॥

ताशे, मर्फे, शिंग, तुताऱ्या, नादानें अंबर भरलें। होलारांचा प्राकृत बाजा बिन्नीच्या पुढती चाले॥ स० १॥

पाटिलबावा महादजी शिंदे पदवि अलीजा बहाद्दर। महा मुत्सद्दी फडाणिस नाना बृहस्पतीचा अवतार॥ या दोघांनीं करून मनसुबा बेत ठरविला रंगाचा। रंगामिषें मेळाच जमविला दख्खनच्या सरदारांचा॥ ऐपतिप्रमाणें हुकूम झाला रंग कराया अवघ्यांसी। एकाहुन एकांनीं केली बरी तयारी बहु सरशी॥ सखलादि रुजामे पसरून वरती राजमार्ग ते भूपाविले। चौकाचौकावरुन कमानी मखमलीच्या आंतुन शेले॥

आनंदसागरीं तईं बुडालें पुणें।
द्वारास बांधिली अंब्याचीं तोरणें।
कांहींच कशाचें नव्हतें बुधहो! उणें।
घातले सडे मिळवून मलय चंदनें।
आकाशीं उडती चास वाम बाजुनें॥

कडेकोट स्वारिची तयारी सरंजाम अवघे आले। बाजार बुणगे त्या समयाला सादर व्हाया नच चुकले॥ स० २॥

वीज पयोदीं जशी लकाके तशी गजावर अंबारी। आरासपाणि ती खालीं, तियेच्या झूल मनोहर जरतारी॥ मौक्तिक माला कंठिं गजाच्या सुवर्ण तोडे पायांत। सुवर्ण मुठिच्या चिराफदानी होते अलंकृत गजदंत॥ सबळ पुण्य शिवछत्रपतीचें अवघ्यांच्या कामीं आलें। विप्र मराठे भारतीय हे वीर म्हणोनी नाणवले॥ छत्रपतीच्या नांवें मुजरा करून भगव्या झेंड्याला। सवाइ माधव प्राण पुण्याचा

धानि अंबारीमधें बसला ॥ सफेद पोषाख गहिना हिऱ्याचा कंठिं मनगटीं झळकत । शोभे पेशवा नक्षत्रांमधिं इंदु जसा काइ गगनांत ॥

कुणि म्हणाति धन्याची दृष्ट खचित काढवा ।
किति घेति बायका अलाबला तेधवां ।
बहु सौख्य वाटलें नानांच्या तैं जिवा ।
कीं प्रदीप्त झाला भटवंशींचा दिवा ।
हा सवाइ माधव भाग्यशालि पेशवा ॥

जहांमर्द सरदार शिपाई रणनवरे कीं जणुं सजले । एकादिल अवघ्यांचा म्हणुनी हें वैभव दृष्टिस पडलें ॥ स० ३

फडणिस नाना, फडके, रास्ते, पारसनिस, विंचुरकर । परशराम भाऊ पटवर्धन विश्वासाचा सरदार ॥ पेठे, त्र्यंबकराव परचुरे, नारोबा अभ्यंकर । चंद्रचूड, बोकील, पानसे, भिडे, प्रभूणे, शालुकर ॥ बापु गोखला वीर धुरंधर, ढमढेरे मोजुमदार । काळे आप्पा, बळवंत मेहेंदळे, बिन्नीवाले बिन्निवर ॥ भावे, खासगीवाले, थत्ते, बुंदेले, पाटणकर । शूर शितोळे, धायबर, भोयटे, जरिपटक्याचा होळकर । दाभाडे, अंग्रे, धुळप, चौगुले, घोरपडे, निंबाळकर । राजे रघुजी, पवार, माने, महाडिक मनिंचे दिलदार ॥

यादव, शिर्के, जाधव, निकम, सावंत ।
समशेर बहाद्दर मस्तानीचा सुत ।
चालली स्वारी डौलांत झुकत झुकत ।
पुढें छडीदार चोपदार ललकारत ।
मल्लाची जोड लेजीममधें खेलत ॥

दो बाजूनें गुलाल उडाला खंडोगणती मण पल्ले । धुवाधार अनिवार मार तो रंगाखालीं जन न्हाले ॥ स० ४ ॥

घेऊन वाडा उजवा आली स्वारी मग बुधवारांत । तेथें झाली गोरगरीबां होनांची बहु खैरात ॥ रविवारामधें स्वारी येतां थाट साहुनीं बहु केला । मोहरा पुतळया उधळुन वरतीं नजराणे श्रीमंताला ॥ हरीपंत तात्याचा झाला रंग केशरी जोराचा । रास्ते पेठेमधून रस्ता धरिला मग वानवडीचा ॥ आले समोर महादजी

शिंदे कर बांधुनियां दस्तीनें। कुर्निसात श्रीमंता केला डोळे भरले प्रेमानें ॥ मुख्य स्थानीं सवाइ माधव मोहराच्या गादीवरती। उजव्या बाजुस फडणिस नाना दौलतिची ज्या कलम हातीं ॥

सरदार अवांतर आपापल्या मिसलीनें।
सदरेस बैसले घालुन वीरासनें।
हे सर्व अमंत्रित शिंद्याचे पाहुणे।
झाले अहेर अवध्यां किती वानुं वाणिनें।
खुशि सर्व जाहले नर्तकिच्या गायनें।

मृगमदमिश्रित रंग तेथिंचा हार तुरे घेऊन उठले। अस्तमानची झाली वेळा, शहराकडे मोर्चे फिरले स० ॥ ५

* * *

कथा ही वर्णित बखरींत वाचुन पुणें पहाया मन हुरहुरलें। येथें येऊन पाहूं जातां तेंच चित्र बहु हिरमुसलें ॥ हाय हायरे ! हे दुर्दैवा शोचनीय ही स्थिती किती ?। ज्या शहरामधि रंग उडाला तेथ उडे सांप्रत माती ॥ विप्र मराठे ज्या शहरींचे एक ही ख्याती दूरवर। होती; तेची बसूं लागले परस्परांच्या उरावर॥ नाहीं शेंडी विप्रवराच्या डोइस नटव्यासम केस। पुरुषत्वाची खूण मिशी जी तिचाच आला बहु त्रास ॥ गजाऐवजीं बग्या, मोटार, बायसिकली रस्तोरस्तीं ॥ घोडे मेणे तशा पालख्या नच कोठें दृष्टीं पडती ॥

मावळलें शौर्य पोकळ वाद माजला।
सर्वत्र पुस्तकी ज्ञानासी पूर आला।
अनीतिचा जाहला जोर, भाव दारुला।
भेद ना गतिकंचनीमधें राहिला।
डोइचा पदर बायांनिं खालिं टाकिला।

चहाकाफिचीं झालिं दुकानें शक्तीचें ठाणें उठलें। देशामध्यें किति संपत्ति हें नोटांनीं सांगितलें ॥ स० ६

सऱ्या गोट पाटल्या आतां ना, पोलकीं स्त्रियांच्या अंगांत। विनयाचा तो खून जाहला, छिचोर चाली सर्वत्र ॥ उंच उंच पोषाख बुडाले बूट पाटलुनिवर भक्ति। जिंजर सोडा वाटर लिमलेट

पाव बिस्किटें बहु खपती ॥ दरबारांचें नांव कशाला फुकट सभा त्या बहु होती । नित्य लेखण्या व्यर्थ पाजळुनि ढवळयावर काळें करिती ॥ अस्तमानिं ते देवदर्शना खंडीमाजी एकराति । लायब्ऱ्यांतुन अतिशय गर्दी, कुणि न पुराणा विचारिती ॥ मर्दुमकी ती मागें सरली, समाज झाला बहु दुबळा। द्वेषघुशीनें पोखरला कीं एकीचा सौख्यद किल्ला ॥

देवतेपरी पूजन जिथें गाइचें ।
तेथेंच उघडले कत्तलखाने तिचे ।
काढिती विकाया तूप तिच्या चर्बिचें ।
ना मिळे मुलांना दूध किमपि धेनुचें ।
वाटोळें झालें धर्मरीतिभातिचें ।

अवर्षणावर अवर्षणें तीं रोग सांथिचे बळावले । रद्दी म्हणुनी अतार-सदनीं धर्मग्रंथ येऊन पडले ॥ स० ७ ॥

प्रौढविवाहें तान खरोखर बालविवाहावर केली । तरुण जोडपीं विषयसुखाच्या नादानें बहु क्षयि बनलीं ॥ मी आणि माझा नवरा याविण नको कुणाचा मुळिं वारा । शिक्षण फल हें, घरंदाज हा शब्द जाहला ठार खरा ॥ विनयविघातक टेनिस कोर्टें स्त्रीपुरुषांनीं बहु भरलीं । विशंक होउनि स्वैर वृत्तिनें खेळुं लागलीं चेंडुफळी ॥ सलकाडि पौंचाऐवजि आतां घड्याळ काताडिपट्टयांत । तरवारीच्या विळया जाहल्या आला काळ बहु विपरीत ॥ हमरस्त्यानें चमकाति पाट्या वकील डॉक्टर लोकांच्या । सुशिक्षितांची लग्नां गर्दी पुनर्विवाहित विधवेच्या ॥

बहुतेक जाहली नष्ट धर्मवासना ।
पापानें महिस व्यापिलें, पिके पीक ना ।
ही अशी दशा कां केलिस नारायणा ! ।
कां नये तुला वा करुणा करुणाघना ! ।
कधिं भारतियांची फेडशील पारणा ।

धनी पुण्याचे निघून गेले फिरंगि वाड्यामधिं शिरले । जिकडे तिकडे पाडापाडी ढीग मातिचे पथिं पडले ॥ स० ८ ॥

इतक्या मध्यें आली बातमी धनि सांप्रतचे येणार । आज दुपारीं लाट गव्हर्नर बुधवारांतुनि जाणार ॥ म्हणुनि धन्याला पाहण्या गेलो तों तेथें कांहिंच नाहीं । नाकेबंदी जिकडे तिकडे जणुं हरताळ पडली काई ! ॥ वाजुं लागल्या शिट्या शिट्यावर, काळे पोलिस चौफेर । वामकराचे मुजरे होता धांवत आली मोटार ॥ नृप-दर्शन-लालसा-नगावर मम बुद्धी होती चढली । ती पोलिसनें ओढुनि मागें उलट मुखामधिं भडकाविली ॥ बरें रे बाबा दुरुन पाहतों धनी तेवढा मज दावा । तोहि म्हणे, मज ठाऊक नाहीं कुठुन तुला मग सांगावा ? ॥

मोटारिमधें ते दोन तीन पाहिले ।
बसलेले फिरंगी लाट नाहिं उमगले ।
ते आगगाडीचे गार्ड मला वाटले ।
येणार धनी असतील मागुनी भले ।

परि कळले कीं त्यांतच होते लाटगव्हर्नर धनि अपुले । हाय हाय रे ! हे दुर्दैवा ! धनी असे का अम्हां दिले ॥ स० ९ ॥

हे मत्कविते ! तुला न आतां नृप वैभव तें वर्णाया । मिळेल बाई ! गोदातटिं तूं चाल हरीचे गुण गाया ॥ कालचक्र हें विपरित फिरलें, दोष कुणासी लावावा । धन्यलोक पूर्वीचे गेले भोगुन स्वातंत्र्याचि हवा ॥ अतां विठोबा ! तुला विनंति ही अमुची जोडु नकर । भरत-भूमिचा झणीं करावा चहुंमुलुखीं जयजयकार ॥

फिर्याद कराया स्थल देवा ! तुजविना ।
नाहींच आम्हांला उरलें सच्चिद्धना ! ।
तूं सर्वशक्ति जगचालक मनमोहना ! ।
पूर्विच्या कवींपरि भाग्य मदिय खचित ना ।

फंदि प्रभाकर जोशिबुवांनीं स्वराज्य रंगासी लुटिलें । दासगणूला परवशतेच्या बेरंगा बघणें आलें ॥ स० १० ॥

## ९९. उसाचा पोवाडा

हे उसा तुझा भरंवसा अम्हां फारसा । होता कि परी दिधला दगा तूं कसा ॥ आलास जियेच्या पोटीं तिला नाशीलें । ओवाहि पिकेना

सत्त्व मुळिं न राहिलें ॥ केलेस जननीचे हाल खला यापरी । त्या तुला दुजाची कींव कुठुन अंतरीं ॥ पाहून तुला विभवाचि उपजते अशा । परिणाम तियेचा होय जगीं दुर्दशा ॥ तव ठायिं नांदते गोडी सूज्ञ सांगती । परि मला तुझ्याहुन अफू बरी वाटती ॥

अफु काळि कडु एकदांच घेते प्राण । देइ मरण ।
तूं सुबक गोड पांढरा करिशि हैराण । नित दैन्य ।
दिसतोस बाहेरुन गुणी परी अवगुण । त्यजसी न ।

ना पुष्टि दिली केल्यास मोकळ्या नसा । तें दुःख नये सांगतां मनाला पुसा ॥ १ ॥

केलि तुला लावण्याची मी तयारी खरी । पासासाठीं घातल्या खेपा ओरशेरा घरीं ॥ केले अर्जावरती अर्ज दाद लागेना । खर्चिलें द्रव्य जणुं काय तमाखु चुना ॥ ओरशेर बसे खुर्चीस चहाकप करी । मी उभा लांब दारांत भिकाऱ्यापरी ॥ मी कांहीं मधें बोलतां डोळे फाडतो । ना अतां वेळ येण्यास असें सांगतो ॥

अखेर मिळाविला पास बहुत कष्टानं । फिरफिरुन ।
शेतांत बसाविल्या मेंढ्या रुपये देऊन । विस दिन ।
ओपून म्हैस दुभत्याची घेतलें शेण । खत जाण ।

मुंबईचें काढिलें तिकिट भरुनियां कसा । घ्यावया विकत मासोळी उसाला पसा ॥ २ ॥

आणण्यास पेंड कांतेची सरी मोडिली । दहा पल्ले दर एकरा पाहिजे खरी । बाळ्याचें लग्न ठेवून टाल्या घातिल्या । एकरीं रुपये पंचवीस सऱ्या पाडिल्या ॥ पाउणशें रुपये बेण्याचा भाव एकरीं । हा असा करावा खर्च तरी कुठवरी ॥ शेतांत चारी वळवून पाणि सोडिलें । लावण्या उस पोराचें कडें मोडिलें ॥

लावुन गडी दहा पांच खांदणी केली । घातिली ।
बुंध्यास करडिची पेंड माती लोटिली । वर वहिली ।
साहिना घाण नाकास फडकीं लाविलीं । डोकीं फिरलीं ।

याहुन बरी नरकाडी थाट हा असा । देण्यानं बनविलें मला जणुं काय पिसा ॥ ३ ॥

क्लोजरची लागली नोटीस चावडीवरी। हे कळलं मला सदनांत खातां भाकरी ॥ लोटून ताट तैसाच पळत सुटलों। ओरशेरा राम कल्पुन पायीं लागलों ॥ होणार कुलेजर पुढं म्हणुन आज तरी। होऊं द्या उसाचं भरण कृपा ही करीं ॥ ओरशेर मुळीं मानिना नीघ जा म्हणे। परदुःख परमशीतळ म्हणति शाहणे ॥

क्लोजरनें काय येणार पगारी तूट। तो उलट।
ऐटींत बसे बंगल्यांत मांडूनी पाट। करी थाट।
म्हणे आला कुलेजर बरा मिटली कटकट। अला वीट।

तक्रारी उसवाल्यांचा योग हा असा। गृहकृत्य कराया वेळ मिळे न फारसा ॥ ४ ॥

घातिली पेंड सल्फेट पुन्हा हिमतिनें। क्लोजरनें दिला संन्यास उसाकारणें ॥ जाउन धवलता आली गुलाबी छटा। हा काय तुझा वद वर्ण हरित सल्फेटा ॥ ओरडती सर्व शेजारि जमिन उपळली। लाखोलि शिव्याशापांचि बहुत घातली ॥ चारि फुटुन थोडकें पाणि सहज वाहिलें। तें किती बघाया तेथ अफीसर आले ॥

लिहुनिया पंचनाम्यास दंड मज केला। गरिबाला।
जाहलों मुळिंच होतों मि महाग अन्नाला। तुकड्याला।
भरण्यास दंड पोरिचा पितांबर नेला। विकण्याला।

पंचानिं परत जातांना उपटिले उसा। अपराधि मुळिंच मी नाहीं म्हणूं त्या कसा ॥ ५ ॥

पाण्याचि घ्याया तारीख चारिच्याच्यावरी। लागते बसावें जाऊन दीनापरी ॥ अज दिवस दहा जाहले मला घेऊं द्या। पाणि हो उसाला कृपा करुन ती उद्यां ॥ सांगतां असें वसकन् वदे पाटकरी। या वेळिं तुला ना, चार दिवस दम धरी ॥ ही अशी तऱ्हा पाळिची काय करूं तरी। नाडा न बैल राहिला मोटही घरीं ॥

पाटकरी धड बोलेना सदा गुर्मींत। अत्यंत।
वरि न्यावि जरि फिर्याद तरी तिच तेथ। आहे गत।
मोटेचि केलि खटपट फिरुन गांवांत। झाली व्यर्थ।

जरि घ्यावें बळें पाण्यास करुन साहसा । तरि होय दंड दुप्पट कायदा असा ॥ ६ ॥

दर दिसासि भाडें दोन रुपये देऊन । पाहिला चरक लोखंडी अलों घेऊन ॥ खोदिलें चुलांगण नवें दिला मंडप । जळणास फास तोडून घातिले कुप ॥ लागेना रवीची सोय तंग जाहलों । सोडून सदन रानांत येउन राहिलों ॥ तापानें तापलीं मुलें हवा चारिची । मानेना मुळीं तोंडा न राहिली रुची ॥

आज लेक उद्यां बायको तेरवां सून । तशि बहिण ।
क्रमवार अजारी अशी झालीं सर्दीनं । मोठं दैन्य ।
शुश्रुषा तया सकळांची कराया जाण । मजवीण ।

कोणि न भाकरीवीण खपाटी कुसा । गेल्या किं पातला काठिण समय तो असा ॥ ७ ॥

ऐकून रवीचा भाव छाति धडकली । फिरण्यानं मुखाला कळा मढ्याची आली ॥ येईना तिसाच्या खालिं हुद्देकरी । जोडिस रुपये ते दहा आणखी वरी ॥ खर्चानें तुम्ही आपल्या खोपि बांधुन । रहाण्यास द्यावें आम्हांस तवा बासन ॥ आगाऊ रुपये ते निमे पाहिजे दिले । मी गरजवंत बोलण्या मुख न राहिलें ॥

रविसाठिं काढिलें कर्ज जबर व्याजानं । गुळ गहाण ।
लावून दिला होणार अशी अडचण । केलि सहन ।
रवि करी आपुल्या काम सर्व छंदानं । नुकसान ।

होतांच असें कां म्हणति नशीबा पुसा । तुम्हीच आपुल्या आम्हांवरती ना रुसा ॥ ८ ॥

होता गुऱ्हाळ घराचा मान जगीं अजवरी । अमुच्यांत खरोखर लगिन घराच्या परी ॥ मुद्दाम आणिती लोक मूळ धाडुन । भावजया भाऊ, जावई, लेक, बहिण ॥ चालतां चरक तो मैल मैल कळतसे । लाकडी, पांथ प्यावया रसा येतसे ॥ लोखंडि करित हा साच मोहतुरापरी । ना कळे जवळच्या कुट्टून लांब मग तरी ॥

स्वच्छता रसाची हेंच कुंकू पुसनियां । लवलाह्या ।
मळकटपण हें शेण धजे लावाया । तें ठायां ।
कमिपणा आणते प्रीति गोडिच्या ठायां । अहो वायां ।

ज्या घरीं ऊस त्या मिळे मान फारसा । जाहलें तेंच उफराटें पाहा या दिसां ॥ ९ ॥

मधेंच मोडला चरक झालि हरकत । पाहतां म्हणे लोहार येउन ऐटित ॥ नको तुझें बलोतें मला दर एकरीं । पाहिजे रुपये ते दोन भेलि त्यावरी ॥ तें सर्व अडचणीमुळें झणीं मानिलें । लोहार करें चरकास जस्त पाजिलें ॥ आधणें निघालीं पांच शेराणि वाटिली । न्यावया गूळ बाजारा गाडि जोडिली ॥

दर गाडिमधें पंचवीस खडे घातिले । पर पाले ।
प्रत्येक खडा तिस शेर वजन पाहिलें । कमी आलें ।
बाजारिं तेच अडत्यानें वाटोळें केलें । गडि बोले ।

ठेवुं नका म्हणे अडत्याच्या वरी भरंवसा । दे गाडिमागें मोघम रुपये दोन विसा ॥ १० ॥

जाता हिशोबास मी वधू करी भाषणा । घ्या साडि मला इरकली तुशी साजणा ॥ सुन म्हणे मला तन्मणी गळ्यांतिल करा । बोले बहिण बांधणें माडि आपुल्या घरा ॥ दादास अणा मंदील घालण्या शिरीं । बाळूस जरीची टोपि बुट्याची खरी ॥ ओझें झालें तरी होउं द्या नोट आणुं नका । आणण्यास बाळाची अफु सख्या चुकूं नका ॥

अवघ्यास तुकावुन मान जाहलों स्वार । गाडिवर ।
पाहिलें दुकान अडत्याचें हर्ष मनिं फार । अनिवार ।
जाहलों करून रामराम गादिच्या वर आखेर ।

बैसलों शेटजी दावा हिशोब झणिं कसा । आहे करणें मला बाजार इथें फारसा ॥ ११ ॥

द्या रोख रुपये ते नोट नको मज मुळीं । दहा तोळे सोनें, मंदील, सांडे इरकली ॥ ऐकतां मादिय बोलणें वाणि हासला । मजपुढें वह्यांचा भारा आणुन ठेविला ॥ पहा हिशोब आपुला तुम्ही नीट

निरखुन। नका करुं दिवाण्यापरी असें भाषण॥ राहिली कुठें तीर जमा उलट तव शिरीं। जाहला बोजा कर्जाचा फेड लोकरीं॥

एकरीं उसाला खर्च एक हाजार। साचार।
लागले अला ना माल सातश्यावर। तिळभर।
राहिलें देणें सरकारी अजुन तें फार। तुजवर।

व्याजांत जामिन दे मला लिहून झट कसा। बघ तुझा नीट निरखून हिशोब हा असा॥ १२॥

पडतांच शब्द हे श्रवणिं चित्त फाटले। जणुं काय वज्र नगशिरीं पतन जाहले॥ घटकेंत उतरला नूर मुखाचा हरी। हातपाय जाहले ढिले लुळ्याच्यापरी॥ जी तमाखुची खावया चिमुठ घेतली। होति मी करामध्यें तीहि तशिच राहिली॥ या अशा जबर धक्क्यानें ढिली कंबर। जाहली बाकीमधें दिला गहाण नंबर॥

सोडिलें दुकान पानाचा विडा घेऊन। खालीं मान।
घालून निघालों परत गाडि जोडुन। रस्त्यानं।
लागली खबर ओंगळशीं हरपलें भान। दैवानं।

पाणिपट्टीसाठीं जप्तिचा हुकुम एक् कसा। झाला मानुं नको मुदतिचा अतां भरंवसा॥ १३॥

मनोराज्य जागिंच्या जागिं सर्व राहिलें। गंधर्व नगरिचें वऱ्हाड जंणुं परतलें॥ हें सौख्य उसाचें असुन मृगजळापरी। तेथेंच भराया घेऊन गेलों घागरी॥ अतां काय तोंड जाऊन दाखवूं घरीं। आणिला किती हा कठिण समय श्रीहरी॥ परभारें जाऊन शेतांत रडत बैसलों। द्यावया जीव विहिरींत सिद्ध जाहलों॥

हें कळुन आलिं माणसें घरचीं धांवत। आरडत।
कांतेनें येउन झटादिशीं धरिला हात। म्हणे नाथ।
देऊं नका प्राण विहिरींत जोडिते हात। विपरीत।

करूं नका कृत्य मनिं धीर धरा थोडसा। दगडानं कधीं संकट येत माणसा॥ १४॥

जळो जळो साडि इरकली ठुशी नथ सरी। मी खूष सख्या राहीन कुंकवावरी॥ आम्हांस प्राण तुमचा हेंच भूषण। तैशींच

मशीं बोलली शहाणी सुन ॥ पोरानं मादिय पायास मिठी घातली । वाहसी कशाला मिशा बहिण बोलली ॥

यापरी करून समजूत घरा मज नेलें । बसवीले ।
कांबळ्यावरी ढाळजेत तोंच की आले । मज दिसलें ।
पाटील तलाठी महार आणिक जागले । उभे ठेले ।

द्वारांत माशिं बोलले म्हणे न या बसा । अम्ही अलों तुझ्या जप्तीस ऊठ झणिं कसा ॥ १५ ॥

अले पंच घरामधें जप्ति कराया खरी । खाराची होति घागर चुलीच्या वरी ॥ काथवट चाटु कुरडच्या डाळिचे वडे । लोखंडी धाव चाकाचि तुटकी कोंबडें ॥ वांझोटी एक शिंगाची गाय पांगळी॥ दहा वसि लागल्या हातास पत्रावळी ॥ हरा डेरा कणगि केरसुणी गाडि मोडकी । दारिचा खराटा उखळ शेळि बोडाकि ॥

भोरकडी एक दिवलाणे पेटि खोक्याची । कपड्याची ।
त्यामधे गवसला बांड चोळी कांतेची । जुनि कुंची ।
शेर शेर बाजरी गहूं माळ मक्क्याची । कणसाची ।

सरमाड थोडें सरपण माल हा असा । झालि जप्ति लिहिलीं कागदी गव्हाचा भुसा ॥ १६ ॥

पासष्ट रुपये पाण्याचा भाव एकरीं । तो कमी करो सरकार प्रभो लवकरीं ॥ घालो कि चारिला नळ आणुन खापरी । ना उपळ शब्द मग येइल कानावरी ॥ चारिनें जमिन उपळलीं नयनीं पाहते । त्याचीच अम्हां सरकार पट्टि मागते । ना द्यावि जरी ती जमिन होय खालसा । भूपतीपाशीं अन्याय नसावा असा ॥

त्यांतून असे जहामर्द अमुचें सरकार । खंबीर ।
इंग्रज न्यायि सद्गुणी अशी आजवर । जगिं फार ।
गाजली कीर्तिपरि त्यांत मुळीं ना सार । आखेर ।

हें आलें कळुन नृप माय रयत वत्ससा । हा न्याय बुडाला हरी पाव तूं कसा ॥ १७ ॥

नको टाकुं उसा भलेपणा पुढें या परी । तूं सार्वभौम सम्राट पिकाभीतरी ॥ तव ठायिं ठेविली गोडि जशी विठ्ठलें । त्यापरी करी

तूं गोड जगाचें भलें ॥ कल्याणरूप तूं शिवापरी शोभसी । जो लावि तुला त्या कुबेर तूं बनविशी ॥ उसवाले तुला पोटाशि धरुन बैसले ना तुझ्याविण त्या प्रीय पोटचीं मुलें ॥

आलें कळुन वर्म जी सजा तूं केलीस । आम्हांस ।
लावून तुला ना केलें तुझ्यासम खास । चित्तास ।
दारु प्यालों ठेविली रांड त्यजुन नीतीस । अनितीस ।

सेविले रोग उपदंश गावि फारसा । जाहल्या वलांडा भरें सज्जना उसा ॥ १८ ॥

हा ऊस नव्हे साक्षात् तपस्वी ऋषी । मस्तकीं जटा पाण्यांत राहे निशिदिनीं ॥ सेवि शेण घाण मासोळी स्वतः हा खरा । त्याचिच जगास्तव पुढें करी शर्करा ॥ पातक्या जशी जान्हवी पुनित बनविते। त्यापरी उसाचा गूण शास्त्र सांगतें ॥ व्हा पुनित आधिं मग तुम्ही उसा लावणें । त्यजुनियां दारु अनितीस रांड सोडणें ॥

वागुनि धर्म नितीनें शेति लावावा । उस बरवा ।
ना जातिजातिचा कुणी करावा हेवा । गुण घ्यावा ।
ठायिंच्या उसाचा हाच बोल ऐकावा । हरिसेवा ।

तुम्ही करा म्हणजे बरकत येउनि कसा । मोहरांनीं भरेल मानावा मनीं भरंवसा ॥ १९ ॥

हा केला पवाडा अम्ही उसाचा खरा। तो शेतकऱ्यांनीं तुम्ही मानसीं धरा ॥ अठराशें साल पन्नास शकाचें खरें । त्या सालि जाहलें दैन्य असे साजिरें ॥ दत्तकपुत्र पाटाचि बायको खरी । ना सुखद होय चारिचा ऊस सावरी॥ यासाठिं विचारा करून रहावें सदा । ना नादें उसाच्या दैन्य भोगणें कदा ॥

अतां हीच विनंति तुम्हां जोडुनि कर । आहे फार ।
बघुं नका कवन हें उगे तुम्ही वरवर । अंतर ।
शोधून पहा सर्वदा अहो चातूर । झडकर ।

हा कवन ऊस येथिच्या अनुभवी रसा । सेवणें दासगणु म्हणे उगे ना वसा ॥ २० ॥

---

# आख्यानांतील पदें

## १००. ( प्रतिकूल होईल )

सबळ पुण्य ज्याचें बुधहो तोच हिला वाची । ( ज्ञानेश्वरी )
कळुन येत किंमत हंसालागिं मानसाची ॥ ध्रु० ॥
करून यत्न मृग तो सेवी मलय मारुताला ।
मुदित मनीं करविल साचें रत्नपारख्याला ।
भ्रमर तेच सेवन करिती पुष्पपरागाला ।
ग्रंथ हा न कादंबरी हो चित्तरंजनाची ॥ ( ज्ञानेश्वर )

## १०१. ॥ लावणी ॥ ( आहे त्याचि मला )

ओठांनि पीति जे पाणि जीव भूवरी ।
ना खाति मांस ते केव्हां, शोधून पहा अंतरी ॥
मृग धेनु महिष गज वाजि उंट वानर ।
फळ कंद मुळें खातात, कुणि रहाति तृणाच्यावर ॥
( चाल ) बाहेर जीभ काढून, जला प्राशन, करिति जे श्वान ।
तेंच मांसाहारी । वृक व्याघ्र तरस केसरी ॥ (शेखमहमद)

## १०२. ॥ लावणी ॥ ( भला जन्म हा )

विष्णु पुजेचा आधिं लोकांनीं बनवावा लागतो ।
म्हणुन तो जगिं माना पावतो ॥
तशिच नृपाची गोष्ट असे गे नाहिं फरक सुंदरी ।
आकारा रयत आणी त्या खरी ॥
( चाल ) नर्मदेमध्यें कां बाण कमी आसती ।
त्यांतून लागले जे लोकांच्या हातीं ।
होऊन राहिले तेच समज पशुपती ।
अवंतराचा पाड मुळीं ना अवघे लोकां हातीं ।
जनाहून श्रेष्ठ नव्हे भूपती ॥ ( सेना न्हावी )

१०३. ॥ लावणी ॥ ( राणि ती हरिश्चंद्राची )

थोरवी आपुलि थोरांनीं । पाहिजे किं सांभाळली ।
कां कुठें सागरानें त्या । निज पुरें घरें पाडिलीं ।
रवि कोश प्रखर तेजाचा । परि नाहीं वनें जाळिलीं ।
भूमीनें भयें भाराच्या । कधिं काय पिकें टाकिलीं ।
(चाल) सत्ता तीं सर्वतोपरी, आहे तव करीं, कथूं कुठवरी ।
दिनाचा वाली । हो निजरयतेस माउली ॥ ( सेना न्हावी )

१०४. ( भाव धरा रे )

दिसे वरि भोळा । अंतरीं विट्ठ हा काळा ॥ ध्रु० ॥
हा देव नव्हे आहे भूत । या नादें बुडाले बहुत ।
मी तुम्हां जोडिते हात । नको हा चाळा ॥ अंतरीं ॥ १ ॥
या भूतें हरिश्चंद्राला । डोंबाचें घरीं राबविला ।
या नादें उपाशी मेला । सुदामा भोळा ॥ अंतरीं ॥ २ ॥
होऊन भटाचें पोर । चकविला बली नृप थोर ।
कवि करितां तदिय प्रतिकार । फोडिला डोळा ॥ अंतरीं ॥ ३ ॥
या भूता काढण्या पाहीं । एकही जगामधिं नाहीं ।
त्या महाभूताचे पायीं । ठेवि गणु भाळा ॥ अंतरीं ॥ ४ ॥
( नामदेव )

१०५. ( प्रतिकूल होईल )

तत्त्वनिष्ठ अक्षय असणें हाच ब्राह्मणाचा ।
धर्म म्हणुनि सांगत आहे वेद जगीं साचा ॥ ध्रु० ॥
काय ? " यच्चकिंचित् " मंत्रांतील वदा सार ।
भाष्य सकल पाहुनि झाला तुम्ही थोर थोर ।
तेंच पुन्हा अवलोकावें शीघ्र एकवार ।
तत्त्वबोध करुनी घ्याया जन्म मानवाचा ॥ ( एकनाथ )

१०६. ॥ गज्जल ॥ ( भैरवी–धुमाळी )

बुराना कोई दुनियामे दिखा जो सो इलाही है ।
घडा चुल्ला खुजा प्याला जुदे ना सीर्फ मट्टी है ॥

नजर आते बहुत अक्साम मगर क्या खाक जुदी है ? ।
खाक देखो छोडो अकसाम, गनूका येहि कहना है ॥
(एकनाथ)

१०७. (रानारानांत गेली बाई शीळ)

घरादाराचा झाला बाई खेळ ॥ ध्रु० ॥
माझा पती देवारे तुझ्या पायी, रे ।
वेडा झाला त्या सुदबुध नाहीं, रे ।
तुळसी काष्ठाचि गळां घाली माळ ॥ १ ॥
तुझ्या नामाचा काय हा गूण रे ।
खाया प्यायाची राही सदा वाण रे ।
दिली कशाला चार पोर बाळ ॥ २ ॥
घरीं दुकानदारी मोठी होती, रे ।
तुझ्या छंदानं झाली त्याची माती, रे ।
गेला तराजु हाति आला टाळ ॥ ३ ॥
मी नांवाची आहे बघ जीजी, रे ।
बऱ्या बोलानं वाट लाव माझी, रे ।
नुरलि वायद्याचि गणु म्हणे वेळ ॥ ४ ॥ (तुकाराम)

१०८ (राना रानांत गेली बाई)

घरा दाराचा केला नाहीं खेळ ॥ ध्रु० ॥
भक्ति उपजे दैन्याच्या पोटीं, ग ।
या भक्तीची किंमत मोठी, ग ।
भक्ति सुखार्थ इंद्र घोटी लाळ ॥ १ ॥
माझ्या हरिचें नाम बहू गोड, ग ।
खऱ्या शांतीची सदा करी वाढ, ग ।
मधु भ्रमरास, बेडुकाला गाळ ॥ २ ॥
जिजे जगांत तुझें कांहीं नाहीं, ग ।
तो अवघाच भ्रम आहे पाही, ग ।
मोह मायेस आधिं घाल वाळ ॥ ३ ॥

लेकराचें हिताहित जाणी. ग ।
माय, तिला न सांगावें कोणी, ग ।
भाव धरून पदीं ठेवि भाळ ॥ ४ ॥ ( तुकाराम )

### १०९. ॥ झंपा ॥

ब्रह्मविद्या खरी एक या भूवरी ।
ब्रह्म जीवा करी हीच राया ? ॥
एक तोची असें जन्ममृत्यु नसे ।
हेंच कीं मिळतसे अनुभवावया ॥
कर्मभक्तीविना ही न लाधे कुणा ।
जेविं का शिशुपणा, थोर व्हाया ॥
लोणि तर्की असे, ब्रह्म शब्दीं तसे ।
बुधाचि त्या घेतसे, घुसळुनीया ॥
दासगणु हा म्हणे, म्हणुन सावधपणें ।
सत्य नित्य शोधणें, जगिं तराया ॥ ( मुकुंदराज )

### ११०. ॥ कटाव ॥

थाट माट बहु पाट शिशीचे । परिमळ सुटती उदबत्त्यांचे ।
पान सव्वा हात, द्रोण केळिचे । मीठ धवल, लिंबू, पंचामृत ।
तक्कू, रायतें, भेंडवडे ते । दाटी झाली कोशिंबिरींची ।
खिरा, काकडी आणि केळांची । पेरु, अननस, डाळिंबाची ।
डाळ वाटिली बहुत मजेची । कुरडी, पापड, भज्या, वड्याची ।
गर्दी झाली तशि शाकांची । मुळा, दोडका आणि भोपळा ।
चुका, चाकवत, वांगीं, कोहळा । भेंडी, डिंगरी, घोळ, पोकळा ।
घेंडस, वाघाटीं, घोसाळी । अबई, शेवगा, चवळि, पडोळी ।
हदगा, गाजर, पपइ, तोंडलीं । अळूं, घेवडा, शुभ्र कान्हळी ।
खिरी मनोहर नानापरिच्या । वळवट टिकल्या नी गव्हल्याच्या ।
रायभोग तांदुळ मजेचे । पिवळें दाट वरण तुरीचें ।
तूप साजुक ते गायीचें । घीवर, जिलबी, ती बासुंदी ।

बेसन, दळिया; चुटिया, बुंदी । साखरभात, शिरा, करंजी ।
पुरी, चिरोटा, फेणी ताजी । शंकरपाळें तेंहि निराळें ।
साखर आज्य युक्तचि सगळे । नानापरिच्या पक्वान्नांचीं ।
चवी निराळी सुधारसाची । कढी मनोहर तशी दह्याची ।
एकेक रुपया पात्रिं दक्षिणा । प्रमोद झाला विप्रवरांना ।
दासगणूच्या या नव कवना । मान्य करो तो पंढरिराणा ॥

( दामाजी )

## १११. ॥ लावणी ॥ ( सुटला पितृ० )

महाराष्ट्र मुलुख बहु खट, त्यांतुनि विशेष गोदेचें तट ।
उमगूं न देति कधिं वाट, सुखाची कवणा ।
जरि सर्वशक्ति भगवान् परि केलि दैना ॥ १ ॥
कुणिं दिल्या खांद्यावर कावडी, कुणि केला बिन पैशाचा गडी।
चोख्याचि अवस्थांवर कडी, ओढविलीं ढोरें ।
वैकुंठपति दाम्यानें, बनविला महार ॥ २ ॥
अवदसा जनी आग जाळी, दळण्या बैसाविला वनमाळी ।
अति कठिण सावतामाळि, लावी खुरपाया ।
गोरा नेत धरून हातास चिखल तुडवाया ॥ ३ ॥
चांग्या तूंहि आहेस त्यांतला, महाराष्ट्रिं निर्दया खला ।
बनवून सुईण सांवळा, महीच्या कांठीं ।
नेलास रुक्मिणी म्हणे दया नाहीं पोटीं ॥ ४ ॥
इकडील संत ते बरे, केलें नाहीं माझें कधि मातेरें ।
जेथें तेथें उभयतां बा रे गेलों थाटानें ।
मेहत्याचें लग्न गणुदास कथी ही खूण ॥ ५ ॥ ( चांगदेव )

## ११२. ॥ सवाल ॥

जगत् जगत् ये खाली पुकारा मत कर मनुज दिवाने ।
सब घटपटमों नाथ भरा है, रीते न रहे कुछ खाने ॥
माया कोल्हाटन करत तमासा सुखदुःख ढोल बजाके ।
हरदम तुजकू ओही पिलाती घडि घडी मृगजल घुटके ॥

ब्रह्म सनातन तूंहि मेरे प्यारे ! कहना यें वेद स्मृतीका ।
दासगनू कहे बाबा जालंदर सूरज ज्ञान नभीका ॥ ( जालंदर )

११३. ( बिहाग-त्रिताल )

मुरली कशास्तव ही करिं धरली ।
निरस असुनियां तुज प्रिय झाली ॥ ध्रु० ॥
गुजगोष्टी तूं हिजसी करिसी ।
परि ती कळवी त्या सकलांसी ॥
योग्य खचित ना ही प्रेमासी ।
कुठें रसिकता हरि तव गेली ॥ ( लाखा कोल्हाटी )

११४. ( भाव धरा रे )

उमग खेळासी । आलि कोल्हाटिण रंगासी ॥ ध्रु ॥
विश्वास स्तंभ साचार । आहेत केवढे थोर ।
भावाचा बांधिला दोर । फिराया तिजसी ॥ १ ॥
सत्कर्म हाच कीं थाळा । या दोरावर ठेवियला ।
आंत उभी भक्तिवेल्हाळा । सांवरि तोलासी ॥ २ ॥
हातिं बांबु पापपुण्याचा । नासाग्रिं रोख दृष्टीचा ।
घे अनुभव स्वानंदाचा । बघे न कवणासी ॥ ३ ॥
गणु म्हणे, उड्या जरि मारी । आधार सोडिना दोरी ।
ही विद्या येइल सारी । वंदितां गुरुसी ॥४॥ (लाखा कोल्हाटी)

११५. ॥ लावणी ॥ ( राणि ती )

हत्तीहि असे चर्माचा । चर्माचा भूप त्यावरी ।
नौबत तीहि चर्माची । चर्माच्या उंटावरी ॥
( चाल ) जो पुढें पळे हलकारा, तोहि साजिरा, चामाचा खरा ।
पणव रणभेरी । चर्मेंच बनाविलीं खरीं ॥
चर्मानें तुझ्या देहाला । तरि कुठें सांग सोडिलें ।
हें दृश्य विश्व बघ सारें । चर्मेंच आकारा आलें ।
( चाल ) चर्माच्या शुद्धिचे साठीं, चाम संपुटी, प्रभू-कीरिटीं ।
ठेवुन पूजिला । गणुदास स्तवी त्याजला ॥

## ११६. ( पिलू–दिपचंदी )

नको मज साडी नसे मी रे उघडी ।
भक्तीची पैठणी नेसुनी बसल्ये, राजा भावें मन विटलें ॥ ध्रु० ॥
वैराग्याची अंगांत चोळी । केशव राघव नग हे मी ल्यालें ॥ १ ॥
मी पण जाळुनि काजळ केलें । ज्यायोगें जग हरिरूप दिसले ॥ २ ॥
सद्भावाचें कुंकू कपाळीं । गुरुरायानें मज लावियेलें ॥ ३ ॥
त्या पुढती या तव भूषणांची । किंमत ना मज, गणुदास बोले ॥ ४ ॥
( जनाबाई )

## ११७. ( धुमाळी )

विठ्ठल वापी, विठ्ठल मोट, विठ्ठल नांद्या बैल ग ।
विठ्ठल पाणी, विठ्ठल हांकिता, त्याविण हें काय होईल ग ॥ध्रु॥
विठ्ठल शेत, विठ्ठल वाफा, विठ्ठल नांगर वखर ग ।
घाडि घाडि विठ्ठल विठूस भेटे, मग कां व्हावें अधीर ग ॥ १ ॥
विठ्ठल बेणं विठ्ठल उगवे, विठ्ठल अवघ्या जगांत ग ।
मग कां डोळे बांधून भटकूं दुर्धर माया वनांत ग ॥ २ ॥
दासगणु म्हणे मायागांठण थोडी कारितां सैल ग ।
बघणारासह स्थावर जंगम रूप विठूचें होईल ग ॥ ३ ॥
॥ सावतामाळी ॥

## ११८. ॥ कटाव ॥

हे ज्ञानेशा, पहा मळ्यासी । नंदनवन हा भूप्रदेशीं ।
आलि वनश्री मुक्कामासी । एकवटोनी या ठायासी ।
मही नेसली शालू हिरवा । नयनमनोहर अवघ्या दुर्वा ।
जाई चमेली दवणा मर्वा । उंच वाढले धरून गर्वा ।
ताडमाड शिंदाड पोफळी । गर्वें फुगली म्हणुनी झाली ।
बांधावरती वस्ती वहिली । निवडुंगाची संगत केली ।
फुलझाडांच्या नाना जाती । एक हारिनें दृष्टिस पडती ।
मदनबाण निशिगंध मालती । बकुल मोगरा कुंद शेवती ।

पीत हारित पांढरा मनोहर । चांफा तैसा गुलाब सुंदर ।
नगर कर्दळी गुलबाशीचीं । कण्हेर पुष्पें दो जातीचीं ।
मधुन मधुन योजना सुरूची । सतेज रोपें किती तुळशीचीं ।
धनी मळयाचा वैष्णव दिसतो । पहा तुळशीला कितितरि जपतो ।
परि बेलाला कधिं न विसरतो । सुमनस्वरूपें हरिला भजतो ।
फळझाडांची गर्दी झाली । पानमळ्यांतुन दिसती केळी ।
पेरू, अननस, आम्र जांभळी । मोसंबी फलभारें लवली ।
दाळिंबानें मातच केली । लिंबू, पपनस, चिक्कू, अंजिर ।
द्राक्षें, खिरण्या, संत्रि मनोहर । फणस, पपया, वानू कुठवर ।
एक्या बाजुस भाजीपाला । मुळा, दोडका, वांगिं, भोपळा ।
घेंडस, पडवळ, चवळी, कोहळा । सुकाळ येथें दिसे रताळा ।
लसूण, कांदा, गाजर, मिर्ची । चुका, चाकवत, खांच अळूची ।
थारोळ्याच्या सन्निध साचा । आहे उसाचा फड जोरावर ।
चौबाजूला वेली सुंदर । फुलें पीवळीं आलिं तयावर ।
त्याच्या सन्निध मका लाविली । मध्यभागीं तीं कणसें आलीं ।
पाचोळ्यानें झांकून गेलीं । आहेत कणसा दाणे आले ।
हें तुऱ्यांनीं बोधित केलें । ऐसें वैभव पाहुन रुसला ।
भुईमूग तो महींत घुसला । तोंड दाविना पहा कुणाला ।
त्याची समजूत घालायासी । योग्य ठरविला एकादशीसी ।
अणिक ठेविलें नाक तयासी । या मानानें अतिशय फुगला ।
फुगला म्हणुनी चरकीं गेला । तैलरुपानें रडूं लागला ।
रडूं नको तूं किमपी बापा । तूंच उजळशी जगांत दीपा ।
अवघ्यामाजी धूर्त बाजरीं । मठ-मूगाला कधिं न अव्हेरी ।
ही धान्याची माय साजिरी । म्हणुन हिचें तें नांव सज्गुरा ।
विपूल आला गहूं, हरबरा । शाळू शोभे भूप साजिरा ।
अमुक वस्तु येथें नाहीं । हें म्हणण्या नच जागा पाही ।
दासगणु तें कवनीं गाई । अवघें वदवी माय विठाई ॥

(सावतामाळी)

## ११९. ॥ लावणी ॥ ( दीनदयाळा परमकृपाळा )

निर्धनतेची माळ कठिण ती पडली ज्याच्या गळां ।
मान तयाचा राहे न कोठें; अपमानची आगळा ॥ ध्रु० ॥
सदन तयाचें सुखद न त्या मग जणुं चितेचा मळा ।
कांता कातर होउन टोंचीं, रडत बसे खळखळां ॥ १ ॥
खेळवणें मग होय सहज तो ग्रामकंटकां, खळां ।
कुणि त्या ' वेडा-लुच्चा-हलकट 'कुणि म्हणती ' बावळा ' ॥२॥
धनहिनता नच जाय झाकली जणुं भाजीमधें मुळा ।
दासगणु म्हणे दारिद्र्याचा कठिण उकलण्या पिळा ॥ ३ ॥

( नरसी मेहता )

## १२०. ॥ कटाव ॥

" अंगिं अंगि ती मखमालीची । बहुत मजेची । शिरीं असे ज्या भरजरि कुंची ॥ केस वाकडे कुटील काळे । पदीं साखळ्या तोडर वाळे । कटिं करगोटा । सुवर्णाचा । घुंगराचा । गळ्यांत कंठा तो मोत्याचा ॥ बिंदली कड्याने मंडित पाणी । रांगत येतां हलतीं दोन्ही । डूल भोकरें ज्याच्या कानीं । दृष्टमणी मनगट्या मधूनी ॥ जोड दंडकडे दंडीं ज्याच्या । खालीं कोपऱ्या नागमोडीच्या । बावन-कशी सुवर्णाच्या ॥ भालीं पिंपळपानावरतीं । नाना परिचीं रत्नें असतीं । किरणें ज्यांचीं केसावरतीं पडून अतिशय शोभा देती । सजल घनीं जणुं वीज तळपती ॥ गालबोट गालास लाविलें । काजळ डोळ्यांमध्यें घातलें । भालिं कस्तुरी चिन्ह रेखिलें । रंगित रिंगणें हातीं धरिल । असें बाळ तें रांगत आलें ॥ निज जननीच्या पायापाशी । येऊन ओढी करिं लुगड्यासी । बहु आतुर ते पाहि मुखासी ॥ त्या सोहळ्यासी पाहुन धाला । भक्तवरद श्रीपंढरिवाला दासगणू ज्या अंकित झाला ॥ "

( गोरोबा )

## १२१. स्फुट प्रार्थनाश्लोक

" विश्वेशा, जगदीश्वरा, भवहरा, भीमा, भवानीवरा ।
श्रीकंठा, वृषभध्वजा, पशुपते मौलेंदु गंगाधरा ।
हे भूताधिपते, सुरासुरपते, हे रुंडमालाधरा ।
बोले दासगणू भवीं बुडत मी माम् पाहि रामेश्वरा ॥

अपांपपतिसुतापते, गिरिनिवासिया ईश्वरा ।
अगा भुवनसुंदरा, अघहरा, कृपासागरा ।
तुझ्यविण रिता नसे मुळिंच ठाव या भूवरीं ।
नमो प्रणतवत्सला तुजशि व्यंकटेशा हरी ॥

बसून मन हें उगे विविध कल्पना त्या करी ।
तरंग वरच्यावरी उठति व्यर्थ नानापरी ।
म्हणून स्थिर तें करी मदिय चित्त सर्वेश्वरा ।
प्रसीद परमेश्वरा मजशि त्र्यंबकेशा हरा ॥

जगज्जननी अंबिके तव पदाब्ज वंदावया ।
गडावरती पातलों झणिं कृपा करावी बया ।
जळो सकल दैन्य तें तव सुदिव्य नामानलें ।
नमो त्रिपुरसुंदरी, भगवती महामंगले ॥

भक्तांना तूं सुखद असुनी वारितां संकटासी ।
ऐसे आले कथित जगता प्रश्न ते व्योमकेशी ।
याचा यावा अनुभव मला वारि वेगें त्रितापा ।
वत्सा माता ढकलित कधीं काय हें मायबापा ॥

घडो मजशिं संगती सतत सज्जनांची हरी ।
जडो मन पदीं पडो तव कथाहि कानांवरी ।
असोच रसना सदा रत तुझ्या सुनामामृतीं ।
करोत कर सर्वदा भजन हे तुझें निश्चितीं ॥

---

# विविध विचार

## १२२. गणेशसरस्वतीस्तव

श्रीगणेशायनमः

" हे एकदंता तूं विघ्नहर्ता । तूं सिंदूर अंगीं चर्चिता । गजमुखा हैमवतीसुता । शूर्पकर्णा पावें मशीं ॥ तूं सकल गणांचा आदि ईश । म्हणून म्हणती गणेश । लीलेकारणें नाना वेश । धारण तुवां केलेसी ॥ सविता आपल्या प्रभेनें । आला वैभवाकारणें । तेंवी तूं मी या द्वैतपणें । तूंच आलास आविर्भावा ॥ औपचारिक पूजेची । गरज इतक्याकारितां साची । कीं त्यायोगें तत्त्वाची आठवण व्हावी उपासका ॥ तव शब्दरूप मूर्तीचें । श्रीज्ञानेश्वरें वर्णन साचें । केलें बहुत बहारीचें । ज्ञानेश्वरी ग्रंथाठायीं ॥ एवंच तुझ्यावांचून ॥ कांहीं नाहीं जगीं आन । तेथेंच तुझें पूजन । जाणिवेनेंच होय कीं ॥ मग एक शंका येते । जरी आज पुजूं तूंतें । तरी काय झालें नव्हतें । काल तुझें पूजन ॥ तूं पूजनरूप सर्वथा । पूजनाची न आवश्यकता । म्हणून माझी अहंता । पूजनाची व्यर्थ आहे ॥ देवा तूं पूजेसहित । आयताच आहेस सत्य । तुज जाणण्याविरहित । आतां न कांहीं राहिलें ॥ परी कल्पनेकरून । व्यवहाराच्या भूमीवरून । जें मानिती संतजन । वदतों तें ये कालीं ॥ शुंडामंडित तुझें वदन । गजनेत्र ते अति लहान । भालीं शोभें मृगलांछन । पीचा कडीं मनगटीं ॥ गंडस्थलीं द्विरेफपंक्ती । रत्नजाडित मुगुट वरतीं । हरित दुर्वा विशेष देती । शोभा तुझिया मस्तका ॥ प्रचंड देवा तुझें उदर । कटीस शोभे पीतांबर । बसोनियां मूषकावर । भक्तसाहायार्थ धांवसी ॥ तुझें नाम वदनीं वदतां । विघ्नें पळतीं तत्त्वतां । जैसें बागूल आला म्हणतां । पोरें लपती कोपऱ्यांत ॥ किंवा उदया येतां वासरमणी । तम पलायन करी झणीं । तैसी तुझिया नामस्मरणीं । विघ्नें पळती दीनबंधो ॥ हे सरस्वती शारदे । हे श्वेतवसने भक्तवरदे । तुझें अभय असूं दे । आतां दासगणूसी ॥ सहस्त्र चंद्राहून दीप्ती । तुझ्या वदनाची सरस्वती । तूं जगद्गुरूची आराध्यमूर्ती । शारदांबा नाम

तुझें ॥ तूं सकल विद्येची स्वामिनी। कञ्जकन्या मयूरवाहनी। वीणेनें तो मंडित पाणी। तुझा मातुश्री सर्वदा ॥ भृकुटी तुझ्या धनुष्याकार । आकर्ण नेत्र साचार। कुरळ केश मस्तकावर। मुकुटाबाहेर विराजती ॥ तुझी पाहून नासिका। लाजेल वाटे चंपक-कलिका। अर्धचंद्राकार कुंकुमरेखा। तुझ्या भाला भूषवी ॥ डाळिंब कुसुमापरी सत्य ! तुझे अधर आरक्त। हिऱ्याऐसा झळकत। दंतसंघ मुखींचा ॥ वदनाकृति तुझी गोल। गुलाबपुष्पापरी गाल। सर्वांगसुंदर वेल्हाळ। वर्णन करूं कोठवरी ॥ ”

## १२३. हिंदुधर्म आणि समन्वय

‘ धर्म जरी अनेक। परी त्याचा उत्पादक। एकचि आहे निःशंक हे कदापी विसरूं नको ॥ एकया हिंदुधर्माविना। देशकालवर्तमाना। पाहुन धर्मस्थापना। केली कर्त्या पुरुषांनीं ॥ धर्म म्हणजे वस्तु नाहीं धर्म म्हणजे ना पदार्थ कांहीं। तत्त्वबोध जेणें होई। त्या होण्याचें नांव धर्म ॥ तो तत्त्वबोध व्हावयाते। जें कांहीं करावें लागतें। त्या करण्याला नांव मिळतें। विधि बापा जगांत ॥ आणि धर्म ना विधी वांचुन। विधि देह धर्मप्राण। ते एकमेकांपासून। अलग केल्या अनर्थची ॥ विधि बापा देहापरी। भिन्न भिन्न भूमीवरी। शिद्दी आफ्रिकेमाझारिं। काळे गोरे युरोपांत ॥ शिद्दी काळा, चिनी पिवळा युरोपाच्या मधील ढवळा। इंडियन तांबडेपणाला। धरूनिया राहिले ॥ हिंदुंचिया वाट्यासी। शामसुंदरता निश्चयेसी। पहा सूर्य-किरणासी। अवघेच रंग ते ठायां ॥ सूर्यकिरणापरीस साचा। वर्ण हा हिंदू लोकांचा। समुच्चय काळयापांढऱ्याचा। रक्तपीताचा ये ठायीं ॥ हिंदूंचा देश आर्यावर्त। हिंदुस्थान म्हणती सांप्रत। त्याचा विचार करितां येथ। तोहि त्याच्याच वर्णापरी ॥ हिंदुस्थान थंड आहे। हिंदुस्थान उष्ण आहे। समशीतोष्णही तो आहे। एकयाच देशी अवघे गुण ॥ हवा युरोपखंडाची। हिमालयीं ये प्रत्यया साची आठवण होतें आफ्रिकेची। मारवाडासी पाहतां ॥ भूलोकाचे साहित्य। प्रथमतः ईश्वरें केलें येथ। हें यावरुन सिद्ध होत। भारतीं केंद्र जगताची ॥ प्रथमतः वैभव शिखरासी। गेलें आहे याच

देशीं। अवघ्या कलाकौशल्यासी। जन्म येथून जाहला ॥ आर्यमहीचे वांटचाला। हा हिंदूधर्म आला। पूर्वकालीं याजला। वैदिक आर्य म्हणत होते ॥ बापा, याच धर्माचीं। तत्त्वें अवघ्या धर्मांत साची योग्यता हिंदूधर्माची। अवघ्यामध्यें श्रेष्ठतर ॥ हिंदुधर्मी जो का नर। तो कोणाचा न करी अव्हेर। आपुलेपणाला तिळभर। फाटा न देता बापा रे ॥ हिंदुधर्म हा आदि। मग बुद्ध, जैन, यहुदी। खिश्चन आणि महमदी। ऐसे निर्माण जाहले ॥ सर्वांगासह तत्त्वाचा। विचार हिंदुंनीं केला साचा। क्षमा आणि नीतीचा। विचार केला बुद्धांनीं दया जैनांनीं फैलाविली। ती खिस्त्यांनीं अमलांत आणिली। तेजस्वीपणाची कमाल केली। या महमदी धर्मानें ॥ या निरनिराळ्या धर्मांत। एकेक तत्त्व केलें ग्रथित। मुख्यत्वेंकरून सत्य। बाकीचीं तीं गौण स्थानें ॥ तैसे न हिंदुधर्मी झालें। अवघ्या तत्त्वां प्रतिपादिलें त्यापरी आचरणही केलें कर्तृत्ववान पुरुषांनीं ॥ पहा पार्थ धनुर्धर। तेजसपणाचा सागर। म्हणून महात्म्या विदुरावर। नाहीं तरवार चालविली। तेजसपणाचा उपयोग केला। दुष्टां वधाया पुरता भला सन्मुख पाहतां विदुराला। लीन झाला तोच कीं ॥ म्हणजे शौर्य संभाळिलें। तेजसपणाला न टाकिलें। दयेलाही न तुडविलें। खून करून विनयाचा ॥ हे अवघे सद्गुण भले। जे पार्थाच्या अंगीं आले। त्याला त्याचें कारण झालें। एक हिंदुत्व निश्चयें ॥ हिंदु-धर्माचा हाच धडा। व्यक्तिस्वातंत्र्य द्वेष सोडा। समाजस्वातंत्र्य प्रेम जोडा। म्हणजे अवघेच ये करीं ॥ जें समाजाचें हित झालें। तें प्रत्येकीं म्हणणें आपुलें। आणि हें ज्याचे मनीं वरिलें। तोचि हिंदू म्हणावा ॥ शूर म्हणती पांडव। बलवान् म्हणती पांडव। सद्भक्त म्हणती पांडव। दयार्द्र म्हणती पांडवांना ॥ नीतिमान् म्हणती पांडव। सत्यवचनी पांडव। अवघ्या उत्तम विशेषणीं गौरव। केला आहे पांडवांचा ॥ म्हणजे पांचजणांच्या समुदायाचा। हा गौरव झाला साचा। विचार करतां यशाचा। लाभही झाला अवघ्यासी। एक अर्जुनाच्या शौर्यानें। पांडव ठरले शूर जाणे। एक भीमाच्या बळानें बळी ठरले तैसेच ॥ धर्म दयार्द्र नीतिमान्। हें त्याचें चांगुलपण।

घेतलें अवघ्यांनीं वाटून। आचरण करतां एक जरी॥ कृत्य व्यक्तीनें करावें। त्याचें यश सर्वां द्यावें। अजरामर होऊन बसावें। आपण आपुल्या समाजासह॥ व्यक्ति समाजरूप देहाचा। एक घटकावयव साचा। म्हणून आपलेपणाचा। अभिमान त्यानें वाहूं नये॥ पहा कर धरी तरवार। दंड देई आधार। मेंदू करी विचार। ही चालवावी कोणावरी॥ येथें नुसत्या करानें। जरी अभिमान धरिला मनें। कीं माझें शौर्य इतरांविणें। आडणार नाहीं निःसंशय॥ हा अभिमान तयाचा। टिकेल का क्षणैक साचा। उलट त्याच्या दुर्गुणाचा। उपहास होईल सर्वत्र॥ म्हणून हिंदुधर्मासमान। सर्वांगसुंदर धर्म जाण। कोठें न झाला निर्माण। तें तूं कदापि विसरूं नको॥ ऐहिक, पारमार्थिक तत्त्वाचा। ज्यांत विचार केला साचा। तोच धर्म जगताचा। बाकीचे ते एकदेशी॥ तत्त्व जरी उत्तम असलें। सर्व बाजूंनीं खरें ठरलें। परी तें पाहिजे आणिलें। व्यवहारांत प्रमाणी॥ सर्वव्यापी सर्वेश्वर हा तात्त्विक धर्माचा विचार। परी अमलांत आणाया साचार। कांहीं प्रमाण पाहिजेच॥ सागर तोयानें पूर्ण भरला। तो अवघा नये घेतां आपणांला। आपल्या पाहून शक्तीला। घट भरून आणणें॥ जो अवघें घ्याया जातो। तो अखेरीं पस्तावतो। जो कांहीं प्रमाणीं आणतो तो। त्याचें सुख सेवी॥ शौर्यगुण अंगीं असावा। परी तो दयेस घातक नसावा। आपलेपणाचा अभिमान वहावा। परी न तुडवणें इतरांसी। अन्न अवश्य खाणें चांगलें। परी तें अधिक खातां भलें। रोगास आमंत्रण केलें। मसणवटींत जावया॥ हाच प्रत्येक तत्त्वाचा। विचार बापा आहे साचा। पूर्ण विचारें तयासा। विचार करणें प्रत्येकीं॥ आतां विधर्मी असून। हिंदूधर्मास कां द्यावा मान। याचें ही कारण। सांगतों तुज ऐक आतां॥ गौतम बुद्ध जेव्हां झाला। तई बुद्ध धर्म उदया आला। त्याचे आधी जगतीतला। धर्म हिंदूच होता कीं॥ हिंदुधर्मा-हून एकाद्याला। बुद्धधर्म जरी पटला। तो जरी चांगला असला। तरी निंदतां नये हिंदूसी॥ पतितपावनी गोदावरी। भव्य राजमहेंद्री-वरी। म्हणून तिला दुरुत्तरीं। निंदावें न त्र्यंबकेश्वरा॥ वृक्ष वरी डेरेदार। पर्णें फळें आलीं फार। म्हणून का अव्हेर! त्यानें करावा

मुळाचा॥ हें तत्त्व विधर्म्यांनीं। अजिबात दिलें टाकुनी। म्हणून संत अवतीर्ण झाले अवनीं। रक्षण कराया मूळाचें॥ प्राणाहून आगळा। धर्म पाहिजे मानिला। परी धर्मद्वेष्टेपणाला। जागा अंतीं रौरवीं॥ संताचें काम हेंच जाण। मूळाचें करावें संरक्षण। संत मेदिनीसमान। ऐसें शास्त्र सांगतें॥ मुळें महीनें रक्षावीं। झाडें दुसऱ्यांनीं पहावीं। शर्करा स्वतः गोड बरवी। परी चवी इतराला॥ इतर धर्मांचा विचार। करितां येथें साचार। अवघे आहेत जोरावर। दैना मात्र हिंदूची॥ कां की हिंदुमध्यें ऐसें झालें। समाजतत्त्व मुळीं न उरलें। कित्येक उघड उघड लागले। निंदावया निजधर्मा॥ विद्वत्तेच्या जोरावरी। चव्हाटीं धर्म म्हातारी। आणून विटंबना खरी। करूं लागले नित्यशः॥ कित्येक शंकराचार्याला। लागले शिव्या द्यावयाला। कित्येक अशक्य गप्पाला। झोकूं लागले त्यांचेविषयीं॥ ज्यांनीं शिव्या दिल्या त्यांला। ते सुधारक म्हणती आपणांला। ज्यांनीं झोकिले गप्पांला। ते भाविक म्हणविती॥ यायोगें ऐसें जाहलें। खरें चरित्र लोपलें। कोठें दंभानें गढूळ झालें। कोठें सडलें अभक्तीनें॥ आतां अभक्त वा दांभिक झाले। त्याला कारण ऐसें घडलें। धर्मविधींत गुंतविलें। मन तयां दोघांनीं॥ विधी मुळींच निरर्थक। त्याचे दांभिकें केलें कौतुक। अभक्तांनीं मुरडिलें नाक। त्याचा लक्षून नीरसपणा॥ म्हणजे दांभिकें ताकाचा। लोणी नसून लोण्याचा। आरोप त्यावरी करून साचा। करूं लागले उपयोग॥ लोणी अनुपान जयाला। ऐशा दिव्य औषधीला। आणून लागले पाजायाला। घालून तक्रीं हे दांभिक॥ अनुपान चुकलें म्हणून। यत्किंचित न आला गुण। उलट झालें नुकसान। औषधाच्या तीव्रतेनें॥ सुधारकांनीं सिद्धांत केला। तक्र प्रयोजन न लोण्याला। आंबटापासून मधुराला। जन्म कैसा होईल॥ ऐसें म्हणून त्यागिलें। ताक सुधारकांनीं भलें। एवंच दोघेहि मुकले। नवनीताच्या लाभाला॥ असो तक्रांशींच नवनीत। का हे मानूं लागले भ्रांत। याचाही मथितार्थ एक तुला सांगतों॥ मागें दामाजीपंत ठाणेदार। यानें सारासार विचार। करूनियां साचार। थोर भंडारा घातिला॥ त्यांच्या त्या भंडाऱ्याचा। विधी तत्त्वास धरून साचा। म्हणून

आलेल्या संकटाचा। परिहार केला पांडुरंगें॥ लोक दुष्काळीं मरूं लागले। हें जें तत्त्व पंतें पाहिलें। तें हल्लीं विसरून गेलें। शेष राहिला विधी मात्र॥ तोच विधी सत्य समजून। तैसें वर्तू लागले जन। परी तत्त्व गेलें म्हणून। फलाभाव सहजची॥ अलीकडे भंडाऱ्याचा। सुकाळ सर्वत्र झाला साचा। तो न भंडारा घालणाराचा। रासमार्था केवळ॥ अलीकडील हे संत। उसने होऊन दामाजीपंत। खऱ्या पंतांच्या चरित्राप्रत। काळिमा मात्र आणिती॥ भाविक भंडारीं जेवणा जाती। सुधारक त्यां निंदीत बसती। एवंच दोघेही न आणिती। चरित्र मनीं पंतांचें॥ श्रीनामदेवें केलें भजन। विठ्ठल विठ्ठल रात्रंदिन। कीं ज्या भजनें नारायण। येऊन राहिला पुढें उभा॥ एक पळही आयुष्याचा। हरिभजनावीण जावा न साचा। म्हणून विधी भजनाचा। अमलांत आणिला गुरुवरें॥ भजनें भेटतो नारायण। एवढेंच खरें मानून। अलीकडील संतजन। ऐसें करूं लागले॥ भजनासाठीं पहारेकरी। पगार देऊन ठेविती घरीं। पगार थकतां वर्गणी खरी। करिती शिष्यमंडळींत॥ ऐसें हें भाडोत्री भजन। फलद्रूप होय कोठून। उलट भजनाचा अपमान। होऊं लागला यामुळें॥ सुधारक बत्तिशा काढिती। आणि उघड ऐसें म्हणती। टाळें भेटतां कमलापती। तरी तांबट उद्धरतो॥ असो कोणत्याही धर्मांत। तत्त्वावीण विधीप्रत। महत्त्व येतां खचित। दैन्य होणार तयाचें॥ तत्त्व त्रिकालाबाधित असे। विधीचा धर्म तैसा नसे। तो लोकांनीं घडविला असे। आपुली सोय पाहुनीं॥ म्हणून वत्सा विधीवरी। भिस्त ठेवूं नये खरी। तत्त्व विचारअंतरीं। सर्व काळ करावा॥ हिंदु करिती एकादशी। जैन भाद्रपदीं उपवासी। यवन रमजान महिन्यासी। रोजे करिती बहुसाळ॥ म्हणजे उपवास करणें हें तत्त्व। एकादशी, भाद्रपद, रोजा व्यर्थ। हाच विचार प्रत्येकांत। कळून येतो शोधितां॥ देशकालवर्तमान। पाहून कोणतेंही कर्म जाण। करावें ऐसी सर्वांलागुन। आज्ञा आहे धर्माची॥ मागें शंकराचार्यांनीं। या तिन्ही गोष्टीस पाहुनी। धर्मविधीलागुनी। योग्य दिधली चालना॥ प्रत्येक तत्त्वालागुन। एक दोष एक गुण। त्याचें तुजला विवेचन। थोडक्यांत करतों ये ठायीं॥ सर्वत्र भरला ईश्वर।

ऐसें जो विचारें मानी नर। तो अक्रिय राहे निरंतर। एखाद्या जड शीलेपरी॥ जो अद्वैत वगळून द्वैत। मानीतसे जगीं सत्य। तो भोगी ऐहिक सुखाप्रत। परी घेई जन्म पुन्हा॥ दयाच नुसती सेवितां। क्रोध नुपजे कदां चित्ता। परी नेभळेपण सर्वथा। येऊन फावेल दुष्टातें॥ शौर्य नुसतें सेविलें जरी। तेजसपण टिकेल भूवरी। परी आजन्म मारामारी। होऊन पळेल शांतता॥ अंगीं असल्या अभिमान। संरक्षील आपुलेंपण। परी इतरांचें दैन्य। करावया न चुकेल तो॥ कामालागीं सेवितां। रतिसौख्य येईल हातां। परी आयुष्या। अल्पता येऊन स्वास्थ्य नष्ट होईल। मानवें लोभ सेविल्यास। वैभव येईल उदयास। परी इतरां ठायीं द्वेष। उपजणार मानसीं॥ मोह मोठा बलवत्तर। काळजीचा पाडी विसर। परी तो विवेकावर। फेकणार आहे मातीच॥ ऐसाच इतर तत्त्वांचा। विचार बापा समज साचा। परी प्रत्येकानें या अवघ्यांचा। स्वीकार केलाच पाहिजे॥ अद्वैतीं ब्रह्म ओळखावें। द्वैतीं होऊन करावें। सृष्टींतील आघवें। व्यवहार परम चातुर्यें॥ शौर्य असावें बाह्यात्कारीं। दया वसावी अंतरीं। जेवीं काटे फणसावरी। आंत पाहतां गोड गरे॥ आपुलेपणाचा अभिमान। तेजसपणें वहावा जाण। परी ठेवावें अवधान। लीनतेवरी सर्वदा॥ शत्रू भेटतां तरवार। करीं धरणें साचार। परी खेळवितां किशोर दूर धरली पाहिजे॥ श्रद्धा ठेवणें धर्मावरी। परी अंधश्रद्धा नाहीं बरी। अंधश्रद्धेनें होळी खरी। होईल तत्त्वांसह सुखाची॥ परधर्म्यांचा तिटकारा। मनीं वाटूं लागल्या खरा। अंधश्रद्धा त्याचे द्वारां। येऊन बैसली म्हणावी॥ अवघ्या धर्मतत्त्वां ठायीं। फरक एतुलाही नाहीं। ते अवघेच एकमयी अवघे आवडती ईश्वरा॥ आंतून स्वधर्मी असावें। बाह्यरूपें विधर्मी व्हावें। विधी मात्र वगळावें। त्याचे स्वधर्म रक्षावया। तात्त्विक विचारें हिंदू असावें। तेजसपणें यवन व्हावें। दयेपुरते बसावें। जैन बुद्ध होवोनियां॥ ऐसा झालिया प्रत्येक। ओखदा न मिळे दुःख। अक्षयीचें लाभेल सुख। सर्वदा सर्व समाजासी॥ त्यांतून ऐसें वागण्यासी। आवश्यकता या देशास साची। कां कीं अवघ्या धर्मासी। खिचडी हें भरतखंड॥ पाहतां ही भारती। आली हिंदूंच्या

वांटण्याप्रती। विधर्मीयांची सत्ता ती। नाहीं किमपी हिजवर॥ युरोप खिस्त्याकारण। तार्तरी तुर्क अरबस्थान। इराण बलुची अफगाण। दिलें यवनाकारणें। बौद्ध येथें जन्मला। परी वस्तीस चिनांत गेला। पाहुण्यास मुलगा झाला। परी न वारसा येई त्यासी॥ भरतखंडा-माजीं भली। विधर्मीयांची गर्दी झाली। आणि तेच होऊन बसले बली! आलें हीनत्व रहिसाना॥ हिंदूचें समाजबंधन। गेलें शिथिल होऊन। अपमतलबें करून। अंतर त्यांचें व्यापिलें॥ समाजबंधन तेव्हांच टिकतें। जेव्हां देशभाषा एक असते। आणि एक्याच धर्मातें। मान जेथें सर्वत्र॥ देशभाषा आणि धर्म। हेंच एकीचें आहे वर्म। त्यांत विपरीत झाल्या कर्म। समाज फुटे तात्काळ॥ येथील भाषा संस्कृत। ती झाली असे मृतवत्। भाषा हीच आळा सत्य। समाजपेंढीकारणें॥ हिंदी बंगाली मारवाडी। गुजराथी उडिया कानडी। महाराष्ट्र तेलगू द्राविडी। कोंकणी पंजाबी गुरुमुखी॥ भाषेप्रमाणें समाज झाले। वेगळेपण अवघ्यास आलें। मग देशाचे तुकडे पडले। अवघाच झाला बोजवारा॥ म्हणूं लागला मारवाडी। मरेना का कानडी। बंगाली म्हणे द्राविडी। नाहीं आम्हांस कामाचा॥ ऐसें झालें म्हणून। हिंदूस आलें दुबळेपण। हें विधर्मीयांनीं पाहून। स्वाऱ्या केल्या या देशीं॥ महंमद गिझनी सोमनाथा। जैं झाला फोडितां। तैं रजपुतांचे चित्ता। हळहळ त्याची वाटली॥ महंमदें सोमनाथा फोडलें। परी द्राविडा वाटलें। त्यांत आमुचें काय गेलें। आमुचा रामेश्वर सुरक्षित॥ खिचडी अवघ्या धर्मांची। भरतखंडीं झाली साची। म्हणून एकीरूप तुपाची। तिला आहे आवश्यकता॥ हिंदूधर्म तांदूळ भला। इतर धर्म डाळमसाला। एकीरूप घृताला। अवघेंच आहे सारखें॥ अवघे समाज एक करा। द्वेष, हेवा दूरी धरा। शहाणे असतील त्यांनाच करा। अवघ्यांचेच पुढारी॥ शहाण्याशिवाय धूरीणत्व। देतां नये कवणाप्रत। तें अनधिकाऱ्या दिल्या घात। होणार आहे अवघ्यांचा॥ त्याची समज पटावया। उदाहरण देतों ये ठायां। तें पूर्ण लक्ष देऊनियां। ऐका बापा शुद्ध मनें॥ पहा एका देहांत। अवयव हे समाज सत्य। आणि तो प्रत्येक आपणाप्रत। मानूं लागला मीच मोठा॥ पाय रुसले मांड्यावरी। मांड्या रुसल्या पोटावरी।

पोट रुसलें करावरी। कर रुसले डोक्यावर ॥ कान नाक नेत्रीं भली। भाऊबंदकी माजली। त्यायोगें त्वरित लागली। विपन्नावस्था अवघ्यांस॥ हाल देहाचे पाहून । चित्तीं द्रवला नारायण । वर द्यावयाकारण। येऊन राहिला पुढें उभा॥ आणि म्हणाला अवघ्यांसी। काय पाहिजे तुम्हांसी। तें मागा मजपासीं द्यावया मी तयार॥ अवयवांत एकीचा। मोडला होता ठाव साचा। म्हणून एकमेकाचा। विश्वास नये एकमेकां॥ पायांनीं विचार केला । अंगठा पुढारी नेमिला। मांड्यांनीं ते गुडघ्याला। दिलें आपलें धूरीणत्व॥ उरानें ते हृदय। करानें ते दंडपाय। धुरीणपणाचा तो ठाय । दिला करें शिरासी ॥ पुढारीपणाचा अभिमान। वाहून केलें भाषण। जें भाषण द्वेषें पूर्ण। भरलें होतें पराच्या॥ अंगठे म्हणाले आम्हांसी। पगडी असावी घालण्यासी। आजपर्यंत जोड्यासी वाहून आम्ही कंटाळलों॥ पाहूं जातां पायावर। अवघ्या देहाचा असे भार। त्याचीच दैना साचार। या इतरांनीं मांडली॥ आमुच्यांत आणि शिरांत। फरक नोहे यत्किंचित्। हाड कातडें रक्ताप्रत। स्थान शिरीं तैसेंच पदीं॥ परी पगडीस भोगी शिर। आम्ही संतुष्ट खेटरावर। कां असावें निरंतर। आतां पगडी दे आम्हां॥ ऐसेंच अवघ्या अवयवांनीं। केलें वत्सा त्या ठिकाणीं। आपुलें मूळचें टाकुनी। परा योग्य द्वेषें मागितलें॥ ऐकतां तें भाषण। हंसूं लागला नारायण। म्हणे अकलेवांचून। अहंता ती वाढली॥ यांची इच्छा पुरवितां। मूर्खत्व येईल माझे माथां। कांकीं योग्यायोग्याची कथा। बीजासह ठावी मला॥ परी कांहीं न देतां यास। मी येथून गेल्यास। माझ्या प्रिय देहास। जावें लागेल मातीमध्यें॥ म्हणून आतां ऐसें करितों। क्षणैक इच्छा पुरवितों। आणि त्यांचे त्यांना दावितों। प्रत्यंतर मूर्खपणाचें॥ सवेंच पगडी आणविली। ती पायास घातली। चालू जातां लागली। ठेंच आंगठ्याकारणें॥ दोन्ही आंगठे फुटून गेले। रक्त वाहूं लागलें। हात होते मुळींच रुसले। ते न लाविती औषधी॥ आंगठ्यापरी अवस्था। जेव्हां अवघ्यांस आली तत्त्वतां। तेव्हांच त्यांची मूर्खता। आली त्यांना कळून॥ जेव्हां अवघ्यांस दुःख झालें। तेव्हां डोळे उघडले। अवघ्यांनीं मिळून निवाडिलें। मग पुढारी तोंडाला॥ मुखें शिराचा आधार। घेतला

विचारा साचार। कांकीं बुद्धीचें भांडार। आहे ठायीं मस्तकाच्या ॥ धुरीणपण आल्यावर। मुख म्हणालें अहो कर। करा आतां नमस्कार। सच्चिदानंद प्रभूसी॥ उदरा तूं वाक थोडा। हे पदहो ताठा सोडा। आलेला हा निधी जोडा। एकमेकांच्या साहाय्यानें॥ नमस्कार जाहल्यावरी। मुख बोललें मधुरोत्तरीं। हे सच्चिदानंद मुरारी। ऐसें आम्हांस पाहिजे॥ पाय आमुचे साधू थोर। अवघ्या देहाचा वाहती भार। करावया आत्मोद्धार। तीर्थें क्षेत्रें हिंडती॥ त्यांचें पगडीनें रक्षण। होणार नाहीं कदां जाण। तें डोक्याचें भूषण। योग्य आहे त्याचें त्या॥ जोडाच किंमतवान् करी। कलाबतू रेशीम लावून वरी। आंत गादी नरम खरी। घाली शीघ्र पांडुरंगा॥ म्हणजे रक्षणही होईल। वरी किंमतही वाढेल। गादीमुळें मिळेल मृदुत्वाचें सौख्य पायां॥ ज्याचें त्याचें त्यास द्यावें। मात्र किंमतवान् करावें। हीनावस्थेंत न ठेवावें। तूं कवणाही पंढरीशा॥ मग तेथें कोठून उशीर। तुऱ्यासह पगडी थोर। आणून ठेविली शिरावर। कानामाजीं चौकडा॥ चष्मा सोनेरी डोळ्यास। मखमली अंगरखा अंगास। कलाबतूचे पायास। जोडे करूनी घातले॥ करामाजीं सलकडीं। कंठांत कंठा पांच लडी। पीतांबराची आणविली घडी। बहुमोलशी नेसावया॥ सव्य बोटीं मुद्रिका। वाम करीं तरवार देखा। नासिकातें द्याया सुखा। अत्तर लाविलें चोहींकडे॥ मग अवघे संतुष्ट झाले। मुखा गौरवूं लागले। द्वेषाचें तें ठाणें उठलें। प्रीती वाढली परस्पर॥ देव म्हणे मुखाला। तूं कांहीं माग आपणाला। तुझ्या दांत दाढा जिभेला। झालेत कष्ट बहुसाळ॥ मुख म्हणालें त्यावर। मला न राहिला अधिकार। मागावयाचा साचार। कांकीं धुरीणत्व मजकडे॥ ज्यानें देवा धुरीण व्हावें। त्यानें सर्वदा निरिच्छ रहावें। कांहींही न मागून घ्यावें। संन्यासवृत्ति स्वीकारावी॥ तैसी त्यानें अंगिकारिली। मुखासाठीं कोठें न झाली। नगवस्त्राची योजना भली। हें ध्यानांत असूं दे॥ समाजरूपी देहाचा। राजा शिरोभाग साचा। शूर समुदाय तयाचा। दोन्ही कर जाणावे॥ शेतकरी हें उदर। व्यापारी हृदय साचार। मांड्या त्या सावकार। मजूरवर्ग पाय पहा॥ अवघे विद्वान् हें मुख। तत्त्ववेत्ते बुद्धि देख। दूरदृष्टीचे ते लोक। नेत्रस्थानीं

समजावें ॥ राजसत्ता ही तलवार । भरभराट वर्ण साचार । देशरूपी हें घर । आहे तया राहायाचें ॥ मूर्खाहातीं धुरीणत्व । देता समाजा होय घात । हें पाहतां इतिहासांत । ठायीं ठायीं कळेल ॥ समाजाचें धुरीणत्व । देतां नये राजाप्रत । त्या बहुमाना योग्य संत । परी ते खरे असावे ॥ नृपें फक्त नृपत्वाचा । उपभोग नीतीनें घ्यावा साचा । इतरांचे व्यवसायांचा । स्वीकार केव्हांही करूं नये । श्रीशंकराचार्य पुढारी झाले । आजन्म यतीच राहिले । श्रीविदुरें नाहीं त्यजिलें । आपुल्या दैन्यावस्थेला ॥ श्रीसद्गुरु कबिरांनीं । प्रसन्न होतां कैवल्यदानी । अवघ्या जगालागुनी । सुखी ठेव हें मागितलें ॥ स्वतःच्या दारिद्र्याचें । गाऱ्हाणें ना केलें साचें । भव्य मंदीर निरिच्छेचें । हाच महात्मा जाहला ॥ त्यालाच म्हणावें संत । कीं जो अवघ्या तत्त्वीं पारंगत । असून राहे अलिप्त । तडागींच्या कमलापरी ॥ एवंच धर्मासारिखा । इहपरत्र नाहीं सखा । परी त्याचा उपयोग निका । घ्यावा विचारें करून ॥ म्हणजे कोठेंच भीती नाहीं । सर्वत्र तो होईल विजयी । अखेरीला शेषशायी तोही जाण भेटेल ॥ हेंच हिंदुधर्माचें । सार आहे बापा साचें । म्हणून तो त्यागिण्याचें । तूं मनांत आणूं नको. ॥ ”

‘ भक्तिसारामृत ’ अध्याय २३.

## १२४. संसाराचें स्वरूप

“ अवघीं शास्त्रें संसारासी । निःसार आहे म्हणती ऐसी । या प्रपंचरूप शृंखलेसी । तोडी सत्वर दीनबंधो ॥ जों जों सुखाची हांव धरावी । तों तों दुःखाची स्वारी व्हावी । आशा सटवी नाचवी । ठायीं ठायीं आम्हांला ॥ शोधूं जातां संसारांत । सुखाचा न लेश सत्य । मी कंटाळलों त्याप्रत । नको संबंध तयाचा ॥ ऐसें ऐकतां भाषण । बाबा बोलले हंसून । वेड्या भलतेंच मोहक अज्ञान । कोठून तुज हें उदेलें ॥ तुझी आहे सत्य गिरा । परी चुकलास येथें जरा । यावत् देह तावत् खरा । संसार आहे पाठीशीं ॥ मग तूं त्या कैसा सोडिसी । तो न चुकला कोणासी । तो तोडितां नये मशीं ।

मीही त्यांत गुंतलों ॥ संसाराची रूपें अनेक । तीं मी सांगतों तुज देख । देहावरी आहे झाक । पहा तया संसाराची ॥ काम, मोह, मद, मत्सर । यांचा जो का परस्पर । संबंध तोही संसार । आहे बापा शिष्योत्तमा ॥ डोळे पदार्थ पाहती । कर्ण ध्वनीतें ग्रहण करिती । रसना रसातें सेविती । याचेंही नांव संसार ॥ मनाचे जे व्यापार । त्याचेंही नांव संसार । शरीरधर्म साचार । अवघे संसाररूपी बा ॥ स्वरूप या संसाराचें । मिश्रण दोन वस्तूंचें । तें हें संसार बंधन साचें । सुटलें नाहीं कोणास ॥ दारा पुत्र कन्यादिकांसी । संसार म्हणती निश्चयेंसी । तो मात्र वोखटा तुसी । वाटूं लागला सांप्रत ॥ दारा पुत्र कन्या जाण । बंधु, भाचे, पुतणे, स्वजन । यांच्या त्रासें सेविलें रान । परी न सुटे संसार हा ॥ या शेवटल्या संसारीं । दुःख होतें नानापरी । वरले संसार निर्धारीं । अवघे ईश्वर निर्मित ॥"

'भक्तिलीलामृत' अध्याय ३२

## १२५. सांसारिक सुखदुःख खोटें

"सौख्य होतां हर्ष वाटे । दुःख होतां हृदय फाटे । हे सुखदुःखाचे चपेटे । पटल केवल भ्रांतीचें ॥ प्रपंचांतील जे जें सुख । तें खरें नव्हे देख । बळेंच त्याला प्रापंचिक । सत्य घेती मानुनी ॥ देह प्रारब्धें एकाप्रत । खाया मिळे पंचामृत । एकास वाळले तुकडे सत्य । एकास मिळे कळणाकोंडा ॥ तुकडे कळणाकोंडेवाला । दुःखी मानी आपणांला । पंचामृताचा धनी भला । म्हणे कांहीं कमी नसे ॥ सेविलिया मधुर पक्वान्न । अथवा कळणाकोंडा जाण । या दोहोंचें अधिष्ठान । तृप्ति जठरस्थ अग्नीची ॥ शाला दुशाला जरतारी । घेऊन कोणी नानापरी । भूषविती तनु साजिरी । कोणी पांघरिती वल्कलें ॥ शाल दुशाल वल्कलांचें । आहे प्रयोजन एक साचें । रक्षण करणें तनूचें । कांहीं न या पलीकडे ॥ मग या सुखदुःखाचा । उपयोग केवळ मानण्याचा । तें मानणें तिमिर साचा । आहे घातक मानवासी ॥ या सुखदुःखाचे तरंग उठती । जे जे कांहीं आपुल्या चित्तीं । ती ती होय अवघी भ्रांती । कामक्रोध हें मूळ तिचें ॥ षड्रिपूसी आवरतां ।

तरंग न कधीं उठती चित्ता। भ्रांत सुखदुःखाची बाधा तत्त्वतां। मग न होई मानवासी॥ खऱ्या सुखदुःखाची। व्याख्या सांगतों ऐका साची। त्यांच्यामधून स्वतःची मुक्तता घ्यावी करूनी॥ मुक्ती हेंच खरें सुख। जन्ममरण हेंचि दुःख। या व्यतिरिक्त दुसरी भ्रामक। आहेत सर्व सुखदुःखें॥"

'भक्तिलीलामृत' अ. ३२

## १२६. प्रारब्धभोग

संचित क्रियमाण पूर्वीचें। देहप्रारब्ध फळ त्याचें। हेंच प्रारब्ध जन्माचें। आहे मूळ कारण॥ तें देहप्रारब्ध भोगल्याविण। न सुटे कवणालागुन। तें भोगण्याकारण। प्राणी जन्म पावती॥ जैसी योनी तैसी कृति। ही जगाची रीत निश्चिती। त्यांतची प्रारब्ध भोगिती। कमी जास्त मानानें॥ पहा कित्येक पंचानन। स्वेच्छेनें सेविती कानन। कित्येका दरवेशी बांधून। दारोदार हिंडविती॥ धनिकाश्रित जें का श्वान। ते बैसती गाद्यावरून। कित्येक बापडे भटकून। गांवांत तुकडे शोधिती॥ या अधिक उण्याचें कारण। एक देह-प्रारब्ध जाण। तें अवघे भोगल्याविण। कालत्रयीं सुटेना॥ तोच न्याय मानवांत। एक गरीब एक श्रीमंत। एक सभाग्य एक अनाथ। एक भिक्षा मागतसे। कित्येकास मुलें न होतीं। कित्येकांचीं होऊन जातीं। आणि कित्येक त्रासती। संततीला॥ हें देहप्रारब्धभोगितां। सद्सद्विचारशक्ती चित्ता। जागृत ठेवावी सर्वथा। तिसी फाटा देऊं नये॥ सहजगतीनें जें जें घडे। तें तें देहप्रारब्ध रोकडें। कर्म करून जें जें घडे। तें न देह प्रारब्ध॥ पहा कित्येक चोऱ्या करिती। कृतकर्में शिक्षा भोगिती। हें शिक्षा भोगणें निश्चिती। नोहे देहप्रारब्ध॥ जहर पीतां घडे मरण। तें नोहे प्रारब्ध जाण। हें कृतीचें फळ पूर्ण। कर्त्यालागीं मिळतसे॥ देहप्रारब्ध कर्मातीत। येथ न व्हावें शंकित। प्रारब्धें कर्मफळ भोगांत। अंतर पहा पडतसे॥ पहा कित्येक खरे चोर। असून सुटती सत्वर। पुरावा न होय त्यांचेवर। हें प्रारब्ध तयांचें॥ दोघांचें कृत्य एक सत्य। एक सुटे एक शिक्षा भोगित।

म्हणून जाण कृत्यातीत। देहप्रारब्ध जाणावें॥ परी त्या सुटलेल्या चोराचें। पाप न जाय कधीं साचे। ते पुढीलिया जन्माचे। दुःखा कारण होईल॥ म्हणून आतां सांगणें तुसी। भोगतां देह प्रारब्धासी। जागृत ठेवावें नीतीसी। म्हणजे कार्य होईल॥'

'भक्तिलीलामृत' अध्याय ३२–३३

## १२७. सत्य आणि मिथ्या यांचें स्वरूप

"पाटीभर कोरडी माती। पाटीवीण न धरवे हातीं। तीच चिखल झाल्यावरती। गोळा होऊन धरितां ये॥ पृथ्वी आप तेजाचा जो झाला समुच्चय साचा। त्या कार्यास कवीची वाचा। गोळा ऐसें म्हणाली॥ या गोळयास पाहुन। गोळाच सत्य म्हणेल जन। आणि तेणें अपमान। होईल मूळच्या सत्याचा॥ हें दूर इष्टींनीं। जाणून स्वानुभवें मनीं। गोळयास मिथ्या म्हणूनी। केला असे इशारा॥ त्यायोगें ऐसें झाले। बुद्धिमान् ते उमजले। गोळया ठायींच पाहिलें। त्यांनीं जीवन मातीला॥ आणि रचिला सिद्धांत। खराच गोळा आहे मिथ्य। पाणी आणि मातीस तेथ। सत्यत्व मात्र असे हो॥ पहा राजाचें सिंहासन। बसणाऱ्यापेक्षां निश्चित गौण। परी वैभव वृद्धी लागुन। लौकिकांत श्रेष्ठ वाटे॥ तैसें सत्य या भूपास। असत्य गादी बसावयास। ब्रह्मराजा सत्य खास। मिथ्या जग गादी पहा॥ जैसी गोळया ठायीं भली। पाणी मातीच पाहिली। परी गोळयाचीं नाहीं जाहली। ताटातूट त्यांचेहुन॥ सत्यत्व पाणी मृत्तिकेला। परी गोळा ठायींच राहिला। आणि मिथ्यात्व गोळेपणाला। वरूनियां राहिलें॥ दोन्ही असून साक्षात्। आलें कळून सत्यमिथ्य। एक्या गोळारूप वस्तूंत। तैसेंच येथें जाणवें॥"

'भक्तिसारामृत' अध्याय ३७

## १२८. कर्म, भक्ति आणि ज्ञान

"कर्म उपासना ज्ञान। हे बाल्य तारुण्य वृद्धपण। या स्थितींचे समान। आहे याचा विसर पडला॥ शेतीं जोंधळा पेरिला। आणि येऊं न देतां कणिस त्याला। बाहुक करूनी रक्षिला। तैसें झालें

कर्मकांड ॥ जोंधळा जो लाविला । तो न बाटुक होण्या भला । आलें पाहिजे कणिस त्याला । हीच इच्छा पेरित्याची ॥ नुसतें कणिस येऊन । इच्छा न खरी पूर्ण होय । त्या कणसालागुन । दाणे आले पाहिजेत ॥ वैदिकपंथ जोंधळा । कर्म हें बाटुक त्याला । उपासनामार्गाला । कणिस म्हणणें योग्य असे ॥ दाणे हेंच आहे ज्ञान । त्या कणसालागुन । ऐसा वेद मार्ग संरक्षण । करणें ज्ञानी पुरुषानें ॥ द्वेष कोणाचा करूं नका । अद्वैतास लागेल धक्का । तारतम्यें सर्व देखा । येथें पडतें उपयोगी ॥ कर्मांचिया काढ्यांत । उपासना ही शर्करा सत्य । मात्रा उगाळून अद्वैत । भवरोग्यास पाजावी ॥ कर्ममार्गें चित्तनिवृत्ति । भक्तिमार्गें ईश्वरप्राप्ती । ज्ञानमार्गें पावताती । प्राणी ईश्वरपणाला ॥ ”

## १२९. सगुणनिर्गुण

“ आम्हां पाहिजे निर्गुण । परी आम्ही भजतों सगुण । जग आणि जनार्दन । एक आम्ही मानितों ॥ या भागवत पंथांत । औषधासही दोष न मिळत । भावंड प्रत्येक भूताप्रत मानिलें पाहिजे या पंथें ॥ अवघ्या ठायीं तोच आहे । अवघीं कृत्यें त्याचींच पाहे । आणि कोणी कोणास निंदूं नये । हाच मार्ग उत्तम ॥ म्हणून हाच उपदेश । विष्णूमय मानी जगतास । नामीं ठेवणें विश्वास । नीतीपथा सोडूं नये ॥ जैसे सुवर्ण असतां एक । दागिने घडती अनेक । परी तें अनेकत्व बाधक । नच होय सुवर्णा ॥ दागिनेपण सोन्यासी । सोनें तेवी दागिन्यासी । व्यापून आहे निश्चयेंसी । वेगळेपणा न आवश्यक ॥ म्हणून जरी झालें ब्रह्मज्ञान । तरी न टाकी सगुणभजन । भिंत चढली म्हणून । काय पाया मोडावा ॥ ”

## १३०. भक्तीचें श्रेष्ठत्व

“ श्रुतींनीं केली बडबड । परी तूं त्यांच्या दृष्टीआड । उपनिषदानें कोरून पहाड । अध्यात्मदऱ्या बनविल्या ॥ त्याहीपेक्षां गोपींचा । खचित अधिकार थोर साचा । तुझ्या दर्शन अनुभवाचा । लाभ यासी सर्वदा ॥ प्रेम जें का विनयरहित । तेंच टिकून सौख्य देत । या प्रेमाची

अखंडित। वाढ साञ्र कालापरी ॥ कर्मी पाहिजे शुचिर्भूतपणा। भक्तिमार्गी निष्ठा जाणा। वेदांत्यानें जनार्दना। जगाठायीं पहावें ॥ या तिन्ही अवस्था भक्तीप्रती। सहजासहजीं प्राप्त होती। उत्तमोत्तम भक्तस्थिति। जगतामध्यें जाणावी ॥ हठयोग्यास ईश्वरप्राप्ती। न होय सत्वर गती। कर्मज्ञानाची ही गती। मानवासी निरुपयोगी ॥ भक्ती हेंच साधन। भक्ती हेंच फळ पूर्ण। भक्तीनेंच नारायण। वश होतो निश्चयें ॥ जो वाणीचा रसाळ। भजनाविषयीं प्रेमळ। त्यासी मृदंग, वीणा, टाळ। कासयासी पाहिजे ॥ देव भक्तीचा भुकेला। हा चि दुष्काळ असे त्याला। जेथें भक्तीचा जिव्हाळा। तेथें चाकर श्रीहरी ॥ ईशाविषयीं अत्यंत प्रीती। हीच होय पराभक्ती। तिच्याचमुळें ईशप्राप्ती। बारणारासी होत असे ॥ ईशप्रेमावांचून। फोल आहे ब्रह्मज्ञान। तें सफल व्हावया लागुन। आहे अपेक्षा भक्तीची ॥ शब्दज्ञानें नास्तिकाला। उपनिषदाचा अर्थ कळला। परी त्यासी नाहीं झाला। लाभ ब्रह्मानंदाचा ॥ नास्तिका ज्ञानें ऐसें होतें। गोष्टी उलटी लागते। भाविक असल्या त्यास करिते। तेंच ज्ञान कृतार्थ ॥ पराभक्ती सेवितां। ज्ञान सहज येईल हाता: जेवीं सूर्याचा उदय होतां। प्रकाश लाभे त्याचेसवें ॥ म्हणून भक्तीसहित ज्ञान। करा बुधहो आदरें ग्रहण। उगीच तत्त्वज्ञानाचें व्याख्यान। देण्यामध्यें मजा नाहीं ॥ जीवोपाधीचा लय। पराभक्तीनेंच होय। ऐसें श्रेष्ठत्व अतिशय। आहे पराभक्तीचें ॥ "

## १३१. अद्वैत आणि भक्ति

"अवघ्या सूत्राचा मतितार्थ। हाच आहे श्रोते सत्य। श्री हरीच्या प्रेमांत। पूर्ण जाणे रंगूनियां ॥ तैसें रंगून जाण्या पाही। विधी असोत कोणतेही। त्याची बाधा यास नाहीं। भक्तचि होतो भक्तिरूप ॥ भक्त अद्वैताचा पुतळा। द्वैतसिद्धांताचा मळा। कर्मयोगाचा सोहळा। संकल्पावीण आचरी ॥ अद्वैतातें लेखी प्राण। उपासना ती कलेवर जाण। आणि अवयवाचे समान। लेखी अवांतर मार्गातें ॥ साधनीं फरक राहिला। परी भक्तींत ना बदल झाला। ती पराभक्ति अवघ्याला। लाधली आहे सारखी ॥ शिव

आणि श्रीहरि। हें एक तत्त्व निर्धारीं। जेवीं तरंग आणि लहरी। शब्देंच येती द्वैतत्त्वां॥ भज्य झाल्या केशव। भक्त होतो त्याचा शिव। जेथें भज्य सदाशिव। तेथें भक्त श्रीहरि॥ ऐसी या दोघांची। गंमत आहे एकत्वाची। द्वैत आणि अद्वैताची। प्रचिती एक्याच तत्त्वीं ये॥ या सृष्टीचा व्यापार। जोवरी आहे दृष्टीसमोर। तोवरी ठसणें। अवघड फार। आहे अद्वैत सिद्धांत हा॥ म्हणून अद्वैत कायम ठेविलें। द्वैतमतासी जीवविलें। किंचितज्ञा जीवा केलें। सर्व बाजूंनीं समर्थ॥ द्वैतग्रहण केल्याविना। व्यवहार तो चालेना। आणि व्यवहार सुटेना। जोवरी देह प्रारब्ध॥ भ्रताराची कामिनी। अर्धांग कथिलें शास्त्रवचनीं। तें देहालागुनी। पाहतां खोटें वाटते॥ कामिनीला गळूं झालें। पोटीस भ्रतारा बांधिलें। तें का उपयोगी पडेल भलें। कामिनीच्या गळवास॥ तेथें अद्वैताची कल्पना। लाविली पाहिजे प्राणा। परी देहाचा भिन्नपणा। मानलाच पाहिजे॥ व्यवहार कायम राहून। अद्वैताचें व्हावें ग्रहण। याच हेतूला धरून। भक्तिसूत्रें कथियेलीं॥ वेद जो त्रिकांड झाला। तो याजसाठीं भला। म्हणून त्याच्या रहस्याला। समन्वये जाणावें॥ मतांत ऐसी गंमत। म्हणे अद्वैती माझें मत। आणि खंडी द्वैत सिद्धांत। हें का सांगा सिद्ध खरें। अद्वैती त्यालाच म्हणती। कीं जेथें भेद कांहीं न उरती। द्वैत अद्वैत भांडणें तीं। नांदतीं शब्दबळावर॥ त्या शब्दवादाचें निरसन। व्हाया भक्तीचें प्रयोजन। भक्तिमार्गें करून। अत्रयेंच आहे साधणारें॥"

## १३२. प्रकृति आणि पुरुष

"हें अवघें दृश्य विश्व। आणि चेतनात्मकजीव। हाच मायेचा असे ठाव। तेंच तिचें स्वरूप असे॥ ईशाची जी शक्ति। तीच आहे प्रकृति। माया ऐसे तिलाच म्हणती। शब्दव्यवहार चालावया॥ अग्नि आणि आग्निपण। हें मुळींच नाहीं भिन्न। हेंही नातें तत्समान। पुरुष आणि प्रकृतीचें॥ माया नसे मुळीं असत्य। नये तिला म्हणतां सत्य। सदसद्विवेक भाव मिथ्य। तिचा शब्दें न वर्णनें विश्वाकार विस्तारली। जरी ही सृष्टि अवघी भली। तरी

ती मायाच राहिली। कांहीं न यापलीकडे ॥ संकोचली तरी माया। विस्तारली तरी माया। हें तत्त्व बाधित व्हावया। अवकाश नाहीं राहिला ॥ प्रकृति आणि पुरुष। हे अनादि निःशेष। ते द्वैताचे दृशेस। येते ना कधींही ॥ त्यांचें द्वैत शाब्दिक। प्रकृति पुरुष तत्त्व एक। प्रभेसहित जैसा देख। तेजोराशी भास्कर ॥ अलंकार आणि सुवर्ण। ही कल्पनाच असे भिन्न। सुवर्णाचा लोप जाण। अलंकारीं न जाहला ॥ सच्चिदानंदा ठायीं जाण। ही पुरुषप्रकृति निर्माण। दोहीं स्वरूपा अधिष्ठान। एकचि असे॥ पुरुष पुरुषरूपा आला। परी वेगळा नाहीं झाला। त्यांनीं ठायींच बैसुनी घेतला। प्रकृतीचा वेश स्वयें। वेश घेतला म्हणून। मोडी न आपुलें एकपण। फक्त वेशाचें दाखवी भान। आपुल्याच स्वरूपीं ॥ नट पाहतां सुंदर पुरुष। तयानें घेतां स्त्रीवेश। तेथें स्त्रीवेशाच्या सुंदरतेस। कारण मूळचें सौंदर्य ॥ एवंच प्रकृति आणि पुरुष। एकरूप निःशेष ठायींच्या ठायीं घेतले वेश। एकपणा न मोडितां ॥ ”

## १३३. बद्ध लक्षणें

“ धर्माधर्म जाणेना। ईश्वर कोण हें ओळखीना। मनीं न उपजे सद्वासना। त्यासी बद्ध म्हणावे ॥ जो केवळ कपटपटु। ज्याचें वचन सदा कटु। ज्याचीं पापें अचाटु। तोही बद्ध जाणावा। साधुसंत सज्जन। यांतें न ओळखी ज्याचें मन। प्रपंची जो तल्लीन। तो ही बद्ध जाणावा। दानधर्मी न ज्याची मती। पोकळ वितंडवादी अती। तोहि बद्ध निश्चितीं। संशयू नाहीं ॥ पराच्या ठेवी बुडवीत। आपला सवरात करीत। साधुसंता निंदीत। तोहि बद्ध जाणावा। आपुली वाढविण्या थोरी। उगीच दुसऱ्याची निंदा करी। सोंग साधूचें घेऊन वरी। अनीति करी तो बद्ध ॥ प्रपंच ज्याचा परमार्थ। प्रपंच ज्याचा पुरुषार्थ। सदा प्रपंची ज्याचें चित्त। तोहि बद्ध जाणावा ॥ जो मित्राचा द्रोह करी। जो गुरूशीं वैर धरी। विश्वास महावाक्यावरी। ज्याचा नसे तो बद्ध ॥ नाना ग्रंथ भाराभर। करूनियां पाठांतर। ज्याचें न होय शुद्ध अंतर। तोहि बद्ध जाणावा ॥ ”

## १३४. मुमुक्षु लक्षणें

" जो बद्ध स्थितीस कंटाळला। जाणें सदसद्विचाराला। म्हणे कधीं भेटेल मला। देव तो मुमुक्षु॥ सत्संगाची करी आस। निःसार मानी जगतास। जो विटला प्रपंचास। तो मुमुक्षु जाणावा॥ देह प्रारब्धें जी स्थिति। प्राप्त झाली तयाप्रती। त्यांतचि मानी चित्तीं। समाधान तो मुमुक्षु॥ जयासी पाप करण्याचें। वाटतसे भय साचें। असत्य न बोले कदा वाचे। तो मुमुक्षु जाणावा॥ पश्चात्ताप कृतकर्माचा। झाला असेल जया साचा। जरी पतित तरी त्याचा। मुमूक्षूंत अंतर्भाव॥ देवाविषयीं ज्यास आस्था। साधूठायीं नम्रता। जो नीतीचा असे भोक्ता। तो मुमुक्षु जाणावा। जो क्षणैक सत्संग सोडीना। ज्याची अखंड रतली रसना। श्रीहरीच्या नामीं जाणा। तो साधक म्हणावा। विषय वाटे विष ज्यासी। जो अध्यात्मविद्येसी। साधावया प्रतिदिवशीं। यत्न करी तो साधक॥ ध्यान करी ईश्वराचें। ग्रहण करून एकांताचें। त्यानें पद साधकाचें। घेतलें ऐसें म्हणावें॥ श्रीहरीचे गुणानुवाद। ऐकतां मानी आनंद। कंठ होतसे सद्गद। तो साधक म्हणावा॥ लौकिकाची न पर्वा। करी सदा संतसेवा। चित्तांतून रमाधवा। जाऊं न दे तो साधक॥

## १३५. संतांचें स्वरूप

" त्यासीच म्हणावें संत। ज्याचे षड्रिपु आज्ञांकित। उदार गंभीर। अति शांत। वासना ज्याची निमाली॥ अष्टसिद्धी राबती दारीं। परी न जो पर्वा करी। जगदुद्धारा भूमीवरी। अवतार ज्यानें घेतला॥ क्षमाशांतीचें माहेर। साधुपुरुष साचार। जेवी जलानें सागर। ओतप्रोत भरियेला॥ त्यालाच म्हणावें जगीं संत। कीं जो समान देखी अवघ्याप्रत॥ उच्चनीच ही भावना नित्य। शिरे न ज्यांच्या मानसीं॥ सच्चिदानंदपदासी। संत सेविती अहर्निशीं। तादात्म्य पावती ईश्वरासीं। फाडशा पाडून मायेचा॥ शाब्दे परेच निष्णात। या लोकीं एक संत। संत असून जीवनमुक्त। लोक-स्थितीनें वर्तती। संत वैराग्य न सोडितीं। संत लोकव्यवहारें वर्तती॥ कर्मभक्तिला चालविती। विमलज्ञाना सेवून॥

## १३६. संतांचें महात्म्य

" संत भवार्णवींची नौका । अथवा स्वर्गींचें सोपान देखा । प्रिय जें का वैकुंठनायका । प्राणाहुनी अत्यंत ॥ संत भूपाचे भूपती । संत वैद्याचे वैद्य निश्चिती । संतापाशीं रमापती । आवडीनें राहतसे ॥ संतांची ती करितां सेवा । हर्ष वाटे रमाधवा । खासदार झाला बरवा । अर्जुनाचा श्रीकृष्ण ॥ जनीचें दळतां दळण । नच लाजे नारायण । काननासी जाऊन । गोवऱ्या वेंची तिजसंगें ॥ पैठणांत गोदातीरीं । पाणक्या झाला मुरारी । श्रीएकनाथाचिये घरीं । गंध उगाळीं आनंदें ॥ संतभक्ता अव्हेरितां । वा दुरुत्तरानें ताडितां । किंवा त्यासी गांजितां । संतापतो घननीळ ॥ झाल्या संतांचें दर्शन । साक्षात् भेटे नारायण । संतसहवास केल्या जाण । मती पालटे मानवाची ॥ संतांचिये संगतीं । अनधिकारी तरून जाती । जैसे मृगमदाचें संगतीं । माती सुवासित होतसे ॥ कलियुगांत संताची योग्यता आहे थोर साची । जहागीर बापा वैकुंठीची । तेच देतील निश्चयें ॥ संतांचिये देणगीस । कदा नाहीं जगीं नाश । निर्विकल्प ब्रह्मास । तेच देती मुमुक्षूतें ॥ संतकृपा ज्याचेवर । त्याचा काळासहि दर । संत भक्तीचें माहेरघर । कामुकाचे कल्पतरू ॥ ईश्वर नाहीं वैकुंठी । न योग्यांच्या हृदयकपाटीं । नामसंकीर्तनीं जगजेठी । उभा प्रेमळ संतांच्या ॥ वासना मोठी अगोचर । मानवा कष्टवी निरंतर । परी ती मरते साचार । संतांचिया दर्शनें ॥ चित्ताप्रती समाधान ? संतदर्शनें करून । बुद्धीलाहि स्थिरपण । येते संतकृपेनें ॥ "

## १३७. भवरोगावर नामाची मात्रा

" करावया ही व्याधि दुरी । वैद्य माझा पंढरपुरीं । उभा राहिला विटेवरी । चंद्रभागातटातें ॥ त्या वैद्याची नाममात्रा । विदित आहे सर्वत्रा एक वळसा जिचा घेतां । भवरोग हा दूर होई ॥ अरे ज्या मात्रेनें भलें । विषाचेंहि अमृत झालें । प्रह्लाद पोर घटघटां प्यालें । भक्त हरीचा म्हण-वुनि ॥ कसलाही भवरोग जाया । नाममात्राच योग्य घ्याया । परी अनु-पान बदलावया । लागेल रोगाप्रमाणें ॥ एकच मात्रा विठूची । सहाण एक भावाची । वाटी तन्निष्ठतेचि एकच ते भरावया ॥ वैद्य एक

मात्र एक। सहाण एक वाटी एक।परी एकानेंच अनेक। लोक पहा तरले हो॥ एकाचे अनेक जहाले। म्हणून एकानें अनेक तरले। अनुपान मात्र बदललें। प्रत्येकाचें वैद्यानें॥ वसिष्ठादि ऋषीला। हीच मात्रा देता झाला। वेदसंहिता रसाला। काढूनियां त्यासवें॥ कोणा सांगे श्रौतस्मार्त। तीच मात्रा द्यावयाप्रत। कोणास सांगे योगशास्त्र। हीच मात्रा द्यावया। कोणास सांगे तीर्थयात्रा। कोणा पुरश्चरण तत्त्वतां। कोणा कीर्तनरसींच पाजितां। झाला असे मात्रा ही॥ या वैद्यानें आपुलें। वैद्यक कोणाला न शिकविलें रोगी मात्र बरे केले। द्वारीं येतांच तत्काल॥ ऐसा अप्पलपोटचा माझा। वैद्य पंढरिचा राजा। नाम गुटिकेची त्याच्या मजा। खचित आहे लोकोत्तर॥"

## १३८. भक्तिमार्गांत इतिहास गौण

"भक्तिमार्गीं इतिहासाशीं। महत्त्व नाहीं निश्चयेसीं। तें देता तयासी। अनर्थ पुढें रोकडा॥ देवाचिया अवतारीं। दोनदां कूर्मी झाला हरी। दोन वेळ भूमीवरी। पशू होऊन विचरला॥ दोन वेळां ब्राम्हण। दोन वेळां क्षत्रियनंदन। ऐसें अवघेंच विलक्षण। आहे बापा ये ठायां॥ महत्त्व देऊन इतिहासाशीं। जरी पूजावें भगवंतासी। तरी वराह म्हणतां तयासी। चिखलांत ठेवणें भाग असे॥ इतिहास नुसता ऐकावा। परी शुद्ध भाव ठेवावा। विक्षेप न होऊं द्यावा। निजभक्तीचा कदाही॥ भक्तीचिया मार्गामधें। महत्त्व हेतूस द्यावें बुधें। सरळ सात्त्विक भाव साधे। तेथें सदा असावे॥ स्थलकाल ते इतिहासीं। महत्त्व पावती विशेषीं। अंतरंगांतील भावासी। तेथें येतें गौणत्व॥ स्थलकालाच्या संशोधना। प्रमाण मानिती कागदांना। परी मर्यादा सुजाणा। असती त्याच्या सत्यतेसी॥ हें न घेतां लक्षांत। अवघेंच होतें विपरीत। भाविकांचें चित्त चलित। उगीच त्यानें होतसे॥ म्हणून हेतु पुरता बरवा। इतिहास तो शोधावा। स्थलकालांच्या अंगा द्यावा। संक्षेप सर्वदा साधकानें॥"

## १३९. सत्याचें महत्त्व

" सत्यावरी ज्याची प्रीति । तो साधूंचा साधु निश्चिती । सत्यासमान जगीं महती । नाहीं कशाची साच हो ॥ अनृत करूनी भाषण । जरी केलें गंगास्नान । महाविष्णूचें पूजन । तरी अवघें निरर्थक ॥ सदा असत्य वैखरी । टिळेमाळा वरच्यावरी । तीं साधूचीं सोंगें खरीं । राजी न त्यातें परमात्मा ॥ सत्यापरता नाहीं धर्म । सत्यापरतें नाहीं कर्म । ब्रम्हज्ञानाचें ही मर्म । सत्य हेंच निश्चयें ॥ सत्य साधनां-चें साधन । सत्य ईश्वराचें पूजन । सत्य हेंच नामस्मरण । तया सच्चिदानंदाचें ॥ सत्य साधन:सुखासी । सत्य कारण लौकिकासी । सत्य हेंच कैवल्यासी । जीवालागीं भेटवितें ॥ "

## १४०. खरें भजन

" करावें कीं ऐसें भजन । निंदास्तुतीचे ठायीं मौन ! प्रथम क्रोधा पिटाळून । लावियलें पाहिजे ॥ लोभमोहाची झाडणी । दंभासी न पहावें नयनीं । अहंकारापासुनी । दूर राहावें भक्तानें ॥ तुच्छ मानावीं सुखें ऐहिक । सर्वा घटीं वैकुंठनायक । जो भजन करतां असे देख । तोच भक्त विठ्ठलाचा ॥ त्यासीच म्हणावें वारकरी । योग्य तोच जाया पंढरपुरीं । त्यासीच मात्र श्रीहरी । पावेल हें विसरूं नको ॥ ईशप्राप्ति न तंबोऱ्यांत । ईशप्राप्ति न तनान्यांत । ईशप्राप्ति न मृदंगांत । भक्ति जिव्हाळा पाहिजे त्या ॥ करितां हरिचें नामस्मरण । हृदय यावें भरून । रोमांच उठावे देहीं जाण । कंठ व्हावा सद्गद ॥ नेत्र भरावे प्रेमानी । प्रेम यावें उचंबळूनी । हरीवीण नयनीं मनीं । अन्य कांहीं येवो नये ॥ "

## १४१. वक्ता कसा असावा

"अधिकार उपदेश करण्याचा । न मिळे हाटीं साचा । वक्ता स्वानु-भवाचा । उपदेश कराया पाहिजे ॥ हल्लीं वक्ते कवडी शेर । पांडित्य करिती जगभर । त्यांत कांहीं नसे सार । तें हानीकर जाणावें ॥ वांझ प्रसूतीयातना । करूं जातां निरुपणा । परी स्वानुभवाविना । पांडित्य तिच वोखटें ॥ वक्ता पाहिजे शुचिर्भूत । वक्ता पाहिजे निष्ठावंत । वक्ता पाहिजे

निर्वैर सत्य । वेदवेदांग जाणता ॥ शास्त्र आधीं अभ्यासावें । तें स्वतः अनुभवावें । मग लोकांस सांगावें । सत्यासत्य म्हणवूनियां ॥ ज्याचें मत स्थिर नाहीं । चांचल्य बुद्धीस असे पाही । परिस्थितीनें मोह होई । त्याचें बोलणें व्यर्थची ॥ ”

## १४२. हरिदास

“याचें नांव हरिदास । लोभ न स्पर्शे जयास । अंतरबाह्य जगन्निवास । विश्वपती दिसतसे ॥ हल्लीं झाले कथेकरी । पैसा पासरी घरोघरीं । जो उठे तो गादीवरी । राहे उभा नारदाच्या ॥ सुभाषितांचा भडिमार । ताणा मारून वरच्यावर । श्रोत्यांस करिती गारीगार । दावून कथेचा तमाशा ॥ बाजारांत गिऱ्हाइका । आकर्षण्याप्रती देखा । वाणी बोले आकावका । तैसेंच हे करितात ॥ कोणी वर्णिती श्रृंगार । कोणी विनोद करिती फार । रागरंग साचार । कोणी उडविती गाण्याचे ॥ घटपटाची खटपट । द्वैताद्वैताची लटपट । कर्मज्ञानाची वटवट । भक्तीविना करितात ॥ व्याकरणाच्या बळावर । पद्याचे अर्थ करिती फार । श्रोतयांस वाटे साचार । दुजा बृहस्पती अवतरला । पाठ करून पूर्वरंग । वक्तृत्वास आणिती रंग । चित्त मात्र असतें दंग । पुढच्या धान्य पैशावरी ॥ कोणी काव्याची कुशलता । दावून करिती हरिकथा । कोणी सांगून सुभाषिता । प्रौढी आपुली मिरविती । असुनी सर्वांग सुंदरी । वरी अलंकार नानापरी । परी एक नसल्या कुंकुमचिरी । अवघेंच जैसें बोखटें ॥ तैसें प्रेमावांचून । जें जें का हरिकीर्तन । तें तें नासिकेवांचून वदन । निश्चयेंकरून जाणावें ॥ प्रेमाविण जी जी कळा । ती ती जाणावी अवकळा । ऐसें अभंगीं बोलिला । श्रीतुकाराम सद्गुरु ॥ त्यासी न म्हणावें हरिकथा ! तें हरिकथेचें सोंग तत्त्वतां । तें न प्रिय रमानाथा । होतसे हो कदा काळीं ॥ हरिदास असावा भाविक । हरिदास असावा निर्लोभ देख । अध्यात्मज्ञान शाब्दिक । त्याचें नसावें सर्वथा ॥ त्याचेंच नांव कीर्तन । कीं प्रेमें उचंबळे मन नाहीं सद्गुणावांचून । विषय तो बोलावया ॥ निंदा पराची न ज्यांत वा कोणाचें वर्म निश्चित । किंवा व्याकरणीं वाक्पटुत्व । लेशमात्र न ज्यामध्यें ॥ वेदोपनिषदें भागवत । गीता इतिहास, भारत । यांची न

दुर्दशा जेथ होत। तेंच बापा कितेन॥ जें परमार्था विघातक। त्याचा उपहास करावा देख। परी तेणें आपुला लौकिक। वाढावा हें न चिंतावें॥ स्पष्टवक्तेपणांत। द्वेष नसावा यत्किंचित्। कुत्सितपणासी देख तेथ। जागा नसावी थोडीहि॥ ऐशा सर्वमान्य कीर्तनासी। साधूच करिती निश्चयेसी। कांकी तयांच्या मानसीं। स्थान नसे अहंभावा॥ द्वेष कोणाचाहि नसे। स्वार्थ मनीं लव ना वसे। लौकिकाची हाव असे। हृदयीं न ज्यांची थोडीहि॥ प्रेमळ ज्यांचें अंतःकरण। स्वानुभवाचें भाषण। निष्ठावंत भावेंकरून। बुद्धी ज्यांची पवित्र झाली॥ ऐसें निराभिमान कीर्तन। बहु आवडे हरि-लागुन। त्यांवांचून त्याचें मन। रमत नसे कधींही॥ ”

## १४३. वेदविद्येचें प्रयोजन

“ अरे तुम्ही अवघेजण। करितसा वेदाध्ययन। काय उपयोग मजलागुन। कराल सांगा तयाचा॥ शिष्य म्हणती जोडून हात। चालवूं नित्य नैमित्य। विद्या दावून सभेंत। जिंकूं आम्ही कैकांना॥ हिंडुनियां देशावर। द्रव्य मिळवूं अपार। कुटुंबपोषण करून उदर। भरूं आम्ही महाराजा॥ ऐसी ऐकतां छात्रोक्ती। महाराज खिन्न झाले चित्तीं। वेदविद्येचा या जगती। काय उपयोग व्हावा असा॥ जी चढाया वैकुंठपेठ। केवळ जिनाच आहे नीट। त्या वेदविद्येची ऐसी वाट। काय लागावी या जगीं॥ उपयोग श्रीमद्भागवताचा। पुडे बांधण्या काय साचा। व्हावा कुंडांतील अग्नीचा। उपयोग काय चिलीमीते॥ यज्ञ प्रसाद पुरोडाश। काय जावा न्याहारीस। नेवो-नियां कुलस्त्रीस। काय बाजारी बैसवावें॥ वेदविद्या न पोटाची। ती सामग्री वैकुंठाची। वेदपठणें ब्रह्माची। प्राप्ती होय तात्काल॥ मुलांनों हें चारी वेद। केवळ ब्रह्मची अभेद। वेद हाचि गोविंद। परते न कोणी वेदांहुनी॥ पाठक असावा श्रद्धायुक्त। जाणता पाहिजे स्वरांत। ध्वनी असावा सामयुक्त। वाणी असावी शुद्ध त्याची॥ स्पष्ट करावा वर्णोच्चार। वेदाप्रमाणें द्यावा स्वर। शब्दांत होता व्यभिचार। शाप देईल संहिता॥ वेदविद्येचा उपयोग। हाच मुलांनो आहे चांग। पाहून वेदवेदांग। ब्रह्म होऊन बसावें॥

विप्रजातीस वेदाविण । ब्रह्मप्राप्ती नव्हे जाण । म्हणून वेदास टाकून । अन्य मार्गी जाऊं नये ॥

## १४४. भूतदयेचें श्रेष्ठत्व

" आणि भूतदयेवांचून । कदा न लाभती ईशचरण । भूतदयेच्या समान । पुण्य आणखी असेना ॥ भूतदया म्हणावी तेची । चिंता वाहणें समस्तांची । भूतदया हे समाजाची । जननीच आहे प्रत्यक्ष ॥ भूतदया हें महापुण्य । मोक्षपेठेचा सोपान । भूतदया हें प्रबल धन । साधूसंतांकारणें ॥ खऱ्या भूतदयेचें ठायीं । दांभिकत्व नुरे कांहीं । क्रोधमदाची मुळीं न होई । स्वारी कदां तिजवरी ॥ भूतदयेवीण वेदान्त । न होई फलद सत्य । फळ न ये ज्या आंब्याप्रत । त्याचा उपयोग सरपणाचा ॥ सहस्र मख केले जरी । परी भूतदयेची नये सरी । सहा शास्त्रें पढला तरी । इजवीण नाहीं उपयोग ॥ जो का भूतदया तत्पर । त्याचा विकला ईश्वर । अवघीं सुखें साचार । तया हात जोडिती ॥ "

## १४५. भिक्षेच्या मर्यादा

" पोट जें का वितभर । तें भराया घरोघर । न फिरावें पसरून कर । स्वकष्टार्जित अन्न सेवी ॥ भिक्षा मुळींच निर्माण । झाली पंगू कारणी । रोगी, अशक्त, दुबळे जन । वा निराधार बालकें ॥ हेच भिक्षेचे अधिकारी । आहेत जाण सर्वतोपरी । इतरांनीं त्याभीतरी । केव्हांही कीं शिरूं नये ॥ जे करिती विद्यार्जन । त्यांनीं मागावें भिक्षान्न । वा थकलेले पांथजन । योग्य भिक्षा मागावया ॥ समाजाच्या हितासाठीं । जे निःस्वार्थपणें खटपटी । करिताती कीं उठाउठी । त्यांनीं अयाचित सेवावें ॥ वेदाध्ययन शास्त्राध्ययन । वा थोर संशोधन । यांत सर्वदा निमग्न जाण । चैन ठावी नसे जयां ॥ त्यांच्या पोषणाचा भार । सत्य आहे समाजावर । त्यांच्या प्रीत्यर्थ त्याग थोर । भिक्षारूपें करावा ॥ ज्यामुळें बहुजनांचें हित । साधणार आहे खचित । ऐसें एकादें सत्कृत्य । भिक्षा मागून उभारावें ॥ या व्यतिरिक्त कोणी । भिक्षा मागूं नये जनीं । फुकाच्या भिक्षान्नसेवनीं । नाश इहपरलोकाचा ॥ "

## १४६. सदाचार

" घरंदाजाची ही रीत । रहावें वडिलांच्या आज्ञेंत। बंधू असल्या त्यासी नित्य । निष्कपट वागावें ॥ सोयरे आप्त येतां घरीं । मान त्यांचा त्यांच्या परी । राखून प्रेम बहिणीवरी । औदार्यासह ठेवावें ॥ कांतेसी अबोला धरूं नये । परी स्त्रैणही असूं नये । विनय कदापी सोडूं नये। सुजनांनीं कांहीं केल्या ॥ सेवेसी योग्य मातापिता । बंधू विचार करण्याकारितां । कांता शोभतसे एकांता । विनयासाठीं अवघें जग ॥ अंगीं वैराग्य असावें । जग अशाश्वत मानावें । संसारीं न लोलूप व्हावें । मधूठायीं भ्रमर जसा ॥ खऱ्याखोट्याचा विचार । चित्तीं करावा निरंतर । जैसा हंस घेई क्षीर । पाण्यामधून निवडूनियां ॥ आपुली पायरी संभाळावी । परी लीनताही न सोडावी । दुष्ट दुर्जनांची असावी । जणीव चित्तीं सर्वदा ॥ लोकाचार सोडूं नये । भलतेंच स्तोम माजवूं नये । दांभिकपण असूं नये । संग्रहासी येतुलेंही ॥ कर्मठापरी शुचिर्भूत । भक्तापरी विश्वासयुक्त । ज्ञात्यापरी शांतचित्त । सर्वकाळ असावें ॥ तडागीच्या नलिनीपरी । रहावें संसाराभीतरी । श्रीहरीस चित्तांतरीं । सर्व काळ आठवावे ॥ कन्या पुत्र माता पिता । स्नुषा भगिनी बंधू कांता । यांच्या वागण्याबोलण्याचा तत्वतां । उबग चित्तीं मानूं नये ॥ जे कोणी कांहीं करिती । त्यास हरकत नसावी निश्चितीं । आपण मात्र त्यांचे रितीं । वाहावून जाऊं नये ॥ कोणाचे दुर्गुण पाहतां । क्रोधवश न व्हावें चित्ता । तिरस्कारही करण्याकारितां । कठोर भाषण करूं नये । सामोपचारें सांगून पहावें । न ऐकल्या सोडून द्यावें । आपणमात्र असूं नये । क्षणिक त्या संगतीसी । यात्रेस विरोध करूं नये । लग्न कोणाचें मोडूं नये । जुनें देऊळ पाडूं नये । कांहीं केल्या ॥ सदन कुणाचें जाळूं नये । विपट कुणांत आणूं नये । लबाडाचा धरूं नये । विश्वास चित्तीं कदापी ॥ महापुरीं पोहूं नये । तस्करासवें जाऊं नये । गणिका शेजार कामा नये । कुणासही ॥ अनाथ प्रेत पाहून । जाऊं नये डावलून । करण्या प्रेतवाहन । उगीच नाहीं म्हणूं नये ॥ कळलें असतां हरिकीर्तन । वा संतांचें

भजनपूजन । बळेंच शयनासनीं जाण । पहुडूं नये सुज्ञांनीं ॥ पंढरीची असतां वारी । ती चुकूं न द्यावी खरी । पती असल्या माहेरीं । कन्या ठेवून घेऊं नये ॥ द्वेष कुणाचा करूं नये । मन कृपण असूं नये । स्वधर्म अपुला सोडूं नये । कांहीं केल्या ॥ उत्कर्ष पराचा पाहून । क्षुब्ध न होऊं द्यावें मन । ज्या मार्गानें संतजन । गेलें जावें त्याच मार्गें । जातिमत्सर करूं नये । उणें पराचें पाहूं नये । सन्नीतीसी सोडूं नये । कांहीं केल्या ॥ परधन परकामिनी । यांचा लोभ न धरणें मनीं । प्रेमा असावा हरिकीर्तनीं । चित्तीं वसो भूतदया ॥ कोणाचें गुह्य जरी ठावें । तरी तें प्रगट न करावें । चहाडीपरी नसे बरवें । पाप दुसरें कोणतें ही ॥ धर्मांतर करूं नका । स्वधर्मिया परके लेखूं नका । चालीरीतीस देऊं नका । धक्का कदापी बापहो ॥ जातिमत्सर करूं नये । परोत्कर्षें जळूं नये । परधर्मियांचा करूं नये । तिरस्कार मानसीं ॥ पूर्ण चौकशी केल्याविना । साधु ऐसें न म्हणा कोणा । मान दिधल्या दांभिकांना ! अवहेलना खऱ्याची ॥ निरुद्योगी लोकाशीं । भिक्षा न घाला गेहासी । ज्ञानलोलुप विद्यार्थ्याशीं । भिक्षा वाढणें उचित असे ॥ सोवळें ओवळें दांभिकपणें । न आचरावें सूज्ञानें । परनिंदेच्या ठायीं धरणें । मौन नसतां कारण कांहीं ॥ राजा राजसत्तेचा । द्वेष करूं नये साचा । राजा प्राण समाजाचा । आहे हें विसरूं नका ॥ हिंदुधर्म किल्ला निश्चित्ती । बुरुज या नाना जाती । यांची बळकटी टिकल्यावरती । अभेद्य हा इतरांना ॥ याचा करून विचार । वागा तुम्ही भूमीवर । एकीलाच सुखदकर । मिळतो जगदात्मयाचा ॥ ” ज्या ज्या कालीं जी जी स्थिती । येईल बाप हो तुम्हांप्रती । ती हरिची इच्छा निश्चितीं । मानून सुखें असावें ॥ सत्य भाषण सोडूं नये । व्याजस्तुति करूं नये । परी कोणास दुखवूं नये । आपुल्या या वाणीनें ॥ ऐसें जगीं वागल्या जाण । लाभे सुखसमाधान । अंतीं श्रीहरिचे चरण । प्राप्त होतील जीवातें ॥

## १४७. संतचरित्रांचें महत्त्व

“ आतां विनंती श्रोतियास । संतचरितें हा ऊंस । यातें सेवून आपणांस । इहपरलोकीं मिळवा सुखें ॥ संतचरित्रें ना कादंबरी ।

या करमणुकीची गोष्ट खरी । ही साक्षात् शिदोरी । कल्याणपेठेस जावया ॥ म्हणुन या संतचरित्राचा । उपयोग करा नित्य साचा । जेणें जीवनयात्रेचा । पंथ सुगम होईल कीं ॥ संतचरित्रें पाहून । आपुलें ठेवा वर्तन । उगीच अहंकारा वश होऊन । भलतें सलतें करूं नका ॥ सांप्रत तुमच्या देशाची । दशा निकृष्ट झाली साची । जो खाण असून वैभवाची । दारिद्र्यनिकेतन झाला असे ॥ ज्या देशीं थोर थोर । झाले महात्मे, मुत्सद्दी, शूर । मोठे मोठे ग्रंथकार । झाले पूर्वी याच देशीं ॥ खगोल, भूगोल धुंडाळिले । ज्योतिषशास्त्र निर्मिले । वनस्पतीचे वर्णिले । गुण वैद्यकशास्त्रानें ॥ गणित पोहोचविलें शिखराशीं । तत्त्व नेलें कळसाशीं । वर्णमाला ही शोधिली ऐसी । जें बोलावें तेंच लिहावें ॥ ऐशा सर्वांगसुंदर देशाचें । आज मातेरं झालें साचे । जो देश गुलामांचें । भांडार बनला विबुध हो ॥ जो सर्वांगसुंदर होता । तो सर्वांशीं वाईट आतां । झाला म्हणून विवेक चित्ता । कांहीं तरी करा हो ॥ ज्याची वर्णाश्रमपद्धती । वाखाणली जात होती । तिला आज ठेविती । नांवें जगतीं चोहींकडे ॥ पाश्चिमात्य राष्ट्रें सारीं । तुम्हां विशेषण देती खरी । कीं विश्वासू कुत्र्यापरी । लोक हिंदुस्थानाचे ॥ ब्राह्मण, मराठे एकमेकां । बुडवावया पाहती देखा । म्हणून डोळे झाकूं नका । वेळ आहे कठिण बहु ॥ स्वधर्माच्या टवाळ्या । सांप्रत तुम्ही आरंभल्या । ह्याच समजा कारण झाल्या । दैन्य देशाचें व्हावया ॥ राष्ट्राशीं जातिमत्सर । हाच क्षयरोग साचार । तो एकदां झाल्यावर । एकी शक्ती कोठून राही ॥ म्हणून वेळ करूं नका । द्वेषी मनें बनूं नका । स्वधर्मातें टाकूं नका । विवेक जागृत ठेवूनियां ॥ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र । ऐसे तुमचे वर्ण चार । ते चारी मिळून साचार । एक व्यक्ती समजावी ॥ देहाच्या अवयवापरी । वर्ण समजा अंतरीं । प्रेम ठेवा परस्परीं । म्हणजे कल्याण होईल ॥ या सर्व गोष्टींचें शिक्षण । एका संतचरित्रापासून । मिळणार आहे तुम्हां-लागून । म्हणून तें परियेसा । ”

“ भक्तिसारामृत ” अध्याय ६३.

## १४८. राष्ट्रोद्धारास चार प्रकारचे पुरुष

" बुधहो राष्ट्रोद्धाराचे। कामा चार प्रकारचे। पुरुष लागती साचे। त्यांविण ना होय कांहीं ॥ आशीर्वादाकारण। साक्षात्कारी साधूजन। व्हावे लागती अवतीर्ण। प्रथमतः त्या देशीं ॥ कोणत्या वस्तूंत काय गुण। ईश्वरें ठेविला भरून। याचें कराया संशोधन। अपेक्षा तत्त्ववेत्त्यांची ॥ तिसरे कवि, ग्रंथकार। कोठें चुकतो व्यवहार। हें दाविण्या साचार। पाहिजेत कीं अवतरले ॥ चौथे ते शूर नर। विवेकी तलवारबहाद्दर। स्वदेश हाच साचार। प्राण वाटे जयांना ॥ साधू तेच निश्चितीं। निःस्वार्थी, हरीचें प्रेम अती। अलौकिक कृत्यें घडतीं। सहज हातीं जयांच्या ॥ ज्याचें मन मेणापरी। तेच साधू निर्धारीं। शत्रू जयांना भूमीवरी कोठेंच नाहीं राहिला ॥ धर्मशास्त्रसंमत। असून जगाची चालरीत। न टाकितां यत्किंचित। ठेविती निजवर्तन ते साधू ॥ अग्नि, वायू, पर्जन्य। यांचे गुणधर्म पाहून। यंत्रें केलीं निर्माण। ज्यांनीं तेच संशोधक ॥ सुख होईल मानवाशीं। आपत्ती टळतील विशेषीं। रोग निश्चयें लयाशीं। जातील ऐसें संशोधन ॥ राष्ट्राची निर्बलता। येईल कैसी काढितां। याच चिंतनीं तत्त्वतां। तत्त्ववेत्ता सदा असे। तोच कवि ग्रंथकार। भीड न कोणाची तिळभर। सत्यासत्य प्रकार। निजवाणीनें वर्णी जो ॥ विक्रय निजवाणीचा। खरा कवी न करी साचा। कंटाळा व्याजस्तुतीचा। मनापासून जयातें ॥ तोच म्हणावा खरा वीर॥ कीं परवशता जया जहर। वाटतसे निरंतर। स्वातंत्र्याचा भोक्ता जो ॥ ज्यास भय ना प्राणाचें। नांव न उरलें लोभाचें। देशहितार्थ कष्टाचें। काम करी तोहि शूर ॥ ऐशा विभूती जन्मल्याविना। देशाचें दैन्य न जाय जाणा। हरीस करावी प्रार्थना। ऐशा विभूती धाडण्यास्तव ॥ "

## १४९. वेदान्तास अधिकारी पाहिजे

" अधिकारावांचून। हें न फलद ब्रह्मज्ञान। उलट होईल नुकसान। फाटा मिळेल भक्तिमार्गा ॥ आहे तेंहि जाईल। अवघेंच

दैन्य होईल । लोक होतील बाष्कळ । व्याख्यानपटु नुसतेची ॥ ज्या वेदान्तामुळें भूषण । आलें आर्यधर्मालागून । तेंच त्याचें, दूषण । अनधिकारी ठरवितील ॥ पूर्वकालीं ऐसें न झालें । रामालाच कथियेलें । योगवासिष्ठ शास्त्र भलें । वसिष्ठ महाऋषींनीं ॥ उगीच अवांतर भूपाप्रत । वेदान्तयुक्त अपुला ग्रंथ । फिरला न वसिष्ठ सांगत । निज विद्वत्ता दावावया ॥ पार्थालाच भगवद्गीता । भगवान् झाला सांगता । उगीच गवळयास ज्ञानगाथा । कथित न बसे वृंदावनीं ॥ उत्तानपादाचें हृदयरत्न । ध्रुव जो का भाग्यवान् । त्यालाच कथिलें ब्रह्मज्ञान । देवर्षि नारदानें ॥ उगीच वीणा घेऊन । करित न फिरला प्रवचन । जडभरतानें अध्यात्मज्ञान । रहूगणासी सांगितलें ॥ शंकराचार्य भाष्यकर्ते । प्रति असून ज्ञानसविते । उलट झाले प्रस्थापिते । कर्मभक्तीस भूठायीं ॥ ज्ञानेशें लिहिली ज्ञानेश्वरी । परी नाथाच्याच दिधली करीं । धरून राहिले तोंवरी । भावार्थदीपिका उराशीं ॥ साहे ओझें जें जयास । तेंच देऊं तयास । अधिकारा ऐसा उपदेश । करूं बोलती तुकोबा ॥ ”

## १५०. चातुर्वर्ण्य

“वैदिकधर्माचे चार वर्ण । ब्रह्मदेवाच्या मुखासमान । किंवा चार प्रकारचे पुरुषार्थ म्हणून । जे कथिले तेच हे ॥ बल, कीर्ति आणि धन । तैसें सुख आणि शहाणपण । चहू वर्णांची एकी पूर्ण । असल्या येते मुक्कामा ॥ या चहु वर्णाला । एकेक गुण विशेष दिला । आहे तो मी तुम्हांला । सांगून ठेवितों थोडक्यांत ॥ एक्या जातीस शहाणपण । एक्या जातीस शौर्य जाण । योग्य वस्तूंचें संपादन । एक्या वर्णा नुसतें बळ ॥ खरें खुरें शहाणपण । टिके न वैराग्या-वांचून । शहाणपणाची वैरी चैन । ती जेथें तेथें न तें ॥ सात्त्विक वृत्तीचें आचरण । असल्या टिके शहाणपण । नाना प्रकारचें संशोधन । होईल त्याच्या हस्तानें ॥ शौर्य तें टिकवण्याप्रत । शक्ती पाहिजे अंगांत । नुसत्या शक्तीनें न भागत । तेथें स्वाभिमान पाहिजे ॥ तो अभिमान आपुल्यापुरता । त्याचा नसावा सर्वथा । समाज-संरक्षणाची चिंता । जागृत पाहिजे त्याचे मनीं ॥ तैसें संग्रहाचें

रक्षण । असावें अवध्याकारण । जेवीं तळयाचें जीवन । अन्य अन्य शेतांसाठीं ॥ संग्रह जलाचा तळयाठायीं । परी त्याचा त्याला उपयोग नाहीं । नाना पिकांचा बहर पाहीं । त्या तळयाचे जीवावर ॥ तैसें समाजांत असावें । व्यक्तिस्वातंत्र्या न हपापावें । समाजस्वातंत्र्य टिकवावें । हरतऱ्हेनें आपुलें ॥ बळ हें ज्या वर्णासी दिलें । त्यावरी ओझें लादिलें । तिन्ही वर्णांचें तें भलें । याचा विचार पोक्त करा ॥ शौर्य ज्याच्या वांट्यास आलें । तेथें मुक्कामा राहिलें । बुद्धीचें तें मंदत्व भलें । कांहीं अंशीं विबुधहो ॥ संग्रह ज्याचे वांट्यासी । आला आहे त्याचेचपासीं । भ्याडपणा तो कांहीं अंशीं । एक्या विशेष कारणास्तव ॥ तनूचें सामर्थ्य जयाप्रत । दिलें असे बलासहित । त्याला अपेक्षा सदोदित । राहे पराच्या आश्रयाची ॥ बुद्धिमंतासी उदरभरण । करितां नये आपुलें आपण । तो राही अवलंबून । अन्नासाठीं दुसऱ्यावरी ॥ चारी गुणांच्या बरोबर । हे जे दोष ठेविले चार । ते एकमेकांचे कर । एकमेकां हातीं देण्या ॥ ही चारी वर्णांची सांखळी । पाहिजे सर्वांनीं टिकविली । ती होतां वेगळी । अनर्थ होय रोकडा ॥ वेदांनीं पुरुषसूक्तीं भलें । समाजपुरुषाचें वर्णन केलें । तें सदैव पाहिजे आणिलें । प्रत्येकानें ध्यानामधें ॥ चारी वर्ण मिळून । एक होय व्यक्ति जाण । ते अवयव मानिल्या भिन्न । नाश पुरुषस्वरूपाचा ॥ अक्षरें बाराखडीचीं । भिन्न भिन्न आकाराचीं । म्हणोनिया शब्दार्थाची । निर्मिता तेथें होत असे ॥ सर्व सारखींच झाल्यावर । काय वाचावें सांगा चतुर । अर्थबोध तो राहील दूर । वेडेपणा पदरीं ये ॥ म्हणून पालट आकारीं । करावा न निर्धारीं । मात्र दुजेपण अंतरीं । त्यांनीं परस्पर करूं नये ॥ तैसीच आहे येथें स्थिती । जाती या अक्षरें निश्चितीं । सुस्वरूप अर्थाप्रती । व्यक्त करण्या आवश्यक ॥ ”

## १५१. सिद्धीची उपेक्षा

गोसावी, बैरागी, फकीर । वा पांथस्थ द्विजवर । यांना त्यांनीं वरच्यावर । जाऊंनियां भेटावें ॥ आणि करावा ऐसा प्रश्न । महाराज

तुम्ही भगवान् । पाहिला का डोळे भरून । हें मजशीं सांगावें ॥ परी त्याच्या प्रश्नाचें । कोणी न देती उत्तर साचें । उलट आपल्या सिद्धाईचें । प्रदर्शन दाखविती ॥ तांबें चिलिमींत घालून । कोणी करिता कांचन । मनोगतालागून । बोलून दाविती पराच्या ॥ कोणी समाधी लावून । राहती अन्नपाण्याविण । कोणाचें पंचाग्निसाधन । कोणी पहुडती कांट्यावरी ॥ कोणी म्हणती हेतु तुमचे । पूर्ण आम्ही करूं साचे । धन, दारा, पुत्र आरोग्याचें । फल देऊन तुम्हांसी ॥ तें तत्कृत्य पाहून । मनीं म्हणे दुर्गाचरण । खुळावले अवघे जन । मागें लागले सिद्धीच्या ॥ एक बैरागी कांट्यावर पहुडला होता दिगंबर । कटीं कंठीं मनगटीं थोर । वासुकी ज्यानें गुंडाळले ॥ मस्तकीं वाढला जटाभार । नखांचा तोच प्रकार । चंदनाची समोर । धुमी जळे तयाच्या ॥ अंगा भस्म फाशिलें । सिंदूर चिन्ह भालीं भलें । रुद्राक्षस्मरणीनें भूषविलें । जयाचिया कराला ॥ त्यापासीं दुर्गाचरण । बैसलें कर जोडून । महाराज अधिकारी आपण । मजला भगवान् भेटवा ॥ तें ऐकतां बैरागी । आसनीं उठून बसला वेगीं । पद्मासन नभोमार्गीं । अधर त्यानें लाविले ॥ काढी बर्फी, पेढे, खवा । उदी, बासुंदी, मालपुवा । अक्षदा फुलें, बदाममेवा । हात घालून बगलेमध्यें ॥ चिलीम अग्नीवांचून । दावूं लागला पेटवून । तें पाहतां दुर्गाचरण । खालीं पाहूं लागले ॥ महाराज हें पाहण्यासाठीं । मी न लागलों आपुल्यापाठीं । जगत्कारण जो जगजेठी । ठावा असल्या दावा मला ॥ तुमच्या बाह्य कृतीवरून । तुम्ही वाटला अधिकारी पूर्ण । परी अज्ञानाहून अज्ञान । आपण आहांत महाराजा ॥ सिद्धाईचे जोरावर । लोकां दावितां चमत्कार । काढून पेढे, खडिसाखर । धिक्कार असो या कृत्या ॥ आधींच आम्हीं संसारीं । झाकून गेलों मायांबरीं । आणखी आपण त्यावरी । ही भ्रमगोधडी घालितां ॥ ऐशा परीचे रस्त्यावर । गारुडी करी चमत्कार । तोच म्हटला पाहिजे थोर । तुम्हांहून या जगीं ॥ अमोल आयुष्याची घडी । खर्च करून तातडी । ही चमत्कारांची पोतडी । साध्य केलीत हाय हाय ॥ सिद्धाईचें प्रदर्शन । तेंच जगीं दाविती जन । कीं न ज्यांचें भरलें अंतःकरण । श्रीहरीच्या भक्तीनें ॥ तुम्ही

भक्तीचें ढोंग दावितां। आसक्ति सिद्धींत ठेवितां। रामराम मुखीं म्हणतां। परी नसे त्यांत सार ॥ ”

## १५२. मतलबी शिष्य

“ सद्गुरूचा सहवास। तोंवरीच पटे शिष्यास। निघतां तीर्थयात्रेस। आहेत गाड्या बसावया ॥ त्यासही पडदे मागें पुढें । टेकावया लोड फाकडें। पक्क्या पानाचे ते विडे। खायालागी क्षणक्षणां ॥ डोईस रुमाल भरजरी। फराळा लाडू नानापरी। मुक्कामा उतरल्यावरी। भोजन पंचपक्कान्नांचें ॥ ऐसा थाट जे ठायीं। तेथें शिष्यांची गर्दी होई। जेथें गुरूच चालतो पायीं। तेथें शिष्य दहा पांच ॥ निंब वृक्षाच्या पाल्यावरी। ज्याचा आहार निर्धारीं। त्याची कराया संगत खरी। शिष्य घेती माघार ॥ अन्न नाहीं वस्त्र नाहीं। मान-मरातब तोहि नाहीं। ऐशा सद्गुरूचे पायीं। कोण लागे सांगा मज ॥”

## १५३. पुरीची जगन्नाथमूर्ति आणि अष्टपदी

“ भगवान् जेव्हां बौद्ध झाले। तेव्हां जगन्नाथीं आले। कुरूपपण स्वीकारिलें। बळेंच हरीनें ये ठायीं ॥ जगदीशाची काष्ठमूर्ति। ओबडधोबड असे अती। ज्या पाहतां चित्तवृत्ति। वरी तिटकारा तात्काळ ॥ पाहून त्या मूर्तीला। जनसमुदाय बोलता झाला। हा भानामतीच्या खेळांतला। वेताळ वाटे निःसंशय। नाक पाहतां अधोली। डोळे जणुं का खवंदे पडलीं। तोंड पाहतां सुसर बसली। वाटे दाभाड पसरून ॥ हातपाय मुळीं नसती। आणि अशाला जगदीश म्हणती। दिवसा ढवळ्या फेकिती। शास्त्रें माती डोळ्यांत॥ ऐसें मत बळावतां। बरेंच वाटलें जगन्नाथा। म्हणे माझ्या दर्शना-करितां। कोणी न आतां येतील ॥ या क्षेत्रींचें महिमान। दर्शनेंच मिळे मोक्ष जाण। अनधिकारी अज्ञान। समता पावतील ज्ञात्याची॥ आतां त्याची भीति नाहीं। ये न मजकडे एकहि। ऐसे म्हणून शेषशाई। राउळीं स्वस्थ बैसला ॥ तें श्रीव्यासें जाणून। झाले उडियांत अवतीर्ण। जगदीशाचें वेताळपण। निवटाया कारणें॥ जगदीशास म्हणती, देवा। वेष खूप घेतला बरवा। परी हा तुमचा

बागुलबोवा । आम्ही टिकूं न देऊं कीं ॥ जेव्हां नरसिंह अवतारीं क्रूर वेश तूं धरिला हरी । गुरगुर करून भूमीवरी । कित्येकांना ठकाविलेंस ॥ परी तुझ्या त्या क्रूरवेशा ; हरण केलें जगदीशा । अल्पवयी अज्ञान अशा । कयाधुहृदयरत्नानें ॥ पुढें वामन, भार्गव आणि राम । अवतार मुळींच उत्तम । तेथें कुणाचें न पडलें काम ।तुम्हां स्पष्ट करावया ॥ आठव्याची ती अभिनव परी । अवघ्या अवतारामाझारी । एकदेशित्व तेथें हरी । तुम्ही मुळींच सोडिलें ॥ उद्धव म्हणे अमुचा कृष्ण । परमज्ञानी ब्रह्मपूर्ण । गोपी म्हणती अमुचा रमण । ब्रह्मचारी कशाचा ॥ चोरटा म्हणती गौळणी । धर्म म्हणे हा मुकुटमणी । नीतिभोक्त्या सज्जनीं ; यशोदा बोले हट्टी बाळ ॥ शिशुपाल म्हणे मोठा द्वाड । जरासंध म्हणे भ्याड । अर्जुन म्हणे धैर्यपहाड । दुर्योधन म्हणे ठक मोठा ॥ गुरेंराख्या गोप म्हणती । राजे म्हणती यदुपती । एकाचा अनुभव एका प्रती । येऊं न दिलास नारायणा ॥ या अवघ्या कृत्यंकरून । दाविलें अवघ्यांचा कारण । मीच एक आहे म्हणून। आपुल्या भक्ताकारणें॥ परी ऐसी कुरूपता। कदां न धरिली तुम्ही हातां । कुब्जेसही सरलता । जगदीशा कीं दिधलीस ॥ तिची कुरूपता काढिली । ती तुम्हां येथें नडली । कुरूपतेनें स्वारी केली । देवा तुझ्या रूपावर ॥ नें कांहीं असो जगदीशा । मी न ठके या वेषा । तुझ्या रासाच्या सरसशा । गोष्टी आतां वर्णितों ॥ जें मदनतुल्य आनन भलें । तेंच येथें भेसूर झालें । कुरुपतेचें घेतलें । घोंगडें कां हें बळें तुम्ही ॥ शब्दें तुझें वर्णन । सूज्ञ म्हणती होत न ! परी त्या शब्देंच तुजलागून । पहा आतां मी नटवितों ॥ तूं खुशाल वरी कुरूपता ! या क्षेत्रीं जगन्नाथा । परी माझी शब्दसत्ता । तिला न हुंकून बघेल ॥ ज्या तुझ्या रूपासाठीं । गोप गौळणी यमुनातटीं । वेडावल्या जगजेठी । दृष्ट काढिती वेळोवेळां ॥ ती तव सुंदरता भली ! रासक्रीडेस कारण झाली । माझें तियेस नव्हतें मुळीं । कारण वर्णन करण्याचें ॥ परी निरुपाय येथें झाला । तुम्ही वरिलें कुरुपतेला । म्हणून तुझ्या सौंदर्याला । वर्णणें आलें भाग मशीं । तुलाच त्याची मोठी हौस । म्हणून तूं हा धरिला वेश । जैसे वधुवरांच्या कोपास । प्रेम कारण पांडुरंगा ॥ तुला वाटलें

पूर्वदेशीं। ओळखणार कोणी न मशीं। म्हणून सोडून द्वारकेशीं। वेश बदलून आलास हा ॥ परी मी तुझ्या ओळखीचा। व्यास मुनी त्या वेळचा। आतां पाही जयदेवाचा। वेश घेऊनी आलों रे ॥ त्या-वेळचें ज्ञानीपण। मी ठेवितों गुंडाळून। भक्तीनें रासक्रीडावर्णन। करून तुला स्पष्टवितों। प्रतिज्ञा करून ऐशी। आरंभ केला काव्यासी। अष्टपदी म्हणती तिशी। भाविकांना सुखदायी ॥ भूपतीचा सुंदर-पणा। जैसा न दिसे सूकरनयना। तैसें अष्टपदीचे चार्वाकांना। महत्त्व न ये कळून ॥ ”

“ भक्तिसारामृत ” अध्याय ४६

## १५४. उपासना व पुराणें

“ कोणतेंही औपासन। सेविल्या अद्वैतावांचून। तेंच कलहासी कारण। होईल पुढच्या पिढीतें ॥ जो तो आपली उपासना। सर्व-मान्य ठरविण्या जाणा। नाना ग्रंथांच्या त्या रचना। कर्ता पुरुष करील ॥ आपुल्या मतासी संमत। ऐशा कथा घालील त्यांत। कांहीं स्वकपोलकल्पित। हें ध्यानांत असूं द्या ॥ उपासना ऐशा रिती। ज्या ज्या निर्माण केल्या जाती। त्या त्या उपासनेचे निश्चितीं। ग्रंथही होतील अपार ॥ त्या उपासनात्मक ग्रंथाचें। ध्येय हेंच ठरावयाचें। उणें तेवढें परपंथाचें। सांगणें आपुल्या ग्रंथांत ॥ ऐशा पुराणें करून सत्य। भाव वाढेल थोडाबहुत। परी नुकसानी अतोनात। होणार आहे समाजाची ॥ महत्त्व ज्या ज्या उपासनेचें। आधारानें पुराणांचें। ठरविलें जाईल साचें। तीं वेदबाह्य समजावीं ॥ व्यावहारिक नीतीपुरती। माना पुराणांची महती। वा मागल्यांची कळण्या कृति। पाहिलें पाहिजे पुराण ॥ या श्रुतिसिद्धांताप्रत। ज्या पुराणांच्या कथेंत। बाध नसेल यत्किंचित्। त्याही तारतम्यें मानाव्या ॥ प्रामाण्य दाविण्या वेदाचें। उदाहरण तें पुराणांचें। केव्हांही न द्यावें साचे। खऱ्या खऱ्या विद्वानांनीं ॥ या पुराणपद्धतीला। वेळींच नाहीं घातला। आळा तरी घात झाला। समजा शेवटीं समाजाचा ॥ करणें असल्या संरक्षण। फळपिकाचें काननांतून। गांवच्या पोळालागून। बांधून

ठेवा दोरानें ॥ पोळा न दाविल्या दोर । तो पिकें नाशील साचार । तैसें पुराणें भूमीवर । तत्त्वपीक नासतील ॥ म्हणून भरमसाट पुराणें । ऐसी न कोठें होऊं देणें । त्यांची वाढ झाल्यानें । श्रुतीस येईल कमीपणा ॥ महत्त्व वाढेल पुराणांचें । तुकडे पडतील समाजाचे । लोक एकाच जातीचे । वैरी होतील एकमेकां ॥ ”

## १५५. आधुनिक स्त्री-शिक्षण

“ ना तरी हल्लींचें । शिक्षण पहा स्त्रियांचें । जें फाजीलपणाचें । स्तोम माजलें केवळ ॥ या आधुनिक शिक्षणतडागांत । विनयरूपी कमल सत्य । नष्ट झालें खचित खचित । अभक्तीच्या थंडीनें ॥ सहृदयतेचा पराग । कोठून श्रोते तेथें मग । सन्नितीचा एकही भृंग । नये रुंजी घालावया ॥ धर्मभ्रष्टता विरोळयांचें । राज्य तडागीं झालें साचे । चैनरूपी गिधाडांचे । भक्षस्थानीं पडावया ॥ संशयाचें शेवाळ । चहूंकडे माजलें सबळ । त्या तडागीचें सेवितां जल । सज्जन काय सुख पावे ॥ स्त्रियांस शिक्षण असावें । परी तें फाजील नसावें । हें ध्यानांत ठेवावें । बोल वृद्धाचे सर्वदा ॥ श्रोते आपुल्या देशाला : आणणें असेल उर्जितदशेला । सुशिक्षित पाहिजे केला । प्रथमतः तो स्त्रीवर्ग ॥ स्त्रियांस द्यावें सुशिक्षण । स्त्रिया कराव्या नीतिमान् । स्त्रिया कराव्या भाविक पूर्ण । धर्मग्रंथ पढवूनी ॥ मेदिनीचे समान । स्त्रीवर्गाची योग्यता पूर्ण । मशागत श्रमें करून । त्याची केली पाहिजे ॥ ”

## १५६. प्राथमिक शिक्षण घरींच व्हावें

“ लेकरांचें लेकुरपण । जेव्हां जाय निघून । तेव्हां शिकाया कारण । शाळेंत त्यास घालावें ॥ शिवाय शाळेमाझारीं । पोरें असतीं नानापरी । अन्य अन्य विचारांचीं खरी । कोणी दुष्ट कोणी सुष्ट ॥ सुष्टदुष्टांचें संमेलन । ती शाळा होतसे जाण । अंगीं बाणाया दुर्गुण । नको अभ्यास कराया ॥ बहुत मुलें शाळेंत जाती । तीं सर्व ना सद्गुणी निघती । दहा पांचची उदया येतीं । दैवयोगें तयांच्या ॥ परी घरींच ज्या ज्या लागुनी । शिक्षण मिळालें बालपणीं । तो

एकही न निघाला दुर्गुणी । ऐसा इतिहास सांगतो ॥ दशरथाचे नंदन । राम, भरत, लक्ष्मण । हेही प्राथमिक शिक्षण । घरींच घेते जाहले ॥ पुत्र उत्तानपादाचा । झाला कंठमणी हरीचा । आश्रय जननीच्या अंकाचा । करून शिक्षण घेई तो ॥ नरपुंगव वीर गाजी । छत्रपती राजा शिवाजी । त्याही घरचा शिक्षक जिजी । वीरमाता लाभलीसे ॥ घरचें शिक्षण ममतेचें । नाहीं उसनें मोलाचें । पाणी पडल्या वळवाचें । नाहीं उपयोग पिकाला ॥ मुलाचें प्राथमिक शिक्षण । घरींच होणें युक्त जाण । नाहीं गवंड्याचें प्रयोजन । पाया खोदितां घराचा ॥ पाया पूर्ण झाल्यावरी । गवंडी भिंत बांधी वरी । करून नकस कंगोरी । आपुल्या अंगींच्या कौशल्यें ॥ तैसाच हाही प्रकार । प्राथमिक शिक्षण पाया थोर । तो मातेनें भरल्यावर । पुढें इमारत उभारावी ॥ ”

## १५७. काशी व पंढरपूर

“ हिंदुस्थानांत वाराणशी । पंढरी ती दक्षिणदेशीं । काशीमध्यें व्योमकेशी । पंढरीसी पांडुरंग ॥ तेथें भागीरथी गंगा । इकडे वाहे चंद्रभागा । तिकडे शिवाचे भस्म अंगा । इकडे बुक्का अश्वगंध ॥ काशींत प्रभू लिंगाकार । इकडे उभा विटेवर । तिकडे नीलकंठ कर्पूरगौर । इकडे अवघाच शामतनू ॥ काशींत बेलकापूर । इकडे तुळशीखडीसाखर । तिकडे पाणी तांब्याभर । इकडे पदीं ठेविती डोई ॥ तिकडे अर्धांगी अन्नपूर्णा । इकडे रुक्मिणी कमलनयना । त्या एकरूप हरिचरणा । जे वंदिती तेच धन्य ॥ तिकडे तुलसी, रामानंद, कबीर, । इकडे नामा, तुका, चोखा महार । तिकडे वेदोक्त मंत्रजागर । इकडे कीर्तन मंडपीं ॥ तिकडे कडकडीत कर्मठपणा । इकडे क्षमाशांती सुलक्षणा । एवंच जो पंढरीराणा । तोच काशींत उमापती ॥ ”

“ भक्तिसारामृत ” अध्याय ३९

## १५८. पंढरीमाहात्म्य

“ म्यां अपार क्षेत्रें भूमीवरी । देवा पाहिलीं साजिरीं । परी पंढरीची ये न सरी । त्यांतून एकाहि विठ्ठला ॥ वाराणशी क्षेत्रांत ।

भगवान् सदा ध्यानस्थ। डोळे मिटून जानकीनाथ। चिंतीत मनीं राहिला॥ अयोध्या रामावतारीं। तुम्ही नेली वैकुंठपुरीं। ओस पडली मथुरानगरी। आपण आला पंढरीतें॥ डाकुरामाजीं अनंता। तुम्ही दारें लावितां। भोजन होतां निघून येतां। याच क्षेत्राकारणें। सराफी धंदा गिरीवरी। तुम्ही मांडिला आहे हरी! गरीबाची न लागे खरी। दाद तया दरबारांत॥ जगन्नाथीं जगन्नाथ। मुळींच बौद्ध अवतार सत्य। क्षेत्र श्रीरंगपट्टणांत। निजून तुम्ही राहिलां॥ तुम्हां पतितोद्धाराचा। हरी आला कंटाळा साचा। म्हणून त्या इतर क्षेत्रांचा। इतिहास ऐसा करविलांत॥ कोठें बसतां जेवीत। कोठें द्रव्यावरी हेत। शालूनें कोठें मुखाप्रत। झाकून राहतां॥ या तुमच्या खोडीसी। पुंडलिकें जाणून मानसीं। उभेंच केलें आपणांसी। पतितोद्धारार्थ क्षेत्रीं या॥ केवढा तयाचा उपकार। झाला महाराष्ट्रावर। मायभूमीचा उद्धार। केला याच भक्तवरें॥ पुराणकालीं महाराष्ट्राची। किंमत कवडीमोल साची। कुणी म्हणती दुष्काळाची। जहागीर असे प्रांत हा॥ महाराष्ट्रीं शोभायमान। कोठेंही नसे कानन। सर्वत्र आहे सुकाळ पूर्ण। बाभळी, हिवर, पळसाचा॥ पीक पाहतां बाजरीज्वारी। कदन्नीं ज्याची गणती खरी। वाहे तीर्थजननी गोदावरी। परी खांडवे सर्वत्र॥ या देशीं रामाला। लाविलें वनीं रडावयाला। मग तोच कुठुनी इतराला। हंसवील ऐसे बोलती। परी त्याचा फेडिला पांग। श्रीपुंडलिकानें चांग। उभा केला श्रीरंग। आणून या दिंडीरवनीं॥ असो देवा बरें झालें। आपण वास्तव्य येथें केलें। आम्हां महाराष्ट्रियांचें फेडिलें। दैन्य त्या पुंडलिकानें॥ इतर गोष्टी करण्यास। सवड न ठेविली तुम्हांस। पतितोद्धारा जगन्निवास। पहारा बसविला तुम्हांवरी॥ डोळ्यांत तेल घालुनी। देखरेख ठेविली संतांनीं। क्षणैकही चक्रपाणी। होऊं न देती दृष्टीआड॥ नामदेव बसला दारीं। चोखा महार समोरी। लक्ष ठेवून तुम्हांवरी। अक्षय उभा राहिला॥ शृंगारिकांच्या खाणाखुणा। सहज जाणिती वारांगना। हें जाणून सुलक्षणा। कान्हो जवळ ठेविली॥ मागें नरहरी सोनार। प्रल्हाद बडवे साधूवर। राऊळीं ठेविला जवळ फार। तुम्हांप्रती संभाळावया॥ जनी करी येरझारा। कळवाया

तुमच्या समाचारा। ऐसा आहे सक्त पहारा। तुम्हांवरी संतांचा॥ म्हणून या क्षेत्राचें। महिमान आगळें झालें साचें। वैकुंठ पृथ्वीवरचें। आगळें आहे धन्य धन्य॥ अंशमात्रें करून। देव सर्व क्षेत्रीं असे जाण। परी पंढरींत वसतो पूर्ण। पतितोद्धारा कारणें॥ कलींत श्रेष्ठ गोदावरी। भीमातटातें पंढरी। या दोहींवरून क्षेत्रें सारीं। ओवाळून टाकावीं॥ भक्तिसुखाच्या कारण। लाळ घोटी चतुरानन। तें सुख भक्ताकारण। पंढरीमाजीं लाधतसे॥ ऐसा पंढरीचा महिमा। अचिंत्य आहे निगमागमा। तुझ्यामुळें पुरुषोत्तमा। झाली वैकुंठ पंढरी॥ लागतां पंढरीच्या वाटे। चित्ता होतें सौख्य मोठें। अभक्त, दुर्जन, करंटे। त्यासमात्र हें सोसेना॥ एक दिवस वास घडतां। पंढरीं क्षेत्रीं अनंता। कैवल्यपद त्याचे हातां। देशी तूं कीं विठ्ठला॥"

## १५९. श्रीकृष्णरूपच पाहूं दे

"मत्स्यरूपें जरी भेटसी। तरी तें न पटे मशी। तुझिया कूर्मरूपासी। मी न पाहावया इच्छित॥ वराहरूपीं पाहूं तुला। परी न मी हिरण्याक्ष भला। उग्र नरसिंहरूपाला। वंदाया मी न प्रल्हाद॥ क्षणांत मोठें क्षणांत लहान। ऐसें रूप तुझें वामन। त्या धरसोडीचें प्रयोजन। नाहीं मजला देवराया॥ जरी फरस घेऊन खांद्यावरी। दर्शन देशी श्रीहरी। तरी क्षत्रियांचा पेटला भारी। कोपाग्नी तव हृदयांत॥ चेहरा सर्वदा चिंताक्रांत। उत्साह नाहीं किंचित्। हैराण सांभाळितां सत्य। तेंही नको रामरूप॥ ज्या तुझ्या पूर्णावतारीं। खेळ खेळलास नानापरी। ज्या तूं एकाच पात्रावरी। ज्ञानी अज्ञानी जेवविले॥ जें जें भेटाया आलें दैन्य। या अवतारीं तुज लागून। तें तें सर्वांशीं सुखद स्थान। तुम्ही केलें अधोक्षजा॥ ज्यासी बोलाया ऋषी भीत। त्याचा पेंद्या हात धरीत। ज्याचे पवाडे वेद गात। गौळणी त्या नाचविती॥ अध्यात्माची आटाआटी। करून वळविला किरीटी। वेदान्तवेत्ता उद्धव जेठी। वाकाविलासी गोपीपुढें॥ ऐसा जो सर्वांगसुंदर। देवा तुझा अवतार। तो आठवा कुंजविहार। दिसो माझ्या दृष्टीसी॥ ऐसी करतां विनवणी। तात्काल प्रगटले वेत्रपाणी। मुरली करीं धरोनी। पाय ठेवून देहुडा॥ कृष्ण-

मुखासीं पाहतां । भक्तराज झाला नाचता । प्रेमभरेंसी दंडवता । घालूं लागला वरचेवर ॥ ”

## १६०. षोडशोपचार पूजा

“पंचसुक्त पवमान । म्हणती ब्राह्मण विद्वान् । अभिषेकधारा धरून । स्नान घालिती रामचंद्रा ॥ भरजरीचा पीतांबर । शिरीं मुगुट मनोहर । हिरे पाच ज्याच्यावर । जडविले असती कुशलत्वें ॥ किनखापाचा अंगरखा । रामाप्रती घालिती देखा । तेणें वैकुंठनायका । शोभा येते विशेष ॥ मौक्तिकहार कंठांत । कडीं पौंची हातांत । रत्नमुद्रिका बोटांत । घातल्या रामचंद्राच्या ॥ मुगुटावरी कलगीतुरा । कानीं चौकडा साजिरा । कंबरपट्टा शोभे बरा । रत्नजडित कटीवरी ॥ सीतामाईस पैठणी । नारळीपदरी अंजिरी जाणी । तियेचें तेज पाहुनी । विद्युल्लता लज्जित ॥ कंचुकी घातिली अंगांत । कापबुगड्या कानांत । पांच तुऱ्यांची शोभे नथ । मातुश्रीच्या नासिकीं ॥ मूद-राखडी शोभे शिरीं । पिंपळपान बिजोरा त्यावरी । गोठतोडे पाटल्या करी । दोन्ही दंडीं बाजूबंद ॥ पायीं सांखळया शोभती । तोरड्या बाळे गर्जती । सतेज चंद्रहार रुळती । जननीच्या वक्षस्थळीं ॥ केशरयुक्त चंदन । केलें असे विलेपन । भृकुटीमाजीं मृगलांच्छन । कृष्णवर्ण तिलक शोभे ॥ कुंकुमतिलक लाविला भालीं । तेणें शोभे जगन्माउली । जी निजकृपेची साउली । करी आपुल्या भक्तावर ॥ नाना जाती सुमनहार । बकुल, शेवती, कल्हार । गुलाब, जाई मंदार । बाण, मालती, निशिगंध ॥ कुंद, कोन्हांटी, मोगरा । गुलाब, चाफा साजिरा । रामतुळशीच्या मंजिरा । घवघवीत कंठीं शोभती ॥ अगरुसार चंदनाचा । धूप तेथें लाविती साचा । सुवास सुटला उदबत्तीचा । दरवळलें मंदिर ॥ फुलवाती विष्णुवाती । बोटवाती वैकुंठवाती । याही करून सीतापती । ओवाळीती भक्त ते ॥ बुंदी, फेण्या, मोतीचूर । जिलब्या, करंज्या, घीवर । पुरी, चिरोटा, शिरा, खीर । यांचा नैवेद्य दाविती ॥ गुलाबपाणी अर्गजा । भक्त लाविती अधोक्षजा । यथासांग करून पूजा । विडा दक्षिणा अर्पिती ॥ ”

## १६१. राजधर्म

"तैं स्वामी म्हणती तयासी। ऐक माझ्या वचनासी। सांभाळी निजप्रजेसी। पुत्रवत् आपुल्या॥ तुझ्या प्रजेचें हिताहित। तैसेंच त्यांचें जीवित। अवलंबून आहे खचित। नृपश्रेष्ठा तुजवरी॥ जो प्रजेसी ठेवी दुःखित। त्याच्या राज्यास होणार घात। भूपतीचें नृपत्व। आहे अवलंबून त्यावरी॥ भूपतीचें अवघें सुख। तैसाच त्याचा लौकिक। सर्व आहे प्रजेचें देख। प्रजा श्रेष्ठ भूपाहुनी॥ प्रजा असावी संपन्न। प्रजा असावी ज्ञानवान्। प्रजा असावी बलवान्। तरीच वैभव राजाचें॥ प्रजेंत विपट असो नये। द्वेष त्यांचा करूं नये। प्रजा परकी लेखूं नये। ती घटकावयव राज्याची॥ राजा, प्रजा आणि मेदिनी। हे तिन्ही मिळून एक जाणी। देह निर्मिला ईश्वरांनीं। भिन्नत्व तेथें मानूं नये॥ या तिहींचें अधिष्ठान। ठेवणें सावध राहून। तरी राज्यालागून। घात न होय सर्वथा॥ प्रजेच्या असंतोषाचीं। बीजें आतां कथितों साचीं। सावधगिरी फार यांची। ठेवावी कीं नृपश्रेष्ठा॥ लांच घेणें न्यायांत। वा करणें पक्षपात। मत्सर वाढविणें ज्ञातींत। धरणें अति धनतृष्णा॥ ज्यास देती अवघे मान। त्याची अप्रतिष्ठा करणें जाण। विद्वानाचा अपमान। व्यर्थ पीडा दुबळ्यांना॥ हीं कारणें अनर्थाचीं। आहेत अवघीं जाण साचीं। भलत्याच कामीं भलत्याची। कदा योजना करूं नये॥ ज्या त्या खात्याचें ज्ञान। असावें मंत्र्याठायीं पूर्ण। आप्त, सखा म्हणून। कोठें कोणास योजूं नये॥ जवळी न करणें चहाडखोरा। दया न दाखविणें तस्करा। गुणीजनांचा गुण खरा। घ्यावा निरपेक्षपणानें॥ हाताखालील कामगार। असावेत फार चतुर॥ निर्लोभ मंत्री सल्लागार। सदा जवळी ठेवावे॥ जी कांहीं गोष्ट करणें। ती अवघ्यांसी विचारणें। सर्वानुमता अनुसरणें। आपलाच हेका न धरावा॥ सुकाळ अथवा दुष्काळासी। राजा कारण निश्चयेंसी। जैसे दिवसरात्रीसी। कारण सूर्यनारायण॥ प्रजापीडन करूं नये। व्यापारीं मन गोवूं नये। कर लादून करूं नये। भरणा आपुल्या कोषाचा॥ वाव न द्यावा चैनीप्रती। स्वयें

आचरावी नीति ! तरीच इहपरलोकीं निश्चितीं । सौख्य लाभे राजातें ॥ दरबार ज्याचा मोकळा । त्याचाच जगीं बोलबाला । जेथें लागे वशीला । त्याचें दैन्य लवकर पुढें ॥ सर्व राजे लोकांना । हाच असे परमार्थ जाणा । नको जाणें तीर्थाटना । जपतपपूजा अन्य नको ॥ प्रजापालन, धर्मरक्षण । हेंच सर्वस्वसाधन । त्यामधें चुकतां जाण । रौरवाची प्राप्ती तया ॥ ”

## १६२. अलिकडचे राजे

“ अलिकडच्या राजांप्रती । धर्माचें वावडें निश्चिती । संता पाहून घालिती । आठ्या आपुल्या कपाळा ॥ त्यांचें आधिदैवत । सांप्रत झाली विलायत । आडनांवाला हिंदुत्व । त्यांच्यामध्यें राहिलें ॥ मडमा घरांत वावरती । कुलाचार बुडाले निश्चितीं । पोरें इंग्रजी बोलती । निजभाषेचें अज्ञान ॥ पोषाख आवडे फिरंग्यांचा । शोक चेंडूफळीचा । वेश देती मडमांचा । आपुल्या स्त्रियांकारणें ॥ हल्लीं मंदिरें बांधणारे । राजे कोठें न उरले खरे । आहेत खेपा घालणारे । विलायतेच्या निरर्थक ॥ धर्ममार्गी त्यांचा पैसा । खर्च होत नाहीं सहसा । बोकाळल्याती पहा रेसा । म्हणजे शर्यती घोड्यांच्या ॥ त्यांत पैसा कित्येकांचा । अगणित होतो खर्च साचा । तो एक प्रकारचा । जुगार साक्षात् विबुधहो ॥ कांहीं विषयांध भूपती । परदेशांत भटकती । स्वदेशाची संगति । क्षणमात्र ती आवडेना ॥ कांहीं जाती जातीचे । तंटे बघती लावण्या साचे । खऱ्या राजधर्मांचे । नृपवर आतां नसती कीं ॥ प्रजेचा पैसा चैनींत । आपुल्या सर्व खर्चित । प्रजा मरे उपवासांत । त्याची नसे तमा कोणा ॥ या राजांना पूर्वजांचें । राज्य भोगण्या पाहिजे साचे । त्यांच्या धर्मे चालीरीतीचें । वाटोळें करण्या जन्मले ॥ या राजांच्या हातीं । तोंडपुजे पोसले जाती । धर्मकृत्याच्या नांवावरती । सगळा धंदा लबाडीचा ॥ साहेबापुढें लाचारी । प्रजेचे मात्र होती वैरी । धर्मनीति म्हातारी । काळ तिचे हे प्रत्यक्ष ॥ पूर्वीच्या राजेलोकांनीं । देह ठेविले धर्मचरणीं । यांचे डाक्टरांच्या चरणीं । अपेयाचे घुटके

घेत ॥ शौर्य, पराक्रम, सन्नीति । यांच्या अभावेंच जगती । पदव्यांचीं शेपटें बाळगिती । मात्र वेड्या कौतुकानें ॥ ”

## १६३. ढोंगी संत

“ या सांप्रतच्या काळांत । जे जे आपणा म्हणविती संत । ते रंगविती तनूप्रत । मुद्रा रेखून नानापरी ॥ उभ्या टोप्या घालिती कोणी । मखमलीच्या करवोनी । भरजरीची अंगीं कफनी । घालून मोहिती जनांना ॥ गळ्यांत माळा नानापरी । सोंग दावी वरिवरी । नटासम परी अंतरीं । भाव राहे निराळा ॥ आयाबाया भोंदिती । गुरु-मंत्र त्यांना देती । आपुला प्रपंच चालविती । लावून आशा परमार्था ॥ वेदमंत्रेंकरून । आम्हांस घाला म्हणती स्नान । शिष्यशाखेच्या गृहा जाऊन । पूजा घेती नानाविधा ॥ पलंग लागतो निजाया । पाय चेपायास बाया । पोटासाठीं सांगती ओव्या । ज्ञानेश्वरीच्या रंगवून॥ कोणाची पुण्यतिथी येतां । तोच यांचा रासमाथा । सालचंदीची पूर्तता, करून घेती त्यामध्यें ॥ जे जे मठपती आहेत कोणी । ते बद्धाहुनी बद्ध जाणी । वैराग्या पांघरूण घेऊनी । मोहजाल पसरियले ॥ नामसप्ते मांडिती । अखेर एकादा याग करिती । परभारें लाडू घालिती । आपणा करिती उत्पन्न ॥ पूजेचा थाट विशेष । तांबटाचें दुकान खास । ज्ञान सांगती लोकांस । आपण पाषाण कोरडे ॥ एक भाडोत्री पहारेकरी । वीणा घेऊन भजन करी । बुवा पाहतां पलंगावरी । सन्निध असती कुटुंबाच्या ॥ कोणी उत्सव काढिती । पत्रिका छापून धाडिती । मोठमोठ्यांना बोलाविती । निज महती वाढावया ॥ याचकजनीं जे कुत्सित । हरिदास, वैदिक, पंडित । भिक्षुक, पुराणिक आणि पंत । वा बोलके गोसावी ॥ अशांना करून संतुष्ट । निंदका त्या बनवून भाट । बनती महंत अतिश्रेष्ठ । नाटकींच्या राजापरी ॥ भजनांतील टाळकरी । माव्हार देऊनी ठेविती पदरीं । फिरत असतां बरोबरी । एक पुराणिक लागतो ॥ काम पुराणिकाचें बरवें । महाराजांचे गाऊन गोडवे । अंधश्रद्धेचे ओढावे । लोक आपल्या पाशांत ॥ साक्षात्कारी साक्ष द्याया । दोन तीन लागती बाया । अयाचित जमवावया । एक

लागतो बहुभाष ॥ ऐसी क्षुद्रें सांगूं जातां । उगीच वाढेल भाकडकथा । गटाराचें उघडितां । झांकणें काय ये सुगंध ॥ ''

## १६४. शाक्त रौरवाचे धनी

" मनुष्यांनीं आपुला । मानवधर्म सोडिला । यथेच्छ मद्यमांसाला । सेवण्या शाक्त जाहले ॥ करून शक्तीचें मिष । वाव दिला अनाचारास । पापाचिया तोंडास । चढविला मुखवटा धर्माचा । मद्य मांस मैथुन । ऐशा नीच कृत्यालागून । शाक्तशास्त्रीं प्राधान्य । पंच मकार निर्मिले ॥ शाक्तशास्त्रामाजीं भली । देवता काली कल्पिली । आणि सत्यावरी फेकीली । धूळ हें न विसरावें ॥ वाममार्गी हे झाले । नीति अनीतीस झुगारले । अनाचाराचे माजविले । यांनीं देव्हारे विशेष ॥ घटकंचुकी नांवाचा । विधी शाक्तांनीं निर्मिला साचा । इतिहास ऐकतां तयाचा । किळस येईल अंतरीं ॥ हे वाममार्गी शाक्त । आहेत अवघे आशाळभूत । अनीतीलाच मानितात । नीति मूर्ख आपुली ॥ शाक्ता न होय सद्गति । शाक्ता न भेटे श्रीपती । शाक्ता न होय ब्रह्मप्राप्ती । ते पाहुणे रौरवाचे ॥ ''

## १६५. लग्नाचें मानसशास्त्र

" लग्नाचें नांव निघतां । जो तो आनंदें अपुल्याकरितां । वधू इच्छी तरुण भर्ता । श्रीमंत सशक्त सद्गुणी ॥ तैसाच मुलाचा प्रकार । त्याची मुलीच्या सौंदर्यावर । दृष्टि राहते साचार । म्हणे वधू पाहिजे रूपवती ॥ माय म्हणे कन्येकारणें । मिळावे विपुल दागिने । म्हणजे माझें पारणें । फिटलें या नेत्रांचें ॥ कन्या पित्याचें इच्छी मन । सोयरा असावा लौकिकवान् । मात्र खर्चाचें तें मान । कमी पडावें मजलागीं ॥ करवल्या पाहती मानापमाना । भिक्षूक पाहती दक्षिणा ॥ आप्त सुग्रास भोजना । चार दिवस इच्छितात ॥ गांवांतील सभ्येतर । संतुष्ट हारतुऱ्यावर । वर्‍ही विडे अत्तर । मिळाल्या लग्न उत्तम ठरे ॥ मध्यमवर्ग नाचासी । पाहून आनंदे मानसी । नोकरवर्ग इनामासी । मिळतां संतुष्ट होतसे ॥ मुलाचा पिता इच्छी हुंडा । वरमाय ती अंबोण मांडा । रासन्हाण्याचा फाकडा । थाट व्हावा हें इच्छिती ॥

गुलाल पडावा शेर शेर । अमुच्या डोक्यांत साचार । हें वरपक्षाच्या इतर । बाया मनीं इच्छितातो ॥ ”

## १६६. खरा फकीर

“फकीर व्हावें याचसाठीं । स्वतः ओळखावा जगजेठी । आणि अनाथाला संकटीं । साह्य होऊन तारावें ॥ उगीच भिक्षा घरोघर । मागावयां न व्हावें फकीर । तो भिक्षाबहाद्दर । पोटभरू काळतोंड्या ॥ फिकीर नाहीं जयाला । फकीर म्हणणें उक्त त्याला । उगीच पोटभरूला । फकीर तुम्ही मानूं नका ॥ ज्यानें षड्रिपु जिंकिले । मी तूं पण टाकिलें । अवघें विश्व ब्रह्म झालें । जया तोच फकीर ॥ यती जती फकीराचा । जंगम गोसावी बैराग्याचा । धर्म मुलांनो एकचि साचा । हे वंद्य अवघ्या जगत्रया ॥ शंकराचार्य यती झाले । उगिच न पुडच्या खात फिरले । निजधर्माला संरक्षिलें । वाग्युद्ध करूनी ॥ जगत्रयीं लौकीक झाला । परी न शिवले वैभवाला । आपुल्या विरक्ततेला । नाहीं त्यजिलें किंचित ॥ करतल भिक्षा मागितली । वास केला तरुतलीं । ती शंकराचार्य माऊली । होऊन गेली फकीर ॥ गोसावी गोरख मच्छिंद्र । वैरागी रामानंद फकीर । अधिकारावीण साचार । होतां नये कवणासी ॥ फकीरपण ना भगव्यांत । फकीरपण ना चिलमींत । फकीरपण ना लंगोटींत । तें वेशाहून निराळें ॥ वेशाहून फकीरपणा । नाहीं मुलांनो लाधला कोणा । वेशधाऱ्यांनी कमीपणा । आणिला या पंथासी ॥ फकीर मुलांनो तोच होतो । कीं जो आयतें खाण्या लालचावतो । किंवा जो पाहूं इच्छितो । प्रभूस्वरूप डोळयांनीं ॥ प्रभूस पाहतां फकीर । न भरवी दंभाचा बाजार । प्रत्येक उपाधीपासून दूर । राहतो तो सर्वथा ॥ ”

‘भक्तिसारामृत’ अध्याय २३

## १६७. पूजेचा अधिकार

“देवा पूजेचा अधिकार । प्राप्त व्हावया साचार । अनन्यभावें नमस्कार । करितों तुला प्रथमतः ॥ तुझी भक्ती ही गोदावरी । प्रेम तुझें तेथ वारी । स्नान तयामाझारी । करवी निश्चयघाटावर ॥

शुचिर्भूतपण हें सोवळें । देई नेसण्या स्नेहाळें । भस्म अंगीं कृपाळें । असो सदा शांतीचें ॥ सद्वासना हें चंदन । मिळो लावण्यालागून । जेणें माझें स्थिर । होईल देतां तुझ्या करी ॥ कांकी मन हें जोंवरी । स्थिर न झालें सिंदुरारी । अवघी खटपट तोंवरी । व्यर्थ आहे एकदंता । आतां एकाग्र करून वृत्ती । पूजन तुझें गणपती । करितों मी निश्चितीं । अनन्यभावें करूनी ॥ ”

## १६८. खरा वेदान्त

“ वेदान्त बहुत सांगती। परी न तैसी करवे कृती । आणि कृतीवांचून निश्चिती। ईशप्राप्ती न होतसे॥ सिनेमा नामें खेळांत। नद्या, सरोवरें दिसतात। परी घागर घेऊन गेल्या तेथ। पाणी भरतां नये कीं ॥ सरोवराचा देखावा । खेळामध्यें मात्र पहावा । तैसाच बापा ऐकावा । वेदान्त्यांचा वेदान्त ॥ आचरणावीण वेदान्त। जेथें वसे ओतप्रोत। साधकानें यत्किंचित। हेत न तेथें गुंतवावा ॥ वेदान्तशास्त्र मोक्षदायी । परी तें क्रियेविण न फलद होई। शब्दपंडिताची साउलीही। साधकानें घेऊं नये ॥ कर्मी पाहिजे शुचिर्भूतपणा। भक्तिमार्गी निष्ठा जाणा । वेदान्त्यानें जनार्दना। जगाठायीं पहावें ॥ उपनिषदें, भाष्य गाथा । वेद वेदांगें तत्त्वतां। पंचदशी भागवता। शिकला परी न साधू तो ॥ पाठ केले अभंग बहुत। अठरा पुराणें मुखोद्गत। परी न तो वेदान्ती होत । साधूच खरा वेदान्ती ॥ काव्य, कौमुदी, व्याकरण। अर्थ, तर्क, पढले जाण। नाना भाष्यांसी पारायण । वरचेवरी करितात ॥ विद्यामद अंगीं भरला। प्राधान्य देऊन कर्माला। तुच्छ मानिती जगताला । ऐसे पढतमूर्ख ते ॥ जैसे फोनो करी गायन। परी अर्थदृष्टि नसे जाण। तैसेच हे ब्राह्मण। आले वेद पढोनी ॥ वेदरहस्य न जाणती कोणी। महती पाहिजे चहू वर्णी। एवढा अभिमान मात्र मनीं। होतो त्यांचा जागृत ॥ वेदान्त खरा अनुभवाचा । असल्या होय उपयोगाचा। सर्व सुखशांतीचा। तोच केवळ चिंतामणी ॥ ”

## १६९. गुरुशिष्य

" तेच म्हणावे गुरुशिष्य । जेथें न लवही दंभांश । प्राणकुडीचा पाहणारास । संबंध दिसावा ते ठायीं ॥ शिष्य नसावा सापेक्षित । गुरू नसावा आशाळभूत । विषय चर्चेचा उभयतांत । परमार्थावीण नसावा ॥ सद्गुरुसेवा शिष्यानें । करावी कायावाचामनें । कोणतेंहि दांभिकपणें । कृत्य न कदा आचरावें ॥ सद्गुरुंनींहि त्यापरी । कृपा करावी शिष्यावरी । आपुल्यासमान अधिकारी । करून इहपरत्र सोडावा ॥ पितापुत्राहुन अधिक । गुरुशिष्यांचें नातें देख । पिता पुत्रासी ऐहिक । अर्पितो क्षणिक संपत्ति ॥ सद्गुरू ना तैसें करी । अविनाश वस्तू जी ब्रह्म खरी । तीच शिष्याच्या देतो करीं । वारूनियां जन्ममरणा ॥ शिष्य असावा अनन्य । गुर्वाज्ञेनें वेंचावा प्राण । गुरुच्या सेवेवांचून । प्रिय कांहींहि नसावें ॥ शिष्याचें अवघें हित । गुरूनें बघणें साक्षात् । आपुल्या प्रपंचाचा भार तेथ । शिष्यावरी न घालावा ॥ आपुली महती वाढवाया । शिष्य जुंपूं नये वाया । गुरुकीर्तीवीण शिष्या ठाया । मोह दुसरा नसावा ॥ "

## १७०. शिष्योपदेश

"देवा तुझ्या पदापाशीं । मी उपदेशितों स्वशिष्यासी । तो बोध त्वन्मानसीं । जागृत राहो विठ्ठला ॥ सर्वसाक्षी जगज्जीवन । बाप माझा नारायण । त्याचें भय धरून । वर्तन आपुलें ठेवावें ॥ जग आहे त्रिविध पाही । त्याचा न कोणा पार येई । ऐसा एकही पदार्थ नाहीं । कीं जो जगानें मान्य केला ॥ सर्वशक्ति सर्वातीत । सर्वांतरयामीं जागृत । जरी आहे पंढरीनाथ । तरी संशय येतो जगा ॥ मग तेथें मानवाची । कथा काय पोरा साची । जग ही मूर्तीच कुटिलत्वाचा । त्याचा विचार करूं नये ॥ परी जग आणि जनार्दन । नव्हत की वत्सा भिन्न । येथ सर्वांतरयामीं नारायण । हें तत्त्व विसरूं नको ॥ ज्या गोष्टीनें कमीपणा । येईल वत्सा आपणा । त्या गोष्टीचा सुजाणा । त्याग आधीं करावा ॥ ही परमार्थाची पायरी ।

टिकण्या आहे अवघड भारी । जैसा मुंगीस लंघण्या गिरी । महा दुर्धर दामोदरा ॥ ज्यांनीं विठ्ठलमाउली । या जगीं आपुली केली त्यांचींच नांवें जाहलीं । अजरामर या जगामध्यें ॥ यात्रा येते पंढरीसी । असंख्यात प्रतिवर्षी । ते सर्वहि विठ्ठलासी । कां न प्रिय व्हावेत ॥ मुलामा करून कथलावरी । मिळून सोन्याभीतरी । जरी नेला बाजारीं । तरी सराफ ओळखीतसे ॥ भगवंताचा तोच भक्त । कीं इंद्रियें ज्यांचीं अंकित । जो सन्नितीचा भोक्ता सत्य । पापाशीं न स्पर्शे जो ॥ हें अवघें एकाच वेळीं । नच लाभे कदा काळीं । परी मानवानें हताश मुळीं । व्हावें न च प्रयत्नांतें ॥ गान, तारुण्य देखणेपण । ज्या ठायीं वसे जाण । तेथें विघ्नास आमत्रण । देण्या नको पत्रिका ॥ कीर्तनींच करावें गायन । एरवीं धरावें सदा मौन । गान कलेनें भगवान । संतुष्ट करावा ॥ तुला जो दिला कंठ मधुर । त्याचा दाता सर्वेश्वर । त्या देणगीचा विचार । भलता कांहीं करूं नये ॥ ज्याचा माल त्याशीं हाल । चोरटें करणें खुशाल । ही अनीतीच केवळ । तिशीं जागा देऊं नको ॥ पोषाख छानछोकीचा । करूं नये सदा साचा । कांकीं तयानें देहाचा । अभिमान व्यर्थ वाढतसे ॥ श्रृंगारिक करी नच भाषणं । भक्तीचा विक्षेप होतो तेणें । सदा वदून नम्र वचनें । लीनता आपुली दावावी ॥ नित्य नेम कांहींतरी । त्वां आचरावा निर्धारीं । तेणें वेळेची किंमत खरी । येईल तुजला कळून ॥ सज्जनांची संगति धरी । विवेक असावा अंतरीं । प्रेम भूतमात्रावरी । समसमान असावें ॥ प्रातःकालीं उठून । करावें ईशचिंतन । परी त्यांत दांभिकपण । थोडकेंही न दाखवावें ॥ आचरी स्नानसंध्येसी । दामोदरा तूं प्रतिदिवसीं । ब्राह्मणानें कर्मासी । फाटा कदापी देऊं नये ॥ सप्रेम करावें भजन । तैसें निजगुरूचें वंदन । टाकुनियां अभिमान । लीनता अंगीं धरावी ॥ पराचिया धर्माची । निंदा करूं नये साची । कोणत्याहि जातीची । अवहेलना करूं नये ॥ जेवढे आहेत जगीं प्राणी । तेवढें विठ्ठलाचे अंश जाणी । मग कोणाचा द्वेष मनीं । व्हावा माझ्या राजसा ॥ ज्या ज्या वेळीं तुला पोरा । रागें भरतों साजिरा । परी तिळ तिळ तुटतो खरा । जीव माझा ते काळीं ॥ काढा कडू लागतो जरी । परी तोच होतो हितकारी । या सिद्धांत

वाक्यावरी। त्वां विश्वास ठेवावा॥ परोपकारा परी दुसरें। पुण्य भूवरी नाहीं खरें। तें तू सेवावें आदरें। हेंच सांगणें आहे तुला॥ योग्यता नरजन्माची। अवघ्यांत मोठी आहे साची। याच जन्मीं भगवंताची। प्राप्ती होते मानवा॥ तो जन्म बालका तुवा। वायां न कदा जाऊं द्यावा। ब्रह्मविचार करावा। अहोरात्र मानसीं॥ मनाच्या संयम करण्याची। पात्रता तुज आली साची। ही कृपा भगवंताची। जाणावी तुवां अनंता॥ याच संयमाच्या बळें। हातीं येतीं आध्यात्मफळें। यावांचून भले भले। आनंदास मुकले कीं॥ भौतिक जगाचे व्यवहार। सांडावे न साचार। ते निरर्थक जरी असार। तरी पाळले पाहिजेत॥ आंबा, लिंबू, डाळिंबाची। साल कवटी नारळाची। जरी निरर्थक आहे साची। परी तिचें असणें अवश्य॥ तैसाचा हा व्यवहार। परमार्थाची साल थोर। त्या सालीचा विचार। करून सर्वदा वागावें॥ कर्मयोग भक्ति, ज्ञान। यांच्या सेवनें करून। सच्चिदानंद नारायण। केला आपुला विचारवंतें॥ कलियुगाचे ठायीं। भक्तीस प्राधान्य आहे पाहीं। या भक्तीनेंच अवघे काही। होय प्राप्त मानवा॥ भक्तीचें मुख्य लक्षण। श्रीहरीचें नामस्मरण। करणें मनापासून। सदाचार रक्षूनियां॥ ती निष्कलंक भक्ती करितां सत्य। व्यवहार ठेवावा जागृत। विमल शांत अंतःकरणांत। श्रीहरी तो सांठवावा॥ तो चित्तीं ठसल्यावरती। अष्टभाव दाटून येती। प्रेमधारा स्रवूं लागती। नेत्रांवाटें अनिवार॥ ऐसी स्थिति झाल्यासी। भक्ती आली हातासी। ऐशा साधका हृषिकेशी। उपेक्षी ना केव्हांही॥ त्या भक्तीप्रीत्यर्थ। त्वां कीर्तन करावें नित्य। मी जीं आख्यानें आजपर्यंत। रचिलीं साधूसंतांचीं॥ त्यांचा उपयोग करावा। आणि समाज बोधावा। उपदेशीं त्या नसावा। द्वेषमात्र अंशेंही॥ लोकसंग्रहा लोकरंजन। कांहीं अंशीं अवश्य जाण। परी तें साधाया कारण। आपली पायरी सोडूं नये॥ नकला, विनोद, तमाशा। गायनाचा संगीत जलसा। आवडे लोकांच्या मानसा। परी तें पाप कीर्तनीं॥ नेमस्त गायन करावें। विनोद सभ्य असावे। प्रौढ गंभीर बोलावें। थिल्लरता न शिवूं द्यावी॥ संतोष संभावित सज्जनांचा। वक्तृत्वानें साधणें साचा। हलकटांच्या वाहवाचा। वत्सा लोभ धरूं नको॥ तरीच तें

कीर्तन । तेणें पावे रुक्मिणीरमण । चित्तवृत्तीस समाधान । अक्षयींचें लाभतें ॥ जातिमत्सर करूं नये । परी जात्यभिमान सोडूं नये । कर्ममार्गास लावूं नये । बोट काळें केव्हांही ॥ परी कर्मपसारा । उगाच वाढवूं नये खरा । तो न प्रिय शार्ङ्गधरा । हें ध्यानांत ठेवावें ॥ योगमार्ग योग्यांचा । तो न गृहस्थाश्रमी लोकांचा । परी तो टवाळीचा । विषय केव्हांही करूं नये ॥ निंदा द्वेषमूलक । यानें न विटाळावें मुख । सारासार विचार देख । केव्हांही ना सोडावा ॥ कीर्तनाच्या धंद्यावरी । पोट आपुलें कधीं न भरी । ती संस्था ठेवणें खरी । सोळीच सर्वदा ॥ लोकाग्रहाकारण । फारसें न करावें कीर्तन । ती संवय झाल्या जाण । बोजवार होय पुढें ॥ नित्यनेमाचीं कीर्तनें । करावीं की आनंदानें । क्वचित् आग्रहाकारणें । मानावें स्नेहीमंडळींच्या ॥ स्पष्टवक्तेपणांत । भीड न धरावी यत्किंचित । आपुलें जें असेल मत । तें स्पष्टपणें मांडावें ॥ कौतुक तुझ्या कीर्तनाचें । मज अत्यंत वाटतें साचे । वरचेवर हृदय माझें । ऐकतां उचंबळून येतसे ॥ हीच पद्धत ठेवावी । तीच होईल प्रभावी । विशुद्ध भक्ति वाढवावी । निज हृदयीं लोकांत ॥ भक्ती पूर्ण झाल्यावरी । ज्ञान उपजेल अंतरीं । अवघीं सुखें तुझ्या घरीं । येतील पोरा चालत ॥ वडिलजनांचा सन्मान । ठेवावा मनापासून । निजजननीचें वचन । वेदतुल्य मानावें ॥ गृहिणी करावी सदाचारी । बोध करून वरच्यावरी । स्त्रियाकरवीं भूमीवरी । स्वैर वर्तन न होऊं द्या ॥ तिचे लाड पुरवावे । परी डोक्यावरी न बैसवावें । विषयसुखास सेवावें । धर्मशास्त्र पाहून ॥ द्रव्य पाहिजे प्रपंचांत । शरीरामाजीं जेवीं पित्त । परी हव्यास अतोनात । न धरावा तयाचा ॥ तो हव्यास केल्यावरी । स्थिति अम्लपित्तापरी । धनलोभानें भूमीवरी । सुख नाहींच होणार ॥ पापावांचून संपत्तिमान् । कोणी न होतो जगीं जाण । धनिकासी समाधान । केव्हांहि न लाभते ॥ म्हणून उत्तम व्यवहारीं । धन जोडावें भूमीवरी । संतोष निज चित्तांतरीं । यथालाभांत धरावा ॥ पात्र पाहून करणें दान । उगीच लुच्चा सोद्यालागून । दांभिकपणें उदारपण । आपुलें केव्हांहि न दाखवावें ॥ जयासी मानिलें स्नेही । कपट त्यासीं करूं नाहीं । हृदय तें उकलण्या पाहीं । जागा एक स्नेहाचीच ॥ उधळेपणा करूं

नये। परी कृपण असूं नये। कर्ज काढून करूं नये। कोणतेंही कृत्य पहा॥ द्रव्यसाठा थोडाबहुत। अवश्य आहे प्रपंचांत। ऐन वेळीं न पडतात। कोणी बापा उपयोगी॥ देशसेवा शास्त्रसेवा। यांत उपयोग करावा। तव उत्तम बुद्धीचा बरवा। तरीच बाळा सार्थक॥ उत्तम कार्य हातीं घ्यावें। तें प्रयत्नें शेवटा न्यावें। तें नेत असतां मागावें। साह्य ईश्वरा वरचेवर॥ कार्यकर्त्या पुरुषाला। व्यवहार पाहिजे सांभाळिला। जी जी असेल ज्या ज्या वेळां। अस्तित्वांत राजसत्ता॥ तिशीं मानून चालावें। परी न तोंडपुजे व्हावें। नसते गोडवे कदा गावे। निरर्थक राजसत्तेचे॥ राजकीय पुढारीपण। नको आपणांलागून। रंग पालटे क्षणोक्षण। वत्सा राजनीतीचा॥ परोपकारी असावें। जगांत कीर्तीरूपें उरावें। मागेंही गुण घ्यावे। आपुले तें लोकांनीं॥ ऐसें कृत्य करून। रहावें अमर होऊन। मृत्तिकेचें आहे पूर्ण। शरीर हें न विसरावें॥ परी या शरीरबळावरी। अवघेंच कांहीं भूमीवरी। घडणार आहे निर्धारीं। आत्म्याचिया सत्तेनें॥ म्हणून हे अनंता। ज्यानें त्यानें प्रथमतः। निजशरीर व्यवस्था। नीट केली पाहिजे॥ जो नियमानें चालतो। तोच निरोगी राहतो। जो शरीरा ना जुमानतो। त्याचें दैन्य वरचेवरी॥ होतां होईल तोंवरी। आपुलींच औषधें चातुरी। उपयोगांत आणावीं खरी। संशोधन करून॥ जो जो शोध आपणांसी। लागला असेल निश्चयेंसी। तो तो सांगावा सर्वांसी। चोरून कशापी ठेवूं नये॥ परी औषध एकादें। उत्तम निघालें जगामधें। त्याचा स्वीकार आनंदें। वैद्यवर्गानें करावा॥ तें परक्याचें म्हणून। अव्हेरूं नये जाण। रोग्याचें दुःखनिवारण। हेंच ध्येय ठेवावें॥ कार्य अध्यापनाचें। त्वां अवश्य करणें साचे। अध्यापन हें ब्राह्मणाचें। श्रेष्ठ कर्म आहे रे॥ फार व्याप वाढवूं नये। शक्तीबाहेर जाऊं नये। विश्रांति घेण्या चुकूं नये। निजशरीर स्वाध्यास्तव॥ अवघ्या साधूसंतांचा। तूं अभिमान वाही साचा। त्यांत लुच्च्या सोद्यांचा। अंतर्भाव करूं नको॥ दांभिक पारखून सोडावे। त्यांच्या न नादीं लागावें। परी दुरुत्तरें न ताडावें। तयांना भर सभेंत॥ दासबोध, ज्ञानेश्वरी। रोज एक एक ओवी तरी। वाचावी कीं अति

आदरीं। नित्य नेम म्हणून॥ परहित साधण्याला। जो जो अडथळा येईल भला। त्या त्या सर्व कृत्याला। हातफळीच देई रे॥ वैद्यकीच्या धंद्यांत। कसूर नसावी यत्किंचित। रुग्ण लोकांची अहोरात्र। काळजी वहावी मानसीं॥ वैद्यकी नाहीं व्यापार। दृष्टि नको नफ्यावर। गोरगरिबां साचार। पैशासाठीं नाडूं नये॥ श्रीभगवान रुक्मिणीरमण। आयुरारोग्य समाधान। सत्यज्ञान तुजकारण। देवो अभ्युदयार्थ॥ हा बोध तुला केला। तो इतरही जनांला। योग्य आहे सेवावयाला। सत्य सत्य त्रिवाचा॥ ”

## जुनें भजन

### १७१.

एकदंत गणनाथ गणाधिप भुवनत्रय सुंदरा।
हे पार्वतिच्या कुमार। हे आद्यपीठ सुखकरा॥
शूर्पकर्ण लघुनयन श्याम ते चमकति जणुं तारका।
कटि पीत पितांबर निका। त्या वरति हेम घंटिका॥
किण किण किण नूपरें झणाणति तव पदिचीं मतिकरा।
तो नाद शांतवी हरा। त्या पूर्ण ब्रह्म शंकरा॥
दासगणू हा तव पदिं नत नित जोडून दोन्ही करा
ये धांवत परमेश्वरा। दे तव चरणीं आसरा॥

### १७२.

ये धांवत गंगाबाई। माझे आई,। कृतपापें विलया नेई॥
त्वा पतित तारिले किती। नाहि त्या मिती।
मग रुसलिस कां मजवरती॥
मी अजाण तव तान्हुलें। पुरवी लळे
शिवप्रिये बया वेल्हाळे॥
हे वृद्धे गोदावरी। पाव लौकरी।
अभिमान गणूचा धरी॥

## १७३.

इंद्रायणिच्या काठी आळंदित समाधि तूं घेतली। ( ज्ञानोबा )
स्वामी तुझी कीर्ति जगीं जाहली॥
पैठण गांवीं रेड्या मुखे तूं वेदाचि बोलविला।
द्विजांचा गर्व सकळ वारिला॥
व्याघ्रावरती बैसून चांगा शरण तुला जैं आला।
तइं तुम्ही चालविले भिंतीला॥
गीतेवरती केली टीका बसुनी प्रवरा तिरीं।
गणु म्हणे माय माझी ज्ञानेश्वरी॥

## १७४.

आरती स्वामीराया रामदासा सदया
परब्रह्मज्ञान मूर्ति शीघ्र दाखवी पाया॥ ध्रु०॥
रुद्र हा अकरावा जन्म जांबेशी बरवा।
सज्जनगडीं राहिलासे अनाथांचा विसावा॥
दासबोध ग्रंथ केला शिष्य कल्याण बोधिला।
निवटुनि माया सारी ज्ञान दीप तो लाविला॥
छत्रपति शिवाजीसी केलें समय विशेषीं।
साह्य श्रीरामदासा आतां पावा गणूसी॥

## १७५.

जय जयाजी महाराज जय जय गुरुबाबा साई।
परब्रह्म अवतार तूं या शतकाच्या ठायीं॥ ध्रु०॥
साई साई वदतां वाचे अघ अवघें विलया।
जाई ऐसा प्रभाव तुमचा हे सद्गुरुराया।
नाहीं शक्ति मजला किमपि तव गुण वानाया।
भाव धरोनी मात्र आलों शरण तुझ्या पाया॥ १॥

हीन दीन मी पापी मोठा तसाच अज्ञानी।
म्हणुनि समर्था देई न मजला कदापि लोटोनी।
आधिभौतिक अध्यात्मिक तैसे अधिदैविक जाणा।
दुःख संकटें वारि समर्था कृपाकटाक्षांनीं ॥ २ ॥

शुकाचार्य तूं होऊन मागें भागवत कथियेलें।
नामामृत तें कबीर होऊन जगता पाजियलें।
शिर्डीत येऊन भ्रम निरसाया तैल जला केलें।
द्वय अंगुष्ठीं गंगा यमुना प्रवाह दाखविले ॥ ३ ॥

भावे चरणीं तव नत होता अघटित तें घडतें।
गांठीं असल्या दुष्कृत तेची सुकृत क्षणीं होतें।
सूर्यागमनीं जसे निशीला दिवसरूप येतें।
दासगणू हा सदैव घाली तुम्हांस दंडवत ते ॥ ४ ॥

## १७६. मनाचे श्लोक

मना लोक हा मूर्ति रे राघवाची।
करीना कदा हेळणा बा तयाची॥
तिन्ही व्यापुनी लोक हे राहिला तो।
जगीं धन्य तो त्यास जो नित्य ध्यातो॥

मना वेद या वर्णितां नेति नेति।
असें बोलतां देव ही भागलेती।
ऋषी तापसी येथ निर्वाच्य झाले।
परी ना कुणा रूप तें पार आलें॥

परी भक्त ते भक्तीनें विठ्ठलाला।
मना कोंडिती चित्तदुर्गात त्याला।
तिथें मात्र हा दास होऊन राही।
गणूदास बोले मना त्यास ध्याई॥

मनावासना दुष्ट ही भ्रष्टविते ।
जशी ती सुरा मद्यप्या नाचविते ।
म्हणोनी अधीं दुष्टशा वासनेला ।
पिटाळूनियां लावीं देशांतराला ॥

मना भूतमात्री सदा प्रेम ठेवी ।
तशी ती मती रामपायीं जडावी ॥
मना नित्य विश्वास नामीं धरावा ।
कदा रे मनीं गर्व ताठा नसावा ॥

मना षड्रिपू दुष्ट ते जाण बापा ।
सदासर्वदा तेच देतात तापा ।
विवेकाग्निनें जाळणें मोहमाया ।
पुढें मोकळा मार्ग मोक्षास जाया ॥

मना शत्रुही मित्र मानीत जावें ।
तयासी सदा गोड वाचे वदावें ।
तयांचा नको डाव चित्तांत ठेवूं ।
कुणाचा नको शब्द लावून घेऊं ॥

मना शब्दसृष्टीमधें ना फसावें ।
सदासर्वदा सार शोधीत जावें ।
मना शब्द ते भक्ति मुक्ती सतासी ।
कदाही न रे पोचवीती नरासी ॥

शरीरा जसे इष्ट अत्यंत पित्त ।
तसे या प्रपंचांत कीं जाण वित्त ।
परी नीति राखून ते मेळवावें ।
मिळाल्यास दैवें न ताठून जावें ॥

सदा संत पायावरी नम्र व्हावें ।
मना नामसंकीर्तनीं तूं रमावें ।
नसावें अभक्तीं कदा आळशी वा ।
गणूचा तुवा बोल हा आयकावा ॥

## १७७. संक्षिप्त उद्धवागमन

वामांकी ज्या हिमनगसुता मस्तकीं जन्हुबाला ॥
कंठी प्रेमें धरि सदय जो मालिका मुंडमाला ॥
वन्हीचक्षू रजनिपति ज्या मौलभागीं विराजे ॥
तो कामारी त्वरित करवो काव्य हें पूर्ण माझें ॥ १ ॥

हे उद्धवा मदिय शांत न चित्त आजी ॥
वस्तू अशी हरपली तरी काय माझी ॥
केला विचार परि कारण तें कळेना ॥
झालें द्विधा मन मुळीं मजला सुचेना ॥ २ ॥

आला जई मजसि अक्रुर न्यावयाला ॥
कंसाकडून सखया व्रजगोकुळाला ॥
तेव्हां व्रजस्थ जन भाविक गोपगोपी ॥
त्या बोलल्या अम्हि न धाडुं हरी कदापि ॥ ३ ॥

तेव्हां मदीय मन जामिन मी तयासी ॥
बा दधिलें म्हणुन तें वसलें व्रजासी ॥
जा ये म्हणून मन घेऊन शीघ्र माझें ॥
हें कोण घेइल शिरीं तुजवीण ओझें ॥ ४ ॥

सांगे प्रणाम शतशा मम नंदताता ॥
आल्हादवी तदिय चित्त कथून वार्ता ॥
येईल धांवत तुला बघतां त्यजून ॥
कृत्यें अखील जननी मम तीच जाण ॥ ५ ॥

धेनू सवत्स बघतां तुजला शिरांनीं ॥
वंदून आणातिल बा नयनांत पाणी ॥
वाणी जरी तुजप्रती नच त्या पुसाया ॥
पाठीवरून फिरवी कर रीझवाया ॥ ६ ॥

घेऊन गोप वनिं गोधन सुप्रभातीं ॥
जातील कंबल शिरीं नव वेत्र हातीं ॥
पावे विठ्या करिं तसें बगलेंत खाजें ॥
होईल तैं स्मरण त्या सकलांस माझें ॥ ७ ॥

संदेश हा म्हणुनि त्या व्रजवासियाला ॥
बा उद्धवा कथि तुं जाऊन गोकुळाला ॥
येईन भेट परतून खचीत घ्याया ॥
मी गोकुलांत तुमचें प्रिय तें कराया ॥ ८ ॥

ऐसा निरोप कथितां तायिं उद्धवासी ॥
आला भरून उर तो असुं लोचनासी ॥
बद्धांजली करून वंदि पदारविंदा ॥
ना एक शब्द वदवे पुढती मुकुंदा ॥ ९ ॥

बोले उद्धव काय हें करिसि तूं बा पंकजाक्षा हरी ॥
आम्हा भक्त तुझे अम्हां असासि तूं कीं वंद्य या भूवरी ॥
खद्योताप्रति काय वंदन करी तो सूर्यनारायण ॥
देवा सांग कधीं तरी, भजत कां कोल्ह्यास पंचानन ॥१०॥

जातो नको स्तवुस या मज पामराला ॥
वृंदावनाप्रति तसें व्रजगोकुळाला ॥
होईल दर्शन मला व्रजवासियांचें ॥
जेणें हरेल अवघें मम पाप साचें ॥ ११ ॥

असें वदुन उद्धवें नमन त्या मुकुंदाप्रती ॥
करून झणि वेंघला निजरथावरी सन्मती ॥
शकून बहु जाहले रथिं बसून जातां पथें ॥
सुवासिनि उभ्या पुढें शिरिं जयाचिया कुंभ ते ॥ १२ ॥

कृतांतभगिनीतटां सघन पादपाच्यापरी ॥
विहंग अपुल्या मुखें वदति कृष्ण राधाहरी ॥
पथां न क्रमितां गुरें सकल कान टौकारुनी ॥
विलोकिति चहूंकडे कुठुन येत ऐसा ध्वनी ॥ १३ ॥

घेऊन वेत्र करिं गोपकुमार त्यासी ॥
ताडावयास बघतां पळती त्वरेंसी ॥
जाऊन येति पुढती परतून मागें ॥
नामामृतांत हरिच्या बहुचित्त रंगें ॥ १४ ॥

असें पाहतां उद्धवा हर्ष झाला ॥
त्यजूनी रथाखालतीं शीघ्र आला ॥
नमस्कारुनी गोप धेनू विहंगा ॥
करें तेथली धूळ लावी निजांगा ॥ १५ ॥

लावावया महिस या पद लाज वाटे ॥
कृष्णा नशीब कळलें मम हें करंटें ॥
ही मृत्तिका असुनि युक्त तुझ्या पदांनीं ॥
ना तीर्थ थोर उरलें जगिं हीजहुनी ॥ १६ ॥

आला असे सरथ उद्धव गोकुळाला ॥
त्या पाहतां जनसमूह चकीत झाला ॥
जोडून गोप कर ते पुसती तयासी ॥
आलांत कोठुन व्रजाप्रति पुण्यरासी ॥ १७ ॥

एक गोप त्यांतला म्हणे मुलांप्रती चला ॥
यासवें न बोलणें उचीत तें गमे मला ॥
यापरीच मागुती अला रथास घेउनी ॥
दुष्ट गोकुळास, जाय रामकृष्ण घेउनी ॥ १८ ॥

असें म्हणुन थुंकती कितिक त्या रथाच्या वरी ॥
कितीक भिरकाविती जड शिला धरूनी करीं ॥
कितीक चढले वरी ध्वज महीस पाडावया ॥
कितीक सरले पुढें तुरग शीघ्र सोडावया ॥ १९ ॥

बोले उद्धव नम्र होऊन अती जोडूनि दोन्ही कर ॥
आलों मी नच न्यावयाप्रति कुणां मानूं नका हो दर ॥
संदेशा कळवावयास मजला मुद्दाम धाडीयलें ॥
कृष्णाच्या तुम्हि देवता सकळ हो कां वेड घेतां बळें ॥ २० ॥

आला श्रीकृष्णाच्या, पारिसुनि नांवास नंद बाहेर ॥
सूर्योदयिंच्या कमला, पाहुन भ्रमरास कां निघे धीर ॥ २१ ॥

कंठा मिठी घालुन उद्धवासी ॥
प्रेमें धरूनी कर आगरासी ॥

उच्चासनीं नेऊन बैसवीला ॥
नंदाप्रती तो अति हर्ष झाला ॥ २२ ॥

हो उद्धवा कुणिकडे चुकलांत वाट ॥
झालें बरें तुम्हि दिली दुबळ्यास भेट ॥
सांगा अधीं कुशल तें मजला हरीचें ॥
होतें तया स्मरण कां कधिं गोकुळाचें ॥ २३ ॥

असेल अगदीं अतां विसरला अम्हांतें हरी ॥
शिरापुरी मिळालिया खचित नाठवे भाकरी ॥
तशांत भरतों अम्ही विकून पोट या गोरसा ॥
दरिद्रि मग मी असा जनक त्या पटावा कसा ॥ २४ ॥

आली यशोदा मग उद्धवासी ॥
वृत्ता पुसाया तयिं ओसरीसी ॥
डोईवरूनी निज पल्लवाला ॥
घे रक्षण्यासी कुलिच्या नयाला ॥ २५ ॥

याया व्रजाप्रति तुम्हां श्रम फार झाले ॥
आहेत कां सुखि वदा मथुरेंत बाळें ॥
खोड्यांमुळें हरिचिया मथुरानिवासी ॥
कंटाळले किति कथा मज पुण्यरासी ॥ २६ ॥

या गोट्या हरिच्या अजून ठिविल्या मी येथ संभाळुनी ॥
केव्हां धाडिल तो निरोप नकळे कीं देई त्या धाडुनी ॥
हा चेंडू, विटि, वेत्र, कंबळ पहा पावा नि हा भोंवरा ॥
हा गाडा करिं घेउनी थयथयां जो नाचला या घरां ॥ २७ ॥

खाई हळूंच हरि चोरून दूध लोणी ॥
चित्तीं बळेंच भय तें मम बाळगोनी ॥
जातां तयास धरण्या उलथी दुधाणें ॥
यांच्याकडे बसत येउन दीनवाणें ॥ २८ ॥

झणीं मजासि दे अमा म्हणुन भूवरी लोळला ॥
असा हरि कधीं तरी अठवितो वदा का मला ॥

तयास मथुरेमध्यें मिळत साय का खावया ॥
मला शिशुच वाटतो बघुं कशास त्याच्या वया ॥ २९ ॥

आले व्रजस्थ जन ते, हां हां म्हणताच नंदवाड्यासी ॥
जेवी वसंत येतां, यावे कोकील सफल आम्रासी ॥ ३० ॥

पेंद्या पुसे अतुरते तयिं उद्धवाला ॥
आलांत सोडुनि कसे तुम्हि कृष्णजीला ॥
येणेंच भाव कळला तुमचा अम्हांसी ॥
द्वीरेफ तोच न त्यजी कधिं जो मधूसी ॥ ३१

असो उद्धवा मित्र त्या कृष्णजीला ॥
मथूरेमधें मत्परी कोण झाला ॥
अजूनी हरी धेनु त्या काननासी ॥
चरायास ने का कथा पुण्यरासी ॥ ३२ ॥

कळप कितिक झाले त्याचिया हो गुरांचे ॥
पय दधि घृत ओपी तो किती रोज साचे ॥
अजुन पद तयाचे वासरें चाटिती का ॥
अशन त्यजुन धेनू येति ऐकून हाका ॥ ३३ ॥

गौळ्या पौळ्या धवल बगळ्या तांबड्या कृष्ण बांड्या ॥
मोऱ्या हण्यों अखुडमुखि हो धेनु त्या लांबतोंड्या ॥
शिंगा शेंड्या अणिक चवके तेविं त चौरगोंडे ॥
वत्साकंठीं कितिक असती बांधिले कृष्ण गंडे ॥ ३४ ॥

सिदामा म्हणे उद्धवा अस्तमानीं ॥
हरी आलिया काननाच्या मधोनी ॥
किती काढिती दृष्ट त्याची स्त्रिया हो ॥
करीं मीठ माती फडे घेउनी हो ॥ ३५ ॥

कितिकदां हरि थैथय नाचला ॥
कितिकदां उखळाप्रति बांधिला ॥
कितिकदां हरिच्या मुरलीरवें ॥
विसरले अशना पशुचे थवे ॥ ३६ ॥

ताज्या शिळया शिदोऱ्या, एक्या ठायीं करून प्रेमानें ॥
केला कां कधिं काला, मथुरेमाजीं वदा मुकुंदानें ॥ ३७ ॥

म्हणे वांकड्या उद्धवा पुण्यराशी ॥
कधी आठवी कां मुरारी आम्हांसी ॥
अम्हीं मारिलें फार येथें तयाला ॥
परी ना हरी रुष्ट केव्हांहि झाला ॥ ३८ ॥

ऐशापरी परिसुनी वच उद्धवाला ॥
झाला अनंद मग बोलत तो तयाला ॥
ना या व्रजासम सुभाग्य तया पुरीचें ॥
रत्नापुढें मुळिच मोल न खापरीचें ॥ ३९ ॥

गोपांनो तुम्हि धन्य या त्रिभुवनीं कृष्णासवें खेळला ॥
योग्यां ना गवसे असा हरि तुम्हीं भक्तीबळें बांधिला ॥
पायाची करितात आस प्रभुच्या योगी, तपी नी मुनी ॥
तीं पद्में तुमच्या व्रजांत फिरलीं धेनूसवें काननीं ॥ ४० ॥

रजनि सरुन गेली बोलतां गोपसंगें ॥
असुरगुरु उदेला शुक्र प्राचीस वेगें ॥
सकल जनमना दे शीतसा सौख्य वारा ॥
झुळुं झुळुं झुळुं वाहे वारण्या ताप सारा ॥ ४१ ॥

प्रातर्विधि करून उद्धव सुप्रभातीं ॥
स्नानार्थ जाय यमुनेवरि हर्ष चित्तीं ॥
चंडोल चास करिती नाभें किल्किलाट ॥
ना मोकळा व्रजवधूविण एक घाट ॥ ४२ ॥

कुंकूम ल्याल्या निजभालीं बाला ॥
वाहून थोडें यमुनाजलाला ॥
प्रेमें मुखानें हरिनाम घेती ॥
गोविंद, दामोदर, माधवेति ॥ ४३ ॥

कुटिलकच शिरींचे सावरी सव्य हातें ॥
निजपदगतिनें जी लाजवी त्या गजातें ॥

कटिवर कर डावा ठेऊनी उद्धवासी ॥
बघुन हळुच राधा बोलली षट्पदासी ॥ ३४ ॥

गाऊं नको रे मधुपा तयाची ॥
कीर्ती अम्हां सन्मुख चावटाची ॥
या त्वाद्गिताचा मथुरापुरींत ॥
होईल बा गौरव गाय तेथ ॥ ४५ ॥

संदेश माझा म्हणशील ऐकों ॥
आहे सुखाची परि येथ शंका ॥
आगीमधें ओतुनि तूप काय ॥
घ्यावा करूनीं अपणां अपाय ॥ ४६ ॥

गोपीवचें करून उद्धव सर्द झाला ॥
येऊनियां झणिं पदीं प्रणिपात केला ॥
तुम्ही व्रजस्थ युवती बहु भाग्यवान ॥
मानीतसे निज तुम्हां यदुराय प्राण ॥ ४७ ॥

ना गोपिनो विसरला हरि गोकुळासी ॥
अन्योक्तिनें मुळीं न द्या तुम्ही दोष त्यासी ॥
केल्या अहेत प्रतिमा तुमच्या पुजाया ॥
त्यानें स्वकीय कुलदैवत कल्पुनिया ॥ ४८ ॥

चंद्रावळी म्हणतसे मग उद्धवासी ॥
खोटें तरी वदुं नका तुम्हि पुण्यरासी ॥
पूजीत जो नित अम्हां प्रतिमामिषानें ॥
कां सोडिला मग वदा व्रजवास त्यानें ॥ ४९ ॥

भृत्यत्व तें बहु कठीण स्विकारल्यास ॥
अंगीं मुळीं नुरतसे बघ सत्य लेश ॥
त्यांतून हा सई मजूर तया खलाचा ॥
गाणार गे निजमुखें स्तुतिपाठ त्याचा ॥ ५९ ॥

सांभाळण्या तदिय बाजु हरी तुम्हांस ॥
देतो पगार किति हो मथुरापुरीस ॥

ज्ञाते असून तुम्हि त्या खललाघव्याला ॥
गेलांत भाळून कसे न कळे अम्हांला ॥ ५१ ॥
हे राधिके, खचित तूं बहु भाग्यशाली ॥
चित्तासवें तव तनू हरिरूप झाली ॥
टाकूनिया जरि तुं बोलसि फार त्याला ॥
येणेंच भाव तव गे उदयास आला ॥ ५२ ॥
कठिण कवच ज्याचें तेंच कीं अंतरांत ॥
अतिशय मृदु राहे न्याय हा या जगांत ॥
अननस फणसाला फार कांटे वरूनी ॥
निघति परि गरे गे गोड त्याच्यामधूनी ॥ ५३ ॥
नुस्ते न भृत्य कळला तुम्हि शिष्य त्याचे ॥
जाळें बरें पसरलें तुम्हि बोलण्याचें ॥
तो शब्दजाल पटु कीं, गुरु या कलेचा ॥
आहे अनूभव अम्हां बहुता दिसांचा ॥ ५४ ॥
उगाळूं नको राधिके कोळशाला ॥
हरी टाकिना गे कधिं दुर्गुणाला ॥
अला पाहुणा गोड त्यासी वदावें ॥
करी तो तिथें काय हें या पुसावें ॥ ५५ ॥
परिसुनी वच त्यांचें उद्धवें हास्य केलें ॥
म्हणत स्थळीं अशा या आपुलें काय चालें ॥
व्रजवधु हरिप्रेमें पूर्ण रंगून गेल्या ॥
लहरि त्यजुन तोया होति ना वेगळाल्या ॥ ५६ ॥
यमनियम कधींही यांनि ना आचरीलें ॥
यजनपूजन तेंही ना करें अल्प झालें ॥
बलगुण स्वरुपाची वाण येथें असून ॥
गणित बघुन प्रेमा श्रीहरी खास प्राण ॥ ५७ ॥
पायांवरी तुमचिया शिर ठेवण्याला ॥
ना योग्य मी म्हणून वाटत लाज माला ॥

तुम्ही कृतार्थ हरिच्या गुणवर्णनानें
वानूं तुम्हांस किति मी अपुल्या मुखानें ॥ ५८ ॥

सासूरवासिण नवी पतिच्या गृहांत ॥
नांदे परी जननिच्या सदनांत चित्त ॥
नांवास तेवि हरि तो मथुरापुरीलां ॥
आहे परी तदिय तें मन गोकुळाला ॥ ५९ ॥

ज्याचें तुम्ही अतुर दर्शन घ्यावयासी ॥
ज्याचे तयार तुम्हि गे गुण वर्णण्यासी ॥
ज्यानें प्रयाण म्हणतां मथुरेंत केलें ॥
तो कृष्ण नित्य तुमच्या हृदयांत खेळे ॥ ६० ॥

असें असुन मानितां विरह तो तयाचा कसा ॥
असे सकल वस्तुच्यावरी पहा तयाचा ठसा ॥
नसे हरिविणें रिता मुळिंच ठाव भूमंडळी ॥
नसे म्हणुनि मानिता मग कसा हरी गोकुळीं ॥ ६१ ॥

राधा म्हणाली मग उद्धवाला ॥
हें ज्ञान का त्या जगदात्मयाला ॥
नाहीं म्हणूनी वद पाठवीला ॥
संदेश त्याने व्रजगोकुळाला ॥ ६२ ॥

वृथा या वेदांता वदुनि वदनातें न शिणवी ॥
तृषा तान्हेल्यांची मृगजल जगीं काय शमवी ॥
शिऱ्यानें बोलाच्या उदर भरतें कां कधितरी ॥
स्त्रियेला चित्रींच्या कधिं न धरतां ये निजकरी ॥ ६३ ॥

अध्यात्म ऐका तुम्हि नित्य त्याचे ॥
आम्हां नको तें कधिंही फुकाचे ॥
त्या शुष्क दृष्टीमधिं अर्थ नाहीं ॥
ना शिणवावें वदना वृथाहि ॥ ६४ ॥

आत्मा जडाच्या करि संगतीला ॥
तेव्हांच कीं तो कळतो जगाला ॥

हें जाणुनिया तुम्हि उद्धवाहो ॥
जें बोलणें तें करणें सुखें हो ॥ ६५ ॥

परिसुनी वच ऐसें राधिकेचे मनांत ॥
मुदित बहुत झाला तेधवां कृष्ण-भक्त ॥
म्हणत सगुणभक्ती श्रेष्ठ आहे हरीची ॥
कपिलहि नच पावे योग्यता गोपिकांची ॥ ६६ ॥

अध्यात्माचें मलरहितसें ज्ञान संपूर्ण व्हाया ॥
बायांनो, हा पथचि तुमचा साधका योग्य जाया ॥
तो आजी मी ग्रहण करुनी मागतों द्या निरोपा ॥
माते जाया परत, न धरा मानसीं अल्प कोपा ॥ ६७ ॥

हो उद्धवा तुम्हि तया मथुरापुरासी ॥
जावोनिया प्रथमतः अमुचें हरीसी ॥
सांगा प्रणाम शतशा कर जोडुनीया ॥
आणी म्हणा चुकुं नकोस व्रजास याया ॥ ६८ ॥

वाणी दिली न विधिनें म्हणुनीच गाया ॥
नंदगृहा बघुनि लागति हुंबराया ॥
त्यांच्यावरी तरि कृपा करण्यास येई ॥
झाल्या त्वदीय विरहें बहु रोड गाई ॥ ६९ ॥

तुझ्या शिशुपणीं जयीं आणि कुलाल ओपावया ॥
नवीन मडकीं तयीं अतुर लोक त्या घ्यावया ॥
अतां न कुणि त्या पुसे प्रतिदिनीं फिरे तो जरी ॥
कधीं म्हणत फोडण्या मडकिं गोकुळीं ये हरी ॥ ७० ॥

सारेंच गोकुळ तुझ्या विरहानलानें ॥
चित्तीं झुरे यमकरीं नच त्यास देणें ॥
केलें तुवां बहुसुखी म्हणती जनाला ॥
तो तूंच कां विसरसी मग गोकुळाला ॥ ७१ ॥

झालें जाणी जनन तव तें चंद्रम्याच्या कुळांत ॥
आणी त्याच्या उलट अगदीं सेविसी काय रीत ॥

अस्ता जातो शशिपरि पुन्हां भेट देतो जगासी ॥
त्या न्यायानें उदय तव तो होऊं दे गोकुळासी ॥ ७१ ॥

द्या साय ही पय दधी नवनीत खाया ॥
द्या ही नवी शिखिपिसें स्वशिरीं धराया ॥
केसाळि द्या करिं तयाप्रति बांधण्यास ॥
येणेंच हृष्ट कधिं होईल ना तयास ॥ ७३ ॥

पेंद्या सिदामा तितुक्यांत आले ॥
आणीकही गोप तसें मिळाले ॥
हो उद्धवा काय तुम्ही निघाला ॥
जायास आतां मथुरापुरीला ॥ ७४ ॥

द्यावी हरीला मन ही शिदोरी ॥
येणें सुखी होईल तो मुरारी ॥
कांकीं तया आवड फार याची ॥
इच्या पुढें ना महती सुधेची ॥ ७५ ॥

सुलभ वट वनींचे जाहले कीं चढाया ॥
श्रम न मुळींच आतां एकमेकां धराया ॥
म्हणुन त्वरित यावें एकदां खेळण्यासी ॥
तव पदयुगलांचा लाभ दे पादपांसी ॥ ७६ ॥

गोपासवें कृष्ण न हें बघूनीं ॥
जाते वनश्री क्षणिं मावळोनीं ॥
दृश्यें अशा या गमते अम्हांला ॥
ती भू पुन्हां इच्छित त्वत्पदांला ॥ ७७ ॥

आयू आहे जगतिं जगण्या तेल जेवी दिव्याला ॥
तेवी रानीं तव उमटल्या पादमुद्रा अम्हांला ॥
वाताघातें पडून धुळ कीं; लागल्या त्या बुजाया ॥
येई वेगें पुनरपि तरी स्पष्ट त्यांना कराया ॥ ७८ ॥

कांहीं असो हलधरासह एक वेळां ॥
येऊन भेट सकलांस तमालनीळा ॥

ही आमुची विनवणी न करी अमान्य ॥
झालों अम्ही तुजविणें जगतांत दीन ॥ ७९ ॥

परिसुनी अशि तेथें उद्धवें गोपवाणी ॥
मुदित बहूत झाला प्रेम त्याचे बघोनी ॥
म्हणत सफल झाला जन्म या बल्लवांचा ॥
विसर नच पडे या श्रीहरीच्या गुणांचा ॥ ८० ॥

ना ध्या दीन असें विशेषण तुम्ही लावूनिया आपणां ॥
गोपांनो भुवनत्रयीं मिळविला तुम्हीच मोठेपणा ॥
जाबाली भृगु गर्ग कौशिक मुनी शांडिल्य पाराशरा ॥
ना ये कीं, तुमची सरी किमपी वा देवादिका किन्नरा ॥ ८१

येतों अतां कथिन मी तुमचा हरीला ॥
संदेश जाउनि तया मथुरापुरीला ॥
नाहीं तुम्हां उभयतांत मुळींच भेद ॥
तो कस्तुरी यदुपती तुम्हि तत्सुगंध ॥ ८२ ॥

कृष्णाप्रती पाहून उद्धवानें ॥
वंदीयले तत्पद आदरानें ॥
ना बोलवे एकहि शब्द त्यासी ॥
तैसेंच झालें कमलावरासी ॥ ८३ ॥

तूं सूर्य गोकुळ तुझा अवघा प्रकाश ॥
तूं तोय गोपगण ते लहरी विशेष ॥
हें दावण्यास्तव गमे मज पाठवीलें ॥
वृंदावना त्वदिय हे उपकार झाले ॥ ८४ ॥

नांवाला मथुरापुरींत तव हें वास्तव्य नारायणा ॥
आहे रंजविण्या व्रजांत वसती तूं गोकुळींच्या जनां ॥
हें सारें कथिलें मला तव मनें जें भेटलें गोकुळीं ॥
जेथें प्राण तिथेंच तें मन वसे येथें न येतें मुळीं ॥ ८५ ॥

हें उद्धवागमन काव्य तुझ्या कृपेनें ॥
झालें पुरें तुजसि तें परमादरानें ॥
अर्पीत ठेवुन तुझ्या पदिं शुद्धभावा ॥
या दीन दासगणुला पदरांत घ्यावा ॥ ८६ ॥

---